SELECTIONS FROM THE GOVERNMENT RECORDS
IN THE ALIENATION OFFICE, POONA.

No. 1004
Date
KHARGPUR

# KAIFIYATS, YADIS, &c.

Containing

HISTORICAL ACCOUNTS OF CERTAIN FAMILIES OF RENOWN IN THE DECCAN AND S. M. COUNTRY UNDER THE MOHAMMEDAN AND MARATHA GOVERNMENTS.

SELECTED BY

**The Late Rao Bahadur Ganesh Chimnáji Vád, B. A.**
Alienation Assistant to the Commissioner C. D., Poona.

AND EDITED BY

PURSHOTAM VISHRAM MAWJEE, J. P., M. R. A. S.

AND

PUBLISHED WITH THE PERMISSION OF THE GOVERNMENT OF BOMBAY

BY

PURSHOTAM VISHRAM MAWJEE, J. P., M. R. A. S.

[Price Rs. 2-2-0.]

Date ---
KHARGPUR

# प्रस्तावना.

इ. स. १८१८ मध्यें पेशवाई नाहींशी होऊन ब्रिटिश सरकारचा अंमल झाल्यानंतर, दक्षिणेंतील जहागिरदार, सरदार, इनामदार ह्यांच्या घराण्यांचा इतिहास व खानदानीची माहिती लिहून घेण्याचा प्रयत्न दक्षिणेंतील पोलिटिकल एजंट ह्यांच्याकडून वेळोवेळीं करण्यांत आला. सदरहू पोलिटिकल एजंट यांनीं, अशा रीतीनें महाराष्ट्रांतील प्रत्येक जुन्या इतिहासप्रसिद्ध घराण्याकडून जी माहिती जमविली आहे, ती " दक्षिणेंतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे " या स्वरूपानें पुणें येथील एलिएनेशन दप्तरांत संग्रहित केलेली आहे. ह्या कैफियती व यादी पेशव्यांच्या अस्सल दप्तरांपैकीं नसून, इ. स. १८१८ नंतर ब्रिटिश अमदानीमध्यें लिहिलेल्या आहेत, हें उघड आहे. या कैफियतींमध्यें महाराष्ट्रांतील बहुतेक इतिहासप्रसिद्ध जुन्या घराण्यांची माहिती असल्यामुळें, त्या मनोरंजक व उपयुक्त आहेत असें जाणून, स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. ह्या सर्व कैफियती केवळ अस्सल कागदांवरून लिहिलेल्या आहेत असें जरी नाहीं, तरी जुन्या माहितगार लोकांकडून मिळविलेली माहिती व कित्येक जुन्या घराण्यांच्या दप्तरांतील अस्सल कागदपत्रांवरून घेतलेली माहिती त्यांत मिळण्यासारखी आहे. ज्या वेळीं या कैफियती लिहिण्यांत आल्या, त्या वेळीं महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें अगदीं अप्रसिद्ध असल्यामुळें व लेखकवर्ग बहुतेक कारकुनी पेशाचा असल्यामुळें, या कैफियतींमध्यें इतिहासदृष्टीच्या उणीवा फार राहिल्या आहेत. एवढेंच नव्हे तर कांहीं कैफियतींमध्यें लेखकांच्या अज्ञानामुळें घडलेले प्रमादही बरेच आहेत. तथापि, या कैफियतींतील एकंदर माहिती अनेक दृष्टींनीं उपयुक्त असल्यामुळें, त्यांची गणना इतिहासाच्या साधनांमध्यें दुय्यम प्रतींत करण्यांस कांहींच हरकत नाहीं. ह्यांवरून दक्षिणेंतील सरदारांच्या बहुतेक घराण्यांची थोडीबहुत माहिती प्रसिद्ध होऊन, ब्रिटिश सरकारचा अंमल झाल्यानंतर त्यांची स्थिति कशी होती त्याचेंही अल्प दिग्दर्शन होतें. या माहितीचा इतिहाससंशोधकांस व सर्वसाधारण लोकांस सारखाच उपयोग होईल अशी आह्मांस उमेद आहे.

ह्या ग्रंथांतील कैफियतींचीं पांच प्रकरणें केलीं आहेत:—१ ल्या प्रकरणांत, मराठे सरदार, २ ऱ्या प्रकरणांत, ब्राह्मण व इतर सरदार, ३ ऱ्या प्रकरणांत, स्वामी व सत्पुरुष, ४ थ्या प्रकरणांत, मुसलमान सरदार व ५ व्या प्रकरणांत, परगणे वतनदार.

मूळ कैफियतींतील भाषा जशीच्या तशीच कायम ठेविली आहे. कित्येक कैफियती फारच अशुद्ध असल्यामुळें त्यांमध्यें व्याकरणदृष्ट्या जरूर तेवढेच फेरफार केले आहेत.

या पुस्तकांत प्रसिद्ध केलेल्या कैफियतींपैकीं बहुतेक घराण्यांच्या हकिकतीच्या कैफियतींचीं इंग्रजी टिपणें सारांशरूपानें या पूर्वींच तयार झालेलीं आहेत, आणि ज्या इतर कैफियती बखरीसारख्या आहेत त्यांचें इंग्रजी भाषांतर पूर्णपणें करणें अशक्य असून त्यांच्या सारांशाचें टिपण देण्यापासून इतिहास वाचणाऱ्या लोकांस फारसा उपयोग होण्यासारखा नाहीं. सबब इंग्रजी सारांश अथवा भाषांतरें या पुस्तकांत दिलीं नाहींत.

# INDEX.



* ERRATUM :—Jadhavrai is a Brahmin Sardar but his name is included through mistake in the list of Maratha Sardars.

No ........
Date ........
KHARGPUR

# अनुक्रमणिका.

---

* **चुकीची दुरुस्तीः**—जाधवराई हे ब्राम्हण सरदार आहेत. चुकीनें त्यांचे नांव मराठे सरदारांच्या यादीमध्यें पडलें आहे.

# दक्षिणेंतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे.

## प्रकरण १ लें.

## मराठे सरदार.

### १ आंगरे.

यादी आंगरे सरखेल यांचे दौलतीची पैदास्ती कोणे दिवसापासून कसी जाली व पुढें कोण पुरुष कसी दौलत करीत आले, त्याचा तपसील. इस्तकबिल शालीवाहन शके १५८० पंधराशें ऐंशी तागायत शालीवाहन शके १७४४ सत्रारों चवेताळीस. सुा इसने अशरीन मयातैन व अलफ छ १४ रमजान ज्येष्ठमासपर्यंत अजमासें एकंदर १६४ वर्षें.

याचा तपसील एकशें चौसष्टीचा

४१ विज(य) दुर्ग, सुवर्णदुर्ग इतकेंच प्रथम संस्थान, त्याची वहिवाट वर्षे.

४७ सुवर्णदुर्ग, विज(य) दुर्ग व कुलाबा संस्थान, याची एकत्र वहिवाट चालली वर्षें.

७६ कुलाबा संस्थान एकच राहिलें. त्याची वहिवाट चालली. एकूण कुलाबा संस्थानास एकंदर आज लग वर्षे १२३ एकशें तेवीस.

१६४

सदरहू एकशें चौसष्ट वर्षांत उपभोग करीत आले त्या पुरुषांचा तपसील:—

४१ विज(य) दुर्ग व सुवर्णदुर्ग संस्थान प्रथम होतें. तितक्याचा उपभोग मूळपुरुष तुकोजी संकपाळ. आंगरवाडी पुण्याचे पश्चिमेस तीन कोसावर. तेथील राहणार, सबब आंगरे नांव पडिलें. ते व त्यांचे पुत्र कान्होजी आंगरे यांणीं केला तीं वर्षे.

४७ संस्थान कुलाबा आल्यावर विज(य)दुर्ग संस्थानसुद्धां उपभोग केला वर्षे.

२० कान्होजी आंगरे.

३ शेकोजी आंगरे दुसरे पुत्र कान्होजीचे.

२ दोन्ही संस्थानें कायम. परंतु उपभोग दोहीकडे दोघांनीं केला. पुत्र कान्होजीचे.

८ तुळाजी आंगरे विज(य)दुर्ग संस्थानी.

२ मानाजी आंगरे कुलाबा संस्थानी.

१२

४७

७६ कुलाबा संस्थान एकलें राहिलें, त्याचा उपभोग केला.

११ मानाजी आंगरे यांची कारकीर्द वर्षें २३. वजा सदरीं विज(य)दुर्ग संस्थानाबराबर उपभोगाचीं लिहिलीं तीं वर्षें १२, बाकीं.

३६ राघोजी आंगरे मानाजीचे पुत्र.

४ मानाजी आंगरे राघोजीचे पुत्र.

१७ बाबुराव आंगरे, येसाजी आंगरे कान्होजीचे लेकवळे, त्याचे पुत्र--याणीं मानाजीस कैदेंत ठेऊन चालविलें.

३॥ मानाजी आंगरे यांणीं फिरोन राज्य केलें.

४॥ राघोजी आंगरे मानाजीचे पुत्र आजतग उपभोग केला व पुढें करीत आहेत.

७६

१६४

या पुरुषांची वहिवाट तपसीलवार जाहिरातींत आल्या गोष्टी त्यांचा शोध, विनायकराव परशराम दिवाणजी यास जुने माहीत'गार' वगैरा आश्रयानें लागल्याप्रमाणें पुढें लिहीत आहेत. व त्याचे पुढें सरखेल यांचा मानमरातब व त्यांस राजानीं दिल्हेलीं राजचिन्हें प्राप्त आहेत तो बयाज लिहिला आहे:—

१ दौलतीस मूळ दरबारांत प्रवेश तुकोजी संकोजी संकपाळ, राहणार प्रांत पुणें या नजीक आंगरवाडीचे, सबब आंगरे हें नांव पडिलें. ते राजधानी सातारा येथें जाऊन, सातारचे राजे शिवाजी याणीं शालिवाहन शके १५६० चे सालापासोन राज्य आक्रमण करण्याचा पाया घातला, आणि राज्याभिषेक शक १५९६ त जाहला. त्या दरबारांत शिवाजीराजे याचे कारकीर्दींत शके १५८० चे सुमारांत जाऊन चाकरीस राहिले. त्यास पंचवीस असामींची सरदारी देऊन सरनोबती देऊन पुढें वाढत वाढत दोनशें असामी करून सुवर्णदुर्ग सुभ्याचे तैनात केलें. तेव्हां तेथेंच तें घर बांधून चाकरी करीत होते. त्यास पुत्र जाले. त्याचें नांव कान्होजी आंगरे. सुवर्णदुर्गास सुभा अचळोजी मोहिते याचा होता, त्याजवळ होते.

१ कान्होजी आंगरे सुवर्णदुर्गास ते कर्ते जाहले. चाकरीस चांगले मर्द जाणून हे हुजूर राज्यापावेतों महशूर जाहले. कांहींका दिवशीं खान जंजीरकर यांणीं सुवर्णदुर्गावर चढाई करून, बाहेर माणूस येण्याची बंदी करून, आंत खावयास गला नाहीं यामुळें किलेकरी बेदिल होऊन, मोहिते याणीं हिमत सोडून किला खान यास देऊं लागले. हें जाणोन आंगरे याणीं हुजूर महाराजाकडे सूचना करून तेथील धोरणावरून मोहिते याचा बंदोबस्त केला, आणि बाहेर येऊन लढाया करून एक वेळ खानाचे फौजेवर हला केला. तेव्हां कान्होजी आंगरे त्याचे हाती सांपडले असतां, रात्रौ युक्तीनें निघोन, पाण्यांतून पोहून..सुवर्ण-

दुर्गांत जाऊन, फिरोन लढाया करून खानाची फौज उठविली. तेव्हां उभयताशीं तहनामा दोस्तीचा ठरून आंगरे याणीं सुवर्णदुर्गचें काम चालविलें. त्याच समयांत संभाजी राजे यांची अफरातफरी जाहली. राज्यावर रामराजे आले. त्याणीं आंगरे यांची मर्दुमी, चाकरी एकनिष्ठ पाहून, आरमारचाही सुभा देऊन, शिक्के सुभा आरमार असे आंगऱ्याचे नांवें दिल्हे. नंतर त्याणीं समुद्रांत स्वारी शिकारी करून बेकौली यासी लढाया करून शिकस्त तरांडीं मारून सरकार किफायत करीत गेले. व त्या प्रांतीं जे राज्यास प्रतिकूल त्यांचा बंदोबस्त करीत गेले. त्यावरून हुजूरची मर्जी आंगरे याजवर दिवसेंदिवस प्रसन्न होत चालिली. पुढें विज(य) दुर्गास राज्याचा सुभा प्रतापराव सेनापती याजकडे होता. त्याजवर शत्रूचे उपराळे होते. तेव्हां कान्होजी आंगरे आपला बंदोबस्त ठेऊन त्याचीही कुमक करीत असत. इतक्यांत शिवाजी राजे शके १६०२ चे शकांत मृत्यु पावले. त्याच सालीं त्याचे पुत्र संभाजी राजे सिंहासनारूढ जाले. त्याणीं आंगरे यांची चाकरी एकनिष्ठ पाहून, कोकणपट्टींत मर्दुमीचे उपराळ्याचें काम पडेल त्याविशीं अखत्यारीनें आंगरे यास हुकूम करीत गेले. त्या समयांत कोकणपट्टींतील किल्ले मोंगलाई वगैरे अमलांतील बहुत आंगरे याणीं लढाया करून घेतले. पुढें शके १६११ चे शकांत अवरंगजेब पातशाहा येऊन संगमेश्वरीं संभाजी राजे यास धरून तुळापूर येथें नेऊन मारिलें. तेव्हां राज्य सर्व अफरातफर जाहलें. आणि झुलपुकारखान व हपसी यांस पातशाहांनीं कोकणपट्टीचे बंदोबस्तास रवाना केलें. त्यांणीं रायगडास घेरा बसविला. तेव्हां संभाजी राजे यांचे बंधु कनिष्ट राजाराम हे तेथून निघोन सर्व मुत्सद्दी कारभारी सरदार सुद्धां चंदी चंदावर प्रांतीं गेले. त्याजबराबर कान्होजी आंगरे यांस बरोबर नेलें होतें. तेथें आंगरे याणीं सेवाचाकरी बहुत केली. इकडे दाहा महिने रायगड लढला. नंतर तह होऊन संभाजी याचे पुत्र शाहू महाराज यांस पातशाहानीं उतरून नेलें. आणि कोकणप्रांतीचा सर्व अंमल घेऊन हपसी व मोगल यांचे हवालीं करून ठेविलें. तिकडे राजाराम याणीं फौज धरून चंदीकडील मुलूख आपले स्वाधीन ठेऊन पादशाहाचे फौजेसीं लढाई स्वारी करून होते. तेव्हां झुलपुकारखान पातशाहानीं चंदीस रवाना केले. त्याणीं वेढा चंदीस घातला. रामराजा फौजसुद्धां तेथून निघोन रांगणा किल्ला शांत तेथें शके १६१८ चे सालीं दाखल जाहले; आणि तमाम देशांतील वगैरे परगणे सोडवीत चालले. कोकण प्रांत सोडवणें तेव्हां कान्होजी आंगरे यांस वस्त्रें व सरखेल असा किताब देऊन कोकणचा सुभा दिल्हा, आणि रवाना केलें. तेव्हां आंगरे याणीं विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग हे घेऊन, तेथें जमाव करून, तमाम कोकणांत स्वारी शिकारी करूं लागले, आणि दुसरे किल्ले घेतले, व अरमार सैन्यानें पाण्यांतील स्वाऱ्या लढाया करूं लागले. पुढें शके १६२४ चे सालीं रामराजा मृत्यु पावले. शके १६२७ चे सालीं औरंगजेब पातशाहा भागानगरीं औरंगाबादेस येऊन मृत्यु पावले. त्याचे शाहाबाज बादशाहाजादे होते. त्यास दिल्हीस राजकारण जलदीचें पडल्यामुळें फौजांसुधां दिल्लीस चालले. ते चमेली नदीपर्यंत गेले. इकडे राजाराम यांची स्त्री व त्यांचे पुत्र शिवाजी राजे व सर्व कारभारी अष्टप्रधान हे एकत्र होऊन

देशीचें राज्य सोडविलें. कोकण आंगरे याणीं सोडविलें. विजयदुर्ग संस्थान केलें व सुवर्णदुर्ग, रत्नागिरी वगैरे किल्ले घेतले. रायगड किल्ला आणीक जंजिरा वगैरे जुजबीं ठिकाणें हपसी याजकडे व कांहीं जुजबीं ठिकाणें कर्नाळा राजकोट वगैरे मोगलाकडे व रेवदंडा वसई फिरंगी याजकडे असीं राहिलीं. बाकी सर्व आंगरे याणीं सोडविलें. प्रांत कुलाबा येथें भिवजी गुजर मराठा होता, त्याजपासोन कुलाबा प्रांत घेऊन, समुद्राचे खडपांत पूर्वी चौकी होती तेथें गडगा घालून, पुढें मजबद किल्ला केला. व प्रांत कर्नाळा येथें डोंगरावर माणिकगड किल्ला बांधिला. व विकटगड राजमाची व कोथळा व विसापूर व लोहगड वगैरे मुलुकसुद्धां किल्ले घेतले. त्यासमंत शाहाजादे चंमल तीरीं गेले. त्याचे कैदेत शाहूराजे संभाजीचे पुत्र होते. त्यास त्याणीं राज्य व चौथाई सरदेशमुखी देशी सातारा पनाळा व सैदापूर विजापूर वगैरे देऊन, वस्त्रें देऊन, या जाग्याचा बंदोबस्त करून आमची कुमक करावी हें सांगून, देशीं रवाना केले. ते देशी आल्यावर ताराबाईचे मनांत राज्य आपण चालवावेंसें घेऊन, घरचे घरांत शाहूराजे यांची पनाळ्यास लढाई जाली. तेव्हां शाहूराजे यांस सर्व मिळोन, ताराबाई पळोन रांगण्यास गेली. ते समयीं कान्होजी आंगरे कोकणांत (होते.) त्याविशीं शाहूराजाचे मनांत दिकत आली, आणि त्यास इशारा न करितां, बहिरोपंत पिंगळे पेशवे फौजेसुद्धां रवाना केले. त्यांची व आंगरे यांची लढाई होऊन, बहिरोपंतास आंगरे याणीं कैद केले. तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांस महाराजानीं आंगरे यांजकडे पाठविलें. त्यांची व आंगरे यांची खातरीनीं बोलणी होऊन, पिंगळे यांस सोडून घेतले, व घाटावरील लोहगड वगैरे किल्ले होते ते राजमंडळाकडे ठेऊन, बाकीचें संस्थान आंगरे यांजकडे चालवावेंसें होऊन, शाहूमहाराजाचे भेटीस गेले. त्यांच्या भेटी जेजुरी मुकामीं जाल्या. राजानीं आंगरे यांची खात्री करून, विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग व कुलाबा विकटगड वगैरे सत्तावीस किल्ले, चौतीस लक्षांचा मुलूख व आरमारचा सुभा व सरखेल हें पद हीं संस्थानचे अक्षयी देऊन कोंकणांत रवाना केलें. तेच समयांत बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाई शके १६३६ चे सुमारांत जाली. कान्होजी आंग्रे यांचे पुत्र

२ पहिले स्त्रीस.
१ शेकोजी आंगरे.
१ संभाजी आंगरे.
—
२

२ दुसरे स्त्रीस.
१ मानाजी आंगरे.
१ तुळाजी आंगरे.
—
२

१ लेकवळे येसाजी आंगरे, धोंडजी आंगरे वगैरे. सदरहूची स्थापना येणेंप्रमाणें केली:-

२ सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग प्रांतिचे कामांत,

१ शेकोजी.

१ तुळाजी.

—

२

२ कुलाबा प्रांतीं ठेविले.

१ संभाजी.

१ मानाजी.

—

२

—

४

१ लेकवळे येसाजी व धोंडजी आंगरे वगैरे ते मानाजी आंगरे यांचे हवालीं. सदरहूप्रमाणें स्थापना केल्यावर शालीवाहन शके १६५२ चे सालीं कान्होजी आंगरे मृत्यु पावले. तीस वर्षे राज्य त्याणीं केलें.

१ शेकोजी आंगरे याणीं कान्होजी आंगरे यांचे मागें तीन वर्षेपर्यंत राज्याचीं वस्त्रें आणोन सरखेली केली. हपसी यांचे आरमार धरून आणिलेवरून कोट घेतला. चौल घेतलें. व इंग्रजी सरकाराशीं तह केला नाहीं. ते मृत्यु पावले. त्यास पुत्र व कन्या नाहीं. त्याचे मागें संभाजी आंगरे यांस वस्त्रें सरखेलचीं जालीं.

१ संभाजी आंगरे याणीं विजयदुर्गाचे संस्थानीं जाऊन तेथील संस्थानची मालकी करूं लागले. कुलाबा संस्थानचा अधिकार मानाजी आंगरे करूं लागले. नंतर कांहीं दिवशीं कुलाबा संस्थानही आपण घ्यावें, हें संभाजी आंगरे याचे चित्तांत येऊन, लढाई करून कुलाब्यावर आले. आरमाराचा वेढा देऊन अलीबाग व हिराकोट आपण घेऊन, लढाई फार केली. तेव्हां मानाजीबावानीं पेशवे यांस लिहून नानासाहेब व आपासाहेब जातीनें फौज घेऊन कुमक मानाजीबावास शालीवाहन शके १६६२ चे सालीं आले. त्याशीं संभाजीबावानीं एक लढाई केली. दुसरे लढाईस पेशवे याणीं तोफेचे मोर्चावर चढाई करून, मोर्चा घेऊन, तुळाजी आगरे यांस धरून नेलें. ती जरब खाऊन संभाजी आंगरे याणीं मानाजी आंगरे यांसीं बोलणें केलें कीं, तुमची व आमची भेट मात्र व्हावी, ह्मणजे आह्मी निघोन जातों. त्यावरून खात्री पाहून, मानाजीबावा किल्ल्याबाहेर येऊन उभयतांच्या भेटी होऊन, कुलाबा संस्थानची मालकी मानाजीबावानीं करावी व विजयदुर्ग संस्थानची संभाजीबावानीं करावीसें ठरून, संभाजीबावानीं कूच करून विजयदुर्गास

गेले. ते समयीं इंग्रजी तरांडीं खांदेरीचे बाऱ्याजवळ जंजिरेकर हपसी याचीं तरांडीं कुमकेस मानाजीबावास आलीं होतीं. त्यांची रवानगी करून, पेशवे यांस राजमाची देऊन त्यांस रवाना केलें व तुळाजी आंगरे यांस सोडून संभाजीबावाकडे दिलें. नंतर कांहीं दिवशीं संभाजी सातारियास गेले. तेव्हां महाराज छत्रपती स्वामीस संभाजीनीं समजाविलें कीं, मानाजी आंगरे आमचे आज्ञेत चालत नाहीन, सबब ते संस्थान आमचे हवाली करावें. महाराजांची आज्ञा झाली कीं, पेशवे कुमकेस गेले तेव्हां तह तुमचा व मानाजीबावाचा जाल्याप्रमाणें विजयदुर्ग संस्थान तुमचेकडे, कुलाबा संस्थान मानाजीबावाकडे याप्रमाणें ठरल्याप्रमाणें उभयतांनीं चालावें. असें सांगोन मानाजी आंगरे यांस वस्त्रे संस्थान कुलाबाची व वजारतमहा हा किताब देऊन संस्थानीं रवाना केलें. शिक्कयांत नांव पेशजी कान्होजी आंगरे यांचे कारकीर्दीत होतें कीं 'शाहू कार्यधुरंधर तुकोजी तनुजन्मना कान्होजी सरखेलस्य मुद्रिकेय विराजते' असाच शिक्का मानाजीबावाचे नांवाचा जाला. व सरखेल अशीं अक्षरें तेथें वजारतमाहास्य अशीं अक्षरें शिक्कयांत जालीं. व संभाजी आंगरे यांसही वस्त्रे होऊन ते विजयदुर्गास गेले. तेथें दोन वर्षेपर्यंत राज्य चालविलें आणि मृत्यु पावले त्यास पुत्र व कन्या नाही. तेव्हां विजयदुर्ग संस्थानचीं वस्त्रें राजाकडून तुळाजी आंगरे यांस जाहलीं.

१ तुळाजी आंगरे सुवर्णदुर्ग विजयदुर्ग संस्थानचें राज्य करीत असतां, अमर्याद वहिवाट पेशवे मुखत्यार राज्याचे कारभारी यांजबरोबर केली; व हिंदूंत ब्राह्मणांस दुःख दिल्हें. व रयतेवर जलेली केली. यास्तव पेशवे यांनी सुभे रामाजी महादेव व मदतीस मानाजी आंगरे यांणीं कंपनी इंग्रज बहादर यांचे मदतीनें लढून, तुळाजी आंगरे यांचें संस्थान दरोबस्त घेऊन त्यास कैदेंत चंदनवंदन येथें ठेऊन तेथे मृत्यु पावले. त्याचा वंश कोणी राहिला नाहीं. बारा पंधरा वर्षे त्याणीं राज्य केलें. थोरले सरखेल यांची प्रथम स्त्री लक्ष्मीबाई होती, ते कुलाब्यास मानाजीबावासुद्धां राहिली.

१ मानाजी आंगरे सातान्यास कान्होजी आंगरे याजबरोबर पेशजी गेले होते. तेव्हां महाराज छत्रपती यांचे आज्ञेवरून शिकारींत वाघ मानाजी आंगरे याणीं हल्ला करून मारिला. तेव्हांपासोन महाराजांची मर्जी मानाजीबावावर चांगली होती. घोड्यावर बसणार व पट्टा खेळणार मर्द चांगले हें ध्यानीं ठेऊन, वस्त्रें पदवीसुधां देऊन, त्यांजवर चांगली कृपा ठेवीत गेले. पुढें वसई घेण्याचे मसलतींत बाजीराव चिमाजीआपा यांस महाराजानीं रवाना केलें. तेव्हां कुमकेस जाण्याविशीं मानाजीबावांस हुकूम केला. त्याप्रमाणें कुमक जाऊन लढाया वगैरे कामांत मेहनत फार केली. तें पेशवे याणीं महाराजाजवळ कळवून याची तारीफ केली. पुढें सन अर्बैन मया व अलफचे सालीं उरण फिरंगी याजकडून घेतलें. नंतर जंजिरेकर खान याजकडील किल्ला उंदेरी वगैरे कुलाबा प्रांतीं होते तेथून संस्थानीं फौज पाठऊन उपराळे करूं लागले. त्यासीं लढाया देऊन त्याजवर जरब ठेऊन त्याजकडील किल्ले कांहीं घेतले.

व सिद्दीसात हपसी चालून आला, त्यास लढाईत ठार मारला. ते समयीं मानाजीबावांस जखम गोळीची मांडींत लागली असतां, हल्ला करून फत्ते केली; व पेशवे याजकडे पेगाम पोचवून आपासाहेबांस कुमकेस आणिलें; व पुढें त्यांचे तर्फेनें रामाजी महादेव यास फौजसुद्धां आणोन, ते व आपण एकत्र होऊन, उंदेरी किल्ला लढोन घेतला. व येसाजी आंगरे हे व धोंडजी आंगरे थोरले सरखेल कान्होजी आंगरे यांचे लेकवळे ते मानाजीबावांचे निसबतीस होते. त्यांस धोंडजी आंगरे यांस कुलाब्यांत हाताखालीं कामांत ठेविले व येसाजी आंगरे यांस पेण परगणे साकसें (?) येथील कामावर ठेविलें. त्याणीं लोक त्यांचे तैनात दिल्हे ते व जास्त ठेऊन बखेडा माजवून, मानाजीबावा मालक त्यास दगाफटका करावा असें मनांत आणून, धोंडजी आंगरे कुलाब्यांत ते व येसाजी मिळोन बखेडा उत्पन्न केला. मानाजीबावांस हें कळतांच मानाजीबावा कुलाब्यांतोन निघोन, रेवदंडा फिरंगी याजकडे होता तेथें जाऊन, आपली लोकसुद्धां मजबुती करून, कुलाब्यांत हल्ल्यानें चढून येऊन, स्वारी करून, धोंडजी आंगरे यांस धरून कैदेंत ठेविलें. येसाजी आंगरे यांस धरून आणिलें. त्यांचे नेत्रही गेले. येसाजीस पुत्र मावजी आंगरे व बाबुराव आंगरे व कन्या पांच व स्त्री याप्रमाणें होती. ते बाहेर मोकळीच होती. तेव्हां येसाजी आंगरे कैदेंत तेथून पळून रेवदंड्यास गेलेवर, त्यांचें कुटुंब बाहेर तेंही त्याजकडे गेलें. पेशवे यांजकडील सुभा रामाजी महादेव पराक्रमी होते. त्याणीं आंगरे याजकडील किल्ल्यास फितुर करून व दग्याफटक्यानें हल्लेकरून पाहाडी किल्ले कांहीं माणिकगड वगैरे घेतले. तें महाराजांस कळल्यावर माणिकगड आंगरे यांस परत देविला. नंतर फिरोन कांहीं दिवशीं रामाजी महादेव याणीं माणिकगड व कोथळा व उरण व पालीही आंगरे यांची घेतलीं. विकटकडहीं सन अर्बा खमसेनांत घेतला. कुलाबा व खांदेरी व सागरगड व हिराकोट हे चार किल्ले मात्र सरखेलकडे राहिले. त्यांतही किल्ले सागरगड येथें रामाजी महादेव दिंमत पेशवे याणीं फितुर करून रात्रौ लोक चढवावयाची माळ लाविली. ते बातमी आंगरे यांस फुटतांच त्यांची माळ तोडून त्याजवर चढाई करून, त्यांची फौज पळविली; आणि आपण खासा स्वारी पुण्यास गेले. कदीम चालीप्रमाणें पेशवे व नानासाहेब सामोरे सवा कोस आले. भेटी होऊन तसेंच पेशवे यांचे वाड्यांत जाऊन बोलणें केलें कीं, "छत्रपती महाराजांबराबर आह्मीं वडिलोपार्जीत राहून बहुत चाकरी करून मुलूख सोडवून महाराजास सोबत दिल्ही. त्याप्रमाणें महाराजांनीं घेतलेले मुलुखापैकीं कायम संस्थान आह्मांस करून दिलें. आह्मीही महाराजांचे चाकरीस एकनिष्ठ वागत असतां, आमचे किल्ले आपण सरदारापासोन घेविले; परंतु आह्मी कांहीं बोललों नाहीं. हल्लीं सागरगडासही फौज रवाना जाली होती. त्यास, आपले सरदारोशीं आह्मीं लढावें हें आह्मांस योग्य नाहीं. सबब कुलाबा संस्थान आपले हवालींकरून घेऊन आमचा बंदोबस्त पुण्यास करून द्यावा. आह्मी येथें राहतों. जात नाहीं." येणेंप्रमाणें बोलणें जाहल्यावर पेशवे बोलले कीं, तुमचे मर्जीस दुःख देऊन आह्मांस कोणची गरज नाहीं. दुसरे बैठकेस येविशीं तुमची खात्री करूं. याप्रमाणें बोलोन मकाणास उतरावयास जाणा

करून मेजवानी पाठविली. फिरोन दुसरे बैठकेस मानाजीबावास बोलाऊन आणून पेशवे याणीं सांगितलें कीं, आज तागायत जाहलें तें जाहलें; यापुढें जे तुमची दौलत राहिली, तिजला कधीं आह्मी किंवा स्वामीचे राज्यांतून कोणी हात लावणार नाहीं. याप्रमाणें बोलले. तेव्हां मानाजीबाबा बोलले कीं, आपली मर्जी आह्मांस कबूल. परंतु दौलतदारीचा खर्च पूर्वीचे लौकिकावर आमचा बहुत, व ठिकाणें किल्ले यांचा खर्च आहे. आणि मुलूक बहुत गेला, खर्च पुरत नाहीं. यास कसें करावें ? तेव्हां पेशवे याणीं एक लक्ष रुपयांत नख्त साठ हजार व भात तीस हजारांचें व कापड दहा हजारांचें याप्रमाणें दरसाल पुण्याहून व आरमाराकरितां सायली सोटे दोनशें वर्षांपैकीं द्यावयाचा ठराव करून, परस्परें मेजवान्या होऊन वस्त्रें अलंकार, हत्ती, घोडे घेऊन, निरोप घेऊन, सरखेल संस्थानीं आले. नंतर पेशवे यांचा लोभ राहून कोणे समयीं सरखेलांवर शत्रूचें संकट किंवा घरफेलानें आलें, तेव्हां पेशवे यांस पत्र लिहिलें असतां, जातीनें किंवा फौज पाठवून उपराळा करीत गेले. व नबाब बंदेगानअली हैदराबादवाले यांचा व पेशवे यांचा बिघाडा होऊन राक्षसभुवनावर लढाई जाली. तेव्हां मानाजी आंगरे यास बरावर नेलें. पुढें तह होऊन नबाबाच्या भेटी जाहल्या. तेव्हां नाना व भाऊ उभयतां पेशवे याणीं आपलमध्यें मानाजीबावास घेऊन, भेटीस जाऊन आपले बरोबर यांची भेट केली. हे जातीनें मर्दानें सबब बराबर नेले. पुढें हपसी जंजिरेकर याजवर मसलत करून रामाजी महादेव यांस पेशवे याणीं पाठविलें. तेव्हां मानाजी आंगरे यांस सांगितल्याप्रमाणें आरमारसुद्धां कुमकेस गेले. पन्नास हजार रुपये खर्चास रोख मानाजी-बावास रामाजी महादेव याणीं दिल्हे. तेथें जाऊन जंजिऱ्यानजीकचे किल्ले लहान बाले किल्ला वगैरे कांहीं घेतले. त्याच संधींत मानाजीबावास बेआरामी जाहली, सबब कुलाब्यास निघोन आले. तेथें जास्त वाखा होऊन पांच सहा दिवसीं मृत्यु पावले. तेव्हां रामाजी महादेव याणीं पुण्यास लेहून मानाजीबावाचे पुत्र राघोजी आंगरे यांचें वय पंचवीस वर्षांचें होतें. त्यांचे नांवें वजारतमहा या पदाचीं वस्त्रें संस्थानचीं आणून रेवदंड्यांत वस्त्रें दिल्हीं.

१ राघोजी आंगरे संस्थानारूढ जाल्यावर संस्थानचा बंदोबस्त नीट ठेऊन हपसी याजवर मोर्चेबंदीस निघोन गेले. कांहीं दिवस मोर्चबंदी होती. इतक्यांत भाऊसाहेब पेशवे पानपतांत गर्दींत गेल्याची बातमी आली, व हपसी जंजीरेकर याणीं कंपनी सरकारांतोन इंग्रजी गलबतें कुमकेस आणिलीं. त्या जरबेनें फौजसुद्धां रामाजी महादेव उठोन गेले. हपसी यांचा व आंगरे यांचा त्याकाळीं घरोबा जाला आंगरेही उठोन आले. येसाजी आंगरे रेवदंड्यास परागंदा होऊन गेले होते; त्यांनीं राघोजी आंगरे यांसी बोलणें लाऊन, दौलतीचे फैलांत आह्मी कधीं पडणार नाहीं; मागील जाली गोष्ट माफ असावी; हा करार केला. तेव्हां पेश-जीची गोष्ट माफ करून कुलाब्यास त्याणीं यावें जावें, याप्रमाणें मोकळीक ठेविली; व पोटास खर्चास मागितलें असतां देत जावें असा क्रम चालता जाहला. त्याप्रमाणें सहकुटुंब येण्याचा

जाण्याचा राबता ठेऊन सुरळीत रीतींने चालू लागले. त्यास येसाजी यांच्या पांच कन्या, त्या पांच ठिकाणीं देशांत दिल्या. पैकीं एक कन्या मैनाबाई आनंदराव शिंदे यांस दिल्ही. पुढें कांहींका दिवशीं येसाजी आंगरे मृत्यु पावले. पुत्र दोघे रेवदंड्यास होते. राघोजी आंगरे संस्थानचे अधिकारी ते नानासाहेब पेशवे यांचे भेटीस गेले. त्यांच्या भेटी पुळ्याचे गणपतीस शिरस्त्याप्रमाणें सत्कारानें सामोरें येऊन जाल्या. चालीप्रमाणें वस्त्रें,हत्ती, घोडा, कंठी शिरपेंच वगैरे बहुत मानानें वस्त्रें व बोलणीं व मेजवान्या परस्परें जाल्या, आणि निरोप घेऊन संस्थानीं आले. नंतर नानासाहेब मृत्यु पावले. यावर माधवरावसाहेब पेशवे यांचे भेटीस पुण्यास गेले. ते एक कोश सामोरें येऊन पूर्व सांप्रदायाप्रमाणें बहुमानयुक्त निरोप देऊन व नेमणुकेपैकीं ऐवज राहिला तो दिल्हा; आणि निरोप देऊन संस्थानीं रवाना केले. पुढें माधवराव यांणीं सन समान सितैनांत राघोजीबावांस पुण्यास बोलाविलें. शिरस्तेप्रमाणें भेटी जाल्यानंतर बोलणीं कामकाजाची होतां, आंगरे यांजवळ पेशवे यांचें बोलणें पडलें कीं, तुमचे घरीं सरखेल हा किताब विजयदुर्ग संस्थानीं व वजारतमहा हा मरातब कुलाबा संस्थानीं चालतो. त्यापैकीं विजयदुर्ग संस्थान सरकारांत घेतल्यामुळें सरखेल हा मरातब राहिला, तो तुह्मीं वडिलोपार्जित सरकारकामांत एक लक्षानें वागणूक केली, सबब तुह्मांस देतों. परंतु तुमचा शिक्का आहे त्यांत "राजाराम कार्यधुरंधर मानाजी तनुजन्मना,राघोजी वजारतमहास्यमुद्रिकेयं विराजते" अशा मरातबाचीं अक्षरें बरावरीचे सरदारीसारखीं चालत आलीं. त्यास पृथ्वींतील हिंदुपद पाछाईतून छत्रपती महाराज यांस मोठी पदवी प्राप्त होत चालली; सबब आतां शिक्क्यांत अक्षरें अशीं घालावी कीं, "राजारामचरणीं सादर मानाजीसुत राघोजी वजारतमहा सरखेल निरंतर" अशीं असावी. यांत महाराज स्वामींचा व आमचा बहुत संतोष. अशा बोलण्यावरून आंगरे यांनीं मान्य करून सरखेलचीं वस्त्रें व मोत्याचा तुरा पेशजीचे सांप्रदायापेक्षां जास्त दिल्हा, तो घेऊन निरोप घेऊन संस्थानीं आले. त्याजवर दोन वर्षे एकदां सालांतून पुण्यास जाऊन येत होते. नंतर सन ईहिंदे सबैनांत विसाजीपंत सरसुभा पेशवे यांचे तर्फेनें कर्नाटकप्रांतीं गेले, त्याजबराबर फौज घेऊन पेशवे यांनीं सांगितल्याप्रमाणें राघोजीबावा गेले. आंगरे याचे स्वार दिंधल्यास खर्चास दरमहा विसाजीपंत देत गेले. पांच चार मास राहून निरोप घेऊन संस्थानीं आले. सन सलास सबैनांत माधवराव यांचा काळ जाला. तेव्हां पेशवेगादीवर नारायणरावसाहेब आले. त्यांचे भेटीस राघोजीबावा सन अर्बा सबैनांत गेले. गणेशखिंडीचे सुमारें पेशवे सामोरें येऊन भेटी जाल्या. दुसरे दिवशीं नारायणराव याजवर गर्दी होऊन मृत्यु पावले. दादासाहेब धनीपणा करूं लागले. त्याणीं शिरस्तेप्रमाणें सन्मान वस्त्रें देऊन आंगरे यांस निरोप दिल्हा. सन खमस सबैनांत साष्टीवर इंग्रजबहाद्दर याची फौज आली. तेव्हां पुण्याहून फौज रवाना जाली. व आंगरे यांसही कुमक जावयाविशीं पत्रें आल्यावरून आंगरे घरसरंजामानिशीं गेले. ते पोंचले नाहींत इतक्यांत साष्टी इंग्रजबहाद्दर याचे फौजेनें सही केली. तेव्हां ते संस्थानीं निघोन आल्यावर विसाजी केशव सरसुभा याणीं वसईस मसलतीकरितां बोलाविल्यावरून वसईस विसा-

जीपंत सरसुभा यांजवर गेले. त्यांचा निरोप घेऊन आंगरे संस्थानीं आले. भाऊसाहेब पानपतचे लढाईंत गर्दीस मिळाले. नंतर तीन वर्षांनीं त्यांचें नांव धारण करून कोणी पुरुष तोतया उत्पन्न होऊन बंड केलें. त्यास कैद करून रत्नागिरीचे किल्ल्यावर माधवराव याणीं ठेविलें होतें. तो, माधवराव मृत्यु पावल्यावर, तेथून तीन वर्षांनीं निघोन फौज धरून, कोकणपट्टी सर करीत राजमाचीचे किल्यावर गेला. तेव्हां पुण्याहून फौजा महादजी शिंदे सुभा येऊन राजमाचीस तोतयाचा मोड जाला. तेथून पळोन पनवेलीस येऊन गलबतांत पांच सातशें माणसानिशीं बसून मुंबईचे बंदरांत गेले असतां, तेथें न उतरतां कुलाबा प्रांतीचे बंदरीं उतरले. हें राघोजीबाबांस कळतांच, आपले कारभारी यास त्याजकडे पाठवून नादाचीं बोलणीं लावून कुलाब्यानजीक आणोन कैद करून कुलाब्यांत ठेऊन पेशवे यांस पत्रें पाठविलीं. इकडे महादजी शिंदे फौजसुद्धां पुण्याकडे जाण्यास बोरघाटानजीक खालापुरास गेले. तेथें कुलाबा प्रांतीं तोतया आल्याची बातमी येतांच, फौजसुद्धां मुकाम करून बाळाराव दिवाण याजबरोबर फौज चार हजार देऊन दुसरे दिवशीं कुलाब्यास दाखल जाहले; आणि आंगरे याजवळ बोलणें चातलें कीं, आमचे हवालीं तोतयास करावें. सरखेल यांचें बोलणें कीं, पेशवे यांजवळ आह्मीच दाखल करूं. परंतु बाळाराव न ऐकत. तेव्हां अडचणीची गोष्ट पडली हें जाणोन तोतयास घेऊन स्वता सरखेल निघाले. बाळाराव यांसही फौजसुद्धां बराबर घेऊन बाळापुरास गेले. तेथें महादजी शिंदे सामोरे येऊन सरखेल यांचा सत्कार करून त्यांचीं यांचीं बोलणीं गोडीचीं होऊन, सारे बरोबरच सन सबा सबैनांत पुण्यास गेले. तेथें सामोरा खडकीचे पुलावर नाना फडणीस येऊन, भेटी होऊन, माधवराव पेशवे लहान वयांत सबब पुरंदरास होते, तेथें सरखेलसुद्धां सर्वजण जाऊन, पेशवे यांची भेट होऊन, कदीम नेमणूक लाख रुपये पावत असे त्यापैकीं दरम्यान चाळीस हजार तहकूब राहून, साठ हजार पावत असे त्याऐवजीं महादजी शिंद्यांचा तैनात मुलूक होता त्यापैकीं प्रगणा हाल्याणें वगैरे गांव उदेपूर पेट्यांतील लावून दिल्हे; व कामकाजाबद्दल माणिकगड किल्ला आंगरे यांचा पूर्वी घेतला तो किल्ला व मुलुक घेतल्यापैकीं एक लक्ष रुपये यांचा मुलूख आंगरे यांस पेशवे यांहीं दिल्हा; व हत्ती, घोडा, अलंकार, वस्त्रें सांप्रदायाप्रमाणें देऊन सरखेल यांची रवानगी संस्थानीं केली.

पुढें सन सलास समानीनांत माधवराव पेशवे यांचे लग्नास माघमासीं सरखेल पुण्यास गेले. तों पेशवे यांस लग्नाची हळद लागली. तेव्हां समोर येण्याचा संकोच पडल्यानें कसें करावें ह्मणोन नाना फडणीस यांचा निरोप सरखेल यास आल्यावर, या समई सामोरें यावयाचें करूं नये, आह्मीच येतों, असा सरखेलांचा निरोप गेला. परंतु पेशवे अंबारींत बसून कुंभारवेशीपर्यंत सामोरें येऊन सरखेल यांस घेऊन गेले. लग्नसमारंभास हैदराबादेहून पोलादजंग आले. त्यांस पेशवे सामोरा चानवडीस गेले. तेव्हां सरखेल यांस बराबर घेऊन गेले. लग्नसंबंधें परस्परें मेजवान्या चालीप्रमाणें होऊन, निरोप घेऊन सरखेल संस्थानीं आले. मावजी व बाबुराव आंगरे यांची बहीण मैनाबाई शिंद्याकडे दिल्ही. तिचे आश्रयानें ते महादजी शिंदे यांजकडे रोजगारास मथुरेचे

मुक्कामीं गेले. तेथें ते दोन घोड्यांनिशीं चाकरी करीत शिंद्याबरोबर पुण्यास येऊन आपला पोटाचा बंदोबस्त संस्थान कुलाबा येथून करून द्यावा हें बोलत गेले. महादजी शिंदे यांस पेशवाईचे चालीप्रमाणें चालावयाचें, सबब हें काम होणार नाहींअसें सांगोन शिलेदारींत त्यांचे दोन चार घोड्यांनीं चालवीत गेले.

सरखेल यांस स्त्रिया चार. त्यांत पहिली स्त्री राजसबाई सातारकर भोसले यांची कन्या. तिचे पोटीं एक कन्या जाली. ते खळोजी शिंदे यांस मौजे आउंध येथें दिल्ही. त्या कन्येस संतान पुढें नाहीं. चौथी स्त्री आनंदीबाई हे सातारकर भोसले यांची कन्या. त्यांचे पोटीं दोन पुत्र जाले. त्यांचीं नांवें मानाजी आंगरे व कान्होजी आंगरे. व एक कन्या जाली. पुढें सन सलास तिसैनांत चैत्र शुद्ध १५ पौर्णिमेस राघोजी आंगरे यांचा काळ जाला. छत्तीस वर्षे राज्य त्यांणीं केलें. त्यांचे मागें मालक मानाजी आंगरे राहिले.

१ मानाजी आंगरे मुख्य. ते दहा वर्षांचे लहान पाहून जयसिंग आंगरे हे राघोजी-बावाचे राखेचे पोटीं जाले ते वयांत थोर होते. त्याणीं संस्थानीं जाफराबादी सोरटी लोक होते ते व कोळी लोक होते ते आपलेकडे मेळऊन घेऊन, राघोजीबावाची स्त्री आनंदीबाई ते कामांत मुख्यत्वें वागत होती व दुसरी स्त्री नर्मदाबाई त्यासुद्धां मानाजीबावा व कान्होजीबावास चौकी पाहरेनिशीं स्वाधीन ठेऊन, दोन कारभारी त्यांचे तरवारी चालवून ठार मारिलें. आणि दौलत आपण चालवूं लागले. तेव्हां आनंदीबाईनीं नाना फडणीस यांस हा मजकूर कळविला. त्यावरून नानानीं जयसिंगास सांगोन पाठविलें कीं,असें तुह्मीं करूं नये. मुलें लहान. बाई मुख्य. त्यांचे आज्ञेंत राहावें. तें ऐकिलें नाहीं.तेव्हां नानानीं माधवराव फडके यांजबरोबर दहा हजार फौज व आरमार देऊन संस्थानीं पाठविलें. त्यांच्यानें बंदोबस्त जाला नाहीं. नऊ महिने लढाई होऊन पुढें तह होऊन, कांहीं मुलुक व पैका घेऊन मानाजीबावास जयसिं-गानें पुण्यास घेऊन यावेंसें ठरवून फडके पुण्यास गेले. परंतु जयसिंग पुण्यास गेले नाहींत. तेव्हां बाईनीं सोरटी जाफराबादी यांस फितावून पैका देऊं करून जयसिंग आंगरे यास कैद करून नाना फडणीस हे मोंगलावर स्वारीस खर्ड्यास गेले होते. तेथें पत्रें पाठविलीं. पत्रें पाहून जवळ गोविंदराव पिंगळे होते त्याजवळ संस्थानचे वकिलासमक्ष बोलले कीं, सरकारांतून काय करावयाचें तें त्याचें त्यांहींच केलें. ठीक जालें. पुढें पुण्यास पेशवे स्वारीहून आल्यावर सन सीत तिसैनांत आश्विनमासीं संस्थानचें पदाधिकाराचीं वस्त्रें बापू अभ्यंकर यांजबराबर मानाजी आंगरे यांचे नांवें पेशवे यांहीं पाठविलीं. त्याप्रमाणें वस्त्रें घेऊन बाईचे मुखत्यारीनें काम संस्थानचे चालत असतां, सोरटी लोकांत फितूर करून जयसिंग आंगरे कैदेंतून पळोन पुण्यास गेले. परंतु नाना फडणीस याणीं कांहीं त्याचें ऐकिलें नाहीं. त्या संधींत माधवराव पेशवे हवेलीवरून उडी टाकून मृत्यु पावले. तेव्हां पेशवे यांचे दौलतींत मोठा बखेडा जाला. शिंदे जबरदस्त जाल्यामुळें नाना फडणीस निघोन सातार्‍यास गेले. त्या संधींत जयसिंग-आंगरे, बाबुराव आंग्रे शिंद्याचे लष्करांत, त्यास मिळोन त्यांचा आज्ञा घेऊन फौज ठेवून कुला-

ऱ्यावर आले. संस्थानी लोकांत फितूर केला. कारभारी यांत कोणी जरबेचा राहिला नाहीं. राघोजी बावाचे वेळचे जे होते, त्यांत कोणी आळ घालीसा नव्हता. ज्याचा तो वेगळा कारभार ओढूं लागल्यानें सर्व कामाचे बंद सुटले. बाई बायको माणूस समंजस होती. परंतु त्यांची जरब फौजेवर पडेना. तेव्हां फौज फितूरून जयसिंगास मिळाली. जयसिंगानीं वेढा कुलाब्यास घालून बंदी केली. तेव्हां आनंदीबाई मृत्यु पावली. मग जयसिंग यांणीं कुलाबा घेऊन बंदोबस्त सर्वांचा करून कोणी ठार मारिलें. कोणी कैद केले. कोणी परागंदा जाले. मानाजीबावा व कान्होजी बावा मालक व त्यांची मातुश्री दुसरी नर्मदाबाई त्यास केवळ स्वाधीन ठेविलें. नंतर बाबुराव आंगरे यांचे व जयसिंगाचे वाकडें पडिलें. तेव्हां मावजी आंगरे व बाबुराव आंगरे याची बहीण मैनाबाई ती आनंदराव शिंदे यास दिल्ही होती, तिचे पोटीं दौलतराव शिंदे जाले. ते महादजी शिंदे यांनीं दत्तपुत्र घेतल्यामुळें त्या गादीचा अधिकार महादजी शिंद्यामागें पावले. पेशवाईचे गादीवर मालक बाजीराव जाले. ते शिंद्याचे स्वाधीन राहिले. त्या संधींत बाबुराव आंगरे यांणीं मसलत संस्थान कुलाब्यावर करून शिबंदी पाठविली. संस्थानीं गादीचीं वस्त्रें घेऊन मानाजी आंगरे होते ते लहान वयांत त्याजला बंदोबस्तांत ठेवून मुख्यत्वें कामांत कारभार जयसिंग आंगरे हे करीत होते. जाफराबादी सोरटी लोक कदीम चाकर होते. परंतु जयसिंगानीं पैका देऊन फितावून आपलेकडे करून घेतलें. तेव्हां फौज कुलाब्याहून जाऊन बाबुराव आंगरे याची फौज शिकस्त करून परत लाविली. नंतर फिरोन बाबुराव याचे तर्फेनें फौज रेवदंड्यास ठेवून तेथील आश्रयानें लढाया करूं लागले. त्याचाही पराभव संस्थानच्या लोकांनीं केला. तेव्हां तिसरे खेपेस दौलतराव शिंदे यांजकडील पलटणें दोन अजम अलीखानसाहेब याजबरावर व स्वार पांचशें बाबुराव याची ठेवणूक तीन हजार फौज पायदळ स्वार याप्रमाणें तोफासुधां घेऊन बराबर मुखत्यार कारभारी हरीपंत भावे हे संस्थानीं येण्यास कुरवडा घाटमाथापावेतों आले. पुण्यास संस्थानचे वकील जाऊन बाजीरावसाहेब व अमृतरावसाहेब व नानाफडणीस यांजवळ बहुत प्रकारें पुढें चालत आल्या सांप्रदायाविशीं बोलणें केलें. तेव्हां पेशवे व नानानी शिंद्याकडे बोलणें घालून घाटमाथा पलटणें बेवीस दिवस महकूब करवून या संस्थानीं बाबुराव यांचा वारसा कसा पुरेल हीं बोलणीं बोलत होते. परंतु शिंद्यांनीं जरबेनें तेविसावे दिवशीं सांगतांच संस्थानचे वकिलास समक्ष पेशवे व नानानीं बोलावून सांगितलें कीं, आतां आमच्यानें रक्षण होत नाहीं, पाहिजे ती तऱ्हा करून या समईं तुह्मीं आपला बचाव करावा. पुढें आमचा हात चालेल तेव्हां तुमची मदत करूं आणि आज तुम्ही येथून निघोन जावें. तेव्हां वकील संस्थानीं आले. बाबुराव यांचीही फौज संस्थानीं दाखल जाली. दोन तीन लढाया संस्थानचे फौजेनें घेतल्या. परंतु पेशवे यांचा आश्रा तुटला व पलटणचा जोर यामुळें संस्थानची फौज शिकस्त खाऊन पेठेंतील किल्ला, हिरा व आलीबाग पलटणांनीं घेऊन कुलाब्यावर मार चालविला. तेव्हां सोरटी लोकाहातीं पैका लागला तो व गलबतें सापडलीं तीं घेऊन निघोन गेले. जयसिंग आंगरे याणीं जरब खाऊन बाबुराव यांचे तर्फेचे कारभारी

हरीपंत भावे यांजवळ बोलणें करून त्याणीं आणशफत केल्यावरून मानाजीबावासुधां भेटीस आले. प्रथम भेटीसच हरीपंतांनीं सर्वांस कैद करून संस्थान काबीज करून कैदेनिशीं माना-जीबावा व जयसिंग यास व दोन तीन दुसरे लेकवळेसुद्धां पुण्यास पाठविलें. तेथें बाबुराव याहीं मानाजीबावास शिंद्याचे लष्करांत वानवडीस कैद आपलेजवळ ठेवून जयसिंग वगैरे यास नग-रास पाठविलें. बिड्या घालून नगरचे किल्ल्यांत ठेविलें. कान्होजी आंगरे व नर्मदाबाई यांस कुलाब्यांत कैदेंत ठेविली. दौलत सर्व जप्त केली. अंगावरील दागिनेसुद्धां घेतले. जयसिंग आंगरे यांची स्त्री व दोन पुत्र हे जंजिरे देरीस गेले. तेथील किल्लेदार याणीं जवळ ठेवून बाबुराव याजवळ बिघडून चालले. मानाजी आंगरे यांस वचन हरिपंतानीं दिल्हें असतां कैदेंत ठेविलें सबब तेथून कैदेंतून परागंदा होऊन अमृतराव पेशवे खडकीवर पडले. त्याचे लष्करांत गेले. तेव्हां शिंद्याचा जोरा फार, पेशवे त्याचे जखेंत; यास्तव अमृतराव यांस जरबेचें सांगणें शिंद्याचे जातांच त्याणीं युक्तीनें मानाजीबावास काढून देऊन दौलतराव शिंद्यांनीं महादजी शिंद्याच्या स्त्रिया कैद करून नगरचे किल्ल्यास नेत होते, त्या मार्गातोन निघोन जाऊन जुने सरदार व फौज जमवून बराबर दावा चालवीत होत्या, त्याचे लष्करांत मानाजीबावास पोचविलें. त्याणीं खात्री करून ठेविले. परंतु, त्या बाया फौजसुद्धां हिंदुस्थानांत जावयाचा बेत करून आंगरे यास चलावें ह्मणाले. तेव्हां याचीं कुटुंबाचीं माणसें अटकेंत, हे लहान, सबब याणीं तें मान्य केलें नाहीं. आणि जुनीं लहान सहान माणसें जमा करून पांचशें शिबंदी ठेवून ताबडतोब निघोन संस्थानाकडे आले. संस्थानीं बाबुराव याचे कारभारी याणीं फौज त्याजवर पाठविली. त्याशीं लढाई करून बाबुराव याची फौज शिकस्त जाली. परंतु किल्ले कोट या सरंजामानें येणार नाहीं. सबब जमाव पोख्त करावा या मसलतीकरितां रेवदंड्याचे आश्रयाचे संधानानें चौकलीस आपले प्रांतीं राहिले. तिकडून बाबुराव यांहीं शिंद्याकडील एक पलटण व एक हजार मोंगल स्वार रवाना केले. ते येऊन स्वार प्रथम लढाईस गेले. ती लढाई मानाजी-बावाची फत्ते होऊन स्वार परत आले. दुसरे दिवशीं पलटण गेलें तेव्हां मानाजीबावाची शिबंदी जरब खाऊन निघोन गेली. मानाजीबावा दहा पांच असामी घेऊन जातीनिशीं रेवदंडा किल्ल्यांत गेले. तो किल्ला पेशवे यांजकडे त्या काळीं किल्ल्यांत शिबंदी वगैरे बंदोबस्त होता. तेव्हां बाबुराव याची फौज परत येऊन पुण्यास पेशवे यांस नेट पोचवून मानाजी आंगरे यास बाबुराव याणीं आपले हस्तगत करून कुलाब्यांत आणून त्याचे सर्व कुटुंब एका घरांत कैदेंत ठेविलें. आणि पुण्यास पेशवे यांसी शिंद्यांनीं सांगोन बाबुराव आंगरे या संस्थानचीं वस्त्रें द्यावयास लष्करांतून पुण्यास पाठविलें असतां बाबुराव याचे बंधु मावजी आंगरे पन्नास पाऊणशें स्वार घेऊन त्यास आडवें होऊन आम्ही वडील असतां तुम्ही वस्त्रें घ्याल तर तरवार चालवूं. याप्रमाणें तंटा केला. तेव्हां बाबुराव फिरोन लष्करांत येऊन सन तिसा तिसैनांत दसऱ्याचे दिवशीं रात्रीचीं वस्त्रें घेण्याचा बेत करून पुण्यास त्यास न कळतां जाऊन वस्त्रें संस्थानचीं घेतलीं. पूर्व चालीपेक्षां शिक्क्यांत सवाई हीं अक्षरें सरखेल पदाअली-

कडे घातली. आणि संस्थान चालूं लागलें. तीन चार वर्षेपर्यंत बखेडा राहून राज्य मानाजी आंगरे याचे नांवें चाललें. पुढें बाबुराव आंगरे याचें नांव चालतें जालें.

१ बाबुराव आंगरे यास संस्थानचीं वस्त्रें जाल्यावर शिंद्याचें लष्कर वानवडीस तेथें त्याचे कामांत वागत होतें. नंतर सर्जेराव घाटगे याचें व बाबुराव याचें वांकडें पडलें. सर्जेराव याची कन्या दौलतराव शिंदे यास दिल्ही यामुळें बाबुराव याणीं चित्तांत बाशा खाऊन सन मयातैनांत संस्थानीं आले. खांदेरी किल्ला तीन वर्षेपर्यंत लढत होता. तिसरे वर्षीं आंत गल्ला वगैरे जिन्नस नाहींसें कळतांच बाबुराव याणीं भवतालीं गलबतें आरमारी ठेविलीं. तेव्हां किल्ला कौलास ठेवून किल्लेदार जयसिंग आंगरे याचा प्रथम पुत्र मुरारजी आंगरे यास घेऊन एक पुत्र व स्त्री जयसिंगाची किल्लासुधां हवालीं केली. नंतर जैसिंग आंगरे यासही संस्थानीं आणून त्याजला ठार मारिलें. बराबर शिबंदी स्वार बहुत आणिल्यानें संस्थान ओढगस्त जालें. कारभारी संस्थान ध्यावयास हरिपंत भावे आले होते. त्याचा ऐवज देणें असतां पैका मागूं लागले. ते देईनात सबब हरिपंतास त्याचे मंडळीसुधां कैद करून खांदेरींत ठेविलें. चार महिने हरिपंतानीं उपोषणें केलीं. तितके दिवसांत संस्थानचीं पागेचीं घोडीं चाळशेंपर्यंत मेलीं. ती शंका मनांत येऊन युक्तीनें बोलणें लाऊन हरिपंताचे घरांत दागिने कापड वगैरे जप्तींत ऐवज सांपडला, त्यासुद्धां पंचवीस हजारांची भरती करून घेतली व पंचवीस हजारांचें खत मुदतीचें घेऊन त्यास सोडिलें. त्यांणीं बाबुराव याची भेट न घेतां निघोन पुण्यास गेले. नंतर परशराम श्रीधर याजपासून पैका कर्जाऊ घेऊन दिवाणगिरी त्यास दिल्ही. पैका घेतल्यावर कारभार त्याजकडे दरकाचें निशाण मात्र चालविलें. आंगरे याची बहीण घाटगे शिलेदार यास दिल्ही होती. ते कारभारांत होते. संस्थानीं ओढ फार जाली तेव्हां बाबुराव शिंद्याचे लष्करांत जावयास पुण्यास गेले. पेशवे बाजीराव यांची मर्जी यावर नाहीं, यामुळें एक महिन्यानंतर भेटले व याचे आदरांत कमीपणा करूं लागले. त्यासहित बाबुराव याचे वडील बंधु मावजी आंगरे उज्जनीस मैनाबाई शिंदे याजवळ होते. ते मृत्यु पावल्याची खबर आली. सबब मावजीचे दोन पुत्र संभाजी व शेकोजी आंगरे यांस येऊन मावजीचे स्त्री काळोसास पुण्यापासून दहा कोसावर तेथें क्रिया केली आणि आउंधास मुकाम करून होते. इतक्यांत यशवंतराव होळकर पुण्यावर आले. त्याचे हुमाल्यावर शिंद्याची फौज आली तेव्हां बाबुराव यास लष्करांत जावयास निरोप व वस्त्रें जालीं. परंतु बाबुराव शिंद्याचे फौजेंत सामील जालें. होळकराचे लढाईत शिंद्याची व पेशवे यांची शिकस्ती होऊन सर्वजण पळाले. बाबुराव संस्थानीं पोहचले. बाजीरावही महाडाकडून रेवदंड्यास येऊन आंगरे भेटीस गेले. व बाळोजी कुंजर पेशवे यांचे कारभारी व निंबाजी भास्कर शिंद्याचे वकील हे कुलाब्यास आले. फौज ठेवून या प्रांतीं पेशवे याणीं रहावें हा घाट करीत होते. परंतु पेशवे तेथें न राहतां वसईस गेले. हरिपंत पूर्वींचे दिवाण कैदेंतोन सुटोन गेले. त्याणीं होळकर याचे दरबारांत पैसाव चांगला करून आंगरे याजवर मसलत केली. तेव्हां

हरिपंताजवळ बहुत प्रकारें लाचार होऊन त्याचे दस्तऐवज वगैरे परत देऊन मसलत त्यांणीं महकूब केली. आंगरे होळकरशाईचे अंमलदारास सामील होऊन चालले हा संशय बाजीराव यास येऊन, इंग्रजीसरकारचे मदतीनें पुणें येथें दाखल जाल्यावर बाबुराव याचे कामांत पुरवणी कमी ठेवीत गेले. सरसुभेदार खंडेराव रास्ते याणीं मागील तेढ काढून माणिकगड तालुक्यांतील कांहीं मुलकांत जप्ती पाठविली. मग पुण्यास बोलणें करून ते मोकळीक करून घेतली. व इंग्रजसरकारचें मुंबईहून सांगणें पडलें कीं अरमार जाऊन लोकांचीं गलबतें जबरदस्तीनें लुटून आणितात तें आणूं नये. त्यावरून अरमार बंद जालें. यामुळें जंजिरे खांदेरी येथें खुटवा घेण्याची चाल होती ते अरमारचे जरबेविना येईना सबब तेही बंद जाली. एक लाख रुपयाचें उत्पन्न कमी जालें. वडील बंधू मानजी आंगरे याचे पुत्र संभाजी व शेकोजी हे कुलाब्यास बाबुराव याजवळ होते. त्यांणीं लोकांत फितूर करून बाबुराव यास मारून आपण दौलत आटोपावी असा बेत केला. तो मनसुबा भेद होऊन बाबुराव यास कळतांच ते सारे फितुरी लोकसुधां संभाजीस कैद केलें. आणि त्यापैकीं कोणी कारणी ते ठार मारून, कांहीं दिवस तसेंच बंदोबस्तानें जवळ बाळगून जवळ ठेवावें तें चांगलें नाहीं, सबब पत्रें देऊन उज्जनीस मैनाबाईकडे वहा घोड्यानिशीं पाठविलें. मैनाबाईनीं दौलतराव यास भेटवून उज्जनीची मामलत देविली. शेकोजी व बायका बाबुराव याजवळ राहिले. मानाजी व कान्होजी आंगरे याची सावत्र मातुश्री नर्मदाबाई याणीं बाबुराव याजवळ बहुत प्रकारें खात्री करून उभयतांचीं लग्नें करून घेतलीं. पुढें सनसबा मयातैनांत मुरारजी आंगरे मुंबईस त्याचे तर्फेनें बच्या सोनार जाफराबादेस जाऊन पांच सातशें सोरटी घेऊन संस्थानावर आला. आंगरे याचे मेहुणे घाटगे ते फौज घेऊन त्याजवर नेले. ते शिकस्ती खाऊन पळोन गेले. दुसरे दिवशीं सोरटी याणीं पेठ अलीबाग व हिराकोट घेऊन मुलकांत जप्ती केली. व कुलाब्यावर हल्ला करावयाचें योजिलें. सोरटी येणार हें पूर्वीं कळल्यावरून बाबुराव याणीं मुंबईस बोलणार पाठविलें. व पुण्यास खंडेराव रास्ते यास लिहिलें. परंतु मुंबईहून उपराळा जाला नाहीं. तुमचे कामांत आम्हीं पडावें असा तुमचा आमचा संबंध नाहीं असें उत्तर मुंबईहून जालें. खंडेराव याणीं पांचशें लोक पाठविले ते हिरा सोरट्यानीं घेतल्यावर आले. त्यांस सोरट्यानीं लढाई करून शिकस्त केले आणि दुसरे दिवशीं तोफांची मारागिरी हिऱ्यावरून कुलाब्यावर चालविली. तेव्हां तोफेचे आवाज कुलाब्यास कशाचे होतात या शोधास मुंबईहून अजम हेलडी साहेबाकडून एक चपराशी पढावावर कुलाब्यांत येऊन शोध विचारून गेला. तेच दिवशीं बिनायकराव परशराम दिवाणजी यास बाबुराव आंगरे यांहीं मुंबईस रवाना केलें. त्याणीं धोंडोपंत नित्सुरे लोहगडवाले यास बराबर घेऊन अजम हेलडी साहेबाचे विद्यमानें मेहरबान अजम डंकनसाहेब जनराल बहाद्दर यांची भेट घेऊन जालें हरद्र सांगोन ये समयीं कुमक करून बचाव करावा हें बोलणें केलें. त्यास जनराल साहेबीं उत्तर केलें कीं तुमचे कजांत आम्ही पडत नाहीं. नंतर फिरोन दिवाणजीनीं हरद्र संकटाचें समजाविलें. तीन वेळ एक दिवसांत भेट जाली. तिसरे वेळेस कोंसलदार व जनरल साहेब एक घटकापर्यंत पसार करीत करीत

बोलोन विचार ठरऊन नंतर नक्षा काढून दिवाणजीस माहिती विचारून, आम्ही आपल्या दोन बोटी देतों तुम्ही बोटीवर बसोन जावें. दोन साहेब बोटीवर देतों. तेथें जाऊन जाफराबादी लोक तुह्मांवर येणार नाहींत इतका मात्र बंदोबस्त तूर्त करितील. नंतर हा मजकूर कळला त्यास लेहूं. तेथून कुमक येईल तसें करूं. तेव्हां दिवाणजीनीं विचारिलें जे, इतक्या आश्रयानें आमचा बचाव जाला. परंतु बाहेरून लष्कर आणून त्याचें पारिपत्य करूं येविशीं रुकार असावा. त्यास येविशीं आमची मनाई नाहीं असें बोलणें होऊन बोट एक घेऊन विनायकराव दिवाणजी कुलाब्यास आले. दुसरे दिवशीं दुसरी बोट उंदेरीस होती तेथून दाखल जाली. त्या जरबेनें बाबुराव याचा बचाव जाला. परंतु सोरटी लोकांनीं सारा मुलूक जप्त केला, यामुळें किल्ल्यांत अडचण पडली. त्यांत पाणी नाहीं व दारू नाहीं. तेव्हां फिरोन विनायकराव दिवाणजीस पाठवून मेहेरबान डंकनसाहेब जनरल बहाद्दर यासी बोलणें केल्यावरून पाण्याचीं पिपें सरकारांतून कांहीं देविलीं. दारू खरेदी नेण्यास कांहीं परवानगी एकदा दिल्ही आणि जनरल साहेबानीं दिवाणजीस सांगितलें कीं, मुरारजी कुभांड करितो यापासून तुमचा बचाव आह्मी करितों. परंतु मानाजी आंगरे तुमचे कैदेंत त्यास आपलेजवळ खुलासा ठेवावें आणि ते तुह्मास राजी हें त्याचें पत्र घेऊन पाठवावें. हें नदरेनें पहावयाबद्दल धोंडोपंत लोहगडवाले यास इकडील तर्फेनें तुह्मी बराबर घेऊन जावें. त्याप्रमाणें कबूल करून संस्थानीं येऊन धोंडोपंताची रूबरू करून मानाजी आंगरे यांचें राजीपत्र जनरालसाहेबाचे नांवें धोंडोपंताजवळ देऊन रवाना केलें. पेशवे यांसही कुमकेविशीं लिहिलें होतें. त्याणीं त्रिंबकजी डेंगळे याचे तर्फेचा सरदार व कांहीं फौज कुमक पाठविली. ती रेवदंड्यास येऊन बसली. फौज जाफरी होती व लढण्याची परवानगी नव्हती यामुळें त्याच्यानें कांहीं जाहलें नाहीं. खंडेराव रास्ते याजवळही बोलणें आमचें कामांत पडावें हें बाबुराव याणीं केलें होतें. परंतु पेशवे याची मर्जी आंगरे व रास्ते दोघाविशीं ठीकशी नाहीं. हें पाहून कामांत कसें पडावें हा विचार रास्ते करीत होते. त्या संधींत कलकत्याचा हुकूम आला कीं, मुरारजी आपले इंग्रजी जाग्यांत राहून दुसरे याजवर जाजती करितो व पेशवे यांचें कायम मकाण त्यास इजा देतो; सबब त्याचें पारिपत्य पेशवे यांचे रुकारानें इंग्रजी सरकारांतून करावें. अशा अन्वयाचा किंवा कांहीं कमजास्त हुकूम आला. त्यावरून अजम कर्नल क्लोज यांहीं पेशवे यांस विचारिलें. आपण पारिपत्य जाफराबादीचें करावें. अगर आह्मास सांगावें. तेव्हां बाजीराव यास पारिपत्य करणें जरूर जालें आणि आम्हीच करितों असें कबूल केलें. परंतु आपण फौज न पाठवितां खंडेराव रास्ते यासच हुकूम केला. तेव्हां खंडेराव यांचीं तयारी होतीच. फौज पाठवून सोरटी यांचें पारिपत्य करून कौल देऊन काढून दिलें. बच्या सोनार यास धरून बाबुराव याजकडे कुलाब्यांत पाठविलें. त्याच समयीं बाबुराव यांहीं बच्यास ठार मारिलें. परंतु इंग्रजी सरदार बोटीवर जवळ होते. त्याचे बचावानें हें सारें अर्थसाध्य जालें असतां त्यास इतल्लाही केला नाहीं. यामुळें जनराल साहेबीं वकिलाजवळ बाबुराव

यास शब्द लाविला. इंग्रजी बोटी मुंबईस रवाना केल्या. दरम्यान विनायकराव दिवाणजीशीं जनरल साहेबाचें बोलणें जालें होतें कीं, तुमचा खिसा आह्मीं मोकळा केल्यास खांदेरी किल्ला कंपनी सरकारांत तुम्हीं द्यावा. तेथें दांडी बांधाव-याची आहे. परंतु दोन महिनेयाचा वायदा. कलकत्यास लेहून हुकूम येईल तसें सांगूं. हें बोलणें जालें होतें. त्यास बाबुराव लष्करांत जातात हा निरोप घ्यावयास विनायकराव यास मुंबईस गेले, तेव्हां निरोप देऊन खांदेरी घेण्याविशीं कलकत्याचा हुकूम जाला नाहीं हें सांगितलें. या समयांत खंडेराव रास्ते जातीनें कुलाब्यास येऊन आंगरे यांचीं बोलणीं होऊन लाख रुपये रास्ते याचें देणें जालें सबब संस्थान त्याचे हवालीं केलें व इनामी गांव दिले. माणिकगड किल्ला मागावा हा करार प्रथम नव्हता. परंतु रास्ते यांणीं समयीं भीड घालून घेतला. पेशवे यांचा सरदार आले त्यास पेशवे यांचीं पत्रें येऊन दहा हजाराचे गांव पेशवे यांणीं सरकारांत घेऊन ते लोक उठोन गेले. सरासरी पंचवीस हजाराचा मुलूख पेशवे व रास्तेसुद्धां त्या समयांत संस्थानचा गुंतला. संस्थानीं बहुत ओढ जाली. रास्ते यांचें देणें सबब संस्थान रास्ते याचे स्वाधीन करणें प्राप्त आलें. व दौलतराव शिंदे यांचींही पत्रें बोलावण्याचीं आलीं होतीं. सबब रास्ते यांचे कारभारीयाचे हाताखालीं आपले मेहुणे घाटगे व परशराम श्रीधर दिवाणजी यांस ठेविलें. आणि विनायकराव परशराम दिवाणजी त्या समयांत इंग्रजी सरकारचे दरबारांत वगैरे मेहनत केली. सबब स्वारीची दिवाणगिरी व पालखी व अफ्तागीर वगैरे देऊन त्यास बराबर नेलें. स्वारींत कारभारास मुख्त्यार रास्ते यांचे तर्फेचे कारभारी व फौज त्याची व कांहीं घरची घेऊन लष्करांत निघोन मानाजी व कान्होजी आंगरे आपले स्वाधीन असावें जाणोन तेही बराबर घेतले. पुणेयास बाजीराव निरोप देतील न देतील या दिकतीकारितां परभारें लष्करांत जातां मार्गीं शिंद्याचे महालीं वगैरे महालीं साधलें तेथें खंडण्या घेत चालले. हे बोभाट जाऊन शिंद्यास चांगलें वाटलें नाहीं. ताकीदपत्रेंही आलीं. तिकडे संभाजी आंगरे यांजकडे उज्जनची मामलत त्यांणीं रयतेस जुलूम करून पैका घेऊं लागले. व सरकारी पैका वसूल न देत व ज्याच्या नेमणुका त्यासही पैसा देईनात. यावरून दोन पलटणें व पांचशें स्वार संभाजी आंगरे यांचे जप्तीस आले. तेव्हां याची कुमक करावी ह्मणोन बाबुराव यास पत्रें संभाजीचीं महेश्वर मुक्कामीं येतांच रातोरात एक दिवसांत चाळीस कोस उज्जनीस दोनशें स्वारानिशीं गेले. तेथें याचे भिडेनें जप्तीस आले. ते उगेच राहिले. आणि आंगरे यांणीं पत्रें शिंद्यास पाठविलीं कीं, मामलत बहाल राहील तरी लष्करांत आम्ही येतों, नाहीं तर परत जातों. तेव्हां मामलत बहाल करून जप्ती उठऊन नेली. नंतर आंगरे यांणी सावकारा वगैरे मंडळीस कर्जपैका मागावयाच्या निकडी केल्या. हातीं आलें तें घेतलें आणि लष्करांत गेले. हे बोभाट जाऊन शिंद्याची मर्जी चांगली राहिली नाहीं. पुढें भेटी होऊन दौलतीचा कारभार आंगरे यांणीं चालवावा हीं बोलणीं होऊन कामास लागले. परंतु कामांत आळा न पडतां बोभाट जाला.

धरणीं फौजेचीं बसलीं. तेव्हां कदीमचे कारभाऱ्याचे हातें काम चालवून सरदारीदाखल आंगरे यास शिंद्यानीं ठेविलें. मुरारजी मुंबईस, त्याचा बंदोबस्त असावा येविशीं इंग्रजी सरकारचे वकील लष्करांत, त्याजवळ आंगरे याचें बोलणें विनायकराव दिवाणजी घेऊन गेले. त्यांणीं जनरलसाहेबाचा जाब आणवून त्याप्रमाणें करूं असें सांगोन जाब आणवून मुरारजीस खावयास अडीचशें रुपये दरमहा देत जावा ह्मणजे त्याचा बंदोबस्त इंग्रजी सरकारांतून ठेऊं याप्रमाणें बंदोबस्त ठरवून दिल्हा. अजम मेहेरबान साहेब अलफिस्टन बहादर व अजम मरसन साहेब व जे साहेब त्या स्वारींत आले त्यांच्या भेटी जाफत शिंद्याचे योगें आंगरे यासी त्या स्वारींत जाऊन उज्जनची मामलत संभाजी आंगरे यांजकडे त्याचें व मैनाबाई शिंदे उज्जनीस याचें वांकडें येऊन त्यापासून संभाजी आंगरे वेगळे राहिले. बाबुराव व मैनाबाईचा एक विचार होऊन संभाजीकडील मामलत बाबुराव यांहीं आपलेकडे घेण्याविशीं शिंद्याचीं पत्रें करून घेतलीं आणि मैनाबाईकडे पाठविलीं. तीं संभाजीचे बंधु उजनीस त्यांणीं मान्य न करितां बाईचे तर्फेचे अमलावर तोफा वगैरे शिबंदी पाठऊन सख्तीनें अंमल चालवूं लागले. तेव्हां फार जिकीरीचीं पत्रें बाईचीं लष्करांत आल्यावर बाबुराव यांणीं विनायक परशराम दिवाणजी यांस ते कामावर रवाना केलें. त्यांणीं संभाजीपासून अंमल घेतला. बाबुराव लष्करांत. त्याजवळ रास्ते यांची फौज होती त्यामुळें व मनस्वी खर्चामुळें ओढ फार जाहली. शिंदे यांजकडून खर्च पुरेना. थोडा खर्च ठेवा ह्मणत तें हे ऐकतना. याजमुळें दोघाचें चित्त निर्मळ राहिलें नाहीं. मग रास्ते यांचे फौजेनें धरणें देऊन सख्तीचा तगादा केला. पलटण शिंद्याचें आणून उठवून लाविलें. शिंदे याची भेट फार थोडी होऊं लागली, खर्चास थोडें येऊं लागलें, तेव्हां येथें राहूं नये असें चित्तांत येऊन लग्न कन्येचें होणें या निमित्यानें निरोप घेऊन उजनीस आले. लग्नें दोन कन्येचीं करून वर्षांनंतर शिंद्याचे मुलीचे लग्नास लष्करांत फिरोन जाऊन तेथें सहा मास राहिले. त्याजकडून याजविशीं अनादर पडूं लागलासें पाहून व लष्करांत बेआरामी फार जाहली सबब उजनीस आले. येथें येऊन रयतेवर पट्टी लग्नखर्चाबद्दल केली व रयतेस जलेली केली. हे बोभाट शिंद्याकडे जाऊन मामलतीस जप्ती येणार हें वकिलानीं लिहिलें. त्याजवरून विनायकराव दिवाणजी यास लष्करांत ग्वालेर मुक्कामीं पाठवून तेथील जाबसाल करून शिंद्याची मर्जी साफ करून दिवाणजीस वस्त्रें शिंद्यानीं दिल्हीं व आंगरे यांस पन्नास हजार रुपये खर्चास व लष्करांतून व बलमपौर्चे वगैरे घेऊन आले. उज्जनीस आले. नंतर एक वर्ष राहिले. संस्थान रास्ते याजकडे कर्जांत गुंतलें. लष्करी फौजेंतून शिंदे याहीं दोन लक्ष रुपये कर्जाऐवजीं लाऊन दिल्हे. परंतु खर्चाचा पैसा गुंतोन राहिला. जातीचा खर्च भारी त्या मुबदल्यास खर्च जाला. रास्ते यास रद्द कर्ज होईना. संस्थानीं खर्च फार. जमा थोडी. तेव्हां खंडेराव यांणीं विचार केला कीं, रद्द कर्ज आपलें होय ती युक्ति करावी. संस्थान ओढग्रस्त हे येऊन जालें. आपल्यास काय? तेव्हां आंगरे यांचे मेहुणे संस्थानीं त्यास

तोड याची विचारली. त्याच्यानें न होय तेव्हां परशराम दिवाणजीस पुण्यास नेऊन संस्थान तुह्मीं आटपावें आणि आमचा पैका फिटे तें करावें. याप्रमाणें घाट ठरवून दिवाणजीनीं आंगरे याचा रुकार संतोषानें आला तो आणून, चार हाताखालीं आणखी घेऊन रास्ते याचा फडशा तोडजोडीनें सावकाराकडून केला. तें रद्द कर्ज करण्यानें संस्थानीं ओढ फार पडली व पदरचे मंडळीसही थोडें पोचूं लागलें. परंतु आंगरे याचें काम होऊन संस्थान मोकळें जाहलें. इतक्या संधींत खंडेराव रास्ते यांचा काळ जाला. राहिला पैका तात्याचे मागें दिवाणजीनीं त्याचे पुत्रास आदा केला. मग फिरोन बोभाट लष्करांत नेमणूकवाले वगैरे रयतेचे जाऊन पत्रें आल्यावरून आंगरे यास वाईट वाटून आह्मास संस्थानीं जाण्यास निरोप द्यावा हें पत्र पाठविलें. तेव्हां शिंद्याचें पत्र निक्षून आलें कीं, वैशाखमास हल्लीं आहे तों लौकर निघोन जावें. पुढें परजन्य येतो सबब लौकर जावें. हें पत्र पाहतांच आंगरे याची मर्जी ठीक राहिली नाहीं. वकिलाचीं पत्रें आलीं कीं तुह्मांवर वराता पलटणच्या होणार व मामलतीचे घालमेलीच्या सनदा जाहल्या. तेव्हां मैनाबाई उजनीस त्याचे विचारें येथें राहूं नयेसें ठरून विनायकराव दिवाणजीचे विद्यमानें कर्ज काढून संस्थानीं यावयास निघाले. ते जांबगांवास पावले. बरसात फार व बेअरामी सबब तेथेंच मुक्काम केला. माणिकगड किल्ला व त्याखालीं मुलूख तो रास्ते याचे वडील पुत्र गोपाळराव रास्ते याजकडे त्याची रयतेस जलेली व संस्थानासीं बिघडून चालले सबब परशरामपंत दिवाणजी पुण्यास गेले. रास्ते यास समजोन सांगतां दाजी रास्ते खंडेराव याचे पुत्र लहान, त्याचे कारभारी बाळाजीपंत नातू वगैरे खंडेराव याचे कारकीर्दींतील माहीत त्यांणीं दिवाणजी सांगतील तसें चालावयाचें याप्रमाणें सांगितलें. गोपाळराव वादास उभे राहून रास्ते याचे कारभारी व दिवाणजीस धरावें अशी तऱ्हा करूं लागले. त्यास आश्रय सदाशिव माणकेश्वर देऊं लागले तेव्हां पेशवेसरकारांतून कोणाचा बंदोबस्त होईल न होईल हा निवाडा ध्यानीं येईना. हें चित्तांत आणून दिवाणजीनीं निश्चय केला कीं, इंग्रजी सरकार हे ईश्वरी अंशाप्रमाणें चालीचे. याचे पदरीं आपण पडिल्यानें आपलें व आपले खावंदाचें कल्याण होईल व वाजवी निवाडा याच जागीं होईल, असा निश्चय करून अजम मेहेरबान अलफिष्टन साहेबबहादर यांची भेट घेऊन मजकूर समजाविला. साहेबबाहादर यास या कामावांचून कांहीं दरकार नव्हती, परंतु थोरपणाकरितां मजकूर ऐकोन घेऊन पेशवेसरकारांत सांगोन चिंतोपंत देशमुख याजकडे पंचायत सांगितली. तेथें बोलणें होतां गोपाळराव स्वतः उठोन दिवाणजीचे कारकुनाचे तोंडांत मारली. कारकुनानें जास्त न करितां घरीं येऊन दिवाणजीनीं साहेबबहादर यांस कळविलें. मग साहेबानीं या कामाची पंचाईत चौघे मिळऊन स्वतः केली. पांच सहा मास फार इजा पडली. परंतु साफ निवाडा रास्त करून नंतर कसें जाहलें तत्राप रास्ते, आंगरे याचे कामास आले हें थोरपणानें मनांत आणून, त्याचेविशीं दिवाणजीशीं समजोन सांगोन त्याचे मंडळीसुद्धां त्यास नेहमीं इनाम उभयतां पुत्रांस करून देऊन, त्याचा पैका

निघाला तो ठरऊन, राहिला मुलुक व किल्ला माणिकगड संस्थानाकडे दिल्हा. जामगांवाहून विनायकराव दिवाणजी पुण्यास येऊन साहेबबहादर यास भेटून, आंगरे याची तबियतीचा हवाल व आंगरे यास बरें वाईट तर आज्ञास इजा पावेल वगैरे सांगोन फिरोन जामगांवीं गेले. तों सन अर्बा अशरीनांत आंगरे याचा काळ जामगांवीं जाला. बरोबर त्याचीं कुटुंबें व मानाजी व कानोजी आंगरे वगैरा मंडळ होतें. त्यास मानाजी आंगरे याणीं बाबुराव याची क्रिया केली आणि बैदाबखेडा होऊं पावेल सबब कामांत विनायकराव दिवाणजी होते त्यांणीं बंदोबस्त ठेऊन सर्व खटलें संस्थानीं घेऊन आले. आणि दरबारांत संस्थानचें चांगलें व्हावें हें बोलणें चालऊन जें होईल तें जेव्हाचे तेव्हां सर्वास व आधिपत्य बाबुराव याची स्त्री काशीबाई याचें राहिलें. त्यास कळवून त्याचे हुकुमांत चालत असतां आंगरे याचे मेहुणे घाटगे होते त्यांणीं व एक दोन आणखी त्यास मिळोन बाईस समजाविलें कीं, दिवाणजीचा पैका स्वारीसमंधें व रस्तेसमंधें कमकसर सवा लक्ष रुपये देणें. पेशवे किंवा इंग्रज याचे घरांत संस्थान घालावें, हीं बोलणीं बोलतात यास्तव याजला कैद करावें. त्यास साधन सदाशिव माणकेश्वर याचा रुकार आणिला. आणि दिवाणजीची मंडळी व कुटुंबें कैद करून विनायकराव यांस जंजिरे खांदेरीस अटकेस ठेविलें. रकम भाव सर्व जप्ती करून नेली, व मानाजी आंगरे यास बाबुराव याणीं लष्करांत नेलें होतें ते बरोबरच आले. त्यास कुलाब्यास कुटुंब कैदेंत फिरोन ठेऊन पंधरा रुपये दरमहा दर खाशे माणसास नख्त कापड मुदपाखसुधा नेमणूक देऊं लागले. तेव्हां दिवाणजीचे कारकून खुद्द आपलें नुकसान करितील या संशयाकरितां पुण्यास ठेविले होते. त्याणीं अजम मेहेरबान अलफिष्टन साहेबबहादर यास जाला वाका अर्ज केल्यावरून दिवाणजी कांहीं दरबारांत वांकडें बोलले नाहींत. हा जुलूम त्याजवर असें दिलांत येऊन पेशवेसरकारांत पेगाम पोचऊन तेथील ताकिदीनें दिवाणजीस खुलासा होऊन आजपासून आम्हीं आपली चाकरी सोडली, बरतर्फीचे विडे द्यावे हें बोलोन बाईपासून घाटगे याचे विद्यमानें विडे घेऊन पुण्यास गेले. नंतर साहेबबहादर याची मुलाकत जाहली. दिवाणजी कायम आहेत हे व पुढें होईल दिवाणजीचा वंश याजवर ये हसान साहेबबहादर याहीं कंपनीसरकारांतून केलें. मुलाकत जाहल्यावर दिवाणजीस सांगितलें जें, संस्थान पेशवे यांचे ताबेंतील, सबब संस्थानसमंधें पेशवे करितील तें होईल. तुमचा पैका देणे तो वाजवी कोण मालक होईल तो देईलच. इतकें सांगोन दिवाणजीचे सालसीवर मेहेरनजर ठेवीत गेले. तिकडे संभाजी आंगरे याहीं शिंदे याचीं पत्रें पेशव्यांस घेऊन पुण्यास आले. पेशवे यांणीं दिवाणजीस बोलाऊन बहुत खातरी करून सांगितलें कीं, संस्थानीचीं वस्त्रें कोणास द्यावयाचीं हा निर्णय होऊन द्यावयाचीं. त्यास तूर्त तुम्ही संस्थानीं जाऊन कारस्थानानें किल्ले कोट आपले हवालीं होत असें करून सरकारांत कळवावें. त्याप्रमाणें विनायकराव दिवाणजींनीं शिबंदीसुद्धां संस्थानीं जाण्याची तयारी केली. मानाजी आंगरे याचे इशारे दिवाणजीस आले कीं

आमचा उपयोग करावा व संभाजी आंगरे याचे बोलणार येऊन लोभ दाखऊन दिवाणजीशीं आमचे कामांत पडावें व खर्चास द्यावें. काम आमचें न जाहल्यास परत देऊं. आमचीं वस्त्रें घेऊन जावीं वगैरा खात्री दाखऊन बोलों लागले. त्यास पेशवे यांचे मर्जीअन्वयें आम्हांस चालावें लागेल, वस्त्रें आम्ही घेत नाहीं, खर्चास तुम्हांस देऊं, काम न जाहल्यास आमचा ऐवज द्यावा, याप्रमाणें त्यास सांगोन पेशवे यांस इतला करून विनायकराव संस्थानीं येऊन युक्तीनें संस्थानची आटप किल्ले कोटसुद्धां करून पेशवे यांस कळवितांच सन खमस अशरांत श्रावणमासीं मानाजी आंगरे यास वजारतमाहा सरखेल या पदाचीं वस्त्रें व सनदा हुजरे यांज-बराबर संस्थानीं पाठविलीं. संभाजी आंगरे याची भेट दिवाणजीचे विद्यमानें पेशवे यांची एक वेळ होऊन सदाशिव माणकेश्वर कारभारी याचे मुखें संभाजीस सांगितलें कीं, या दौलतीचा वारसा मानाजी आंगरे याचा· कांहीं कारणामुळें बाबुराव यास वस्त्रें जालीं तीं ते जिवंत तों-पर्यंत केलें तसें निभाविलें. तुमचे विस्ताराचा समंध नाहीं, हें सांगितलें. तेव्हां संभाजी आंगरे याहीं दिवाणजीस सांगून खर्चास मागून दिवाणजीची मेजवानी घेऊन पैका देणें तो लष्करां-तून पाठऊं असा करार करून शिंद्याचे लष्करांत गेले. पस्तीस हजार रुपये दिवाणजीचे मार-फतीचें देणें राहिलें. बाबुराव यांणीं सोळा वर्षें व त्यांचे स्त्रीनें एक वर्ष एकूण सतरा वर्षें संस्थान चालविलें. पुढें मालक संस्थानीं मानाजी आंगरे जाले. बाबुराव यांस पुत्र नाहीं.

१ मानाजी आंगरे संस्थानारूढ जाहल्यावर कारभार विनायकराव दिवाणजी करीत असतां, तीन महिन्यानंतर बाबुराव आंगरे यांची स्त्री काशीबाई त्याचे बंदोबस्ताविशीं मानाजी-बावाशीं रदबदल करून चालत आल्याप्रमाणें जातीचा बंदोबस्त पालखी, घोडी, रथ वगैरा इतमाम कायम करविला. परंतु त्याजविशीं जुने मंडळींनीं मानाजीबावाचे मनांत संशय आणिला कीं, दिवाणजी बाबुराव याजवळ होते, हे आपले लक्षांत चालतील न चालतील. याजवरून दिवाणजीची गेरत दरबारांत केली. त्याजवरून दिवाणजी पुण्यास पेशवे व इंग्रजी सरकारचे कृपेची वृद्धि राहावी याबद्दल पुण्यास होते त्यास कळलें. तेव्हां संस्थानीं एक दोन बखेडे जाहले. ते दिवाणजीचे ध्यानीं येतांच बखेडे मोडून पुण्याहून मानाजीबावाकडे जाऊन ज्या तन्हेनें त्याची खात्री होय ते करून, बाबुराव यांचे स्त्रीचें चालत आल्याप्रमाणें चालविलें. आठ महिने मानाजीबावाचे दिलांत मळ दिवाणजीविशीं होता, ते साफ होऊन पेशवे यास इतला दिवाणजींनीं देऊन फिरोन कोणी कुभांडी मालकाचें नांव करून दरम्यान दिवाणजीचा बोभाट सांगितलि सबब पेशवे यास विनंती करून त्याचे खासगींतील कारकून मानाजीबावाकडे पाठऊन विचारिलें. तेव्हां दिवाणजीचा आमचा बेमिलाफ असें सांगितलें. संस्थानचीं वस्त्रें द्यावयाचीं ठरलीं. तेव्हां खांदेरी किल्ला व दाहा हजार रुपयांचा मुलूक द्यावयाचा पेशवे यांस कबूल केल्याप्रमाणें दिल्हा. मानाजीबावाचे कनिष्ठ बंधु कानोजी आंगरे यांस एक वर्ष वाखा होता ते मृत्यु पावले. सन सबा. अशरांत मानाजी आंगरे पेशवे याचे भेटीस पुण्यास जाऊन चैत्रमासीं पेशवे कोत्रुडचे बागेजवळ सामोरे

येऊन भेटी होऊन तेच दिवशीं सरखेल यास दिवाणजीसुद्धां नेण्यास कोत्रुडास बोलाऊन सरखेल व दिवाणजीस वस्त्रें दिल्हीं. नंतर पांच चार भेटी सरखेलच्या होऊन बोलणीं साफीचीं जाहलीं. तेव्हां खांदेरी किल्ला संस्थानाकडे परत द्यावा हीं बोलणीं सरखेल बोलले. उत्तम आहे हें पेशवे बोलले. दिवाणजीचा त्याचा एक विचार पाहून पेशवे यांसही संतोष जाला. पुढें कंपनीसरकार व पेशवे यांचे दोस्तींत कमी आल्या-मुळें पुण्यासभवतीं पलटणें जाऊन साफीचा तहनामा जाला. त्या घालमेलीमुळें पेशवे यांची मर्जी त्या कामांत गुंतल्यामुळें आंगरे यांचे भेटीस अडचण पडूं लागली. व मेजवानी पेशवे यांस होणें ते तूर्त करूं नये हें सांगितलें. तेव्हां मर्जीचा रुख पाहून सरखेलनीं सांगून पाठ-विलें कीं, दिवाणजीस येथें ठेऊन आह्मी संस्थानीं जातों. त्याजवरून शुक्रवारचे वाड्यांत भोज-नास सरखेलीस पेशवे यांहीं बोलाऊन निरोप दिल्हा. तेव्हां गेल्यापासून चौथे महिन्यांत सरखे-लची स्वारी संस्थानीं आली. दिवाणजी पुण्यास राहिले. तेथें आबा पुरंदरे यांचे मारफतीनें संस्थानाविशीं कुभांड दरम्यान उभें राहिलें. त्याचा बंदोबस्त दिवाणजीनीं दरबारचे मर्जीनें तेथें राखिला. पुढें अश्विनमासीं निरोपसमयीं सरखेल याजवळ बोलणेंयांत आल्याप्रमाणें खांदेरी किल्ला परत मुलुकसुद्धां देण्याच्या सनदा देऊन परत दिल्हा. व रेवदंडा तालुका येथील मामलत दिवाणजीचे नांवें करून दिल्ही. हा भेद दिवाणजीस कांहीं ठाऊक नाहीं, परंतु दिवाणजीचे मनांत जसी ईश्वराजवळ साफ चालावें, तसेंच कंपनीसरकारामुळें आपण कल्याण पावलों, सबब तेथें साफ चालावें हा भाव खचित चित्ताचा हमेशा, यास्तव इतल्ला मेहेरबान अजम अलफिष्टन साहेबबहादर यांस दिल्हा. पुढें बाजीरावसाहेब यांहीं कंपनीसरकारशीं बिघाड अश्विन वद्य एकादशीस केला. ते रात्रीस पर्वतीवर बाजीराव यांचा मुक्काम, तेथें दिवा-णजीनीं जाऊन संस्थानचे बचावास्तव निरोप मागितला असतां, जाऊं नये आमचे लष्करांत राहावें हें सांगणें पडलें. त्याप्रमाणें लष्करांत राहिले. मग पेशवे याणीं मनांत आणिलें कीं, दिवाणजी कंपनीसरकारचे लक्षांतील. यास आपले कामांत गुतवावें ह्मणजे तिकडील लक्ष कमी पडेल. जाणोन अवचीतगड व उंदेरी वगैरा मामलती सांगितल्या. तेव्हां हा भाव दिवाणजीस सर्व कळला परंतु कबूल केलें. कार्तिक शुद्ध अष्टमी रविवारीं लढाईत शिकस्त पाऊन पेशवे रात्रौ निघोन चालले. दीड कोशावर दिवाणजीनीं पेशवे यांस इतल्ला करून व साहेबबहादर याजकडे पुण्यास कारकून रवाना करून आपण निघोन संस्थानीं येऊन पेशवे यांचे किल्ले दरम्यान कोणाचे हातीं जाऊं पावेनात असा बंदोबस्त ठेऊन कच्चा इतल्ला मुंबईस अजम मेहे-रबान जनराल साहेबास दिल्हा. तेथोन पत्र दिवाणजीस हुशारी देऊन आलें. इतक्यांत मानाजी आंगरे यांस एकाएकीं एक दिवस व्राख होऊन दिवाणजी रेवदंड्यास बंदोबस्ताकारितां गेले होते त्यास बोलावणें पाठविलें. ते येत तों मानाजीबावा मृत्यु पावले. तेव्हां कुटुंबाचीं माणसें सरखेल साहेबाचीं सर्व बहुत दुःखित जालीं. त्याचे पुत्र राघोजी आंगरे तेव्हां बारावे वर्षाचे सुमारांत व पेशवे राज्यांत बेदा याजमुळें सर्वांस संकट पडलें. संस्थानचीं वस्त्रें नसलीं तर एखादें कुभांड

करील जाणोन महाराज छत्रपती स्वामी व बाजीराव एकत्र फिरत होते. यास्तव तेथून वस्त्रें आणून मुंबईस इतल्ला जनरल साहेबास करून राघोजी आंगरे संस्थानारूढ जाले. साडे तीन वर्षे राज्य मानाजीबावानीं केलें. दिवाणजींनीं मानाजीबावा सरखेल कायम असतां सरखेल याचे विचारें थोरले सरखेल राघोजी आंगरे यांणीं छत्तीस वर्षे राज्य चालविलें. तो पाया चांगले रीतीविषयीं धरून कामाचा क्रम चालविला, व मागील कारकीर्दीचे परागंदा होऊन गेले व संकटांत होते त्यांस आणून सर्व दरक पेशजीचेप्रमाणें ज्याचे त्यास दिल्हे. ज्यांणीं मानाजीबावाविषयीं पूर्वील कारकीर्दीत बखेडे केले त्याणींही कौल मागितले त्यास देऊन पोटास देऊन त्याचे बंदोबस्त करून दिल्हे.

१. राघोजी आंगरे संस्थानारूढ जाहल्यावर संस्थानचें काम चालतें जाहालें. परंतु बाजीराव यांचा कंपनीसरकाराशीं बिघाड राहून बैदा चालला होता तेव्हां दिवाणजींचे हवालीं बाजीराव यांणीं केले ते जनराल साहेबाचे हुकुमाप्रमाणें इंग्रजी सरकारचे ताबे जाहाले व अजम कर्नेल फरोदर फौज घेऊन पाली, तळगड, भोरप वगैरा किल्ले घ्यावयास आले. तेव्हां संस्थानीं लिहून आल्याप्रमाणें लोक शिबंदसुद्धां सामील राहात गेले. कंपिनीसरकाराशीं रुजू राहून चालींत अंतर न केल्यामुळें कंपनीसरकारची मर्जी संस्थानिकावर व दिवाणजीवर चांगली राहात गेली. इतक्यांत महाराज छत्रपती यांस स्थापून बैद्याचा बंदोबस्तही कंपनीसरकारांतून जाला. सरखेल वयानें लहान सबब त्याची मातुश्री गजराबाईसाहेब व मानाजीबावाची सावत्र मातुश्री नरमदाबाईसाहेब हीं एक जागां एक चित्तें राहून आपलें घरचालीप्रमाणें चालत आल्याप्रमाणें सर्व कुटुंबाचा आळा करून दौलतीचें काम रोज बेरोज आपण समजोन घेऊन दिवाणजीविषयीं विश्वास व कंपनीसरकारचा सर्व प्रकारें भरंवसा ठेऊन काम चालविलें. व सरखेलसाहेब यास लिहिणें व शस्त्रविद्या वगैरा यांत तयारी करीत चालले. मग दुसरे वर्षी सन तिसा अशरांत सरखेलसाहेबाचें लग्न जाहालें. जनराल साहेबांनीं मुलूक मोबदल्या प्रकर्णीकरितां अजम उइलिमसाहेब यास पाठविलें. ते शादींत सामल होते व शादीचें बोलावणें होतें सबब संस्थानिकावर मेहेरनजर याजमुळें अजम पिलसाहेब व अजम रीटसाहेब यांस शादीचे समारंभाकरितां जनरालसाहेबानीं रवाना केलें. त्याजवरून सरखेल साहेबाचे खानदानाचे माणसास बहुत खर्च जाला. समारंभ चांगला जाला. दिवाणजीविषयीं सरखेलचीं खानदानचीं माणसें व बाईसाहेब कामांत त्याची मर्जी बहाल राहून त्याचे जातीचा सरंजाम वगैरे नेहमींचा बंदोबस्त आंगरे सरकारांतून करून त्याविषयीं मेहेरबान अलफिष्टनसाहेबबहादर यांस लेहून त्याजकडून कंपनीसरकारतर्फेनें खात्री दिवाणजीची करविली. रेवदंडा मुक्कामीं दिवाणजी जाऊन सदरीं लिहिले ते त्रिवर्ग साहेब यांमध्यें दिवाणजीचीं बोलणीं मुलूक मोबदल्याचीं जाहलीं. इंग्रजी सरकारांतून मुंबईहून सरखेलसाहेब यास बिलोरी झाडें वगैरा पाठविलीं. पुढें अजम मेहेरबान बंदेगान अली अलफिष्टनसाहेब जनराल बहादर यांचें येणें मुंबईस जाहलें. तेव्हां सरखेलसाहेबांनीं विनायकराव दिवाणजीस पाठऊन मुलाकत

करून संस्थानाविषयीं मेहेरनजर जाहिरात आल्यानें सर्व बेंदे बखेडे दूर होऊन संस्थानचें काम सुरळीत चालू होऊन दौलत खराब घरतंट्यानें जाहाली, तिचा बंदोबस्त होत चालला. कदीम वडिलाचे वेळचीं माणसें सर्व दरकावर कायम जाहालीं. दिवसेंदिवस सरखेलसाहेब घोडेस्वारी व हत्यार व लिहिणें वगैरा चालींत तयार होत जाऊन कामकाजाचा कित्ता मोहर दसकत वगैरा स्वहस्तें करण्याचा राबिता ठेऊन माहितीस मजबुदी होत चालली. कंपनीसरकारचे मेहेरनजरेचे वृद्धीविषयीं दरसाल दिवाणजीस मुंबईस पाठऊन कंपनीसरकारानीं सरखेलसाहेबाची वृद्धि व्हावी हें ध्यानीं आणून संस्थान व कंपनीसरकार या दरम्यान कसी चाल राहावी याविषयीं तहनामा ठरावांत आणिला. हल्लीं सरखेलसाहेब सोळा वर्षांचे वयांत येऊन उभयतां बायांचें लक्ष धरून, रोज बेरोज काम समजोन घेऊन, दिवाणजीचे हातें काम घेऊन सर्व खानदानाचीं माणसें त्यांचा गौरव त्यांचे दरजाप्रमाणे चालऊन कंपनीसरकारचा भरंवसा सर्व प्रकारें ठेऊन उपभोग संस्थानचा करीत आहेत.

आंगरे वजारतमहा सरखेल यांस मानमरातब वगैराचीं चिन्हें पेशवे यांचे घरीं चालत आलीं.

१ भेटीस एक कोस सामोरें येऊन वहानाखालीं उतरून गाशावर भेटून समागमें आपले मकानास उजवे बाजूस घेऊन जाऊन विडे देऊन मकानास जावयास निरोप द्यावा आणि मेजवानी पाठवावी.

१ उभयतांची बैठक जाहल्यास खडी ताजीम घेऊन गालीचावर मध्यें दोन तकीये ठेऊन उभयतां एका गालीचावर बसावें.

१ आंगरे यांचे निशाणावर शंखाचें चिन्ह.
१ झेंडा भगवे कापडाचा व ढाल भगवीच.
१ बहुमान करणें तो सरकारतर्फेचा आंगरे यांस.

१ वस्त्रें पांच.
१ कंठी मोत्याची.
१ घोडा.
१ शिरपेंच जडावी.
१ मोत्याचा तुरा.
१ हत्ती.
१ भोजनास बोलवावें.

---

१ सरखेलनीं मेजवानी केली असतां त्याचे मकानीं जाऊन घ्यावी.
१ राजकीय दिल्हेलीं चिन्हें.

१ पदाचा मरातब सदरीं लिहिला आहे.

१ मोरचेलें दोन पाछाईतून दिल्लीहून महादजी शिंदे यांहीं आणिलीं.

१ सोन्याच्या काठ्या चोपदारास.

१ जरीपटका.

१ साहेबनौबत हत्तीवरील.

.१ चौघडा.

१ लगी भरजरी दोन जिभाची.

सदरहू योग्यतेस योग्य तितकीं चिन्हें चालवावींसें चालत आहे.

१ स्वतः राजे छत्रपती महाराज वस्त्रें देत गेले तेव्हां एक चादर जास्त देत गेले.

सदरहूप्रमाणें बखर अजम वार्डनसाहेब तरजुमा मुनसीखाना यास छ २४ रमजान सन खमस अशरीन जेष्ठ वद्य ११ शके १७४४ त दिल्ही असे.

---

## २ कदम बांडे.

कैफियत भास्करराव वगैरे इसम तीन व कृष्णराव वगैरे इसम तीन कदम बांडे यांजकडे मौजे कोपरली व ठाणें व रनाळें, तिन्ही गांव कसे चालतात, याची सनदपत्र काय आहे, वहिवाट कशी, याचा दाखला लिहून पाठवावयासी हुकूम आला. त्यास सनदापत्रें तों बंडांत गेलीं; पुर्जा राहिला नाहीं, परंतु संपादन करणार कोण व हल्लीं खाणार कोण, इनामी किंवा कसें, विल्हे कोणी, याची माहिती आहे. तो मजकूरः—

१ कसबे रनाळें मूळ संपादन करणार अमृतराव कदम बांडे हे प्रथम विजापुरास होते. पादशाहापाशीं शिलेदारीची चाकरी करीत असतां दरम्यान कांहीं वांकडें जाल्यामुळें जातीनशीं सडे निघोन सातान्यास छत्रपती महाराजांचें कुटुंब ताराबाई राज्याचा कारभार करून होते त्यांची भेट घेतली. त्यांनीं मर्द माणूस पाहून, गंगेचे पलीकडे मोंगलाई अमलांत मोकासा आपला आहे, तो कायम करण्याविशीं सांगून रवाना केलें. त्याप्रमाणें यांणीं अंमल नंदुरबार, सुलतानपूर आदिकरून ज्याहमर्दीनें बसविले, आणि आपण कुकुडमुंढ्यास राहिले. पुढें कांहीं गैरचालीनें चालूं लागले ह्मणून मोंगलानीं बोभाट छत्रपतीकडे सांगितला. तेथून बांड्यास हुकूम आला तो मानिला नाहीं. त्याजवरून सरकार इतराजी होऊन दाहा हजार फौज येऊन कुकुडमुंढ्यास मोर्चे लाविले. दोन महिने लढाई झाली. पुढें खावयास नाहीं सबब कुटुंबें घोड्यावर पाठीशीं बांधून, सरकारचे मोर्चे उठवून निघोन निखलवाहाल माहालीं उंबराण्याची बांड्याची पाटीलकी होती तेथें येऊन राहिले. मागाहून सरकारी सरंजाम तेथें येऊन मोर्चे

लाविले. तीन दिवस लढाई होऊन गोळी लागून अमृतराम कदम ठार जाले. मागें त्यांचे चिरंजीव सवाई त्रिंबकराव कदम एक वर्षाचे होते. व सखे बंधू संताजी कदम व चुलत चुलत बंधू रघोजी कदम वगैरे त्रिवर्ग बंधू पराक्रमी मर्द मनुष्य जाणोन, सेनापती दाभाडे यांनीं सरकारांत अर्ज करून याजला हुजूर बोलावून, परगणे नंदुरबार येथील निमे मोकासा व परमणे सुलतानपूर येथील मोकासा दरोबस्त चाकरीचे पोटीं लावून देऊन दोनशें स्वारांनिशीं सरकारांत असावें असा करार करून घेतला; आणि गुजराथप्रांतीं अंमल बसविण्यास पाठविले. त्यावरून पंचवीस तीस हजार फौज ठेऊन गुजराथ सर करून रनाळें मुक्कामीं आले. नंतर शाहू महाराजांची कन्या गजराबाई रघोजीबावाचे कनिष्ठ चिरंजीव मल्हारराव कदम यास दिल्ही. नंतर मागती गुजराथ प्रांतीं गेले. पुढें छत्रपतीचा कारभार थोरले बाजीरावसाहेब पेशवाईचा करूं लागले. त्यांचें व बांडे यांचें कांहीं कारणावरून वाकडें जाल्यामुळें मल्हार खुणी व पिलाजी गायकवाड यांस सुभे करून गुजराथींत पाठविले. त्यांची व बांड्याची लढाई दोन वर्षें होऊन बांडे शिकस्त खाऊन रनाळें मुक्कामीं आले. सरकार इतराजी जाणोन पेशवे यांनीं इतलाखी सरंजाम सर्व दूर करून मोकासे प्रकर्णीं स्वार मात्र कायम ठेविले, आणि जातीचे खर्चास कसबे रनाळें हा गांव इनामी कुलबाब कुलकानू करून दिल्हा. त्याची सनद त्रिंबकराव कदम व संताजी कदम व रघोजी कदम व कंठाजी कदम व गोजाजी कदम पांच इसमांचें नांवें करून दिल्ही. त्यास कमपेश शंभर वर्षें जालीं; व ही वहिवाट सुरळीत चालत आली. दरम्यान सरकारांतून त्रिंबकजी डेंगळे यांजकडे नंदुरबार सुलतानपूर येथील मोकाशाची जप्ती जाली. त्यांनीं मोकाशाची जप्ती करावी; ते न करितां, इनामी गांवसुद्धां सनदेवांचोन चार वर्षे केली. त्याचे मोकळिकेचाही उद्योग चालला होता. परंतु डेंगळे याची चाल दरबारांत भारी, यामुळें दिवसगत लागले. इतक्यांत सरकार कुंपणीचा अंमल सन १२२७ चे अखेरीस आला. मजकूर समजोन घेऊन गांवची मोकळीक करून दिली. त्याप्रमाणें वहिवाट सुदामत वहिवाटप्रमाणें चालत आहे. मेळविणार व वहिवाट करणाराची वंशावळी.

१ त्रिंबकराव कदम इसम एक. त्याचे चिरंजीव सवाई अमृतराव कदम. याचे चिरंजीव बळवंतराव कदम. याचे चिरंजीव भास्करराव व खंडेराव व मार्तंडराव कदम. हल्लीं कायम रनाळेंपैकीं बुधवार पेठ व जमीन आपले हिशाप्रमाणें उपभोग करून आहेत.

संताजी कदम इसम दुसरे याचे चिरंजीव.

१ खंडेराव कदम

१ अमृतराव कदम

२

यांसी वंश

| | |
|---|---|
| खंडेराव कदम. याचे पुत्र | अमृतराव कदम. याचे चिरंजीव |
| संताजी कदम. त्याचे पुत्र | आनंदराव कदम. यांचे चिरंजीव |
| आनंदराव कदम हल्लीं | अमृतराव कदम व गणपतराव कदम |
| कायम आपला हिस्सा | व तिसरा. एकूण तिघे बंधू हल्लीं कायम |
| खाऊन आहेत. | आपले हिशाचा उपभोग घेऊन आहेत. |

१ रघोजी कदम इसम तिसरे. याचे पुत्र माधवराव कदम. त्याचे चिरंजीव भगवंतराव व कृष्णराव कदम. भगवंतराव याचे चिरंजीव दौलतराव व गोविंदराव व नारायणराव तिघे बंधू. कृष्णराव यासी संतत जाली नाहीं. तिघांचे वंशांचा तपशील:—

१ दौलतराव यांचे चिरंजीव कृष्णराव कदम. हल्लीं कायम आहेत.
१ गोविंदराव यांचे चिरंजीव पर्वतराव कदम. हल्लीं कायम आहेत.
१ नारायणराव यांचे चिरंजीव गोविंदराव कदम. हल्लीं कायम आहेत.
३

तिघेजण आपले हिशाचा उपभोग करून आहेत. कलम

१ कंठाजी कदम इसम चौथे. त्याचे चिरंजीव चत्रशिंग कदम. त्याचे चिरंजीव यशवंतराव कदम. एकूण तीन जण.

१ यशवंतराव याचे चिरंजीव तुकोजीराव व गणपतराव हल्लीं कायम आहेत.
१ खंडेराव जातीनिशीं कायम आहेत.
१ मल्हारराव जातीनिशीं कायम आहेत.
३

त्रिवर्ग आपले हिशाप्रमाणें उपभोग करून आहेत.

१ गोजाजी याचे चिरंजीव राणोजी कदम व हैबतराव कदम.

१ राणोजीचे चिरंजीव त्रिंबकराव कदम त्यास पुत्र नाहीं. त्याची बायको कायम आहे.

१ हैबतराव यास पुत्र विठलराव कदम व राणोजी कदम दोघे, पैकीं विठलराव कदम पेशजी मृत्यु पावले. राणोजी कदम वहिवाट करून होते. ते सरकार कंपनीचा अंमल जाल्यावर, एक वर्षांनीं निवर्तले. त्यांची बायको आहे. त्यांनीं पर्वतराव कदम दत्तक घेण्याचा विचार करून वहिवाट करून आहेत.

५ २

सदरहू पांच इसम आपलाले हिशाप्रमाणें रनाळें येथील वहिवाट करून उपभोग घेत आहेत. या गांवांत सरकारी अंमल कांहीं एक नाहीं. पाटीलकी आदिकरून सर्व वतनें बांडेच करून आहेत. दुसरा कोणी नाहीं. कलम

मौजे तोरखेड प्रगणे सुलतानपूर मूळ संपादन करणार राघोजी कदम व कंठाजी कदम व भोजाजी कदम त्रिवर्ग बंधू रनाळ्यास होते. तेव्हां तोरखेडकर राऊळ यांनीं बंड मातवून नंदुरबार, सुलतानपूर महालीं उपसर्ग मनस्वी केला. त्या काळीं जहागिरीचा अंमल मोगलाई होता. त्याचकडे महालचा बोभाट राऊळाचे उपसर्गाचा लिहिला गेला. त्याजवरून कदम बांडे त्रिवर्ग इसम यांसी बोलावून सनद करून दिल्ही. त्यांत मजकूर राऊळाचें पारिपत्य तुम्ही करून गांवचा अनुभव राउळाचा गिरासाचा अनुभव इनामी तुम्हीं घेत जावा. त्याजवरून बांडे यांनीं मसलतखर्च पदरचा करून राऊळाचें पारिपत्य केलें, आणि जागा कायम करून गांवचा व गिरासाचा उपभोग करीत आले. हा भोगवटा पाहून श्रीमंत पेशवे यांनींही सनदा इनाम करून दिल्ह्या. त्यास कमपेश शंभर वर्षे होत आलीं. वहिवाट दरोबस्त अंमलाची बांडे करून आहेत. सरकारी अंमल कांहीं एक नाहीं. दरम्यान डेगळे यांनीं सनद नसतां जबरदस्तीनें अंमल बसवून चार वर्षे वहिवाट केली. त्याची मोकळीक करून घेण्याचा उद्योग चाललाच होता. परंतु डेंगळे यांची मातबरी मोठी, सबब दोन रोज अधिक उणे लागले. इतक्यांत सरकारी कंपनीचा अंमल जाला. त्यानीं मागील भोगवट्याचा मजकूर मनास आणून गांवची मोकळीक करून दिल्ही. त्याची वहिवाट सुदामतप्रमाणें करून आहेत. पाटील कुलकर्णी आदिकरून सर्व वतनें कदम बांडे करून आहेत. दुसरा कोणी नाहीं. संपादन करणार व हल्लीं उपभोग घेणारांची वंशावळ:—

१ इसम पाहिले रघोजी कदम. यांचे चिरंजीव माधवराव कदम. त्यांचे चिरंजिव भगवंतराव व कृष्णराव कदम. पैकीं कृष्णराव यास संतती नाहीं, भगवंतराव यास पुत्र तीन.

१ दौलतराव, नारायणराव, गोविंदराव. यास पुत्र

१ दौलतराव याचे चिरंजीव कृष्णराव हल्लीं कायम आहेत.

१ गोविंदराव याचे चिरंजीव पर्वतराव हल्लीं कायम आहेत.

१ नारायणराव याचे चिरंजीव गोविंदराव कायम आहेत.

३

तिघे कायम आहेत. आपले हिशाची वहिवाट करून उपभोग घेतात. गांवची मालकी याच इसमांकडे. आणखी दोन इसम आहेत, त्याजकडे जातीचे बेगमीस दोन शेऱ्या नेमिल्या आहेत, त्या खाऊन आहेत.

१ दुसरे इसम कंठाजी कदम बांडे. त्यांचे चिरंजीव चत्रसिंग कदम बांडे. त्यांचे चिरंजीव यशवंतराव कदम व खंडेराव कदम व मल्हारराव कदम. पैकीं यशवंतराव कदम मृत्यु पावले.

त्यांचे चिरंजीव तुकाजीराव व गणपतराव कदम कायम आहेत. खंडेराव व मल्हारराव उभयतां जातीनेंच कायम आहेत. त्रिवर्ग आपले हिशाप्रमाणें शेऱ्या खाऊन आहेत.

१ तिसरे इसम गोजाजी कदम. त्यांचे पुत्र राणोजी कदम व हैबतराव कदम. त्यांचे पुत्रः—

| | |
|---|---|
| १ राणोजी कदम याचे पुत्र त्रिंबकराव कदम पेशजी मृत्यु पावले, कुटुंब आहेत. | १ हैबतराव यांचे चिरंजीव<br>१ विठलराव<br>१ राणोजी कदम<br>२ |
| | पैकीं विठलराव कदम मृत्यु पावले. राणोजी कदम सरकार कुंपणीचा अंमल जाल्यावर वर्षाभरानें निवर्तले. त्यांची स्त्री कायम आहे. ते परवतराव कदम यास दत्तपुत्र घेण्याचा विचार करून उपभोग घेऊन आहेत. |

सदरहू उभयतां ज्याचे ते हिशाप्रमाणें वहिवाट करून आहेत. कलम.

१ मौजे कोपरेल व मौजे ठाणें संपादन करणार अमृतराव कदम बांडे यांचे चिरंजीव सवाई त्रिंबकराव कदम बांडे यांजकडे पन्नास स्वार दोनशें स्वारांपैकीं लावून देऊन नंदुरबार निम्मे मोकाशापैकीं चौथाई व सुलतानपुरास गेल्या मोकाशापैकीं चौथाई लावून दिल्हे. खेरीज वरसे व उमरपाटे जहागीर देऊन तीस स्वार नेमून चाकरी घेतली. सरदारी सामान याजकडे सबब संताजी कदमाचे हिशापैकीं दोन हजार रुपये याजकडेस देत जावे, अशी वांटणी सेनापती हातून होऊन वहिवाट चालत आली. पुढें सेनापती पेशवे यासी विन्मूख होऊन रनाळें मुक्कामीं येऊन रघोजी कदमाचे चिरंजीव माधवराव कदम बांडे यांस सामील करून घेतलें आणि स्वराज्यांत बंड करूं लागले. तेव्हां सवाई त्रिंबकराव कदम यांनीं माधवराव कदम यांस सांगितलें कीं, सेनापती सरकाराशीं बिघडून आहेत, त्याशीं आपण सामील न व्हावें. तें त्याचे ध्यानांत न येतां नंदुरबारीं जाऊन जहागीरचें ठाणें बसविलें. त्यावरून दमाजी गायकवाड पांच हजार फौजेनिशीं व आणखी इतलाखी फौज पांच हजार घेऊन सेनापतीचे पारपत्यास रनाळें मुक्कामीं आले. त्या कालीं गायकवाड्याचे चिरंजीव सयाजीबोवा यांसी त्रिंबकराव कदम याची कन्या दिल्ही. पुढें सेनापती व माधवराव कदम यांची व गायकवाडाची लढाई होऊन सेनापती व माधवराव यांनीं शिकस्त खाल्ली. त्या लढाईत सवाई त्रिंबकराव कदम सामील न जाले, सबब सेनापती व माधवराव कदम यांनीं दंगा करून त्रिंबकराव कदम यांस ठार मारिलें. त्या कालीं त्रिंबकराव यांचे चिरंजीव सवाई अमृतराव कदम पंधरा सोळा वर्षांचे होते. ते पळून भ्रातुश्रीसह गायकवाड यांचे फौजेंत आले. मागें सेनापती व माधवराव यांनीं वाडा वगैरे लुटून नेला.

अमृतराव कदम मातुश्रीसुद्धां गायकवाडाबरावर पुण्यास येऊन थोरले माधवराव साहेब पेशवे यांची भेट घेऊन आपलें वर्तमान जाहीर केलें. त्यावरून सरकारलक्ष्यामुळें त्रिंबकराव कदम मारले जाऊन नुकसानींत आले, याचा निर्वाह जाला पाहिजे याजकरितां पेशवे यांनीं मेहरबान होऊन मौजे कोपरेल व मौजे ठाणें हरदू गांव इनामी कुलबाब व कुलकानूसुद्धां करून दिल्हे. सनदा अमृतराव कदम यांचे नांवें करून दिल्या. त्यास कमपेश साठ वर्षें झालीं. वहिवाट चालत आली. दरम्यान सरकारांतून मोकाशाची जप्ती त्रिंबकजी डेंगळे याजकडे जाली. त्यांनीं तेंच करावें तें न करितां रनाळें तोरखेड इनामगांवसुद्धां जप्ती केली. कोपरलीस येऊं लागले त्या-काळीं बळवंतराव कदम बांडे यांनीं सांगितलें कीं, जप्तीची सनद दाखवावी ह्मणजे ठाणें देऊं. सनद तों नाहीं मग त्यांनीं नाद सोडिला. पुढें सन १२२६ चे सालीं कादर भालदार भिल्ला-चे मोहिमेवर इकडे आले. त्यांनीं कोपरेल व ठाणें यांची सनद नसतां तीन महिनेपरियंत ठाणें खालीं करून देण्याविशीं लढाई घेतली. कदम यांनीं सनद दाखवावी आणि ठाणें घ्यावें म्हणून सांगितलें. तें न जालें. उगीच जबरी करूं लागले. पुढें कदम यास शिबंदीचें देणें मनस्वी झालें. देण्यास ठिकाण नाहीं. लाचार जाणोन कादर भालदार यांनीं बावीस हजार रुपये दिल्हे, ते घेऊन शिबंदीचा फडशा केला आणि ठाणें हवालीं करून देऊन कुटुंबसुद्धां निघोन ग्वोलरीस गेले; आणि भिकाजी बाजीराव यासी श्रीमंताकडेस पाठविलें. ते उद्योग करून होतेच. दरम्यान सरकार कुंपणीचें व पेशव्यांचे वांकडें पडल्यामुळें श्रीमंत निघून गेले. भिकाजी बाजी माहुरापरियंत त्याजबराबर होते. इकडे सरकार कुंपणीचा अंमल होऊन सर्वांनीं हजर व्हावें ह्मणजे बंदोबस्त होईल ह्मणून जाहिरनामे जाले. त्याजवरून भिकाजी-पंत मालेगावचे मुक्कामीं येऊन कपतान ज्यान ब्रिग साहेबांची भेट घेऊन मजकूर समजाविला. त्यांनीं मागील भोगवटा पाहून हरदू गांवें सोडून सनद करून दिल्ही; आणि पुढें आणखी बंदोबस्त करून देऊं असें सांगितलें. त्या दिवसापासून सुदामतप्रमाणें वहिवाट करून आहोंत. या गांवांत सरकारी अमल कांहीं एक नाहीं. सनदपत्रें तों गेलीं. परतु गांव इनामी दिल्हावर पाटलांनीं आपली पाटीलकी कदमराव बांडे यांस दिली. त्या समयीं पाटलांनीं बांडे यांस लेख करून दिल्हा त्याची नकल हुजूर पाठविली आहे. संपादन करणार अमृतराव कदम त्याचे चिरंजीव बळवंतराव कदम त्याचे चिरंजीव भास्करराव व खंडेराव व मार्तंडराव त्रिवर्ग हल्लीं कायम आपली वहिवाट करून आहेत.

जाला मजकूर लिहून दिल्हा आहे. कोपरलीस पाटील आहे, ठाण्यास पाटील आहे. त्याचे मुचलके मामलेदारांनीं जमीनदाराचे साक्षीनशीं घेतले आहेत. रनाळें तोरखेड येथें पाटील कुलकर्णी नाहीं. सर्व मालकी कदमाचीच, तेव्हां लेख कोण करून देईल? भोगवट्याची साक्ष रनाळ्याची महालाचे जमीनदारांनीं लिहून दिल्ही आहे. सन १२३२ माहे रजब छ २७ सन १८२३ इसवी.

---

## ३ घाटगे कागलकर.

कागलकर आबाजी घाटगे सर्जेराव




कागलपैकीं परगणे चिलरखंड भाऊवाटणीस जाऊन कसबा कागल व खेड मिळून सुमार ४०।५० हजाराचे मशारनिल्हेकडे होते. याशिवाय परगणेमजकूरचे देशमुखी दरोबस्त चालत होते. ते सुमार पन्नास वर्षांखाले शिवाजीमहाराज यांणीं दरोबस्त परगणे व देशमुखीसुद्धां जप्त करून खालसातींत ठेवले होते. करितां विश्वासराव व सखाराम घाटगे दोघेही महादजी शिंदे याजकडे चाकरीस म्हणोन निघोन गेले. बाकी लोक मौजे उतूर व पिंपळवंडी वगैरे दोनी तिनी गांव चालत होते तेथें व आपले सोई असले जागीं जाऊन राहिले होते. कोलापुरांत महाराज कम उमरचे होते. सबब यशवंतराव शिंदे कारभार करीत होते. त्यांनीं आपले इलाखदारावरी व पराई पेशवेसरकारचे इलाखेवरी तंटाबखेडा करूं लागले. सबब याचे बंदोबस्त करणेबद्दल महादजी शिंदे यास ११८७ फसलींत पाठविलें. त्यांनीं येऊन जेर करून फौजेचे वगैरे खर्चाबद्दल २० लाख रुपये द्यावे म्हणोन तहनामेचे याद ठरविले. त्या वक्तीं सदरहू हरदो घाटगे शिंदे याजबराबर होते. सबब शिंदे याणीं कागलचें ठाणें आपले तर्फेनें घाटगेचे सुपूर्द करून तहाचे यादींत घाटगे कागलकर हे पुरातन सेवक राजमंडळचे याजकडे पहिलेपासून कागल आहे. अलीकडे शेषोनारायण याचे कारकीर्दीस महाराजांनीं सरकारांत घेतलें होतें, तें फिरोन आम्हीं घेऊन घाटगे याजकडे दिल्हें आहे, त्याजप्रमाणें चालवावें. येविशींची सनद द्यावी व घाटगे यांचें वतन आहे तें त्याजप्रमाणें चालवावें. आम्हाकडे आलें होतें ह्मणोन आकस करूं नये. कलम १. यास महाराजांनीं करार कलम लिहिलें तें:— कागलकर पुरातन सरकारचे सेवक चाकरी पूर्ववत्प्रमाणें करावी. चाकरी पूर्ववत्प्रमाणें केलेस कैलासवासी आईसाहेब यांचे वेळेस चालत आलें त्याप्रमाणें चालविलें जाईल. येणेंप्रमाणें करार ह्मणोन लिहिले आहेत. तेव्हां यशवंतराव घाटगे कम उमरचे होते सबब देशमुखीचें वतन पुरतें चालत होतें. बाकी गांवचें हरदो घाटगे वहिवाट करीत होते. यशवंतराव घाटगे यांस महाराजांनीं पुढें १२।१३ वर्षांनंतर लेकीस देऊन लग्न केलें. तेव्हां यशवंतराव वडील घराणेचे सबब कागल वहिवाट महाराजाचे कुमेकेनें करूं लागले. यशवंतराव यांस आसरा पाहून सखाराम घाटगे यांणीं दौलतराव शिंदे यांस आपले

लेकीस दिल्हें. सन १२०९ मयातैनचे सालीं शिंदेचे फौज परशरामपंत भाऊ याचे कुमकेस ह्मणोन जाऊन महाराजास फार जेर केलें. त्या वक्तीं सखाराम घाटगे यांणीं महाराजाचे सरकारास फार कुमक करून वेढा उठऊन त्या मुलाहिजेनें कागल व सुमार १०।११ खेडीं महाराजाकडे होते तेसुद्धां आपले सुपूर्द करून घेऊन, महाराजांस ज्या वेळीं पाहिजे त्या वेळीं कागल सुपूर्द करूं ह्मणोन दस्तैवज लिहून दिल्हे आहेत. यशवंतरायाकडे देशमुखी सोडून, बाचणी, बेलवें, सावरडें, चारी गांव चालत होते, ते निपाणीकरांनीं देशमुखी व चार गांवचे वहिवाट करीत होते. सन सलास अशर सन १२२२ फसलींत पुणें मुकामीं निपाणीकरानें जबरदस्तीनें घेतले ते सोडावे ह्मणोन जबाबसाल जाहले. त्यावेळीं निपाणीकरांनीं हिंदुराव घाटगे याजकडे चालत म्हणोन सांगून त्याचे स्वाधीन केले. हिंदुराव याकडून घ्यावे तरी त्यांनीं हिंदुस्थानांत निघून गेले. सरकारचे अंमल जाहलेवर १२३० फसलींत महराजांनीं आपले सरकाराकडे चार गांव घेतले. देशमुखीपुरता हिंदुराव याजकडे चालतो. यशवंतराव याजकडे हल्लीं कांहीं चालत नाहीं. महाराजाकडून दोन गांव बहादुलें, परीत चालत आहे.

आकरा गांवचे तपसील.

| | |
|---|---|
| १ चंदरें | ७ बालिगें |
| २ निगवें | ८ भिवसी |
| ३ रुई | ९ सिदनुरली |
| ४ माणगांव | १० बोरवाड |
| ५ साजणी | ११ बिदरी |
| ६ माहालावें | |

यादी कागलकर घाटगे यांची कैफियत आबाजी घाटगे सरजेराव यांस पुत्र.

| १ | | २ | |
|---|---|---|---|
| सुलतानराव यास पुत्र. | | तुळाजीराव ऊर्फ बोवासाहेब घाटगे यांस पुत्र | |
| १ यशवंतराव हाल हजर. यास पुत्र नाहीं. पुत्री आहे. तिला आ-णखी लेंकरूं जा-हलें नाहीं. | १ दुसरा एक होता तो वारला, त्यास अवलाद नाहीं. | विश्वासराव यास पुत्र नाहीं. पुत्री दोघी त्यांपैकीं ए-कीस पाटणकरा-चे घरास दिलें. एकीस हालीं म-हाराजास दिल्हें आहे. | सखाराम घाटगे यास पुत्र हाल हजर जयसिंगराव ऊर्फ हिंदुराव घाटगे. पुत्री बायजाबाई दौलतराव शिंदे यांस दिल्ही आहे. हालीं कागलपैकीं चिखली सखाराम घाटगे याची बायको सुंदराबाई आहे. जयसिंगराव यास पुत्र नाहीं. |

कागलचे मोकदमेस कैफियत.

१ पादशाई कारकीर्दीपासून कागलपैकीं जाहगीर चालत आहे. त्यांपैकीं भाईबंदाकडे गांव आहेत. जाता कसबा कागल व गांव वगैरे मिळून सुमार ४०।५० हजार रुपयेचे व परगणेमजकूरचे देशमुखी अमलसुद्धां आबाजी घाटगे याजकडे चालत होते. ते मृत्यु पावलेवरी शिवाजी महाराज यांचे वख्तीं येसाजी शिंदे याचे कारकीर्दीत मौजे उंतूर व पिंपळवडी वगैरे दोनी तिनी गांवखेरीज बाकी गांव व कसबा व देशमुखी अमलसुधां जप्त केले. तेव्हां विश्वासराव घाटगे व सखाराम घाटगे यांणीं महादजी शिंदे यांजकडे जाऊन चाकरीस राहिले होते; तों इतकीयांत येसाजी शिंदेस पेशवेस बरकशी पडून ११८७ फसलींत महादजी शिंदे यांची फौज कोलापुरावरी पाठविली, त्या वख्तीं महादजी शिंदे याणीं कागल वगैरे ठाणा घालून घाटगे याजकडे देऊन पेशवेसरकारास महाराज यांचे सरकारदरबारखर्चसुधां २० लाख रुपये घेणेचें ठरवून तहनामेची याद केली. त्यांत घाटगेचे मोकदमेस कलम नमूद केलें असणेचें. घाटगे कागलकर हे पुरातन सेवक राजमंडळचे, याजकडे पहिलेपासून कागल आहे. अलीकडे शेषो नारायण याचे कारकीर्दीस महाराजांनीं सरकारांत घेतलें होतें, तें फिरोन आम्हीं घेऊन घाटगे याजकडे दिल्हें आहे, त्याप्रमाणें चालवावें. येविशींची सनद द्यावी व घाटगे याचें वतन आहे तें त्याजप्रमाणें चालवावें. आम्हाकडे आलें होतें म्हणून आकस करूं नये. कलम १. यास महाराज यांणीं करार कलम लिहिलें तें:—कागलकर पुरातन सरकारचे सेवक, चाकरी पूर्ववतप्रमाणें करावी. चाकरी पूर्ववतप्रमाणें केलेस कैलासवासी आईसाहेब यांचे वेळेस चालत आलें त्याप्रमाणें चालविलें जाईल. येणेंप्रमाणें करार म्हणोन लिहिले आहेत. तेव्हां यशवंतराव घाटगे याचे बापाकडे देशमुखीचें वतन बहाल ठेवून कसबे कागल व गांवगन्ने हरदो घाटगे याणीं वहिवाट करूं लागले. पुढें सुमार १२।१३ वर्षापासून महाराजांनीं आपले मुलगीस यशवंतराव घाटगे यांस देऊन लग्न करून मशारनिल्हे वडील घराणेचे म्हणोन कागल व गांवगन्ने याकडे वहिवाट होयाजोगा बंदोबस्त करून दिल्हा. सबब हरदो घाटगे याणीं आपणास आसरा पाहिजे लागतो म्हणोन सखाराम घाटगे याची मुलगी बैजाबाईस दौलतराव शिंदे यांस देऊन लग्न केलें. नंतर सन १२०९ फसली मयातेनचे सालीं शिंदे याची फौज परशरामपंत भाऊ याचे फर्जंद रामचंद्रपंत आपा पटवर्धन याचे कुमकेस म्हणोन जाऊन महाराजांस फार जेर केलें. त्या वख्तीं सखाराम घाटगे याणीं दरम्यानदार होऊन जाबसाल करून वेढा उठविला. त्या मुलाहिजेनें कागल व गावगन्ने व कागल परगणेचे ११ खेंड सरकारांत होते ते सुधां सुमार ६९॥ गांव सखाराम घाटगे याजकडे देऊन १२१० फसलींत इनामपत्र तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चिरकाल पुरातन भोगवटेप्रमाणें अनभऊन राज्यासीं एकनिष्ठपणें असोन सुखरूप राहणें ह्मणोन करून देऊन, सखाराम घाटगे याजकडून ज्या वेळेस महाराज कागल मागतील त्या वेळेस देऊं म्हणोन दस्तऐवज लिहून घेतले, ते यशवंत (राव) घाटगे याजकडे दिल्हे होते. म्हण व

यशवंतराव घाटगे याजकडे कागल परगणेचे देशमुखी व मौजे सेंडूर १ बाचणी १ बेलवल १ सावरड १ चार गांव चालत होते, ते निपाणीकर यांणीं जबरदस्तीनें घेऊन आपण वहिवाट करीत होते. सन सलास अशर सन १२२२ फसलींत पुणें मुक्कामीं निपाणीकरानें जबरदस्तीनें महाराजाचे मुलूक घेतले, ते सोडावे म्हणोन जाबसाल होऊन चिकोडी मनोली तालुकेचे दरीयाफ्त जाहले. त्या वेळीं निपाणीकरांनीं हिंदुराव घाटगे याजकडे सदरहू देशमुखी अमल चार गांव चालत ह्मणोन सांगून मशारनिल्हेचे सुपूर्द केले. त्या वख्तीं पेशव्यांनीं कागल आपलें ह्मणोन बोलत होते. त्याचेही दरीयाफ्त होऊन कागल महाराज यांचा इलाखा आहे ऐसें ठराविलें आहे. पुढें हिंदुराव याजकडून देशमुखीचे अंमल व चारी गांव घेऊन यशवंतराव घाटगेस देऊन मशारनिल्हेकडे गुजराणेस गांव आपले सरकारांतून दिल्हे होते ते सोडून द्यावे. तरी इरादा कीं, या हिंदुराव यांणीं शिंदेसाहेब याजकडे निघोन गेले. करितां तैसेच राहिले होते. त्यापैकीं सन १२३० फसलींत आबामहाराज याणीं सदरहू चार गांव ठाणा घालून घेतले. ते यशवंत(राव) घाटगेस घेऊन आपण दिल्हे ते गांव सोडावे ह्मणाले असतां ऐकिलें नाहीं. सबब गुजराणाकरितां दिल्हे होते ते गांव जप्त करून घेतले. त्यांनीं मुबदला सदरहू चारी गांव कांहीं घेतले नाहींत. दोघाकडून घेतले ते गांव महाराज यांचे सरकारांतच आहेत. हल्लीं यशवंतराव घाटगे याजकडे पेशजीं शिवाजी महाराज यांणीं दिल्हे ते १ बहादूल व १ परीत ऐसे दोनी गांव चालत आहेत. हिंदुराव याजकडे कसबा कागल व गांव वगैरे सनदेप्रमाणें देशमुखीचे अंमलसुधां चालत आहेत. यापैकीं हाल्लीं महाराज याणी माहे आक्टोबर महिनेंत कागल तालुके मानगांवचे रयता फरारी जाहले असतांना राजमंडळ इलाखा कडोली नामें गांववालेस जामीनीवरी आणून जुलूम केले. करितां मानगांवचे जनावर लुटून आणविलें व चाकोता नामें गांवांत मांग १०० घरवाले राहून आसपास चोरी वगैरे करीत होते. त्याकरितां महाराज यांणीं मौजेमजकुरी ठाणे ठेवणें गरज नाहीं ह्मणोन सांगितलें असतां कागलकर ( यांनीं ) ऐकिले नाहीं. करितां ठाणा घालून पाटिलाचे वाडा पाडिले व छ २६ माहे फिब्रवारी सन १८२४ इसवींत कागल तालुका निंगवें नामें गांवठाणा घातलें ह्मण. त्यास हाल्लीं महाराज याकडील वकिलाचें ह्मणणें कागल पाहिजे तेव्हां सोडितों ह्मणोन हिंदुराव घाटगे याचा बाप सखाराम घाटगे याणीं दस्तैवज लिहून दिल्हे आहेत. त्यास हाल्लीं मशारनिल्हे याणी इकडे जाहागिरीदार होऊन येथें असेना ते शिंदेकडे आहेत. याजकरितां घाटगेमजकूर याणीं येथें असावें हें मंजूर न जाहलेस कागल सोडावें ह्मणोन ह्मणत होते.

---

## ४ घाटगे मलवडीकर.

आदि सूर्यवंश घाटगे मूळपुरुष देशमुखी पिढी दरपिढी कदीम पुस्त दरपुस्त पूर्वीपासून करीत आल्याप्रमाणें मलवडी कसबे ललगुण बुधपाचेगांव याचा विस्तारः—

मूळपुरुष सर्पधननाक. याचा पुत्र बाळनाक, याचा पुत्र लोहनाक, याचा पुत्र सारंगनाक,

यावर फाटक गुमास्ते होते. यांनीं आप्त फितूर करून मारा घाटगे सारंगनाक वगैरे वंशावरी मारा करून कापून काढून, त्यावरी फाटक देसगत कांहीं दिवस दहा पांच वर्षें केली न केली, तों सारंगनाकाची स्त्री गरोदर राहिली होती ती, परागंदा होऊन आथर्ववेदी ब्राह्मणाचे घरीं निंबांत राहिली. त्या स्त्रीस पुत्र जाहला. त्याचें नांव कामराज घाटगे. कामराजापासून घाटगेपणाची किताबत पातशाहानें दिल्ही आणि समरांत फाटक मारून आपले वतनाचा भोगवटा कुलबाब देसगती करूं लागला. त्या कामराजास पुत्र सहा, १ परसनाक, २ लोहनाक, ३ जयनाक, ४ जैतपालनाक, ५ बागनाक, ६ लोहनाक.

पैकीं परसनाक याचा विस्तार होता त्याणें देसगत केली नाहीं. बागडनाक व जैतपालनाक याचे वंशीं विस्तार जाहले, त्यापुढें वंशीं जावजी घाटगे देसगत करीत होते. सदरहू सहापैकीं एक घर कर्नाटक प्रांतीं पनाळा प्रांतीं गेलें तिकडेच राहिलें. पुढें वंश सदरहूचे तानाजी देसगत करीत होते. तेथें मलवडीस ठाणेदार बहुत होत गेले. त्याचा तपसील कानगोचे बदलचें सदर लिहिणें जे, ज्या त्याचे आवरजे देशकुळकर्णी याजपाशीं आहेत. त्यांत तपसील ठाणेदार याचा आहे, त्यापैकीं तानाजीचे देशमुखी होती ते वेळेस शके १४७६ सन खमस खमसेन तिसा मयामधें ठाणेदार कामीलखान मलवडींत होते, वर्ष २४, त्याचे कारकून.

१ अलीशा ठाणेदार मुदत वर्षे २०
१ फत्तेखान ठाणेदार
१ जानू केशव मुजुमदार
देशपांडे बापाजी गंगाधर
याणें केले, त्याचे पुत्र २
१ राघव १ कानाव

१ तानाजी घाटगे देसाई याचे लेक चार ४.
१ मिठोजी
१ जगोजी
१ महाळोजी
१ नरसोजी.
४

या चवथ्याचें नक्कल जालें. तेव्हां परसनाक याचा पाठचा भाऊ सदरहू सहापैकीं लोहनाक यास पुत्र कडतोजी याचा पुत्र चिह्माजी त्याचा पुत्र बाळोजी बाजी घाटगे देसगत करूं लागले. त्यास पुत्र विस्तारः—

१ कोरपाळजी बाजी घाटगे
२ कडतोजी बाजी घाटगे
३ बाबाजी बाजी घाटगे
४ राहुजी बाजी घाटगे
५ महळोजी बाजी घाटगे
६ मिठोजी बाजी घाटगे
७ कयाजी बाजी घाटगे.

पुत्र सात. पैकीं कोरपाळजीचें नक्कल. कडतोजीचे पुत्र बाळोजी बाजी देसगत चालूं लागले आणि पुढें पुंडावा करूं लागले आणि मलवडी महाल साठ गांव येथील महालची जमाबंदी विजापुरास न जातां महाल तमाम लुटून खाऊं लागले. मग पांच चार वर्षें महा-

लाची तक्षप सोडून जमाबंदीचे महालचे ऐवजाचे फडशाकरितां विजापुराची स्वारी होऊन धरून नेऊन ऐवज मागूं लागले. तेव्हां उपाय नाहीं कैदेंत सांपडला सबब महालचा ऐवज इस्तकबिल तागाईत भरून देणें प्राप्त, तेव्हां सुटका ऐसा विचार पडला. सबब बाळोजी बाजी यानें सावकार पठाण पाहून त्याजपाशीं वतन देसगतींचे शिक्यासुद्धां ठेऊन सरकारचा दस्त महालचा भरला. त्यावरी मागती येऊन महालीं पूर्ववतपणें वहिवाटूं लागला. तेव्हां सरकारासीं बंदमस्त सबब सरकारची स्वारी सुभा येऊन बाळोजीस कैद करून विजापुरास धरून नेहलें. मेजवानी सरकारची ह्मणोन विजापुराचे सरकारानीं जिवें मारिला. तेव्हां त्याचा मुडदा जाळावयास कोणी त्याचे भाऊबंद घरभाऊ पाठचे व मिठोजी बाजीचा पुत्र बोवाजी झुंजाररावही तेथें होते, त्याणीं अग्रप्रसाद द्यावयास सिद्ध जाहले. तेव्हां सरकारची आज्ञा जाहली. परंतु कर्जदार सावकार पठाण मातबर त्याचे घरीं वतन शिक्का वडीलपण गाहण होतें. त्यांणीं येऊन मुडद्यास ध्वाई दिली. ते वेळेस आमचे ऐवजाचा फडशा करून देणें अगर वतन आमचे घरीं डुले असें ह्मणोन सरकारचे कागदपत्र करून देणें अगर आपला ऐवज देणे असें पठाण बोलोन अडथळा केला. तेव्हां सरकारचे रुजवातीनें भाऊबंदाचे जे ऐवज देऊन वृत्ती सोडवावयास जाहली. मग ज्याणें सोडवावी त्याणें वतन वडीलपण शिक्का खावा. असा करार जाहला. ते समयीं बोवाजी झुंजारराव मिठोजीचा पुत्र याणें फडशा करून सरकारी दाखल वतनशिक्का मानपान देसगतींचे मलवडी महालचे सोडून करूं लागले. त्याचा तपशील जोतीबा घाटगे याचे वादांत करणा सरकारांत आहे. त्यांत तपशील आहे. कलम.

सदरहू कडतोजीचा बाळोजी येणेंप्रमाणें मारला गेला. पुत्र नाही. नक्कल. तेव्हां तिसरा त्याचे पाठीचा बाबाजी बाजी घाटगे. परंतु राहुजीनें देसगत करूं लागला. देशपांडे राघोबा १ व कोनेरी १ बापाजीचे पुत्र दोघे यानीं केले तागाईत कारकीर्द शेख हैदर हिसाफनमुलूख सहा महिने ठाणें होतें. तागाईत शहा अबदुल बाबासाहेबापुढें सदरहू कडतोजीनें कज्या वडील ह्मणून करून, राहुजी पिटवून बुधास राहून आला. कलम १.

बाबाजीचा विस्तार पुत्र साबाजी बाजी एक होते. त्याचा पुत्र मलजी बाजी त्यास पुत्र साबाजी बाजी घाटगे देशमूख, त्यास महादाजी बाजी व तुळाजी बाजी. महादाजी बाजीचा पुत्र साबाजी व सुलतानजी बाजी व संभाजी बाजी व तुळाजी बाजी व रामचंद्र बाजी व नरसिंगराव बाजी घाटगे; पैकीं महादाजी बाजी यास पुत्र वडील साबाजी, यास पुत्र शिवाजी बाजी घाटगे, एकाक्ष यास पुत्र हल्लीं महादाजी घाटगे आहेत. कलम १.

राहुजी बाजीचें नक्कल. विस्तार नाहीं. महाळोजी बाजीचें नक्कल. विस्तार नाहीं. सातवा कयाजी बाजी याचा विस्तार पुत्र सोनजी त्याचा नाइकजी व जनानीस पुत्र नायकजी बाजी, त्यास पुत्र आनाजी घाटगे दहिवडीकर हे सागुली याचे झुंझांत विलेसाठीं कज्या होऊन नागोजी झुंझारराव घाटगे याणें जिवें मारिलें. सबब राजश्री दादोबा प्रतिनिधी यांची हज्ञा होऊन नागोजी झुंझारराव हेही मृत्यु पावले. त्या अनाजीस पुत्रः—

१ जनाजी बाजी.
जनाजीचा हल्लीं नाना घाटगे
दहिवडेकर

२ नाइकजी.
३ हणमंतराव.
नाइकजीचे पुत्र जोत्याजी बाजी.
हणमंतराव याचे पुत्र दोनः—
१ आबाजी बाजी घाटगे.
१ लक्ष्मण बाजी घाटगे.
२

एकूण दोन पुत्र हल्लीं आहेत.

मिठोजी बाजी सहावे भाऊ याचे विस्तार. पुत्र तीनः—

१ वडील बोवाजी झुंझारराव हे शूर बहुतयुद्ध करून कामकाज सरकारचें करून सरकार पादशहानें किताबत दिल्ही. तेथपासून बोवाजी झुंझारराव नांव पडलें. कलम.
२ कबाजी घाटगे.
३ जानोजी घाटगे मोळकर.

वडील बाबाजी झुंझारराव यास पुत्र दोनः—

१ दाउसाहेब याचें नक्कल. विस्तार नाहीं.
२ राजजी घाटगे झुंजारराव.

राजजी घाटगे यास पुत्र सातः—

१ वडील पदाजी झुंजारराव.
२ बाबराज याचें नक्कल.
३ बाळाजी हा मोळकर याचे ओट्यांत जानोजी, यास पुत्र मलजी त्याचे त्या मलजीचे ओट्यांत घातला. कलम १
४ जानोजी घाटगे.
५ गैराजीबोवाचें नक्कल.
६ दामराज घाटगे.
७ कामराज.

सदरहू पदाजी झुंझारराव हे विजापुरीं कांहीं सरकारी इतराजीबद्दल भावानें वगैरे मिळोन इतराजी होऊन धरून नेहलें आणि कैदेंत ठेविलें. त्यावर कांहीं दिवसांनें मागुती सरकारची मेहेरबानी होऊन देसगती खेरीजकरून ललगुण महालेचे गांव चार इनाम करून देऊन मागुती पांच गांवची वहिवाट करूं लागले. यावरी दरम्यान सरकार बाबती चवथाई नाडगौडी सरदेशमुखी वगैरे अंमल होतेच. ते वेळेस सरकारचे स्वराज्याचे अंमल पुढें जाहले. सबब त्याचे तर्फे मोरो शामराज व महादाजी शिवदेव वगैरे होते ते, मग स्वराज्याचीं पत्रें करून घेतलीं. शिवछत्रपतीचे नांवचीं इनामपत्रें चार व खेरीज इनाम ताराबाईसाहेब याजपासून घेतलें. कारकीर्द अखेर अवल नागोजी झुंजारराव. कलम १

पदाजी राजे यास पुत्र तिघे. बायका तीन. वडील सगुणाबाई व सकुबाई दुसरी, तिसरी कमळजाबाई.

सकुबाईचे पुत्रः—

१ वडील नागोजी राजे झुंझारराव घाटगे.

१ सगुणाबाईस पुत्र संभाजी राजे घाटगे यास पुत्र.

१ राजजी घाटगे यास पुत्र हल्ली गोपाळराव नाना घाटगे.

कमळजाबाईस पुत्रः—

१ जिजाजी, १ शिवाजी.

जिजाजीस पुत्र साबाजी व शिवाजीचा पुत्र पदाजीचा शहाजीचा पुत्र सखारामचा कृष्णाजी हल्ली नाकपुरीं आहेत. पदाजीचे तात्या घाटगे यास पुत्र हल्ली अक्कलकोटी आहे.

नागोजी राजे याचे पुत्र बावाजी राजे यास पुत्र दोन, नागोजी व भवानजी राजे. पैकीं नागोजी बिन बाबाजी यास पुत्र नाहीं. नक्कल.

भवानजीचे पुत्र मशारनिल्हे हल्ली आहेत तः—

१ नागोजी झुंझारराव याचें नक्कल.

२ बावाजी राजे याचें नक्कल.

३ शिवाजी राजे हल्ली आहे ते काइम. त्यास पुत्र भवानजी राजे झुंझारराव.

कबाजी राजे यास पुत्र चार स्त्री दोघी, रखवा व मालवा.

१ वडील रखवाचा नागोजी.

२ दुसरा मताजी.

३ बाळोजी.

१ मालवा यास पुत्र शिवाजी.

नागोजीचा विस्तार. पुत्र सखोजी व मताजी व कृष्णाजी एकूण पुत्र तीन.

सखोजीचा मिठोजीचा नागोजी व मानाजी व संताजी.

मताजीस पुत्र नाही तेव्हां नागोजीचा पुत्र मिठोजी दिल्हे.

कृष्णाजीचा वंश नाहीं. नक्कल. त्यास तिघांनी त्याचे स्त्रीस तीन पट्या जमीन दिल्ही. जमीन बिघे ते हल्लीं पडली आहे.

नागोजीचा पुत्र मालोजी त्यास पुत्र मिठोजी व सखाजी व मताजी व मानाजी.

१ मानाजीचे पुत्र तीनः—

१ लक्षुमण घाटगे.

१ बाळाजी घाटगे.

१ संताजीस पुत्र हैबतराव ते हल्लीं आहेत.

१ राणबा घाटगे यांचा विस्तार.

लक्षुमण नक्कल.

बाळोजीस पुत्र एक आहे. धाकटा मूल त्याचें नांव रावजी हल्लीं बुधांत आहे.

राणोजीचे पुत्र तिघेः—

१ बोधलेबावा.

१ नागोजी.

१ बाबाजी घाटगे यांस पुत्र तीनः—

१ सखाराम घाटगे.

१ आपाजी घाटगे.

मिठोजीची स्त्री येसूबाई तीस नक्कल.

१ सखजीचा पुत्र गजेंद्रगडीं आहे.

१ मताजी मानाजी हल्लीं अकलूजकडे आहेत.

दुसरा मताजी यांनीं इनामगांव बुध राजापूर राजाचे पत्रें करून आणले. त्या मताजीस पुत्र तीनः—

१ कृष्णाजी. १ रामजी. १ कबाजी.

कृष्णाजीचे पुत्र महादाजी त्याचा पुत्र सखजी त्यास पुत्र नऊ. सखजीचे स्त्रीचें नांव आनंदीबाई निंबाळकर भोसल्याची कन्या.

१ परशरामबावा.
२ तुकाराम घाटगे.
३ जोतिबा घाटगे.
४ मालोजी घाटगे.
५ भिवराव घाटगे.

५

६ राजजी घाटगे.
७ शिवराम घाटगे.
८ भुजंगराव घाटगे.
९ जानराव घाटगे.

४

परशरामबावास पुत्र दोनः—

*मताजी.* *सुभानराव.*

उभयतांचें नक्कल जाहलें.

तुकाराम यास पुत्र महादाजी, यास पुत्र बाळयाबा ह्मणतात हल्लीं आहेत.

जोतिबा घाटगे याचें नक्कल.

मालोजीबावास पुत्र दोनः—

१ बचाराम घाटगे. १ जोतिबा घाटगे याचें नक्कल.

भिवराव घाटगे यास पुत्र दोनः—

१ कासीबा घाटगे याचें नक्कल. १ नरसिंगराव घाटगे काइम.

राजजीराव यास पुत्र लक्ष्मणराव आहेत.

शिवरामबावा यास पुत्र गोविंदराव हल्लीं पुसेगांवीं आहेत.

भुजंगराव यास पुत्र रघुनाथ याचें नक्कल.

जानराव घाटगे यास पुत्र १ नानासाहेब व १ रावसाहेब, पैकीं रावसाहेब यमाजी घाटगे यांचे ओट्यांत घातला. नानासाहेब यास पुत्र दोनः—

१ नारायणराव हे मताजी याचे ओट्यांत घातले.

रामजीस पुत्रः—

१ आनंदराव यास यमाजी दिल्हे. त्यास पुत्र हल्लीं कायम उलजीराव आहेत.

१ भाऊसाहेब.

१ दारकुजीस पुत्रः—

१ हेमाजी.

१ आनंदराव.

१ बाळोजी.

सदरहू चौघांपैकीं बाळोजीराव त्यास पुत्र नाइकजी त्यास पुत्र शेखजी व निळोजी.

शेखजीस पुत्र शिवाजी त्यास पुत्र हल्लीं गुजराथींत आहेत.

निळोजीस पुत्र तिघेः—

१ संभाजी घाटगे

१ नागोजी घाटगे

१ दाजी घाटगे

३

दाजीचा सभाजीचा सुलतानजीस पुत्रः—

१ मानाजी

१ साबाजी.

१ काशीबा हल्लीं आहेत.

१ जानबाचा पुत्र हल्लीं लक्ष्मण आहेत.

चवथा शिवाजी त्याचा कबाजी, त्यास पुत्र नाहीं सबब मताजीचा पुत्र कबाजी दिल्हा. त्याचा पुत्र पिराजी त्याचा पुत्र कृष्णाजीचा नक्कल. पिराजीचा पुत्र कबाजी. हल्लीं त्याचे पुत्र दोनः—

व्यंकटराव याचा पुत्र हल्लीं वाटणें यांत आहे.

१ रघुनाथराव त्याचे पुत्र जोत्याजीराव हल्लीं आहेत.

जानोजी मोळकर याचा विस्तार पुत्र मलजी. त्यास पुत्र नाहीं. सबब राजजी झुंझारराव याचे पुत्र सात पैकीं बाळोजी होता तो दिल्हा त्यास पुत्रः—

१ रवळोजी.

१ रखमाजी.

रवळोजीस पुत्र नाहीं सबब मालोजीचा पुत्र बाळोजीबावा दिल्हे. त्यास पुत्र हल्लीं नागोजी व आंबानाथ यास पुत्र जोतिबा हल्लीं आहेत.

१ मालोजी.

१ कुसाजी.

मालोजीचा पुत्र बाळोजी व नारायण यास पुत्र दिल्हे.

१ व्यंकटराव.

१ मालोजी.

१ शिवराम हल्लीं आहेत.

कुसाजीस पुत्रः—

१ रखमाजीस पुत्र बाबाजी व तुकाराम व हणमंतराव.

१ सयाजीस पुत्र गोविंदराव.

१ माधवराव यास पुत्र.

राजजी राजे झुंजारराव याच्या सातपैकीं विस्तारः—गोदाजीचें नक्कल. कामराज याचें नक्कल. बाबराज यास पुत्र राजजीबावा आंबेकर यास पुत्र जोतिबा. यास पुत्र नाहीं. नक्कल.

कृष्णाजी यास पुत्र सिरसिंगराव त्यास पुत्र १ गोविंदराव १ रामचंद्र १ लक्ष्मणराव. हल्लीं आहेत. जानोजीस पुत्र मानसिंगबावा, गैरोजीबावा.

मानसिंगराव यास पुत्रः—

१ फिरगोजीबावा.

२ रघुनाथराव.

३ कृष्णाजी.

४ नारायण हल्लीं आहे.

त्याचे पुत्र हल्लीं आहेत.

गैराजीबावा यास पुत्रः—

१ आपाजी.

१ रामचंद्रराव याचे पुत्र जिजाजीराव घाटगे आहेत.

शके १४७६ कामीलखान जाहल्यावर, शेक हैदर जाहल्यावर, ठाणेदार दिलावरखान मुदत साल ५ जाहल्यावर, मग पुढें महमदखान सालें ४॥। पावणे पांच, बाळोजी व राहवोजी देसगत तहत कारकीर्द सालें २, खुमखान तागाईत राजेखान याचे वेळेस कोन्हेरपंत देशपांडे बुधास आल्यावर गंगाजीराम तमाजी कोन्हेर हे करीत आहेत. कारकीर्द देशपांडे तमाजी कोन्हेर ठाणें हयबतखान मलवर्डास शके १५२० तागाईत शके १५३८ बाळोजीनें देसगत केली.

---

## ५ घोरपडे अमिरुल उमराव.

यादी घोरपडे अमिरुल उमराव व त्याचा इतिहास वडील वृद्ध सांगत आल्या माहितीवरून वर्णन केला आहे. तो येणेंप्रमाणें:—

घोरपडे हें उपनाम पडण्याचे पूर्वीचें उपनाम सिसोदे भोसले होतें. नंतर अवरंगजेब बादशाहाचे समक्ष हापशी लोकांचे राज्यांत स्वारी करून किल्ल्यावर हल्ला चढले. ते हल्ला असे कीं, किल्ल्याच्या नंगींत घोरपड ह्मणून जंगली जनावर राहतें, तें बसलें होतें. त्यास धरून पूर्वजानें हल्ला करून किल्ला हस्तगत झाला. त्या दिवसापासून घोरपडे असें उपनाम व निशाण बंडी ह्मणजे काळी पांढरी मिश्रित वामवणेस पादशाहाचा हुकूम होऊन त्याप्रमाणें आजपावेतों वहिवाट चालली आहे. त्या मूळ पुरुषाचे व कोणत्या पादशाहाचे कारकीर्दींत कोणते सालांत त्याचा दाखला आतां लागत नाहीं. परंतु याप्रमाणें मजकूर जगप्रसिद्ध आहे. पुढें नांवाची वगैरे माहिती लागती ती तपशीलवार लिहिली जातात.

१ मूळ पुरुष माहाळोजीबावा घोरपडे हे हिंदुस्थानांतून या प्रांतीं दक्षण देशांत येऊन पाटिलकी वगैरे वतन संपादन करून होते. त्यास दोघे पुत्र; एकाचें नांव भवानबावा, दुसरे संताजीबावा.

२ भवानबावा सदरी पाटिलकी वगैरे संपादन केले वृत्तीवर हल्लीं पुणें प्रांतीं जांब वगैरे ठिकाणीं आहेत. त्याचें वर्णन केलें नाहीं.

३ संताजीबावा शूर व पराक्रमी. हे दिल्लीचे पातशाईजवळ मानकरी होते. त्याचे पुत्र माहाळोजीबावा.

४ माहाळोजीबावा हेही सदर पादशाहाजवळ मानकरी याचे इरादेनीं पादशाहाचे पदरीं असतां त्यास तिघे पुत्र; संताजीबावा, बहिरजीबावा, माहाळोजीबुवा एकूण ३.

५ सदर संताजीबावा व बहिरजीबावा व माहाळोजीबावा हे तिन्ही पुत्र आमचे अव्वल संपादक महान पराक्रमी व शूर आणि बुद्धिमान् होत्साते करवीर व सातारेकर महाराजांचा उत्कर्ष झाला तों या पुरुषाचे बळानें. हें पातशाहास जाहीर असून करवीर सातारकर महाराज यास पट्टाअभिषेक झाला, त्यावेळीं सदरहू आमचे हे त्रिवर्ग पुरुषाचीही बहडती झाली. येणेंप्रमाणें:—

संताजीबावा यास सेनापती हे किताब आणि पांच गांव इनाम व गजेंद्रगड परगणा पनाळे प्रांतीं देशमुखी दिली. त्याचे वंशाचें वर्णन यांत केलेलें नाहीं.

माहाळोजीबावा हे आमचे मूळ पुरुष, हे आह्मास निपणजेचे आजे होत. यासी अमिरुल उमराव हे किताब आणि पांच गांव इनाम व आजरे परगणा आणि बेळगांव प्रांत-ची देशमुखी दिली. हे आमचे अव्वल संपादक याचे वंशाचें वर्णन.

येणेंप्रमाणें पादशाहाचे हुकुमावरून करवीर व सातारकर महाराज यांनीं आमचे वंशास उत्तेजनें देऊन आपलेजवळ ठेवून घेतलें. नंतर सदरहू पुरूष आपआपले संस्थाना-वर राहून महाराजाबरोबर स्वारी मोहिमा वगैरे करून मुलूख काबीज करून महाराज सर-कारची फारच बढती केली. यांपैकीं आमचे पूर्वज माहाळोजीबावा या प्रांतींच मृत्यु पावले. यास पुत्र शिवजीबावा.

६ शिवजीबावा मोठे राजकारणी पुरुष, आमचे निपणजे. त्यास पुत्र यशवंतराव १ एक, माद्याळकर रामचंद्रराव १ एक, मालोजीराव १ एक, असे त्रिवर्ग आमचे पणजे. यांजपैकीं संस्थानावर चुलते पणजे यशवंतराव यास ठेवून माद्याळकर याचे वंशाचें वर्णन केलें नाहीं. त्यास महाराज सरकारचे स्वारीबरोबर नेमून शिवजीबावा निपणजे हे आमचे सख्ये पणजे यांनीं मालोजीराव आपला पुत्र बराबर घेऊन कर्नाटकप्रांतीं मोहीम करण्यास गेले. बरोबर दुसरे घराणेचें व त्यांचे वे कलमांत सांगितलेलें संस्थान राजकारणामुळें अफरातफरी झाल्याचें वर्तमान ऐकून या प्रांतीं शिवाजीबावा निपणजे येणार, इतक्यांत त्याच प्रांतीं मृत्यु पावले. त्याचे पुत्र आमचे पणजे मालोजीराव बरोबर होतेच.

७ पणजे मालोजीराव यांनीं दुसरें घराणें व शिदोजी हिंदुराव बरोबर निपणजांनीं नेला होता. त्यास गुत्ती संस्थानांत ठेवून तिकडील कामाची बंदोबस्ती त्याजकडे सांगून पणजे मालोजीराव या प्रांतीं इकडील बंदोबस्ताकरितां आले, आणि येथील संस्थान चुलते पणजे यशवंतराव होते त्याची रवानगी गुत्ती संस्थानाकडे करून दिली. नंतर चुलते पणजे तिकडे जाऊन पोहोंचल्यावर गुत्ती संस्थानावर शिदोजी हिंदुराव दुसरे घराणेचे पुरुष निपणजे यांनीं स्थापना करून आले होते, ते त्यांनीं तिकडील किल्ले वगैरे दुरुस्त करून होते, आबादी केली आणि इरादाही मोठा ठेविला. इतक्यांत ते मृत्यु पावले. त्यास पुत्र मुरारराव आणि आमचे चुलते पणजे यशवंतराव, मिळून गुत्ती संस्थानचें काम चालवून त्या प्रांतीं देवालय, तलाव, धर्मशाळा वगैरे कित्येक धर्मकृत्याचें काम केलें; आणि श्रीमंत पंतप्रधान यासीं दोस्ती ठेवून तिकडील पाळेगार वगैरेचा बंदोबस्त राखिला. हैदर याजबरोबर लढाया केल्या. शेवट हैदर यांनीं गुत्ती किल्ला घेऊन धरून कपाळगडावर ठेविला. तेथें मृत्यु पावले. मुरारराव यास पुत्रसंतान नाहींसा झाला. चुलते पणजे यशवंतराव यास दोघे पुत्र शिवराव १ एक व व्यंकटराव १ एक हे आमचे चुलते आजे. त्यांतून शिवराव यास मुरारराव यास दत्तक देऊन व्यंकटराव यांनीं पहिलें संपादन केले संस्थानावर व गुत्ती संस्थानावर नजर ठेवून जात येत होते. नंतर चुलते पणजे यशवंतराव मृत्यु पावले, आणि चुलत आजे व्यंकटराव या प्रांतीं आले असतां कर्नाटकप्रांतीं टिपूचा दंगा होऊन गुत्ती संस्थान टिपूनें हस्तगत करून घेतलें, आणि तेथील पुरुषास अटकाव केला. ते पुरुष मुरारराव हिंदुराव चुलत आजे शिवराव १ आणि पणजे मालोजीराव यांचेंही कुटुंब तिकडे होतें. त्याचे पुत्र यशवंतराव हे आमचे सख्ये आजे, दुसरे खंडराव हे आमचे चुलत आजे. हेही टिपूच्या हस्तगत होऊन पाडावांत सांपडले. टिपूनें दुसरीकडे जाण्यास अटकाव करून चार खासे टिपूच्या स्वाधीन झाले. त्यांतून आपले शूरत्वानें चुलत आजे याचे पुत्र शिदोजीराव आमचे चुलत चुलते हे टिपूचे हस्तगत न होतां या प्रांतीं येऊन सदर व्यंकटराव दोनी संस्थानांवर नजर ठेवून होते. त्यास व पणजे मालोजीराव यास गुत्तीकडील व्यवस्था सारी निवेदन करून टिपूच्या हस्तगत खास झाल्याचें सांगितलें. नंतर विचार पडून सख्ये आजे यशवंतराव व चुलत आजे खंडेराव हे लहान वयानें, याची पहिल्यानें श्रीमंत पंतप्रधान याचे कानावर [illegible] चुलत चुलत आजे व्यंकटराव यांनीं मोकळीक करून घेऊन या प्रांतीं श्रीमंतांच्या भेटीकरितां घेऊन आले. या दंग्यांत मालोजीराव पणजे याचा काळ झाला.

८ सख्ये आजे यशवंतराव व चुलत आजे व्यंकटराव व चुलत चुलते शिदोजीराव एकूण चार खासे श्रीमंताकडे मुरारराव साहेब व चुलत आजे शिवराव याचे मोकळिकीविशीं वगैरे बंदोबस्ताकरितां येऊन मोकळिकी विचार चालविले असतां टिपूचे बंदोबस्ताबद्दल परशरामपंत भाऊ पटवर्धन याची रवानगी कर्नाटकप्रांतीं फौजेसुद्धां होण्याचें मसलत होऊन

पटवर्धन कर्नाटकच्या मोहिमेस निघाले. त्या वेळेस श्रीमंतांनीं आमचे सदरहू खाशेस समजूत करून भाऊबरोबर याची रवानगी करून दिली. त्याप्रमाणें भाऊबरोबर कर्नाटकप्रांतीं जाऊन मुरारराव व चुलत चुलत आजे शिवराव याची मोकळीक करून घेऊन गुत्ती संस्थानाविशीं खटपट चालविली असतां श्रीमंताचा टिपूचा तह झाला. मुराररावसाहेब टिपूच्या बंदांत वारले. गुत्ती संस्थान तहामध्यें गुंतलें. तूर्त सोंडूर संस्थान सदर खाशेस देऊन खाशे याची समजूत करून घेऊन हरिपंततात्या फडकेबराबर पुण्यास येऊन श्रीमंत प्रधान यांसी भेटून आणखी बेळवती, रोंळी, कंकणवाडी वगैरे तालुके देऊन तूर्त समजूत करून जवळ श्रीमंतांनीं ठेऊन घेतलें. इतक्यांत चुलत आजे शिवराव आणि शिदोजीराव चुलत चुलते यासी सोंडूर संस्थानावर पाठवून सख्ये आजे यशवंतराव व चुलत आजे खंडेराव आणि चुलत चुलत आजे व्यंकटराव श्रीमंतासंनिधानीं राहिले. नंतर सदर व्यंकटराव यासी देशीं रवाना करून तेही सावनूर वगैरे लढाईंत खर्च झाले. त्यास दत्तक नाहीं. खर्डेची स्वारीची मोहीम येऊन श्रीमंत पंतप्रधान सवाई माधवरावसाहेब यांनीं फौजबंदी करून निजाममुलुकावर चालले. त्या वेळीं माधवरावसाहेब यांची कृपा असून त्या स्वारींत आमचे सरदार खाशेनीं मर्दुमी व पराक्रम दाखविले. तेणेंकडून श्रीमंत खुशाल होऊन बक्षिसा वगैरे दिल्या. खरड्याची मोहीम फत्ते करून श्रीमंताचे स्वारीसमागमें उभयतां आजे यशवंतराव खंडेराव पुण्यास आले. त्यावेळीं श्रीमंताचे मनांतून तालुके वगैरे संस्थान देऊन गुत्तीबद्दल समजूत काढावी असें बोलणें लागलें. त्यावेळीं उभयतां आजे यांचें ह्मणणें गुत्ती संस्थान प्राचीन वडिलार्जित संपादन केलेलें, टिपूकडे तहनामेंत सरकारानें सामील केलें तें आमचें आह्मांस मिळालें पाहिजे. त्यावांचून दुसरें घेणार नाहींत. ह्मणून निग्रह धरिल्यावरून नाना फडणीस व हरिपंततात्यांनीं वगैरे तेच संस्थानाचें देणें होईल ह्मणून आश्वासन देऊन जवळ ठेवून घेतलें. पुढें कांहीं दिवसांनीं श्रीमंत सवाई माधवरावसाहेब यांचा काल झाला. श्रीमंत बाजीरावसाहेब गादीवर आले. राज्यकारण मोठेंच मांडिलें. यांत कोणी मागील वाकबगार नाना फडणीस वगैरे कारभारी राहिले नाहींत. नाना फडणीस यांस बाजीरावसाहेब यांनीं कोंडलें; माहाडास अटकाव केला, तेथून सख्ये आजे यशवंतराव यांनीं खटपट चालवून मुक्त करून आणून शिंदे अलिजाबहादर यांची व नानाची दोस्ती करून राज्यकारभार चालविणें व मनसुबींत सख्ये आजे यशवंतराव असून नाना फडणीस याशीं शिंदेची भेट करविली. शिंदे यांनीं बाजीराव साहेब यांचे सुचनेवरून कैद करून यशवंतरावास अलिजाबहादरजवळ ठेवून घेतलें. नंतर श्रीमंत बाजीरावसाहेब पंतप्रधान व शिंदे या दोन्हीकडील धोरण राखून असतां शिंदेसरकाराशीं व इंग्रजी सरकाराशीं बिघाडा येऊन अजंठ्याच्या घाटावर लढाई झाली. त्यावेळेस सख्ये आजे यशवंतराव यांनीं शिंदे अलिज्याबहादर यासी समजून सांगून दोन्ही सरकाराशीं सल्ला करावा हें नीट, ह्मणोन आपण दरम्यान दोन्हीकडील इरावा राखोन इंग्रज-

सरकारच्या चित्तानुरूप तह करविला. तो तहनामा झाला त्यावेळीं आजे यशवंतराव यास वसली साहेबबहादूर इंग्रजसरकाराकडील होते. त्यांनीं सख्ये आजे यशवंतराव यास दरमाहा एक हजार रुपये जरनेली पेनशन करून दिली, आणि यशवंतराव हे मसलतबहादर असें समजून इंग्रजबहादरांनीं पेशवाईवर राजकारण चालविणेकरितां सख्ये आजे यशवंतराव यास आपलेकडे शिंदेकडून बोलावून घेतलें. त्या वैषम्यानें बाजीरावसाहेब यांनीं पेशजी दिले ते, बेळवती, रोळी, कंकणवाडी वगैरे जप्त केलें. त्या दिवसापासून इंग्रजसरकाराशीं दोस्ती ठेवून सख्ये आजे यशवंतराव यांनी पेशवाई सर होणेंविशींच्या चांगल्या मसलती इंग्रजसरकाराशीं देऊन त्याप्रमाणें सिद्धीस नेल्या व पेशवाई इंग्रजसरकाराशीं प्राप्त झाली. त्या योग्यतेवर सख्ये आजे यशवंतराव सरकारची खैरखा समजून पंचवीस हजार रुपयेची इनाम गांव पुत्रपौत्रादि पंशपरंपरा दिली. आणि पन्नास हजार रुपयांचा इनाम देणेचे संकेत होता त्यास हे पंचवीस हजार व पेशजी वसलीसाहेबांनीं जरनेली पेनशीन दिली ती बारा हजार जमेस धरून एकूण सदतीस हजार रुपये जाले. बाकी तेरा हजार मिळतील ह्मणून अश्वासन देऊन ठेवून घेतलें; आणि सरकारी कामकाजांत आजे यशवंतराव वागत होते. चुलत आजे खंडेराव पेशव्याचे व इंग्रजसरकारचे लढाईत बाजीरावसाहेब यांचे कारकीर्दींत स्वामीकार्यावर खर्च झाले. सख्ये आजे यशवंतराव यांनीं पेशवाईत व शिंदे आलिजाबहादर व इंग्रजसरकार यांचे कामांत अदमासें चाळीस वर्षें कामकाज करून सन १८२१ इसवी शके १७४३ चैत्र शुद्ध १५ पोर्णिमा रोजीं पुणें मुक्कामीं मृत्यु पावले; व चुलत आजे खंडेराव यासी शिवराव व भुजंगराव ऐसे दोन पुत्र. हे आमचे चुलत चुलते सख्ये आजे यशवंतराव यास आमचे तीर्थरूप मालोजीराव व नरसिंगराव हे आमचे सख्ये चुलते असे दोन पुत्र.

९ चुलत आजेचे पुत्र शिवराव व भुजंगराव वर आठ कलमांत सांगितलेले. हे आमचे चुलत चुलते. यांजैपकीं शिवराव यास सोंडूर संस्थानाकडील शिवोजीराव चुलत चुलते याचा काळ होतांच सख्ये आजेनीं पाठविला होता. ते त्या संस्थानाच्या गादीवर असून तीस वर्षे कारभार करून सन १२४९ फसली वैशाख शुद्ध १ प्रतिपदा शनिवार रोजीं मृत्यु पावले. त्याचे बंधू भुजंगराव हेही आमचे चुलत चुलते त्याचे संन्निध होते. ते शिवराव याचे पूर्वींच सन १२४१ फसली माघ वद्य त्रितिया शनिवार रोजीं सोंडुरास मृत्यु पावले. शिवराव यास पुत्रसंतान नाहीं. भुजंगराव यास एक पुत्र—व्यंकटराव. ते आमचे चुलत चुलत बंधू.

१० व्यंकटराव चुलत चुलत बंधू हे सदर शिवराव चुलत चुलते कैलासवास जाल्यावर सोंडूर संस्थानचे गादीवर असून हल्लीं तेथील काम चालवीत आहेत.

११ सख्ये आजे यशवंतराव याचे पुत्र आमचे तीर्थरूप मालोजीराव व चुलते नरसिंगराव वर आठ कलमांत सांगितलें तें वर्णन.

तीर्थरूप मालोजीराव यांनीं पहिले पांचवे कलमांतील अवल करवीर व सातारा महाराजाकडील राहिले. संपादन मौजे दत्तवाड इनामगांव आणि आठवे कलमांत सांगितलेली जरनेली पेनशीन बारा हजार व पंचवीस हजार रुपयांचीं इनामेंची वहिवाट करून तीर्थरूप वारल्यावर तेवीस वर्षें अजमासें कारभार करून शके १७६५ सन १२५४ फसली फाल्गुन शुद्ध पंचमी रोजीं कैलासवासी झाले. हे पुरुष लौकिकवान या प्रांतीं गौरनरसाहेब सरदार लोकांच्या भेटीवख्तीं याजकडूनही सल्ला घेऊन, त्याचे त्याचे मरातबाप्रमाणें सरदार लोकांच्या मुलाकती घेणेचा इंग्रजसरकारांनीं पाठ ठेविला होता. त्यास पुत्र आह्मी वडील नारायणराव, व आमचे सख्ये बंधु यशवंतराव, व सापत्न बंधू खंडेराव असे त्रिवर्ग.

चुलते नरसिंगराव आठ कलमांत सांगितले. त्यास आमचे तीर्थरूपांनीं इंग्रजाकडील संपादन केले इनामपैकीं तीन गांव दिले. उपभोग करून होते. ते तारीख ४ सपटंबर सन १८३७ इसवी रोजीं जेजोरीस श्री देवास गेलेवेळीं पुणें मुक्कामीं मृत्यु पावले. त्यास पुत्र व्यंकटराव हे आमचे चुलत बंधू.

१२ चुलत बंधू व्यंकटराव यास बडोदेकर गायकवाड सेना खासखेल समशेरबहादूर यांनीं आपली कन्या देऊन लग्न फार समारंभानें करून पन्नास हजार रुपयांचा स्वास्था देऊन आपले सन्निध ठेवून घेतलें. ते हल्लीं बडोदें मुक्कामीं मानपानानें आहेत.

१३ आह्मी नारायणराव दहावे कलमांत सांगितलेप्रमाणें त्रिवर्ग बंधू हे करवीरकर महाराजाचे व सातारे महाराजाचे उत्कर्षावेळेस मिळालेले पांच कलमांत लिहिल्याप्रमाणें राहिला इनामगांव मौजे दत्तवाड येथें राहून, इंग्रजसरकारांनीं इनाम दिले ते उपभोग करून सख्ये बंधू व सापत्न बंधू लहान हे सन्निध ठेवून घेऊन इंग्रजबहादर सरदार लोकांची मर्जीनुरूप दोस्ती ठेवून आहोंत.

येणेंप्रमाणें इतिहासांतील अभिप्राय पांचवे कलमांत सांगितला. मूळ पुरुषांनीं करवीर व सातारे महाराजाकडून पातशाहाचे हुकुमावरून अमिरुल उमराव ही किताब मिळविली आहे. त्याचप्रमाणें श्रीमंत पंतप्रधान यांनीं थोरवी देऊन आमचे पुरुषाची बढती करून सरकार कामकाजांत घेऊन लौकिक वाढविला. त्यांनीं कर्नाटकप्रांतीं केलेल्या सुकीर्ती अद्यापि महशूर आहेत. तसेंच आठ कलमांत सांगितले ते आमचे सख्ये आजे महान प्रतापी, त्यांचा लौकिक हिंदुस्थान व दखन भरून सर्वत्रांस प्रसिद्ध आहे; आणि पुणें मुक्कामीं करनेल कुलूरु साहेब यांनीं पेशवाई सर झाले वेळीं होते, आणि अलफिस्टन साहेब होते त्यांस सर्व आमची पदवीची पक्की वाकबगारी झाली असून त्या वाकबगारीवर अलीकडील सरदार गौरनेर एजंट आदिकरून आमचे खानदानीची थोरवी जाणून त्याप्रमाणें मेहेरबानी करून दोस्तीची बढती ठेविली आहे. शिवाय आमचे इरादेचे सरदार शिंदे अलिजाबहादर व होळकर, भोसले, गायकवाड, सरलष्कर, निपाणीकर, पटवर्धन, रास्ते आदिकरून या

लोकांशीं आमची थोरवी व किताब प्रसिद्ध असून वडिलार्जित तसेंच लिहिण्याचा पाठ आजपर्यंत चालला आहे.

येणेंप्रमाणें घोरपडे अमिरुल उमराव याचे इतिहासाचें वर्णन असे. तारीख २७ माहे नवंबर सन १८५१ इसवी छ मोहरम शके १७७३ विरोधीकृतनाम संवत्सरे सन १२६१ फसली कार्तिक वद्य १२ गुरुवार सुरूसन इसन्ने खमसेन मयातैन व अलफ.

**माहाळोजी.**




* हे दोघे हैदराचे बंदींतून पळून येऊन मग सख्त लढाई करून वारले. दोघांस संतान नाहीं.

**टीप–माहाळोजी** याचें आडनांव पहिलें भोसले म्हणून होतें, व दिल्लीचे बादशहापाशीं बहुत अबूनें सरदारी कामावर होते. कोणी एक किल्ल्यास पादशाहा वेढा दिला, परंतु हल्लेस उपाय चालेना; तेव्हां यांनीं घोरपड किल्ल्यास लावून त्याचे जोरानें किल्लेस खुद्द हल्ला चढून ठाणा घेतलें, कारण घोरपडे म्हणून त्या दिवसापासून आडनांव प्राप्त झालें.

एजंट दप्तरपैकीं रुमाल नंबर २५ यांत घोरपडे यांची वंशावळ असून त्याखालीं कैफियतीदाखल टिपा आहेत त्यापैकीं उतारा:—

१ संभाजी राजे यास दिल्ली पादशाहा रामराजे यास विजापूर पादशाहां यांनीं कैद केलें, तेव्हां संताजी घोरपडे यांनीं मुलखांत बंडाई केले; बहिरजी घोरपडे विजापुरांत हिकमत

करून मालोजी घोरपडे यास रामराजे याचे बिछानेवर निजवून राजे यास घेऊन कर्नाटकांत चंदीचंदावरास दाखल झाले. पुढें शाहूराजे यास दिल्ली पादशाहानीं चौथाई व सरदेशमुखी वतन देऊन पाठविलेवरून स्थळास येऊन पावले. ते खबर ऐकून चंदीहून रामराजे व बहिरजी घोरपडे येऊन पावले व मालोजीही येऊन पावले.

२ उभयतां महाराज स्थलास येऊन पावलेवरी बहुत खुषी होऊन महलाजीचे मुलगे संताजी, बहिरजी व मालोजी यांची मेहनत खातीरेंत आणून:—

संताजी—यास पांच गांव इनाम व करवीर हवेलीचे, सरदेशमुखी वतन व इसाफत गांव व मलप्रभापासून तुंगभद्रेपावेतों मुलूख देऊन सैनापती किताब दिले.

बहिरजी—यांस पांच गांव इनाम करवीर हवेलींचें सरदेशमुखी व इसाफत गांव व तुंगभद्रेपासून रामेश्वरपावेतों मुलूख देऊन हिंदुराव ममलकतमदार किताब दिले.

मालोजी—यांस पांच गांव इनाम व अजरें व बेळगांवप्रांतचे व सरदेशमुखी व इसाफत गांव देऊन कृष्णापासून मलप्रभापावेतों मुलूख देऊन अमिरुल उमराव किताब दिले.

सदरीं तिघास मुलूख दिले म्हणोन लिहिलें आहे; परंतु दाखले पाहतां सदरीं मुलखाचे चौथाई दिले असतील असें दिसत आहे.

---

## ६ घोरपडे गजेंद्रगडकर.

यादी घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडकर यांची कैफियत. घोरपडे हे पादशाई पैवस्तींत वजीर मूळ पुरुष मालोजीराव घोरपडे पादशाहाकडे होते. त्याचे पुत्र माहाळोजीराव घोरपडे हेही पादशाईत वागले. नंतर त्याचे पुत्र बहिरजीराव घोरपडे हिंदुराव ममलकतमदार सेनापती हे श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपती शककर्ते याजकडे बहुत मेहनत करून, गजेंद्रगड व गुत्ती दौलत मिळविली. त्यांस वर्षे सुमार २५०. श्रीसुब्रह्मण्य प्रसन्न झाला. त्याचे पुत्र मुरारराव हिंदुराव ममलकतमदार सेनापती हे विजापुरचे फौजेबरोवर लढाई करून उमर २२ वर्षांमध्यें लढाईत मेले. याचा वंश नाहीं. त्याचे धाकटे बंधू शिदोजीराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सेनापती राजऋषी याप्रमाणें किताब मिळविला. त्याचे पुत्र मुरारराव हिंदुराव सेनापती गुत्तीकर. याचे धाकटे बंधू दौलतराव हिंदुराव याचे धाकटे बंधू भुजंगराव घोरपडे लढाईत पडले. उमर वर्षे २०. त्याचा वंश नाहीं. दौलतराव घोरपडे हिंदुराव याचे पुत्र थोरले बहिरजीराव, धाकटे पुत्र संभाजीराव, नानासाहेब ज्येष्ठ बहिरजीराव साहेबाचे पुत्र, हल्लीं राजश्री भुजंगराव आप्पासाहेब घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडांत आहेत. मूळ पुरुष मालोजीराव व माहळोजीराव हे दोघे पादशाई सेवेंत या वेळेस दौलत बहुतच होती. त्या काळचीं कागदपत्रें हरएक गर्दीत तसनस झालीं. दाखला राहिला नाहीं. बहिरजीराव हे मूळ पुरुषाचे नातू. यांनीं छत्रपती सरकारांत सेवा करून, गजेंद्रगड व गुत्ती वगैरे तालुका चाळीस लक्षांचा अनभवीत आले. त्यास अडीचशें वर्षे झालीं. पुढें मुरारराव

गुत्तीकडे याचें व हैदराचें वैमनस्य पडून तमाम मुराररायाकडील तालुका टिपूनें घेतला. याजवर मुराररायाचे बंधु दौलतराव यांजकडीलही गजेंद्रगडसुद्धां कितेक तालुका वहा वर्षें टिपूनें अंमल केला. तो परतून पेशवे यांचे कुमकेनें दौलतरावसाहेब यानें घेऊन आपला तालुका आपण अनुभवीत होते. त्याचा तपशील वगैरे:—० × × × एकंदर आहवाल असा आहे कीं, सदरी गजेंद्रगड किल्ल्याखालीं सरंजाम बेरीजने लिहिले-प्रमाणें बहुत वर्षे चालून दरम्यान हरिपंत फडके यांनीं आदावतीनें नबाब निजाम अलीखा-बहादूर याचे व टिपूचे व पेशवे पंतप्रधान या तिघांचे तहाचे संधींत, आमचे खुद्द जातीचाच खर्चापुरता तालुका मामूल जहागिर समजून, सदरहु जातीपुरतें ठेवून, हें ठेवल्याचे मोबदला पेशव्यानें नबाबास आणखी सरकारी तालुका वेगळा देऊन आमचा तालुका आह्मां-कडे ठेविला. त्यांची बेरीज हल्लीं चालती ती अजमासें:— भुजंगराव आपासाहेब व भाऊबंद वगैरे मिळून चालत आहे रुपये १३०००. गजेंद्रगडांत हल्लीं वहिवाट चालतच आहे. आणि मामूल दौलतीचा दाखला तमाम पेशवेकडील नाना फडणीस यांच्या दप्तरास बार आहे; हल्लीं गजेंद्र-गड तालुकेंत धर्मादाय ब्राह्मणांस दिल्याची सनद व शेटे महाजन यांस पेठ वसाहत करणेस सनद दौलतराव घोरपडे यांनीं दिली ती अजमासें शंभर वर्षांच्या सनदा हजर आहेत. पूर्वील कागदपत्र टिपू याचे गर्दींत तसनस झाली. परंपरा चालत आलेला मजकूर असा आहे. घोरपडे हे पादशाई सरदार त्या दिवसापासून दौलतदार, पुढें छत्रपती सरकारा-कडे राज्यभार आला, त्याजकडे वागले. नंतर पेशवे हे कृपा करीत होते. त्याजवर कुंपणी सरकार सरफराज होऊन परामृष करीत आहेत. तारीख छ २१ माहे जमादिलावल ऊर्फ भाद्रपद वद्य ८ मन्मथ संवत्सरे शके १७५१ सन १८३५ इसवी.

( ब )

यादी घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडकर यांची कैफियत तपशील सुरुसन सलासीन मयातेन व अलफ.

पूर्वीं दक्षणचे पादशाहा तीन, निजामशाहा व आदिलशाहा व कुतुबशाहा, त्यांमध्यें निजा-मशाही पादशाही बुडाली. घोरपडे हे वजीर दोन पिढीचे. विजापूर पादशाही आवलशाहाचे कारकीर्दींत पादशाहाची पैवस्ती तीन पिढी. घोरपडे याची पिढी दोन पादशाहींत गुजरल्या-नंतर आदिलशाहा पादशाहा धाकटा त्यास लालखान पठाणानें कैद करून त्या मुलाचे नांवें आपण मुखत्यार फौजबंद होऊन मराठे सरदारास बुडवावें हा इरादा केला. त्यावेळीं शिवाजीमहाराजाचे बाप, इब्राम आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दीस, महाराजाचे वडील निजामशाहींतून इकडे भागानगरास आले; आणि शिवाजीमहाराज यांनीं घोरपडे वजीर यास भागानगरचे मुक्कामीं कुतुबशाहा पादशाहाचे हुजूर येणें ह्मणून हुजूरचा कौल-फरमाना पाठविला; आणि लिहिलें कीं, तक्त व छत्र विजापुरचा कोट पठाणांनीं कबज केला; पादशाईस पठाण जाला ही गोष्ट बरी नव्हे. कुळी दक्षिणी याची घरें बुडवील

सबब कुतुबशाहाचे हुजूर तुह्मी आले असतां तुह्मांस दुगणी दौलत मिळेल. पठाणास सामील न होतां इकडे येणें. असें. मालोजी घोरपडे मुधोळकर हल्लीं होते याचे आजे मालोजी व आमचे मुरारराव साहेबाचे निपणजे बहिरजी घोरपडे गजेंद्रगडकर हे उभयतां बंधूवर्ग आणखी एक बंधू दतवाडकर व कापशीकर हे एकंदर गोत्र पुरुष मूळ घराणें एक पातशाहींत दोन पिढ्या या त्रिवर्गाचे आजे वजीरी अनभवीत आले. पुढें कुतुबशाहाचे फर्मानेबमोजीब शिवाजीमहाराज यांचे लिहिल्याअन्वयें लालखान पठाणाची संगत सोडून, सदरहू मालोजी घोरपडे त्रिवर्गबंधूसुद्धां कूच करून भागानगरचे मुक्कामीं जाऊन, राजे याचे विद्यमानें कुतुबशाहा पादशाहाचे भेटी घेऊन, पादशाहास व राजेस विजापुराकडे मजल दरमजल येऊन पठाणाचें पारिपत्य केलें. हिंदु पदवी जुमामर्दीनें घोरपडे वजीर त्रिवर्गांनीं राखली. सबब मालोजी घोरपडे यास राजे हा किताब व बहिरजी घोरपडे यास हिंदुराव ह्मणोन किताब; दतवाडकर यास अमिरुल उमराव ह्मणून मरातब, कुतुबशाही पातशाहा सरकारांतून तिनी किताब घोरपडे यांस मिळाले. त्याकाळीं दवलतही पादशाहाचे वेळीं बहुत चालत आली. पुढें पादशाहाचें व महाराजाचें कारणपरत्वें वैर पडून विजापुरांत महाराजास पादशाहानें कैद केलें. करवीरप्रांत पनाळगड वगैरे राजधानी किल्ले पादशाहाकडून ठाणीं बसत चाललीं ! त्यासमयीं घोरपडे दोघे चौघे बंधू एकदिल होऊन जातीचा अभिमान धरून, फौज जमावानिशीं हरएक प्रांतांत फिरत होते. तेथून संताजी घोरपडे दोघे तिघे बंधूंनिशीं दरकूच फौजबंद आणि तोफेचें कूच व्हावयाजोगी फौज बहुत होती. ते थोरले संताजी कापशीकर विजापूरनजीक येऊन दाखल झाले. दोघे बंधूवर्ग घोरपडे बायकांचें सोंग घेऊन पाण्याच्या घागरी डोक्यावर घेऊन कैदखान्यांत बायकाचे मिषें जाऊन राजे पलंगावर निजले होते. तेथून बायकाचें सोंग राजास घालून एक घोरपडे, राजाचे पलंगावर राजेच निजले असे बहाणा करून गुप्त निजले. एकजण घोरपडे स्त्रियाचे वेषानें राजेसुद्धां कैदखानेंतून संताजी घोरपडे याचे फौजेंत राजेस घेऊन दाखल जाहले. पलंगावर निजले घोरपडे त्यांनीं बेआराम तबेत ह्मणून अंगावरील पांघुरणाची मुसकट न काढितां जेवायास उठेनात. राजे भोजनास न आले ह्मणून वरदी हुजूर पोंहचली, नंतर चौकशी झाली. मुसकट पाहतांच शत्रु गेला असें समजून यास मारून तरी उपयोग नाहीं ह्मणून पोशाख देऊन सोडून दिलें. नंतर एकंदर घोरपडे दरकूच करून करवीर प्रांतीं येऊन राजधानी हस्तगत करून करवीरकर संभाजीराजे छत्रपती यास तख्तावर आभिषेक करून तमाम ठाणीं घेतलीं. तेव्हां हिंदु पदवी राखली, सबब संताजी घोरपडे हे वडील घराणें यास सेनापती पदवी देऊन छत्रपतीनें वस्त्रें दिलीं. उपरांतिक श्रीमहालक्ष्मीची मूर्ति यवनाचे योगें बहुत काल गुप्त होती. ती थोरले बहिरजीचे पणतू शिदोजी घोरपडे हिंदुराव याचे स्वप्नीं येऊन देवळांत स्थापना करावी ह्मणून आज्ञा झाली. गुप्त स्थळही स्वप्नीं सांगितलें. त्या

ठिकाणास जाऊन ती मूर्ति पालखींत दाखल करितांच पालखी भोयास उचलेना. तव घोरपडे हिंदुराव यांनीं श्रीमहालक्ष्मी देवीस अर्ज केला कीं, आमचे स्वप्नांत सांगितलेलें खरें असें आहे, तर आह्मी खांदा पालखीस लावितांक्षणीं स्वारी उठावी. ह्मणून खांदा देतांच पालखी उठली. तव देवळांत स्थापना होऊन देवीचीं प्रधानकीचीं वस्त्रें घोरपडे हिंदुराव यांस होऊन पांच गांव व सरदेशमुखी वतन इनाम छत्रपतीनें करून दिल्हे; ते हिंदुराव यांनीं सरदेशमुखी व सांगवड गांव आपलेकडे ठेवून बाकीचा चार गांव गुमास्ते ब्राह्मण यांस इनाम देऊन श्रीची अर्चा चालविली. पुढें महाराजाचे कृपें पेशवे प्रबल झाले. तेव्हां त्यासही घोरपडे अनसरून होते. शिदोजीराव याचे पुत्र मुरारराव थोरले, धाकटे दौलतराव गजेंद्रगडकर हे दोघे बंधू; त्यांत मुरारराव महापराक्रमी दैवशाली होऊन मोंगलाईंत चौथाई घेऊन छत्रपतीचे बंधू चंदीचंदावराकडे गेले. त्याचे आज्ञेरूप पेशवेचेही दोस्ती राखून गुत्ती वगैरे चाळीस लक्षांची दवलत अनभवीत होते. पादशाही व शिवशाही व पेशवाई वगैरे राजकारणें अनेक तऱ्हेचीं त्या धांदलींत कितेक दवलती गेल्या आल्या. कागदपत्रें दप्तर तसनस झालें. असो. दरम्यान टिपूस देखील मुरारराव शत्रू प्रबल होते. उपर हैदरअल्लीखान हे त्रिचनापल्लीवर दावा पेशजी करीत असतांना इंग्रजबहादूर यांनीं आपले कुमकेस मुराररावसाहेब यांस त्रिचनापल्ली मुक्कामीं कांहीं दिवस घेऊन गेले होते. श्रीमंतांचे वकील मुरारराव याजकडे हमेशां राहत होते. तदनंतर थोरले श्रीमंताची स्वारी कर्नाटकांत आली, त्यावेळें सातारे इलाख्यांतील दाभाडे सेनापती याची पदवी तगैरी करून कर्नाटकचे स्वारींत मुरारराव यास सातारे राजधानींतील सेनापती पदवीचीं वस्त्रें देऊन जहागीरही बहुत बेलवती, सिधनाथ, रोली, निडगुंद वगैरे देऊन, मुरारराव याचे बंधू दवलतराव घोरपडे गजेंद्रगडकर याजवरही श्रीमंतांनीं बहाल मर्जी करून गजेंद्रगड तालुका तीन लक्षांचा किल्लेखर्चाकडे करून दिले. त्याजवर टिपूचे हैदरअल्लीखान वगैरे लढाई होऊन फितुरानें पुढें मुरारराव हैदराचे हस्तगत झाले. तदनंतर गजेंद्रगडही टिपूनें घेतला. दौलतरावसाहेब यांनीं श्रीमंताची मर्जी रक्षून इकडे कर्नाटकांत श्रीमंताचे स्वारीसह हरिपंत फडके वगैरे येतांच गजेंद्रगडास मोर्चा देऊन, हर युक्तीनें श्रीमंताचे आज्ञेप्रमाणें किल्ले गजेंद्रगड दवलतरावसाहेब यांनीं घेऊन, अंमल सुरू करून तीन लक्षांचा मुलूख किल्लेखर्चाकडे अनभवीत आले. त्याजवर परशरामपंत भाऊ पटवर्धन यांची फार दोस्ती दवलतराव घोरपडे करीत होते. भाऊचे व हरिपंत फडक्यांचें वैमनस्य, घोरपडे भाऊचे दोस्त, आपले मर्जीनें वागत नाहींत; या आकसकोशीनें मोंगलाई तह करते वेळीं किल्ले गजेंद्रगड वगैरे पंचवीस हजाराची जहागीर जातीचे खर्चास ठेवून, पावणेतीन लक्षांचा तालुका मोंगलाईकडे तहाचे संधींत त्यास दिला. त्याजवर अलीकडे इस्तकबिलपासून श्रीमंताचें देणें कैलासवासी थोरले माधवराव यानें गलमल, निडगुंदे, इंगल वगैरे गांव पन्नास साठ हजाराचे चाळीस पन्नास वर्षे घोरपडे गजेंद्रगडकर यांजकडे गड किल्ले खेरीजकरून होते

चालत आले. ते हल्लीं श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान यांनीं जप्त करून जुने सरदार मोडून नवीन केले. टिपूचे लढाईमुळें कागदपत्र गजेंद्रगड वगैरेचे तसनस झाले. राजक्रांत बहुतेक गर्दी. हर पैवस्तीस पर सैनाचे होऊन घोरपडेचे वंश व वहिवाट दाखला एवढेंच राहिलें. बाकीचे कागदपत्रें शत्रूचे प्रबलांत गेलीं. सारांश घोरपडे हे पादशाहीपासून वजिरी घराणें व सुब्रह्मण्य नागसर्प प्रत्यक्ष मूळ पुरुषापासून प्रसन्नवरदी त्या कृपेनें पादशाईचे हुकुमानें पराक्रमशाली होऊन दौलत करीत आले. पादशाही पुण्य सरल्यावर शिवशाही छत्रपती सरकारकृपें त्याचे आज्ञेप्रमाणें बहुत दवलत जाऊन थोडक्या दौलतींत गुजारा करीत आले. राजधानी पुणें पेशवे राजेचे योगं प्रबल जाहले. याचे मर्जीनुरूप मुराराव व दवलतराव जुरतीनें श्रीमंताचे निरोपें कोते दौलत अनभवून चालले. श्रीमंताचें पुण्य सरून कुंपणीसरकार सार्वभौम पृथ्वीपती शककर्ते सरकार इंग्रजबहादूर दयाळू, मामुल सरदारास वाढविणार, दीन दुनयाचे पादशाहा, त्याचे हुकमानुसार मुरारराव व दौलतराव यांचे नातू राजश्री भुजंगराव घोरपडे हिंदुराव हे किल्ले गजेंद्रगड मुक्कामीं गरीफदारी दवलतींत श्रमून कर्जाचे पेचीं येऊन सदरहू तालुकेंत भोगवटा करीत आहेत. श्रम परिहार करणार खावद समर्थ आहां. तारीख छ २४ माहे मोहरम मुकाबला २४ जून सुरुसन फसली १२४२ सन १८३२ इसवी. जेष्ठवद्य ११ नंदन संवत्सरे शके १७५४.

---

## ७ जाधवराव.

### ( अ )

साहेब मुषफक मेहरबां करम फर्माय दोस्तान राबर्ट किसर साहेब बहादूर आक्टिंग एजंट जिल्हा दक्षिण सलामहू.

आजी साहेब राजे रतनसिंग जाधवराव सलाम बादआज सलाम अंकी येथील खैरियत जाणून आपली शादमानी हमेशा कलमी होऊन दिल अराम करीत असावें. दिगर मजमुन आ साहेबाचें खत तारीख २९ माहे मे सन १८५२ इसवी नंबर ३८२ चें कलमी जाहालें. त्यांत आपल्यास किताब राजे हें पद आहे तें कधीं, कोणत्या बाबेनें, कोणाकडून प्राप्त झालें, त्याचा एकंदर खानदानी व पदवी थोरपणाचा इतिहास दाखल्या-निशीं लिहिण्यांत येऊन दाखला असेल तो ऐकिण्यांत पुरावा दाखल्यानिशीं पाठविला पाहिजे. पुरावा नसल्यास तैसेंच लिहून पाठवावें ह्मणून लिहिण्यांत आलें. त्यास खान-दानी व थोरपणा व राजे हा किताब पूर्वी आमचे पणजे मूळपुरुष धनाजी जाधवराव हे फौजबंद पराक्रमी. यांनीं श्रीमंत महाराज शिवाजी राजे छत्रपती यांनीं राज्य सर केले-नंतर श्रीमंत महाराज शाहूराजे यांनीं बहुत पराक्रमी फौजबंद आणि राज्य मिळविते जाणून सेनापतित्व दिलें. ते समयीं बाळाजी विश्वनाथ हे धनाजी जाधवराव याचे पदरचे, यांनीं कामें मोठीं मोठीं केलीं. राज्यकर्तेपणा समजून त्यास पेशवेपद प्राप्त झालें. पेशवे

यांनीं मूळ जाणून लढाईअखेर अगोदर भेटीस पुण्यास जाणें झालें असतां येत होते. धनाजी जाधवराव यास पुत्र वडील चंद्रसेन जाधवराव व धाकटे शंभूसिंग जाधवराव हे आमचे आजे. यांनीं दिल्लीस जाऊन पादशाहा याची भेट घेतली. पादशाहांनीं पराक्रमी पाहून हैदराबाद इलाख्यांत बावन्न लक्षाचे जहागिरीचे सनदापत्रें देऊन राजे ही किताब दिली. सनदापत्रें वगैरे दाखल्याचे कागद दरोबस्त होळकर दंग्यांत गेले. खानदानी व थोरपणा व राजे ही पदवी छत्रपती महाराज यांचे राज्यापासून मोंगलाईंत महशूर आहे. हा सर्व अभिप्राय कंपणीसरकारांत जाहीरच आहे. मालूम व्हावें. हमेशां खत कलमी होऊन दोस्तीची मेहेर असावी. रवाना तारीख छ ७ माहे सवाल सन १२६२. जादा काय लिहिणें. प्यार मोहोबत कीजे हे किताबत.

( ब )

यादी राजे रतनसिंग जाधवराव सुरुसन सलास सलासीन मयातैन व आलफ. सरकारांतून मेहेरबान डिपुटी एजंटसाहेब यांचे कचेरींतून तारीख ८ सपटंबर सन १८३२ इसवीचें इज्यानिबास खत आलें. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदेगान अली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत जे, दक्षिणेंतील जहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी ह्मणून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला ते, व फौज व जात सरंजाम आपले वडिलाकडे चालत होता व सदर्हू सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपनीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश तफावत काय आहे ते, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणून पत्र आलें. त्याचें उत्तर लिहिण्यांत येतें, बितपशील.

१ आपली खानदानी व बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला. याचें उत्तरः—श्रीमंत महाराज शिवाजी राजे छत्रपती यांनीं राज्य सर केलें, पादशाई किल्लेकोट लढाया वगैरे केल्या, ते समयीं आमचे पणजे धनाजी जाधवराव हे सरदार फौजबंद, पराक्रमलौकिक मोठा महशूर, त्यासी सेनापती पदवी दिली. पुढें श्रीमंत महाराज शाहू राजे छत्रपती शके १६३१ सालीं दिल्लीहून दक्षिणेस आले. त्यांनीं धनाजी जाधवराव सेनापती हे फौजबंद त्यास अनुकूल करून घेऊन राज्यकारभार करूं लागले, आणि राज्याचा बंदोबस्त केला. धनाजी जाधवराव यांचे पदरीं बाळाजी विश्वनाथ होते. हे बहुत उपयोगी पडले, सबब त्यास सेनाकर्ते असा किताब झाला. पुढें मोठे मोठे कामें करितां पेशवे पद प्राप्त झालें. परंतु आपण जाधवराव याचे पदरचे हें जाणोन होते. खानदानीची बढती धनाजी जाधवराव याजपासून व खानदानीचा लौकिक महशूर शिवाजीमहाराज यांची राज्यावर स्थापना केली त्या दिवसापासून जाहला.

२ फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता; व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला त्याचें उत्तरः—आमचे पणजे धनाजी जाधवराव सेनापती याजकडे फौजबंद उत्पन्न वगैरे मोठें; त्यासी पुत्र दोघे, चंद्रसेन जाधवराव व शंभुशिंग जाधवराव. हे आमचे आजे. हे उभयतां दिल्लीस जाऊन पादशाहा याची भेट घेऊन पादशाहा यांनीं त्यांचा पराक्रम शूर असें मनांत वागवून ( पुढें फाटलें आहे ) वर्ष सुमारें झालें. तारीख लावावयाची त्यास आमचे सनदापत्रें दंग्यामुळें अस्ताव्यस्त झालीं आहेत. कलम.

३ आपले जाहगिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली याचें उत्तरः—आमचे सरंजाम मोकासे अमलाचा बहुतकरून मोंगलाईंत होता. त्याचा अम्मल जसा जोर पोंहोचेल तसा आम्ही घेत होतों. राहण्याचा गांव माळेगांव, त्याची वहिवाट मुखत्यारीनें आमचे आह्मी करीत आहों. यांत सरकारची दखलगिरी कांहीं एक नाहीं.

४ आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे याचें उत्तरः—

१०००० राहण्याचा गांव माळेगांव व कुगांव मोकासबाब आंबडबरसी फुटगांव मिळून आकार अजमास.

१०००० मोंगलाईंत सरंजाम गेला त्याबद्दल बेवीस हजार रुपये याखेरीज जात सरंजामास द्यावयाचा नेम बोलण्यांत आला. परंतु मोगलाईबद्दल सरंजाम ह्मणून दिला नाहीं. पेनशिन दहा हजार करून दिली ते वेळेस पत्रांत मजकूर कीं, खावंदांनीं मोठेपणावर नजर देऊन पेनशिन दिली ह्मणून.

२००००

याप्रमाणें चालत आहे. कलम.

५ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे. त्यांत कंपेश तफावत काय? याचें उत्तरः—आमचे तीर्थरूप आमरसिंग जाधवराव शंभर वर्षे वयाचे वृद्ध होते. त्यांनीं बाळाजी विश्वनाथ याजपासून श्रीमंत राजेश्री बाजीराव साहेबापावेतों जितक्या कारकिर्दी पेशव्यांचे घरीं झाल्या, तितक्याही कामकाजांत उपयोग करून पाहिल्या; व आपले पूर्वीचे यजमान जाधवराव आपण यांचे योगानें दौलतीस आलों, ऐसें पेशवे आठवीत होते. अबागिरीवर आमची निशाणीची खूण वागवीत होते. आमचे जाधवराव पुण्यास आले असतां पेशवे यांनीं भेटीस शहराबाहेर सामोरे यावें, असा रुदबा चालत होता व मातबर कामकाजाचे प्रसंगानें व फौजेचे जमितीनें राहती त्यास कंपनी सरकारांतून फौजेचा सरंजाम महकूब झाला. ( पुढें फाटलें आहे. )

## ८ जाधवराव वाघोलीकर.

यादी लक्ष्मण जाधवराव वाघोलकर सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व आलफ मेहरबान वार्डिनसाहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षिण यांचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवींचें ईजानेबास खत आलें. त्यांत मजकूर जे, हजरत बंदेगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कैसी आहे, याची वाकबगारी व्हावी. याजकरितां आपण सरकारांत रवाना करणेकरतां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे ह्मणून. त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो जेः—

१ आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला ह्मणून पत्रांत कलमी केलें त्याचें उत्तरः—आमचे निपणजे पिलाजी जाधवराव मूळ-पुरुष दौलत संपादनकर्ते. हे श्रीमंत महाराज शाहू छत्रपती दिल्लीहून आले, ते वेळेस कितीएक सरदार त्यांस राज्यावर आणावें ह्मणून गेले होते. त्यांनीं पादशाहाची मर्जी संपादन करून महाराजास दक्षिणेस घेऊन आले. त्यांत पिलाजी जाधवराव यांनीं महाराजांचा बहुत उपयोग केला. त्याजवरून शाहू छत्रपती यांनीं कृपा करून इनाम पुणें प्रांतीं मौजे दिवें येथील मोकासा बाबती व मौजे नांदेड येथील स्वराज्य अंमल इनाम दिला. सन ११२३ साचे सालीं तारीख १३ माहे जिलकाद दिल्यानंतर पुढें औरंगाबाद प्रांतीं कनड फुलबरी वगैरे माहालाचे मोकासे दीड लक्ष रुपयांचे सरंजामास दिले. त्या योगें-करून पागा पथक जाबीद राहून, सरकारांनीं कामगिरी फर्माविली तें काम महाराजांचे प्रतापें-करून बजावीत होते. दमाजी थोरात हिंगणगांवकर यांनीं बाळाजी विश्वनाथ पेशवे व आबाजीपंत पुरंधरे यांस कैद केलें. त्यास कारस्थानानें व जहामर्दीनें काढून सातान्यास नेलें व पुढें दमाजीस धरून कैद करून सातान्यास नेलें. तेव्हांपासून खानदानीची बढती व लौकिक महशूर झाला. या अलीकडे बाळाजी विश्वनाथ व बाजीरावसाहेब पेशवे यांजबराबर दिल्लीच्या स्वाऱ्या केल्या. नबाबावर स्वारी करून कामकाज बजावून सरकारांत मुलूख घेतला, आणि नबाब निजामनमुलूक यांनीं आह्मांस इनामगांव मौजे गोळेगांव व मौजे मरकल येथील जाहागिरीचा अंमल इनाम दिला. त्याजवर हिंदुस्थानांत राजे छत्रसाल याजवर वक्त पडला, तेसमयीं बाजीरावसाहेब यांजबरोबर जाऊन छत्रसाल राजे यांजवर शत्रु आला होता त्याचें परिमार्जन करून संस्थान रक्षिलें. याजमुळें राजे छत्रसाल यांनीं पेशवे सरकारांत लाख रुपयांचा मुलूख बुंदेलखंडाचा दिला. आह्मांसही इनाम मौजे बासा वगैरे देहें ५ सागर प्रांतीं इनाम दिलीं. त्याजवर त्रिंबकराव दाभाडे बाजीराव-साहेब याजवर चढोन आले व त्याची जमीयत भारी होती, असें असतां त्यांशीं लढाई देऊन दाभाडे यास शिकस्त करून गारद केलें व चिमाजी आप्पाबराबर वसईचे मसलतीस पिलाजी जाधवराव बराबर होते. तेथें कामकाज भारी करून इनाम बाग वसईस सरकारांतून करून दिला, व बंगाल्याची मोहीम नानासाहेब पेशवे याजबरोबर सेनापती

होऊन केली. याप्रमाणें कोणतेही स्वारींत हरवक्त पिलाजी जाधवराव याचा लौकिक व पराक्रम सरकारचे पुण्यानें होत गेला. याजमुळें श्रीमंत नानासाहेब पेशवे हे पिलाजी जाधवराव यास काका म्हणत होते, व जाधवराव सरकारवाड्यांत आले असतां, सरकारचे बंदेखान्यांतील बंदे याचा खुलासा याचेबद्दल खातर करून देत होते. एवढा मोठेपणाचे रुदबा सरकारांत महाराजांचे प्रतापेंकरून ठेवीत होते. कलम.

२ फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला, ती तारीख व आपले जाहगिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांनीं कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली व आपल्याकडे सरंजाम हल्ली काय चालत आहे, म्हणून पत्रांत कलमी केलें त्याचें उत्तरः—फौज व जातीस सरंजाम शके १६४० साचे सालीं पुणें प्रांतीं वाघोली वगैरे गांव येथील जाहागीर मोकासे वगैरे अम्मल औरंगाबाद प्रांतीं कंनड व फुलबरी वगैरे माहाल ९ याचे मोकासे दीड लक्षाचे शाहू महाराज छत्रपती यांनीं दिल्हे. त्या सालची मूळची सनदेची तारीख लावावी तर कागदपत्र अस्ताव्यस्त, याजमुळें सनदेची तारीख लाविली नाहीं. अलीकडे महाराजांचीं ताकीदपत्रें कंनड फुलबरी वगैरे महालाचीं आहेत. सन ११३१ साचे सालचीं त्याजवर तारीख मार्गशीर्ष बहुल ८ अष्टमीच्या लागल्या आहेत. पुढें बाजीरावसाहेब पेशवे यांनीं हिंदुस्थानांत नरवर प्रांतीं शिप्री, कुलारस वगैरे महाल मिळोन लाख रुपयांचा मुलूख दिल्हा. एकूण फौज व जातीस मिळोन अडीच लक्ष रुपयांचा सरंजाम चालत होता. मूळ पुरुष संपादक पिलाजी जाधवराव याचे पुत्र सटवाजी जाधवराव यास पुत्र २:—सुभानजी जाधवराव व जोत्याजी जाधवराव. यास पुत्र लाडोजी जाधवराव वाडीस राहतात. निम्मे हिस्सेदार सुभानजी जाधवराव यास पुत्र दोन, संभाजी जाधवराव व मळोजी जाधवराव हिस्सा निम्मे. संभाजी जाधवराव यास पुत्र पिलाजी जाधवराव वाघोलीस राहतात. हिस्सा चौथा व मळोजी जाधवराव याचे पुत्र आह्मी, हिस्सा चौथा वाघोलीस राहत आहों. येणेंप्रमाणे आज पांच पिढ्या सरकारची सेवाचाकरी पागापथक सरंजामसुद्धां इस्तकबिल तागाईत सन १२२८ लढाईअखेरपर्यंत करीत आलों, व महालमुलूखही तोंपर्यंत आमचे आम्हांकडे चालत होते.त्याची मुखत्यारी आमची आम्हाकडेस होती. सरकारांतून दखलगिरी करीत नव्हते. कलम.

३ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे. त्यांत कमपेश तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून रवाना करावें म्हणून कलमी केलें त्याचें उत्तरः—पेशवेसरकार जोंपर्यंत होते, तोंपर्यंत जो आमचा रुदबा होता त्याप्रमाणें चालवीत होते. पुढें कुंपणीसरकारांतून महरबानी करून आमचे जातीस सरंजाम लावून दिला. तो परगणे कंनड सुभा खानदेश येथील देहे १३ तेरा चोवीस हजार पांचशें पांच रुपये सवा दाहा आणे याचे तनख्याचे गांव, पैकीं निम्मे पिलाजी जाधवराव याच्या स्त्रिया याजकडे देहे ६॥ साडे सहा तनखा रुपये १२२५२॥~। बारा

हजार दोनशें बावन्न रुपये सवा तेरा आणे. बाकी देहे ६॥ तनखा रुपये १२२५२।॥-बारा हजार दोनशें बावन्न रुपये तेरा आण्यांचे देहे साडेसहा आम्हांकडेस सरंजामास चालत आहेत. खेरीज पुणेंप्रांतीं वाघोली वगैरे देहे सहा येथील जाहागीर मोकाशाचे अमलाचे हिसे आहेत त्याचे तनख्याचे रुपये १२९७॥ॐ॥ पैकीं निम्मे पिलाजी जाधवराव याच्या स्त्रिया यांजकडेस ६४८॥-॥ साहाशें अठेचाळीस पावणे चौदा आणे व निम्मे आम्हांकडेस ६४८॥-॥ साहाशें अठेचाळीस पावणे चवदा आणे तनख्याचा अंमल चालत आहे. याखेरीज इनाम सदरीं लिहिले आहेत. खेरीज जकातीचे माफिचें दस्तक व दसऱ्याबद्दल पोशाख सरकारचा, बहुमानाची सनगें साडेतीन. सरकारांतून पावत आहेत, व सरकार आम्हावर बहुत मेहरबानी करून मानमरातब पुर्ववतप्रमाणें रक्षीत आहेत. आम्हास पुत्र दोन व बंधू तीन याप्रमाणें आहेत. त्यास साहेबानीं मेहरबानगी करून दिलें, त्यांत गुजारा करून सरकारचे कदमापाशीं खुषी आहेत. कलम.

येणेंप्रमाणें तीन कलमें लिहिलीं आहेत त्यांजवरून सरकारचे दिलांत येईल. मित्ती ज्येष्ठ वद्य ५ शके १७५५ विजयनाम संवत्सर.

---

## ९ जाधवराव वाडीकर.

यादी लाडोजी जाधवराव वाडीकर सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ मेहरबान वार्डिनसाहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षण यांचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें ईजानिबास ग्वत आलें. त्यांत मजकूर जे, हजरत बंदेगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहात आहेत की, दक्षिणेंतील जाहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी. याजकरितां आपण सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. ह्मणून त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो. बितपशील.

१ आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला ह्मणून पत्रांत कलमी केलें, याचें उत्तरः—आमचे पणजे पिलाजी जाधवराव हे श्रीमंत महाराज शाहू छत्रपती दिल्लीहून आले, त्या वेळेस किती एक सरदार त्यास राज्यावर आणावें ह्मणून गेले होते. त्यांनीं पादशाहाची मर्जी संपादन करून महाराजास दक्षिणेस घेऊन आले. त्यांत पिलाजी जाधवराव यांनीं महाराजाचा उपयोग बहुत केला. त्याजवरून शाहू छत्रपती यांनीं कृपा करून इनाम पुणें प्रांतीं मौजे दिवें येथील .............. नांदेड येथील स्वराज्याचा अंमल सन ११२३चे सालीं तारीख १३ माहे जिलकादीं दिले. नंतर पुढें औरंगाबाद प्रांतीं कनड फुलबरी वगैरे महालांचे मोकासे दीड लक्षांचे सरंजामास दिले. त्या योगेंकरून पथक पागा जयत राहत होती. जे कामगारी सरकारानें फर्मावंवी तें काम महाराजांचे प्रतापानें बजावीत होते. दमाजी थोरात हिंगणगांवकर यांनीं बाळाजी

विश्वनाथ व आबाजींपंत पुरंदरे यांस कैद केलें. त्यास कारस्थानानें व जवामर्दीनें काढून घेऊन सातान्यास नेलें. तेव्हांपासून खानदानीची बढती व लौकिक महशूर झाला. त्या अलीकडे बाळाजी विश्वनाथ व बाजीरावसाहेब पेशवे यांजबरोबर दिल्लीच्या स्वाऱ्या केल्या व नबाबावर स्वाऱ्या करून कामकाजें करून सरकारांत मुलूख घेतला; आणि नबाब निजाम उलमुलुख यांनीं आह्मांस इनाम गोळेगांव व मरकल येथील जहागिरीचा अंमल इनाम दिले; व हिंदुस्थानांत राजे छत्रसाल बुंधेले याजवर वख्त पडला ते समयीं बाजीरावसाहेबाबरोबर जाऊन बुंधेले यांजवर शत्रु आला होता त्याचें परिमार्जन करून संस्थान रक्षिलें. याजमुळें बुंधेले यांनीं सरकारास लाखों रुपयांचा मुलूख बुंधेलखंडचा दिला, व आह्मांस इनाम करून दिलें. व त्र्यंबकराव दाभाडे बाजीरावसाहेब यांजवर चालून आले होते. त्याची जमीयत भारी असतां त्याशीं लढाई यांनीं देऊन दाभाडे यांस शिकस्त करून गारद केलें, व चिमाजीआप्पाबरोबर वसईच्या मसलतींत कामकाज भारी करून इनाम मिळविलें, व बंगाल्याची मोहीम नानासाहेब पेशवे याजबरोबर सेनापती होऊन केली. ......... .. ...... वख्त पिलाजी जाधवराव याचा लौकिक व पराक्रम होत गेला, यामुळें श्रीमंत नानासाहेब पेशवे हे पिलाजी जाधवराव यांस काका ह्मणत होते व जाधवराव सरकारवाड्यांत आले असतां यांचेबद्दल खातर बंदीवानाचा बंद खुलासा दरोबस्त करावा असा मोठेपणाचा रुदबा पराक्रमावर ठेवीत होते.

२ फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहु सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांनीं कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे म्हणून पत्रांत कलमीं केलें. याचें उत्तरः—फौजेस व जातसि सरंजाम शके १६४० सोळाशें चाळीसचे सालीं पुणेंप्रांतीं वाघोली वगैरें फुटगांव येथील मोकाशाचा वगैरे अंमल व अवरंगाबाद प्रांतीं कंनड फुलबरी वगैरे महालचे मोकासे एकूण दीड लक्षाचे शाहूमहाराज छत्रपती यांनीं दिले. त्यास या सालची मूळची सनदेची तारीख लावावी. तरी कागदपत्र अस्ताव्यस्त. यामुळें सनदेची तारीख लागली नाहीं. अलीकडील महाराजांचीं ताकीदपत्रें कंनड वगैरे महालांचीं आहेत. सन ११३१चे सालचीं, त्याजवर तारिखा मार्गशीर्ष बहुल ८ अष्टमीच्या लागल्या आहेत. पुढें बाजीरावसाहेब पेशवे यांनीं हिंदुस्थानांत नरवरप्रांतीं शिपरी कुलारस वगैरे महालांचा अंमल लाख रुपयांचा दिला त्याची मूळची सनद नाहीं. एकूण फौज व जात मिळून अडीच लक्षांचा सरंजाम चालत होता. मूळपुरुष ...... जाधवराव त्याचे पुत्र सटवोजी जाधवराव. त्याचे पुत्र सुभानजी जाधवराव वाघोलीकर आमचे निमे हिसेदार व आमचे तीर्थरूप जोत्याजी जाधवराव. त्याचे पुत्र आह्मी,' असे चार पुरुष उपभोग शंभर वर्षे करीत होतों. तों श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांनीं आमचे सरंजामाची जप्ती पुणें प्रांतीचे मोकाशाची वगैरे व कंनड फुलबरी

वगैरे महालांची लढाई अगोदर दोन तीन वर्षे इनामसुद्धां केली. यामुळें हल्लीं सरंजाम आम्हांकडे चालत नाहीं. सरंजाम चालत होता ते समयीं आम्हीच मुखत्यारीनें वहिवाट करीत होतों. पेशवेसरकार दखलगिरी करीत नव्हते.

३ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे. त्यांत कमपेश तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून रवाना करावें म्हणून कलमी केलें. याचें उत्तरः—पेशवेसरकार जोंपर्यंत मातबरी ठेवीत होते तोंपर्यंत मोठीच मातबरी रक्षिली. याचा मजकूर पहिले कलमांत बंद खुलासा वगैरे मजकूर लिहिलेच आहेत. अखेर बाजीरावसाहेब यांनीं इनामसुद्धां जप्त केलें ही गोष्ट समजून झाली नाहीं. असें कुंपणीसरकारांनीं दिलांत आणून मेहरबानगी करून इनामगांव सोडिले व गुजाऱ्यास पेनसील करून दिलें, व जकातीबद्दल माफीचें दस्तक व दसऱ्याचा पोशाख बहुमानाचा देऊन मातबरी सरकार ठेवीत आहेत.

येणेंप्रमाणें तीन कलमें लिहिलीं आहेत. यांजवरून इकडील मजकूर सरकारचे दिलांत येईल. मिती ज्येष्ठ शु० १३ शके १७५५ विजयनाम संवत्सरे.

---

## १० जाधवराई.

### ( अ )

यादी कैफियत गणपतराव माधव जाधवराई सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. कुंपणीसरकारांतून मेहरबान वार्डिन साहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षणचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवींचें आलें. त्यांतील हासील कीं, हजरत बंदेगानअली रैट हनराबल गौरनर कौनसल चाहात आहे कीं, दक्षिणेंतील जाहागीरदार लोकांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी; म्हणून कलमी केलें जातें जे, आपण मेहरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशीलः—आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख व आपले जाहागिरींतील वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होते ती व हल्लीं कुंपणी-सरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे. त्याजवरून कैफियत लिहिली आहे कीं, आमचे आजे सदाशिवराव हे चंद्रसेन जाधवराव यांचे पदरीं पालखीपदस्त. त्यास पुत्र आमचे तीर्थरूप माधवराव यांनीं मोंगलाई सरकारांतून कामेंकाजें करून लौकिक संपादन करून मोंगलाई सरकारांतून छ ५ माहे रमजान सन ११७१ हिजरी सन (१७६८) या रोजीं पांच हजारांची नेमणूक जहागीर

संपादन करून घेतली. नंतर नबाबाचे सरकारांतून पेशवेसरकारांत येऊन मुत्सद्दीगिरी वगैरे वाकीलीचे कामांत होते. त्याउपरी सन (१७७१) इहिदे सबैनांत छ १२ जमादिलावलीं सरकारांतून नबाब महंमद अल्लीखान सुभे अरकाट याजकडे सरकारचे खंडणीचा ऐवज येणें. त्याजवर सरकारांतून स्वारीची योजना करून आमचे वडील माधवराव याजबरोबर हत्ती, पागा, सांडणीस्वार वगैरे फौजेची कुलमुखत्यारी देऊन रवानगी केली. त्याजवरून नबाबाकडे जाऊन बशर्थ खंडणीचा वसूल आणून सरकार खजिन्यांत दाखल केला. व चेनापट्टण व चंदावर व गदवाल व सुरापूर वगैरे संस्थानी यांजकडील दरोबस्त बोलणीं माधवराव यांचे मारफतीनें सरकारांत होत होतीं व सन (इ. स. १७७५) सीत सबैनांत कर्नल आपटेन साहेब व मेघफरसन साहेब कलकत्याहून पेशवेसरकारचे हुजुरांत वकिलीस आले. त्यांचें बोलणें माधवराव आपा यांचे मारफतीनें होत होतें व आम्हाकडे फौजेस म्हणून सरंजाम नाहीं. सरकारांतून मोहिमेवर वगैरे कामाकाजास जाणें झाल्यास सरकारांतून फौज वगैरे येत होती. तैनातीस नेहमी हत्ती व हलकारे व जासूदजोड्या वगैरे सरंजाम राहत होता. त्याची नेमणूक सरकारांतून पोहोंचत होती. जातीस सरंजाम जहागीरबद्दल तैनातजाबता सन (१७६९) सबैन मया व अलफ छ २६ जिलकाद नबाबाचे सरकारांतून गांव मिळविले त्यासुद्धां जहागीर पंधरा हजाराची व खेरीज कुरण व असामी रुपये ३०० व मुत्सद्दीगिरीमुळें वगैरे अंतस्थ मिळेल त्याची याद सरकारांत समजावून पैकीं पांच हजार रुपये दरसाल बक्षीस दाखल येत होते. याप्रमाणें वहिवाट चालत होती. आह्मांकडे गांव जहागिरीच वहिवाटीस दिले त्याची दखलगिरी पेशवेसरकारांतून करीत नव्हते. आमची आह्मी दखलगिरी मुखत्यारीनें राखीत होतों. आम्हांकडे सरंजाम वहिवाटीस चालत आहे तो बितपसील:—

२१३० मौजे निंबगांव प्रगणे कडेवळीत हा गांव दरोबस्त.
११०० मौजे टाकळी खंडेश्वरी प्रगणे श्रीगोंदें येथील जाहागीर अंमल व स्वराज्य रुपये २२०० पैकीं निमे शिंदे यांजकडे रुपये ११०० बाकी आम्हांकडे रुपये.
९३६ मौजे वडगांव शिंदे तर्फ हवेली प्रांत पुणें तनखादेखील सरदेशमुखी.
१६२५ मौजे वाघोली प्रगणे कसबे धारूर येथील जहागीर अंमल व बाबती.
७५ मौजे येरवडें येथील जमीन जिराईत तर्फ हवेली.

५८६६

वहिवाटीस हल्लीं चालत नाहीं तो बितपशील:—

६५६८॥। मौजे शिंगवें परगणे कुंभारी हा गांव पेशवेसरकारांतून कारकीर्द बाजीरावसाहेब यांनीं जप्तीचा अंमल भगवतसिंगबावा याजकडे सांगितला होता. त्याची मोकळीकेची याद छ १९ सवाल माघ मास सन इसने मयातेनांत जाहली असतां अंमल आम्हांकडे चालता झाला नाहीं.

१००३। मौजे शहा प्रगणे इंदापूर हा गांव कारकीर्द बाजीरावसाहेब यांनीं आह्मांकडून काढून गमाजी निंबाळकर याजकडे दिला होता. तो दूर करून आह्मांकडे देण्याविषयीं सनदा सन इसने मयातेन छ २७ रबिलावलच्या जाहल्या. पुढें सदाशिव माणकेश्वर याजकडे इंदापूर महाल जाहाला त्यावेळेस त्यांनीं हा गांव आमचा घेऊन सरकारजमेस लाविला.

१४१९ मौजे अरणी परगणे ढोकी हा गांव लढाईअखेर आम्हांकडे चालत होता. पुढें सन १२२७ फसलीस मोंगलाई सरकारांतून गांव जप्त केला. नंतर मेहेरबान बडे साहेब यांनीं आमचा सरंजाम सोडते वेळेस सदरहू गांवाबद्दल नवाबाचे सरकारांत लिहून सोडचिठ्ठी आणवून गांव आम्हांकडे चालता केला. त्याप्रमाणें सन १२३१ फसलीपावेतां वहिवाट आह्मांकडे चालत होती. पुन्हां मोंगलाई सरकारांतून चौथाईचे हिश्यामुळ गांव जप्त केला. त्याजवरून मेहरबान चापलेनसाहेब बहादूर यांनीं मोंगलाईत लिहून गांव आम्हांकडे चालता केला. त्यापुढें सन १२३२ फसलीपासून गांवचा अंमल पुन्हा मोंगलाईवाले यांनी जप्त केला. येविषयीं याद आलाहिदा पेशजी कुंपणीसरकारास दिली आहे. असें असतां बंदोबस्त होऊन आमचा गांव आम्हांकडे चालता जाहला नाहीं. त्यास मेहरबानगी करून आमचा गांव आम्हांकडे चालता करून दिला पाहिजे.

१०० मौजे रायखलें प्रगणे नलदुर्ग परभारें मोंगलाई सरकारांतून जप्तीस आहे.

४३ बरहुकूम तैनात जाबता बेरजेचे भरतीस.

९१३४

शिवाय कलमें चालत नाहींत तीं:—

१ कुरण मौजे नाणोली तर्फ चाकण प्रगणे जुन्नर हे पेशवेसरकारांतून लढाईअखेर आम्हांकडे चालत होतें. पुढें कुंपणीसरकाराचे अंमलापासून आम्हांकडे चालत नाहीं तें चालतें करून देविलें पाहिजे.

१ प्रगणे चिटगोपें येथील मुजमीची असामुची वहिवाट आम्हांकडे चालत नाहीं.

१ बक्षीसीदाखल पेशवेसरकारांतून रुपये ५००० येत होते ते येत नाहींत.

सदरहूप्रमाणें जाहागीर चालत आहे व जी चालत नाहीं त्याचा तपशील सदरीं लिहिला आहे. याखेरीज आमचे वडील पेशवेसरकारांत मुत्सद्देगिरींत वागून संस्थानिक लोक यांचीं कामेंकाजें सरकारांतून उलगडून देत होते. याजमुळें पेशवेसरकारांतून मरातब मोठा राखीत होते. पुढें सन सबा समानीन मयांत आमचे वडील माधवराव यास देवाज्ञा झाली. नंतर आम्हांवर सरकारांनीं कृपा करून जाहागीर आम्हांकडे चालविली. हल्लीं लढाईअखेर जी जाहागीर आह्मांकडे चालत आहे, त्याचा तपशील सदरीं लिहिल्याप्रमाणें चालत आहे. त्यावर गुजारा करून आहे. व सरकारांतून बहुमानाचा दसऱ्याचा पोशाख येत असतो. याप्रमाणें इकडील मजकूर आहे, तारीख ५ माहे दिसंबर सन १८३२ इसवी.

( ब )

साहेब मेहरबान दोस्ता राबर्ट किसन साहेब बहादुर अक्टिंग एजंट जिल्हा दक्षण दामोहबतहू.

छ अजदिल एखलास गणपतराव माधव जाधवराई जागीरदार निसबत कुंपणीसरकार सलाम बाजत सलाम अंकी खेरयत जाणून आपली शादमानी हमेशा कलमी करीत असलें पाहिजे. दरिविला दिगर मजमुन साहेबांकडून नंबर ३७९ तारीख २९ माहे मे सन १८५२ इसवीचा हुकूम जाला जे, सरकारचा हुकूम तारीख ३० माहे जुलई सन १८५१ इसवीचा आल्यावरून कलमीं केलें जातें जे, आपल्यास किताबत जाधवराईपद आहे तें कधीं, कोणत्या सबबेनें, कोणाकडून प्राप्त झालें त्याची, व एकंदर खानदानीची पदवी थोरपणाचा इतिहास दाखल्यानिशीं लिहून यावा व त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे. ऐकीव मजकुराची हकीकत असेल त्याविशीं कांहीं पुरावा नसेल तर तसेंच साफ लिहून यावें म्हणून हुकूम. त्यास, पूर्वीं आमचें वय तीन वर्षाचें, ते वेळेस पूर्वी माहीतगार पन्नास साठ वर्षाचे कारभारी ते बोलत होते जे, मोंगलाईत नौकर चंद्रसेन जाधवराव सरकारचे पदरीं आमचे आजे सदाशिवराव दोनशे लोकांचे सरदारी करून होते. त्याचे पुत्र माधवराव त्याचे मानसपुत्र आह्मी, आमचें नांव गणपतराव, आम्हांस वय हल्लीं बाहत्तर वर्षाचें. तेव्हां मागील हकीकत जाहीर होण्यास साहेबांस ऐकिलेली लिहितों. मोंगलाईतून जाधवराव याजवर कसाला होऊन दौलत फौजसुद्धां गारद झाली, ते वेळेस आमचे आजे गारद झाले. तेव्हां आमचे वडील तेथून निघून भालची चिटगोपें हें आमचे राहण्याचें वडिलाचें गांव, तेथें सरंजामासुद्धां येऊन राहिले. ते समयीं नबाब सरकारांतून तीन गांव पांच हजाराची यांस जहागीर झाली. नंतर तेथून सरंजामसुद्धां जानबासाहेब निंबाळकर नबाबाचे पदरचे सरदार दाहा लाख रुपयांचे जहागिरी ते कर्माळ्यास, त्याचे दिवाण माधवराव आपा याचे सासरे त्याचे भेटीस आले. मोंगलाईतील तीन गांव त्यांपैकीं एक गांव कर्माळेनजीक त्या गांवचें नांव निंबगांव तेथें येऊन सरंजामसुद्धां राहिले. पुढें सवाई माधवराव यांचें लग्न होणें,

त्यावेळेस निंबाळकर यांनीं पेशव्यास वस्त्रें देऊन यासमागमें देऊन पुण्यास पोंचतें केलें. नंतर श्रीमंताची भेट होऊन यांचा बहुमान जाला. तेव्हां सरकारचे मनांत आलें जे, यांनीं सरकारचे पदरीं असावें. त्याजवरून यास जहागीर दाहा हजार रुपयांची व एक हत्ती बक्षीस देऊन यांस चार कामें सांगितलीं. चिनापटणचे नबाबाची वकिली व चंदावरचे राजाची वकिली व सुरापुरची वकिली व कर्नोळकडप्याचे नबाबाची वकिली सांगितली. याप्रमाणें हकीकत ऐकिल्यांतील व पाहण्यांतील आहे. ती साहेबांस जाहीर होण्याकरितां लिहिली आहे. याविरहित दाखला आह्मापाशीं असावा, तर सरकारी मोहजब्याचें काम यांजकडेस कांहीं एक नव्हतें, तेव्हां दाखला ठेवण्याचें कारण नव्हतें. यामुळें आम्हांपाशीं कागदोपत्रीं दाखला कांहींएक नाहीं. व माधवरावआपा यांस तैनात जाबता पंधरा हजार रुपयाचे जहागिरीचा सरकारांनीं करून दिला. तो आह्मांपाशी होता. तो साहेबाकडे पाहणेस पाठविला आहे. यावेगळे आह्मांपाशीं दुसरा दाखला कांहीं नाहीं. तैनातजाबता त्यास शहात्तर वर्षे झालीं. तो कागद नाना फडणीस दिवाण यांचे सहीचा असे. तारीख १८ माहे जून सन १८५२ इसवी. जादा काय लिहिणें ही किताबत.

सही गणपतराव माधव जाधवराई दस्तुर खुद्द.

---

## ११ डफळे.

कैफियत यशवंतराव बिन नारायणराव राजे चव्हाण डफळे देशमुख परगणे चार सरकार विजापूर सुरुसन १२२८ फसली माहे रबिलाखर कारण लिहून दिल्हे कैफियत ऐसा जे, अवरंगजेब पादशाहा याजपाशीं आमचे वडिलांनीं सातारे मोकामीं लढाई केली. त्या समयीं सरकारकामीं आले. ह्मणून शट्याजीराव राजे चव्हाण डफळे देशमुख परगणे चार सरकार विजापूर यासी महाल तपसील परगणे जत १ व परगणे करजगी १ परगणे बरडोल १ परगणे हानवड १ चार परगणेची देशमुखी व दोन परगणेची जहागीर परगणे जत व परगणे करजगी येथील दिली. त्या तागाईत वहिवाट आजपावेतों अनभवीत आलों. शट्याजीराव राजे चव्हाण यांचे पुत्र बाबाजी चव्हाण यांनीं अनभव केला. त्यांचे दोघे बंधू होते. संतान नाहीं. नाबहुद. बाबाजीराव चव्हाण यांचे पुत्र खानाजीराव राजे चव्हाण देशमुख यांनीं अनभव केला. त्यांचे पुत्र यशवंतराव राजे चव्हाण डफळे देशमुख वडील याचे बंधु रामराव राजे चव्हाण व तिसरा भगवंतराव चव्हाण. यशवंतराव चव्हाण याचे पुत्र अमृतराव चव्हाण यांस घेऊन रामराव चव्हाण महालची वहिवाट दोघे मिळून करीत आले. अमृतराव बिन यशवंतराव चव्हाण व नारायणराव बिन रामराव चव्हाण, हे दोघे मिळून संस्थानांतील कामकारभार करीत आले. अमृतराव चव्हाण यांचे पोटीं खानाजीराव चव्हाण देशमुख यांनीं अनभव केला. सन १२२४ फसली सालीं महालची हलीमाझी श्रीमंताकडून होऊन डेंगळे याजकडे जाली. खानाजीराव चव्हाण यांनीं यशवंतराव बिन नारायणराव चव्हाण हे उभयतां

महालचे वहिवाट करीत आले. खानाजीरावाची स्त्री मातुश्री रेणुकाबाई व दुसरी स्त्री मातुश्री साळुबाई हे दोघी बायका. थोरली बायकोस व खानाजीराव यांसी बनव पडेना, तेव्हां रेणुकाबाई निघोन निपाणीकडे गेली. धाकटी बायको जतेस होती. पुढें सन १२२५ सालीं खानाजीराव डफळे यांचा काल झाला, ते समई यशवंतराव चव्हाण जवळ होते. त्याचे मांडीवर प्राण सोडिला. पोटीं संतान नाहीं. यशवंतराव यांणीं विधीकर्म यथाविधी केलें. पुढें सहाचार महिन्याउपरांतिक रेणुकाबाईस निपाणीहून आणविलें. परभारें अथणीस आली. गोविंद वासुदेव निसबत त्रिंबकजी डेंगळ्याचे विद्यमानें बोलणीं होऊन वडीलपणा मातुश्रीकडे राखोन कामकारभार करीत जावा. त्यावरून मातुश्री रेणुकाबाई जतेस आली. आठ पंधरा दिवस एक जागीं होतों. मातुश्री रेणुकाबाई यांनी गोविंद वासुदेव निसबत डेंगळे याशीं संधान करून त्याजला संतोषविलें. आह्मी जतेस राहूं नये, याप्रमाणें धरबंद करून आम्हांसी घसघस लाविली, तेव्हां आह्मी निघोन हुजतीस आलों. आजपावेतों जतेस गेलों नाहीं. संस्थानास आम्ही अधिकारी आणि रेणुकाबाई परागंदा होती. खातरी करून आणून ठेविली. ऐसें असतां एक दोघे कारभारी मिळून हरएकाविशी आह्मांसीं खटखट करितात. बंदोबस्त करून देणार खावंद आहां. सेवाचाकरीविशीं मजकडून अंतर होणार नाहीं. आज्ञेप्रमाणें हजर असो.

---

## १२ थोरात.

साहेब मुषफक मेहरबान दोस्ता हेनरी ब्रौन साहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलामहू.

१ आज दिल एखलास आनंदराव थोरात दिनकरराव जहागीरदार ठाणें मौजे विरगांव पैकीं आकोलें, जिल्हा अहमदनगर सलाम बाजद सलाम आज्याम अंकी तागाईत कार्तिक वद्य १३ सन १२६१ पावेतों साहेब आपली षादमानी हामेषा कलमी करून दिल ताजा करीत असलें पाहिजे. दिगर मजमुन साहेबाकडून पत्र तारीख २६ माह आगष्ट सन १८५१ इसवीचें आलें. त्यांत मतलब कीं, आपल्यास मरातब दिनकरराव पद आहे. हें कधीं, कोणत्या सबबेनें कोणाकडून प्राप्त झालें त्याचा, व एकंदर खानदानी व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनशीं लिहून द्यावे, व त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे. ऐकीव मजकुराची हकीकत असेल व त्याजविषयीं कांहीं पुरावा नसेल तर तसेंही साफ लिहून द्यावें. परंतु जुने कागदपत्रावरून व माहीतगार लोकांकडून जितके प्रयत्नपूर्वक माहिती सांपडेल तितकी सर्व लिहून द्यावी. त्याजवरून लिहिण्यांत येतें कीं, आमचे निपणजे कैलासवासी शक्राजीराव थोरात हे श्रीमंत महाराज राजे शाहू (?) छत्रपती यांचे पदरीं सरदार होते त्यावेळेस विजापुरचे बादशाहावर छत्रपती महाराज यांची स्वारी जाऊन मोठी लढाई झाली. ते समयीं महाराज छत्रपती यांचा मोड होऊन शिकस्त घेतली. ते समयीं छत्रपती महाराज यांजला आमचे निपणजे आपले बसते घोड्यावर पाठीशीं

घेऊन रातोरात सातान्यास येऊन किल्ल्यावर चढले. तों दिनकर उदय झाला, सबब महाराज फार प्रसन्न होऊन दिनकरराव हें पद दिलें, व नव लक्षांच्या सनदा मोकाशे अम्मलाबद्दल दिल्या; आणि सनदेंत वगैरे कागदोपत्रीं आमचे पांचवे पुरुषापासून दिनकरराव अशी पदवी लिहिण्याची वहिवाट आजपर्यंत चालत आली, व त्या वेळेपासून इंग्रजसरकारचा अम्मल होईतोंपर्यंत पेशवे कारकीर्दअखेरपावेतों ज्या ज्या सनदा मिळाल्या, त्या त्याप्रत दिनकरराव असें लिहीत आले. त्याअन्वयें दिनकरराव ही पदवी वडिलोपार्जित वंशपरंपरा लिहिण्याची वहिवाट आजपर्यंत चालू आहे. केवळ दिनकरराव पदवी दिल्याबद्दल कांहीं वेगळा दाखला म्हणून असावा, तर ज्या वेळेस मिळवते पुरुषानें पराक्रम करून छत्रपती महाराज यांच्या सनदा व पदवी मिळविली, ते वेळचे कांहीं कागदपत्र व सनदा होळकराच्या दंग्यांत व दुष्काळांत गेल्या. ते समयीं दिनकरराव पदवीबद्दल कांहीं सरकारांतून दाखला मिळाला असल्यास तोही गेला असेल तर आह्मांस कांहीं समजण्यांत आला नाहीं. परंतु छत्रपतीच्या वेळच्या कांहीं सनदा व पेशवेसरकारच्या सनदा आहेत, त्यांत दिनकरराव हें लिहिलें आहे व आजतागाईत वहिवाटही लिहिण्याची चालत आली आहे. त्यावरून सर्व माहितीचा प्रकार सरकारास कळविला आहे. जादा काय लिहिणें. प्यार मोहबत असावी हे किताबत.

सही आनंदराव थोरात दिनकरराव तर्फेनें करणार विठल रामचंद्र कारकून मुखत्यार निसबत मशारनिल्हे.

---

## १३ फलटणचे निंबाळकर.

फलटणचे निंबाळकर यासंबंधीं सारांश सन १८२१ सालीं जाला. त्यांत सदर घराण्याबद्दल हकीकत आहे ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—

निंबाळकर यांजकडील वंशावळीची यादी.

१ वंशावळ मुधोजी नाईक यास दुसरा पुत्र मालोजी नाईक याचा वगैरे विस्तार.

१ दुसरा पुत्र मालोजी नाईक याचा विस्तारः—

१ कुसाजी नाईक वडील, २ गोरखोजी नाईक.

तपसील.

कुसाजीस पुत्रः—

१ मालोजी नाईक.
१ मानसिंग नाईक
१ शिवाजी नाईक
१ साबाजी नाईक

४

गोरखोजीस पुत्र दारकोजी नाईक यासी पुत्रः—

१ गोरखोजी नाईक यास संतान नाहीं. ते मृत्यु पावले.
१ बजाजी नाईक.
१ खंडेराव नाईक मृत्यु पावले.

तपसील

१ मालोजी नाईक संस्थानास.

१ मानसिंग नाईक यास पुत्र नाहीं. सबब शिवाजी नाईक याचा पुत्र माहादाजी नाईक यास ओटींत घातलें. महादजीनाईक यास पुत्र मानसिंग नाईक यास पुत्रः—

१ कृष्णाजी नाईक वडील.
१ परवतराव नाईक.
१ शिवाजी नाईक.
३

१ शिवाजी नाईक यास पुत्र

१ महादाजी नाईक.
१ जानराव नाईक
२

दोन पैकीं महादाजी नाईक मानसिंग नाईक यास दिल्हे. जानराव नाईक संस्थानास मालोजी नाईक यास दत्त दिल्हें. बाकी शिवाजी नाईक याचें कोणी नाहीं.

१ साबाजी नाईक

१ तुळाजी नाईक
१ संभाजी नाईक
२

पैकीं तुळाजी नाईक मृत्यु पावले. संभाजी नाईक यास सक्रोजी नाईक बिन जगदेवराव नाईक यांणीं दत्तक घेतलें.

४

हल्लीं एक पुत्र आहे.

१ यशवंतराव नाईक यास जानराव बिन तुकाराम नाईक गुंजवटीकर याचे ओटींत घातलें.

४

१ तिसरा पुत्र जगदेवराव नाईक यासी पुत्र संकाजी नाईक ते मृत्यु पावले. त्याचा दत्त साबाजी नाईक याचा पुत्र संभाजी नाईक, यास पुत्र संकाजी नाईक, त्यास पुत्र विठल-राव नाईक आहेत.

१ चवथे पुत्र माहादाजी नाईक यासी पुत्र तुकाराम नाईक यास पुत्र जानराव नाईक व मुधोजी नाईक. एकूण उभयतां मृत्यु पावले. त्यास पुत्र नाहीं.

१ पांचवे पुत्र बजाजी नाईक यास पुत्र रायरोजी नाईक व बाजी धारराव एकूण उभयतां मृत्यु पावले. संतान नाहीं.

१ वणगोजी नाईक सहावे पुत्र यास वंश नाहीं.

५

१ मुधोजी बिन जानोजी नाईक निंबाळकर सन १७७६ फसली कार्तिक शुद्ध ४ चतुर्थीस फलटण मुक्कामीं देवाज्ञा जाहली.

१ मुधोजी नाईक जिवंत असतां मालोजी नाईक कुसाजी नाईक याचे वडील पुत्र आणोन दत्त करून सरकारांत विनंति केली कीं, माझा वृद्धापकाल आहे, या चिरंजीवाचे हातून चाकरी घ्यावी. नंतर कांहीं दिवस चाकरी करीत असतां मुधोजी नाईक यास देवाज्ञा जाहली. पुढें सोयराजी बिन बजाजी नाईक याणीं सरकारांत फिर्याद केली कीं, मालोजी नाईक दत्त जाहला नाहीं. ते समई सोयराजी बिन बजाजी नाईक यास सबल पक्ष सखारामबापू याचा त्यांणीं सरकारांत समजाऊन फलटणास जप्ती पाठविली. जप्तीवाले कारकून व पायदळ यांशीं सगुणाबाई मुधोजी नाईक याची स्त्री यांणीं गोळी वाजविली. हा रोष सरकारचे चित्तांत येऊन सोयराजी बिन बजाजी नाईक याचे हवालीं फलटण महाल केला. त्या दिवसापासोन सोय-राजी नाईक हे मुधोजी बिन बजाजी नाईक सरकारांत आपलें नांव समजाऊं लागले. सर-कारचे लोक येऊन सगुणाबाईसाहेब यास फलटणांतून काढिलें. ते वेळेस बाई यांणीं कागद-पत्र जाळून फलटणांतून पदरचे मंडळीसुद्धां तेरढोकीस बालेघाटीं जाऊन साहा वर्षें राहिली. बाईकडून नरसिंगराव कान्हेर पुणें मुक्कामीं वकिलीस होते. त्यांणीं रघुनाथ बाजीराव पेशवे यांस विनंती केली कीं, सोयराजी नाईक यास मुधोजी नाईक यांणीं दत्त घेतला आहे. याची चौकशी सरकारांतून बहुत जाहली. नंतर क्रियेवर ठेप ठरली. दत्तक जाहला असी जेजुरीचे कासवावर क्रिया करावी. त्याजवरून नरसिंगराव वकील यांणीं जेजुरीचे कासवा-वर मालोजी नाईक मुधोजी नाईक यांणीं दत्तक केला असी क्रिया केली. नंतर वकिलास सांगून सगुणाबाईसाहेब यास तेरढोकेहून पुण्यास आणवून मालोजी नाईक बिन मुधोजी नाईक यास बहालीच्या सनदा करून देऊन लाख रुपये नजर घेतली.

१ रघुनाथ बाजीराव प्रधान.

१ नारायणराव बल्लाळ प्रधान.

२

एकूण दोन पत्रें अस्सल आहेत. त्या दिवसापासोन सगुणाबाईसाहेब दरोबस्त अधिकार करीत होते. मालोजी नाईक सरकारचाकरी पथकसुद्धां करीत होते.

१ मालोजी बिन मुधोजी नाईक निंबाळकर कर्नाटकचे स्वारीस हरिपंत तात्यासमागमें सगुणाबाईसाहेब यांणीं चाकरीस पाठविले. तेथें सन ११८६ फसलीमध्यें स्वारींत कार्तिक शुद्ध ९ रोजीं मृत्यु पावले. मालोजी नाईक याचा वाखा फार जाहला. बरोबर सदाशिव शामराव फडणीस होते. त्यांणी हरिपंत तात्या फडके यास सांगितलें कीं, मालोजी नाईक याचा वाखा फार आहे. तेव्हां तात्या बोलले कीं, याचा विचार काय करावा. ते वेळेस सदाशिवपंत बोलले कीं, मालोजी नाईक यास चाकरीस पाठविलें ते समई बाई बोलत होती कीं, मालोजी नाईक याची प्रकृति अशक्त आहे; यास्तव शिवाजी नाईक याचे पुत्र जानराव नाईक याजला दत्त घ्यावें. परंतु स्वारीची निकड आहे. स्वारी आल्यावर करूं असें बोलून स्वारीबरोबर रवानगी केली. हल्ली मालोजी नाईक याचा वाखा फार आहे. प्रसंगीं जानराव नाईकही लष्करांत आहेत. मला आज्ञा जाहल्यास त्यास आणितों. बाईचें अनुमत आहे त्यापेक्षां जानराव नाईक जवळ आणावें. त्याप्रमाणें सदाशिवपंत भाऊ यांणीं परशरामभाऊ याचे गोटांतून जानराव नाईक यास आणोन मालोजी नाईक सावध असतां जानराव नाईक याचे तोंडांत साखर घालून साखरपानें मंडळीस वांटून नंतर प्रहरा दिडा प्रहरानें अगदीं अंतकाल आला तेव्हां जानराव नाईक यांणी मांडी दिल्ही. मांडीवर प्राण गेला. नंतर पाणी पाजून उत्तरक्रिया लष्करातच केली. तेरावे दिवशीं चारपांच हजार समुदाय भोजनास होऊन सरकाराकडील दुखवटा तात्यांनीं गोटांत येऊन केला. त्यावर मोठे मोठे मंडळीहीं दुखवटे केले. मालोजी नाईक वारल्याचा मजकूर नाना फडणीस यांस हरिपंत तात्यांनीं लिहिला कीं, मालोजी नाईक यांणीं आह्मांस कळवून जानराव नाईक यास दत्त घेऊन मृत्यु पावले. क्रिया दिवससुद्धां जानराव नाईक यांणीं केला. येविशीं पत्रें आहेत—त्याचा तपशील वर लिहिला आहे. सरकारचाकरी पथकसुद्धां जानराव नाईकच करितात. त्याचें उत्तर तात्यास आलें जे, तुह्मी लिहिला मजकूर सरकारास विनंती केली. उत्तम आहे. पुढें दरोबस्त मालकी सगुणाबाईसाहेबच करीत आली. चाकरी जानराव नाईक करीत होते. नंतर सन १२०१ फसली, अश्विन वद्य १२ स सगुणाबाईसाहेब यास देवाज्ञा जाहली. तेव्हां जानराव नाईक हरिपंत तात्याबरोबर पैठणचे स्वारीस होते. तिकडून आल्यानंतर सरकारचाकरी महालची दरोबस्त वहिवाट मुखत्यारीनें करूं लागले. नंतर सन १२०४ फसलीमध्ये नाना फडणीस यांणीं सांगितलें कीं, तुमचे नांवें सरकार नजर अद्याप जाहली नाहीं, त्यास नजर देऊन सनदा करून घ्याव्या. त्याजवरून लाख रुपये नजर ठरवून सरकारानीं जानराव नाईक याचे नांवें नजरेबद्दल ह्मणोन कृष्णाजी नाईक थत्ते यास लाख रुपये देऊन भरपाई करून घ्यावी असी वरात दिली. नंतर नाईकसाहेब यांणीं बजाबा शिरवळकर याजपाशीं कर्ज लाख रुपये घेऊन थत्ते याजकडे भरणा करून वरातेवर भरपाई करून घेतली आणि सनदा करून दिल्या.

## १४ पवार.

यादी राजश्री अवधुतराव पवार सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ मेहरबान जॉन वार्डिनसाहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षिण यांचें पत्र तारीख ७ माहे सपटेंबर सन १८३२ इसवीचें आलें कीं, हजरत बंदेगानअली राईट हनरेबल गौरनर कौंसल चाहात आहेत कीं, दक्षिणेंतील जहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे याची वाकबगारी व्हावी. ह्मणून कलमी केलें जातें कीं, आपण मेहरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील आपली खानदानीची बढती, व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तो, फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कमपेश व तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणून कलमी केलें आहे. ऐसियास कलयुग प्रमाण चार लक्ष बत्तीस हजार त्यांपैकीं गतकली चार हजार नऊशें तेहतीस सन १२४३ सालमजकूरपर्यंत पैकीं शककर्ते व राजकर्ते यांचा तपशील:—

३०४४ शककर्ते युधिष्ठिर धर्मराज पांडव इंद्रप्रस्थीं दिल्लीस तीन हजार चवेचाळीस वर्षे.
१३५ शककर्ता राजा विक्रम उज्जनीस एकशें पसतीस वर्षें संवत १८९०
१७५५ शालिवाहन शके प्रतिष्ठाणीं पैठणास वर्षे सत्राशें पंचावन पैकीं राजकर्ते राजा भोज इत्यादि राजा सदल व खडगसिंग व चतुरभुज व आग्रसेन व उदियादीप व रणधौल व जगदेव पवार व अलगपाल तुवर व प्रीतिराज चव्हाण वगैरे पातशाई

५१२ १२४३

एकूण वर्षें सत्राशें पंचावन १७५५

जगदेव पवार हे श्रीदेवी उपासक निस्सीम होते. श्रीजगदंबेनें त्यासी प्रत्यक्ष दर्शन देऊन भाषण करावें. त्याचे भक्तीस्तव श्रीदेवीनें कंकाली भाटणीचे स्वरूपें करून धारेस प्रगट होऊन जगदेव पवार याजपाशीं शिरदान मागितलें. त्यांनीं ते क्षणीं तरवारीचे शस्त्रेंकरून आपलें शिर स्वहस्तें छेदून श्रीदेवीस अर्पण केलें. नंतर श्रीकालिका प्रसन्न होऊन शिर धडास. मेळवून जगदेव पवार यास सजीव केलें, आणि वरदान देऊन राज्यीं स्थापिलें. तें श्रीकालिकादेवीचें स्थान अद्याप धारेस आहे.

४९३३ गतकली चार हजार नऊशें तेहतीस वर्षें

बाकी शेष कली चार लक्ष सत्तावीस हजार सदुसष्ट वर्षे राहिला आहे. पैकीं सदुसष्ट वर्षांनीं भागीरथीचें महात्म्य जाईल, व आम्रवृक्षांस फळें येणार नाहींत. त्यापुढें पांच हजार वर्षांनीं " श्रीविष्णु भगवान् त्यजिति मेदिनी " ऐशी शास्त्रमर्यादा आहे. पवार कुलीचे वर्णधर्म याचा तपशीलः—

| | |
|---|---|
| १ वौंश सूर्यवौंश. | १ वेद ऋग्वेद. |
| १ वर्ण जात क्षत्रीय. | १ कुलीचें गोत्र अगस्ती. |
| १ धर्म क्षत्रीयाचा. | १ कुलस्वामी कालभैरव. |
| १ आचार विप्रवत्. | १ उपासना शक्तीची. |
| १ यज्ञोपवित धारण. | १ संस्थान अबूगड. |
| १ गायत्री अष्टपदा. | १ धारागिरी नगर. |
| १ संध्या त्रिकाल. | १ देवप्रतिष्ठेचे समयीं देवक धारतरवारीचे. |
| १ लगीबाणावर श्रीहनुमंत मूर्ति. | १ निशाण लाल, वरता जरीपटका त्याजवर मारुती. |
| १ ढाल सवाई मारुतीसहित. | |
| १ आलकाब पवार तोडरमल. | १ ब्रीद तोडर. |
| १० | ९ |

१९

सदरहू अन्वयें पवारकुळीचा पूर्वीचा मार्ग आहे आणि पवार यांनीं पूर्वापार पराक्रम केले आहेत. त्यांच्या कीर्ती रेवा दक्षणतीरपासून इंद्रप्रस्थापलीकडेस हिंदूचे हद्देपर्यंत पवार व तुवर यांचा लौकिक महशूर आहे. त्याअन्वये पातशाहींत पवार यांचा मानमरातब मुलखांत चौथाई अम्मल चालला. पवार यांनीं कारभार, खंडण्या व चाकरीस फौज दिली नाहीं; आणि इंद्रप्रस्थीं अथवा राजसंस्थानीं फौजसुद्धां आलीयास भेरी, नौबद, नगारे, वादन करीत निशाण जरीपटकासहित चालते स्वारीनें जावें. शस्त्रसहवर्तमान तसलिमांत नजर न करितां सलाम करून तक्ताशेजारीं उजवे बाजूस बैठक तेथें बसावें. वस्त्रें सर्वधी मानपानदान भेटी सन्मानें करून व्हावी ऐसा सांप्रदाय प्राचीन आहे, तो आमचे वडीलवडिलांनीं विदित केला. तो आमचे वडिलांनीं आह्मांस निवेदन केला आहे. त्याअन्वयें चालत आलें तें लेखन केलें आहे. त्या पवार यांचा वंशज कालांतरें करून धारेकडून फौजेसहवर्तमान रेवा उतरून, तमी उल्लंघन करून, खानदेश प्रांतींकडून दक्षिणेंत आले. त्यांनीं गलिमाईचा क्रम चालवून मुलुखांत अंमल चालविला. सबब दक्षिणेंत गलिमाई व मोंगलाई दोन अंमल चालले. शिवाजी राजे भोंसले यांनीं गलिमाई केल्यानंतर साह्यतेंकरून राज्य प्राप्त झालें. आमचे वडिलांनीं युद्धप्रसंगीं पराक्रमेंकरून राज्य मिळविलें. राजकारणीं देह समर्पण केले आहेत ह्मणून शाहूराजे यांणीं आमचे वडिलाचा पूर्ववत्प्रमाणें मानसन्मान मरातब व फौज व विश्वासराव आलकाब चौथाई

अंमल चालला. आमचे पूर्वज दक्षिणेंत येऊन राहिल्यामुळें क्षेत्रधर्माचा आचार रहित जाहला. गंधर्वविवाहाखेरीज करून सत् शुद्रवत् आचार चालला आहे. गोत्र वासिष्ठ व प्रवर तीन. वसिष्ठ, आंगिरा व प्रमोद एकूण प्रवर तीन, व यज्ञोपवित धारण करितात, व सत् शूद्राचे कन्येशीं लग्नें होतात असा मार्ग चालला आहे. अज्ञानत्व आहे. त्यास गोत्र व प्रवर ध्यानास नाहींत. ते काश्यप गोत्र ह्मणतात. ऐसा अनुक्रम आहे. दक्षिणेंत आलीयावर पवारकुलीचे गोत्रज झाले त्यांचा तपशीलः— वाघ व वानखडे व निंबाळकर व इंगळे व धारराव व धायबार व घुमरे व कन्हेकर व पाडभर व मगने व वागचवरे व शेटे व परमडे व वाघमारे वगैरे सदरहू गोत्रजांत शरीरसंबंध करूं नये याअन्वयें कुलीची रीत आहे. शाहू महाराज यांनीं गलिमाई अंमल तोच पुढें स्वराज्य व मोंगलाईनीं एकूण दुतर्फा अंमलाचा दाखला चालविला. पेशवे यांचे कारकीर्दींत दाभाडे सेनापती यांचे साह्यतेकरितां फौज व सरंजाम कमी झाला. लढाईचे प्रसंगीं पेशवे यांजकडे पागा व सरंजाम पाठविला होता, त्याजवरून धारेचें संस्थान व खंडण्या व चौथाईची वाटणी व दक्षिणेंतील सरंजाम चालला. कांहीं न चालला. मोहिमीस जाण्याचें मानसिक झालें, सबब फौजसरंजाम कमी होत गेला. मानमरातब पूर्ववत्प्रमाणें चालविला. आमचे वडील फौजेसुद्धां आलीयास प्रथम भेटी शीव उल्लंघन करून घेतल्या आहेत. वाड्यांत अथवा डेऱ्यांत भेटीस आले असतां सन्मानें करून घेऊन जावें; पानदान वगैरे मानें करून पोंहचावून मार्गस्त करावें. व त्या कालीं आमचे वडिलाशिवाय दुसरा फौजबंद सरदार नाहीं. नंतर मल्हारराव होळकर व त्यापुढें शिंदे वगैरे अवतार झाले आहेत. असें असून आमचे वडिलांनीं युद्धप्रसंगीं राजकारणीं देह अर्पण केले आहेत, याचे दाखले सरकार दफ्तरीं असतील. ऐसा पूर्व वृत्तांत आमचे वडिलांनीं आह्मांस सांगून वंशमालिका पूर्वजांची सांगितली आहे. त्यांपैकीं नांवानिशीचा तपशीलः—

१ सुभानजी पवार यास पुत्र साबाजी पवार.
१ साबाजी पवार यास पुत्र केरोजी पवार.
१ केरोजी पवार याचे पुत्र साबाजी पवार.
१ साबाजी पवार याचे पुत्र कृष्णाजी पवार.
१ कृष्णाजी पवार यास पुत्र बुवाजी पवार, लढाईंत गत झाले.
१ बुबाजी पवार यास पुत्र संभाजी पवार.
१ संभाजी पवार यास पुत्र तीनः—
७

युद्धप्रसंगीं वारंवार जखमा सर्वांगीं लागल्या होत्या.

| | |
|---|---|
| १ उदाजी पवार. | १ आनंदराव पवार. |
| १ जगदेवराव पवार. | ० लग्न. |
| २ | १ |

३

आमचे पणजे संभाजी पवार असतां दयाबहादूर याची फौज ऐंशी हजार शिवाय पायदळ व तोफा सुमारें ३५० साडेतीनशें अशा सरंजामानिशीं आला होता. ते समयीं आमचे आजे त्रिवर्ग बंधु यांनीं खासपागा पंधरा हजार फौज घेऊन त्याशीं लढाई करून आमचे आजे जगदेवराव पवार यांनीं दयाबहादूर यास जातीनें मारून हत्तीवर चढून आंबारींत जाऊन त्याचें शिर छेदून त्यास खालीं टाकिलें. ऐसे पराक्रम वारंवार युद्धप्रसंगीं केले आहेत. तेणेंकरून दर लढाईत तरवारीचे व भाले व गोळ्या व तीर वगैरे जखमा जातीस लागून सर्वांगीं होत्या. दयाबहादूर याची फौज लुटून तोफखान्यासुद्धां दरोबस्त सरंजाम आणिला तो आमचे वडिलांनीं ठेविला. राजास द्यावयाचा संप्रदाय नाहीं. आमचे आजे त्रिवर्ग बंधू यांच्या दक्षिणेंतील सरंजामाची व वतनाची व रेवा उत्तरप्रांतीं धारेच्या संस्थानाची व मुलुखाची व खंडण्याची व चौथाई वांटणीचे व मालमालीयित वगैरे जिंदगी वगैरे पागा, फौज, पिलखाने व तोफखाने वगैरे आठरा कारखान्यांची व कागदपत्र व देवधर्मासुद्धां हरबाबेची वांटणी जाली नाहीं. आमचे पणजे संभाजी पवार असतां आनंदराव पवार गत झाले. संभाजीराव पवार निवर्तल्यावर आमचे आजे जगदेवराव पवार मृत्यु पावले. नंतर उदाजी पवार यांनीं सदरहूची वांटणी न करितां विश्वासराईचे चौथाई वांटणीपैकीं मुलाचे जातीखर्चाकडे सरंजाम खाजगत व दारकोजी पवार व चंदरराव व गोविंदराव पवार व यशवंतराव पवार यांजकडे चालविला तो लढाईअखेरपर्यंत चालला. त्याचे दाखले सरकारदप्तरीं आहेत. तारीख नवीन लिहून कळवावी ऐसा अर्थ नाहीं. खेरीज सदरीं लिहिल्याअन्वयें सरंजामाची व संस्थानाची व वतनाची वगैरे हरबाबेची वांटणी झाली नाहीं. आमचे पणजे संभाजी पवार यांचे तीन पुत्राचे वौंशाचा तपशील नांवनिशीवार:—

१ उदाजी पवार यास पुत्र चार:—

| | |
|---|---|
| १ मेनाजी पवार. | १ दारकोजी पवार लढाईत गत झाले. |
| १ गोविंदराव पवार लढाईत मृत्यु पावले. | १ चंदरराव पवार बारभाईचे गर्दीत शस्त्रेंकरून मरण पावले. |
| २ | २ |

४

पैकीं तीन पुत्रांस वौंश नाहीं. दारकोजी पवार याचे पुत्र मल्हारराव व आनंदराव पवार मलठणास होते. आनंदराव पवार अल्पवयांत मृत्यु पावले. मल्हारराव पवार यांस पुत्रसंतान नाहीं, व त्यांनीं दत्त पुत्र घेतला नाहीं. त्याच्या खाशा लग्नाच्या दोन स्त्रिया होत्या. त्या मल्हारराव असतां गत झाल्या. नंतर राजसबाई खंजीरी संप्रदायाची त्याचेजवळ होती. मल्हारराव निवर्तले ते समयीं सन १२१२ सालीं आमचे येथील पुत्र मलठणचे संस्थानीं जाऊन वहिवाट चालविली ह्मणून सरंजामाची जप्ती सरकारांतून झाली नाहीं. लढाईअखेरपर्यंत सरंजाम विश्वासराईचे चौथाई

वांटणीचा व दहकचा मल्हारराव पवार यांचे नांवें चालत होता, त्याचा दाखला सरकारदप्तरांत आहे. हल्लीं ते राजसबाई खंजीरी सांप्रदायाची मलठणास आहे. तिजकडेस अधिकार नाहीं. ऐशा आमचे येथें आजपावेतों होत्या; व गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादूर यांचे येथें बडोद्यास आहेत. त्यांच्या पोटीं पुत्र जाला असतां त्याजकडेस मालकपणाचा अधिकार नाहीं. ऐसें असतां राजसबाईजवळ यशवंतराव पवार, अमृतराव पवार याचा पुत्र सुपेकर राहून निर्वाह करीत आहे. त्यास सुपेकर याचा, आह्मी असतां आमचे येथें येऊन राहण्याचा संबंध नाहीं; ऐसें असून यशवंतराव पवार सुपेकर सरकारनिसबत जाहागिरीचे अमलाची वहिवाट करीत आहे. ते सरकारांतून मनाई जाली पाहिजे. आमचे वतनाची वहिवाट आह्मी चालवून जिंदगी वगैरे कागदपत्रसुद्धां वगैरे हरबाबेचे राजसबाई असतां घेऊं, अथवा गत जाहल्यावर घ्यावयास येईल. मल्हारराव पवार याचे नांवें सरंजाम चालत होता तो आमचा आह्मांकडे चालविला पाहिजे. याविषयीं सरकारची नजर अगर सरंजामपैकीं सरकार हुकुमान्वयें मान्य आहोंत. साहेबांनीं मेहरबान होऊन लिहिल्याप्रमाणें चालवावें.

१ जगदेवराव पवार यास पुत्र दोनः—

मोंगलाचे व पटरपरचे व आनदमोगरचे वगैरे लढाईंत युद्धप्रसंगी जातीस जखमा लागून लोक कामास आले आहेत.

१ गोविंदराव पवार.
१ दारकोजी पवार.
—
२

वरील दोन पुत्रांपैकीं गोविंदराव पवार याचे पुत्र व पौत्र वौंश राहिला नाहीं. दारकोजी पवार याचे पुत्र हल्लीं आह्मी अवधुतराव पवार आहोंत. आह्मांसही पुत्र आहेत. विश्वासराईचे चौथाई वांटणीपैकीं सरंजाम लढाई अखेरपर्यंत चालत होता. त्याची यादी सन १२३४ श्रावणमासीं दिली आहे; व सरकारदप्तरीं दाखले आहेत. महालानिहायपैकीं देहे ३८ व महाल चार व बार एक पैकीं हिस्सा जकात व बाबतींसुद्धां खेरीज रेजमुरा रुपये १८३० शिवाय जाजती सन समान तिसा मया व अलफचे सालीं रुपये ४०० एकूण रुपये २२३० दोन हजार दोनशें तीस, शिवाय पोषाक व दिपवाळीचें तेल वगैरे मानमरातब पूर्ववतप्रमाणें चालत होते. आमचे सरंजामाची वहिवाट दखलगिरी सरकार अमलाप्रमाणें आमचे आम्ही हरबाबेची मामूल वहिवाटीप्रमाणें करीत होतों. त्यास सरकारची मनाई नाहीं. हल्लीं कुंपणीसरकारांतून आमचे सरंजामापैकीं जातीस सरंजाम देहे १७ सत्रा त्यांचा तपशील परगणे संगमनेरपैकीं तर्फ बेलापूर देहे पांच व तर्फ देवपूर देहे तीन एकूण देहें आठ व

परगणे शेवगांवपैकीं देहे आठ व परगणे कोतूळपैकीं मौजे डोळसणें देहे १ एक एकूण देहे १७ सत्रा मामूल वहिवाटीचे शिरस्तेप्रमाणं तारीख १४ माहे सपटंबर सन १८२४ इसवीपासून चालत आहेत. त्याची वहिवाट दखलगिरी दुमाले खेरीज करून सरकारी अम्मलाचे गांवची पूर्ववत्प्रमाणें होत नाहीं. सबब लावणींत तजावत तफावत वगैरे हरबाबेची होऊन आमची नुकसानी होत आहे, आणि सदरहू सत्रा गांवचा कमाल आकार होत नाहीं. हल्लीं लावणीअन्वयें वसूल येतो, तो सालवार एकसारखा आमीमुळें येत नाहीं. कम आकार होतो. तो आमचे खर्चास व उछाहास पुरत नाहीं म्हणून देण्याचा भरणा होऊन बहुत अडचणींत आलों आहोंत. येवि- षयीं इंग्रजी पत्र तारीख १ नवंबर सन १८२७ इसवीचें सात कलमांचें लिहिलें आहे, त्यांत मजकूर लिहिला आहे. तरी साहेब मेहरबान होऊन आमचे सरंजाम- पैकीं जाजती सरंजाम अथवा पोतापैकीं व उछाहाचे खर्चाकारितां श्रीदेवाकडेस गांव इनाम अगर नेमणूक मेहरबान होऊन चालविली पाहिजे, म्हणजे उछाहाचा व खर्चाचा निर्वाह होईल. दसऱ्यास पोषाख साडे तीन वस्त्रें व दिपवाळीचें तेल वगैरे चालतें केलें पाहिजे हल्लीं दोन वस्त्रें दसऱ्याचा पोषाक सरकारांतून येत आहे. कमपेश तफावतीची यादी आलाहिदा पाठविली आहे. खानदानीचें पत्र आल्याचे पूर्वी सन १२४१ सालीं यादी हुजुरांत मुंबई मुक्कामीं मलठण संस्थानी कागदपत्र आहेत त्याविषयीं केली आहे, व धारेच्या संस्थानीं कागदपत्र आहेत. आह्मांकडील दप्तरें बंडांत व पेंढारी यांचे लुटींत व लढाइचे गर्दीत गेलीं आहेत. कांहीं कागदपत्र गैरविल्हेस पडले आहेत सबब तारखेचा मजकूर लिहिला नाहीं. सरकारदप्तरीं दाखले आहेत.

( आमचे वडिलानी यशवतराव पवार यानीं पेशवे याचे कारकिर्दीत भाऊसाहेब यानी सरकार हुकमी जरबेचा जाब ज्यावेळी बोलले ते फौज तयार करून तोफाचे गोळे व बाण टाकून पेशवे यांचे डेरे जाळिले परन्तु पेशवे यांनी सहन करून समजून घालून मानमरातब पूर्ववत्प्रमाणे चालविले ह्मणून युद्धी प्राण वेंचिले आहेत. )

१ आनंदराव पवार यास दोन पुत्रः—

१ यशवंतराव पवार यास पुत्र खंडेराव पवार. याचे पुत्र आनंदराव पवार धारेच्या संस्थानीं होते. त्यास पुत्रसंतान नाहीं व त्यांनीं दत्तपुत्रही घेतला नाहीं. सरंजाम लढाई अखेरपावेतों आनंदराव पवार यांचे नांवें चालत होता. त्याचा दाखला सरकारी दप्तरांत आहे. हल्ली त्याची खासी लग्नाची स्त्री मैनाबाई पवार धारेस आहेत. महाल, मुलूख, संस्थान कुंपणी सरकारांतून चालत आहे. आह्मी तेथील मालक अधिकारी आहोंत. सरकारांनीं नजर अगर सरंजामपैकीं हुकूम होईल त्यास मान्य आहोंत. मेहरबान होऊन आमचे संस्थान आह्मांकडे हुकूम होऊन चालविलें पाहिजे.

( यशवंतराव पवार व रायाजी पवार व उभयतांचे वंशांनीं सदरीं लिहिलेप्रमाणें मोंगलाकडील बेहल लडाई करून बुडविला. नतर यशवंतराव पवार पानिपताचे लढाईंत फौजेसुद्धां गर्द होऊन गेले. यावर फत्तग्गडचे लडाईंत काम काज चौथाईची वांटणी घेतली आहे. )

१ रायाजी पवार यास पुत्र दोन.

१ मल्हारराव पवार यास पुत्र हल्लीं बळवंतराव, व हनुमंतराव पवार आहेत. व बळवंतराव पवार यास पुत्र आहे.

१ विठलराव पवार यास पुत्र आहे. सुंदरसीकडे आहेत.

२

२

वांटणी झाली नाहीं सबब रायाजी पवार यास यशवंतराव पवार यांनीं सरंजाम दिला नाहीं. वांटणी देण्याविषयीं पेशवे यांचें मान्य केलें नाहीं. यास्तव नवीन सरंजाम पेशवे यांनीं दिल्हा होता तो चालला. रायाजी पवार गत झाल्यावर चालला नाही. डग व गर्गाड दोन महाल चालले.

विश्वासराईचे चौथाई वांटणींपैकीं देहे व परगणे नेवासेंपैकीं देहे ४० चाळीस व जाहागिरीचा देहे १ याप्रमाणें लढाईअखेरपर्यंत चालत होतें, त्याचा दाखला दप्तरांत सरकारच्या आहे. हल्लीं कुंपणीसरकारांतून चिरंजीव बळवंतराव पवार यांचे नांवें मोकासा खेरीजकरून जाहागिरीचा देहे १ एक व परगणे नेवासेंपैकीं मोकाशाचे देहे १३ एकूण देहे सुमारें १४ चवदा चालत आहेत, व तीर्थस्वरूप विठलराव पवार यांचा सुंदरसीकडे अम्मल चालतो, व चिरंजीव राजश्री बळवंतराव पवार यास दसऱ्याचा पोषाक सरकारांतून येत आहे. सरंजामाचें उत्पन्न खर्चास पुरत नाहीं. साहेब मेहरबान होऊन ज्यास्ती सरंजाम देविला पाहिजे ह्मणजे खर्चाची निभावणी होईल.

चिरंजीव राजश्री बळवंतराव पवार यांचे नांवें परगणे नवासेंपैकीं मोकाशाचे देहे तेरा जाहगीर मौजे आमदाबाज तर्फ कर्डे व वतनाची व वाड्याची वगैरे हरबाबेची वहिवाट सरकारांतून हुकूम होऊन आह्मांकडे चालत आहे.

३

सदरहूप्रमाणें खानदानीचा मजकूर व वंशावळीचा व बढतीचा व कीर्ति व पराक्रमाचा व सरंजामाचा वगैरे आमचे वडिलांनीं आह्मास विदित केला आहे, तो लेखन करून यादी रवाना केली आहे. हें साहेबांनीं अक्षरशः ध्यानास आणावी म्हणजे साकल्यार्थ निवेदन होईल. सारांश, सरकारांनीं मेहरबान होऊन सदरीं लिहिल्याअन्वयें चालविलें पाहिजे. सन १८३३ इसवी मुक्काम पुणें.

तारीख छ २५ माहे रबिलाखर. अधिक भाद्रपद मास सन १२४३ शके १७५५.

## १५ पवार मलठणकर.

साहेब मुषफक मेहरबान दोस्तां हेनरी ब्रौन साहेबबहादूर एजंट जिल्हा दक्षण सलामहू:—

१ अज दिल एखलास यशवंतराव पवार संस्थान मलठण सलाम बाजद सलाम अंकीं येथील खैरयत जाणून आपली शादमानी हमेषा कलमी करीत असिलें पाहिजे. दिगर मजमून सरकारचा हुकूम तारीख ३० जुलई सन १८५१ इसवीचा आला कीं, आपणास किताब विश्वासराव पद आहे. हें कधीं, कोणत्या सबबेनें, कोणाकडून प्राप्त जालें, त्याची व एकंदर खानदानी व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं लिहून यावा. त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे. ऐकीव मजकुराची हकीकत असेल त्याविषयीं कांहीं पुरावा नसेल तर तसें लिहून यावें. परंतु जुने कागदावरून व माहितगार लोकांकडून माहिती सांपडेल ती लिहून यावी. म्हणून आसाहेबाकडून खलिता तारीख ३ माहे दिसंबर सन १८५१ इसवी नंबर १३१८ चा आला. ऐसीयासी आमचे वडील बुबाजी पवार यांस श्रीमंत शिवाजी महाराज छत्रपती यांचे पुत्र राजारामसाहेब छत्रपती यांनी मुलखाचा बंदोबस्त करावयास सांगितल्यावरून त्यांनीं लढाया घेऊन बंडें मोडून अंमल बसवून विश्वासानें बंदोबस्त केला; ह्मणून विश्वासराव असें पद जिंजीचे किल्ल्यावर देऊन विश्वासराईचा सरंजाम प्रांत दक्षण व प्रांत खानदेश वगैरेचा दिल्हा. त्यावर बुबाजी पवार यांचे नातू उदाजी पवार आमचे पणजे यांचा पराक्रम शाहूमहाराज व पेशवे यांनी पाहून विश्वासराईचे सरंजामाशिवाय, गुजराथ व माळवा व मेवाड, मारवाड, बुंदेलखंड वगैरे प्रांतांतील मोकासे दिले. खेरीज दहकाचा सरंजाम उदाजी पवार तक्षीमा २ व मानाजी पवार तक्षीम १ असा सामसती दिला. याप्रमाणें दिवसेंदिवस रुदबे शूरत्वानें वाढत गेले. यांजबद्दल पेशजी यादी एजंट कचेरींत व गौरनर कौसलांत दिल्या. त्याजबरोबर राजसनदा व पेशवे यांच्या सनदा दाखवून नकला एजंट कचेरींत दाखल्यास दिल्याच आहेत. विश्वासराव पदाबद्दल व सरंजामाचा दाखला सरकारदप्तरीं आहेच. आह्मांपाशी कागदपत्र असावे तर हमेशा मोहिमीवर वडिलांच्या जाण्यामुळें कागद एके ठिकाणीं राहिले नाहींत. आढळण्यांत येतात तसे दाखल्याकरितां देतच आहोंत. हल्लीं थोरले बाजीरावसाहेब यांच्या सनदा सांपडल्या, त्या चिरंजीव राजमान्य राजश्री रावसाहेब संस्थान धार यांचें लग्न झाल्यावर चैत्रमासीं आपले मुलाखातीस येऊं ते वख्तीं दाखविण्यांत येतील. तारीख १८ माहे जानेवारी सन १८५२ इसवी ऊर्फ पौष वद्य १२ शके १७७३ मुक्काम धार प्रांत माळवा. ज्यादा काय लिहणें. प्यार मोहोबत असों दिजे हे किताबत.

## १६ पवार सुपेकर.

यादी चंदरराव पवार सुपेकर सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ. मेहेरबान जान वार्डिन साहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षण यांचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें आलें. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदेगानअली राइट हनराबल गौरनर कौंसल चहात आहे कीं, दक्षणेंतील जहागीरदार लोक यांची कैफियत कसी आहे त्याची वाकबगारी व्हावी, यास्तव आपण मेहेरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपसीलः—आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला तें व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तन्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कमपेश व तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून रवाना केली पाहिजे. ह्मणोन त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो तो बितपसील कलमें.

१ आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला याचें उत्तरः—आमचे वडील हिंदुस्थानांतून साबुसिंग पवार तद्देशांतील रजपूत आले. त्याचे पुत्र कृष्णाजी पवार पवितों स्वतंत्रपणानें वागत होते. पुढें त्यांचे पुत्र बुबाजी पवार व रायाजी पवार व केरोजी पवार श्रीमंत महाराज शिवाजी राजे छत्रपती यांजवळ इनलाखी फौजेनिशीं कामेंकाजें करून होते. शिवाजी महाराज यांचे पुत्र राजारामसाहेब छत्रपती यांनीं बुबाजी पवार यास मुलखाचा बंदोबस्त करावयास सांगितला. त्यांनीं मातबर जमेत बाळगून तापीतीरापर्यंत अंमल बसवून विश्वासानें बंदोबस्त केला, ह्मणून विश्वासराव असें पद दिलें. रुतबा वाढला. बुबाजी पवार यांचे कनिष्ठ बंधु रायाजी पवार व केरोजी पवार यांनींही रामराजे यांचे संनिध फौजेनिशीं राहिले. त्यास सेना बारा सहस्री केरोजी पवार यांस पद दिलें. नंतर श्रीमंत शाहू महाराज दिल्लीहून सरफराज होऊन दक्षिणेस आले. ते समयीं बुबाजी पवार याजवळ फौजेची जमेत भारी, कितीक सरदार, याजकडे आले. त्यास बुबाजी पवार यांनीं मोठीं मोठी कामेंकाजें स्वपराक्रमें केलीं. सबब महाराजांनीं विश्वासराईचा सरंजाम चौथ पादशाहाकडून संपादन केली. त्यांपैकीं फौजेचा व जातीस सरंजाम मोकाशाचा अंमल सरकार संगमनेर व खानदेशांत वगैरे दिल्हा. तेव्हांपासून खानदानीची बढती व लौकिक महशूर झाल्यावर, भाउपण्यांत सरदाऱ्या वेगळाल्या झाल्या. पुढें महाराजांनीं पराक्रम पाहून ज्यास्ती सरंजाम दहकचा ह्मणून आमचे घराण्यास एक हिस्सा व उदाजी पवार मलठणकर यास दोन हिस्से दिल्हा. पुढें बाळाजी विश्वनाथ व बाजीराव बल्लाळ पेशवे यांजबरोबर दिल्लीच्या वगैरे स्वाऱ्या व आणखी कामें आमचे वडिलांनीं केलीं.

कलम.

२ फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे-सरकांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ? याचें उत्तरः—बुबाजी पवार यास पुत्र दोन त्यांचीं नांवें.

१ वडील पुत्र काळोजी पवार. यास पुत्र चार त्यांचीं नांवें:—

१ कृष्णाजी पवार विश्वासराव वडील.
१ तुकोजी पवार गणेगांवकर.
१ जिवाजी पवार हिंगणीकर.
१ मानाजी पवार सुपेकर धाकटे.
—
४

१ धाकटे संभाजी पवार यासी. पुत्र तीन त्यांचीं नांवें:—

१ उदाजी पवार मलठणकर.
१ आनंदराव पवार कवठकर.
१ जगदेवराव चितेगांवकर.

— —
२ ३

पैकीं वडील काळोजी पवार याचे पुत्र चार बंधु एकत्र असतां आमचे आजे मानाजी पवार राजे शाहू छत्रपती याजपाशीं इतलाखी फौजेनिशीं होते. तेव्हां कामेंकाजें पाहून महाराज प्रसन्न होऊन दहकचा सरंजाम रुपये २०००० चा दिला. त्याच्या सनदा बहुतेक दंग्यांत गेल्या. एक सनद राजशक ६१ व दुसरी ६२ च्या आहेत. कलम.

३ स्वार असामी ६० सरंजामाचे चाकरीस याचा रोजमुरा खेरीज पावत होता. सरंजामाची वहिवाट आमची आह्मी मुखत्यारीनें केली. यामुळें पेशवेसरकारांतून कधीं दखलगिरी जाहली नाहीं. स्वारानिशीं चाकरी पानपतची स्वारीपर्यंत हुजूर व विठ्ठल शिवदेव याचे तैनातीस केली. हिंदुस्थानचे सुभे याजबरोबर मानाजी पवार पालिपडगंजनजीक दिल्ली येथें कैलासवासी झाले. पुढें आमचे तीर्थरूप यादवराव पवार यांचे नांवें सरंजाम होऊन अंताजी माणकेश्वर व विसाजीपंत बिनीवाले व महादजी शिंदे यांजबरोबर तैनातीस सदरहू चार भावांचीं पथकें होतीं. त्यांजबरोबर हिंदुस्थानांत कामेंकाजें लढाया झाल्या त्या त्रिवर्ग सुभ्यास माहीत आहेत. शिंदे आलिजाबहादूर यांनीं मागील बहिवाट पाहून हिंदुस्थानांत हमीरपूर महाल लाख रुपयांचा व खंडण्यांत् वाटणी पवारास देत आले. आमचे तीर्थरूप तापीतीरीं शांत झाले, तेव्हां श्रीमंत माधवरावसाहेब सवाई यांनीं आमचे नांवें सरंजाम करार करून दिला. तो कुंपणी-सरकाराचे लढाईअखेर आह्मांकडे चालत होता. कलम.

४ आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे याचें उत्तर :—पांच हजारांचा जातीचा सरंजाम आहे. त्याचे मोकासे गांव परगणे सावदे व परगणे गालणें प्रांत खानदेश येथें चालत आहे. कलम.

५ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे. त्यांत कमपेश तफावत काय आहे तें वगैरे याचें उत्तर:—सदरचे कलमांत बहुतेक आलें आहे. दसऱ्याचे बहुमानापैकीं साडेतीन सनगें पावत होतीं. हल्लीं कुंपणी-सरकारांतून दोन पावतात. कलम.

एकूण पांच कलमांप्रमाणें मजकूर आहे. सरकारचे दिलांत येईल. तारीख ५ माहे जुलई सन १८३३ इसवी. मुताबक आषाढ वद्य ४ शके १७५५ विजयनाम संवत्सरे सन १२४३ फसली.

---

## १७ पवार सुपेकर.

यादी बुबाजी पवार विश्वासराव सुपेकर सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ मेहरबान जॉन वार्डिनसाहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षण यांचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवींचें आलें. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदेगानअली रैट हनराबल गवरनर कौंसलांतून चाहात आहे कीं, दक्षिणेंतील जहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी; यास्तव आपण मेहरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपसील:— आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिला ती तारीख, व आपले जाहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कमपेश व तफा-वत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे. म्हणून त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो. कलमें बितपसील:—

१ आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला याचें उत्तर:— आमचे वडील बुबाजी पवार व केरोजी पवार महाराज शिवाजीराजे छत्रपती यांजपाशीं शिलेदारी करून होते. पुढें राजाराम राजे महाराज छत्रपती यांनीं बुबाजी पवार व केरोजी पवार यांस स्वदेशीं दमाजी व तिमाजी वगैरे यांचीं जागजागां बंडें होतीं, त्यांचे बंदोबस्तास नेमलें. त्यांनीं भारी फौजेची जमीयत बारा हजारपर्यंत मिळवून बंदोबस्त केला. तेव्हां केरोजी पवार यांस ' सेना बारा हजारी ' किताब जाहला. नंतर उभयतां बंधु यांनीं भारी जमावानें गंगथडी व खानदेशप्रांतीं तापीतीरापावेतों स्वराज्याचा अम्मल सुरुवात

करून मोठींमोठीं कामें विश्वासानें केलीं, सबब ' विश्वासराव ' असें पद देऊन, कित्येक महाल सरंजामास दिल्हे उपरांतिक बुबाजी पवार याचे पुत्र काळोजी पवार व संभाजी पवार हे छत्रपती महाराजासंनिध फौज बाळगून कामकाजें करीत होते. ते वेळेस विश्वासराईचे सरंजामाची वांटणी होऊन निमे सरंजाम केरोजी पवार विश्वासराव व चवथाई सरंजाम संभाजी पवार, बाकी चौथाई सरंजाम काळोजी पवार याजकडे याप्रमाणें भाऊपण्यांत वहिवाट करूं लागले. काळोजी पवार यास पुत्र चार. कृष्णाजी पवार वडील, आमचे पणजे, दुसरे तुकोजी पवार, तिसरे जिवाजी पवार, चौथे मानाजी पवार, स्वदेशीं फौजेनशीं होते. पुढें श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे माळवेप्रांतीं मुलूख सर करावयास गेले. त्याजबरोबर तुकोजी पवार व जिवाजी पवार फौज घेऊन गेले. त्यांनीं माळवेप्रांतीं कामकाजें सरकार उपयोग केला, सबब त्याजला माळवेप्रांतीं मुलूख सर केला त्यांपैकीं शिंदे व होळकर यांजबरोबर वांटणीचा सरंजाम लाखो रुपयांचा दिल्हा: तो उभयतांकडे चालत आहे. त्याखेरीज परगणे हमीरपूर प्रांत बुंदेलखंड हा महाल अंताजी माणकेश्वर यांजकडे सरंजाम होता; त्याची जप्ती सरकारांतून झाली त्यांपैकीं नवा दिला. त्यांतील तीन हिस्से त्याची चौथाई वांटणी आह्माकडे चालत होती. चवथे भाऊ मानाजी पवार यास छत्रपती महाराजांनीं दहकाचा सरंजाम मोकाशाचा खानदेशप्रांतीं दिल्हा. त्यांत तिजाई याची व दोन हिस्से उदाजी पवार याजकडे. येणेंप्रमाणें चौघा भावांकडे सरंजाम होते. ते ज्याचे त्याजकडे चालले. वडील कृष्णाजी पवार आमचे पणजे याजकडे पेशजीचा विश्वासराईपैकीं चौथाई वांटणीचा सरंजाम मोकासे स्वदेशी चालत होते. त्याचीं राजपत्रें शाहूमहाराजांनीं राजशक शके ५३ पराभवनाम संवत्सरे करून दिल्हीं, व मौजे सुपें परगणे पारनेर हा गांव इनाम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दिल्हा. त्यास वर्षे १०७ जालीं आहेत. पुढें त्याचे पुत्र बुबाजी पवार विश्वासराव आमचे आजे शाहू महाराजासंनिध फौजेनिशीं कामकाजें करीत होते. त्याजवर छत्रपती महाराज सरफराज होऊन केरोजी पवार यांचे पुत्र धिराजी पवार मोगलाईत गेले. त्याजकडे विश्वासराईचा सरंजाम, चौथाई मोकासे स्वदेशीं होते तो सरंजाम त्याजकडून दूर करून, विश्वासरावपदसुद्धां सरंजाम राजशक शके ६२ राक्षसनाम संवत्सरीं बुबाजी पवार विश्वासराव यास दिल्हा. ते आमचे आजे, त्याजपासून आमचे खानदानीची बढती व लौकिक महशूर जाहला. त्याचे पुत्र माधवराव पवार विश्वासराव आमचे चुलते, यास शाहूमहाराजांनीं वस्त्रें देऊन सरंजामाची फौज बाळगून महादजी शिंदे यांजबराबर चाळीस वर्षे हिंदुस्थानांत कामकाजें करीत होते. ते वारल्यावर त्यांचे धाकटे बंधु राणोजी पवार विश्वासराव आमचे तीर्थरूप यास श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांनीं वस्त्रें देऊन सरंजामाच्या सनदा करून दिल्ह्या. तो सरंजाम होळकरांचे दंग्यापर्यंत दरोबस्त चालत होता. पुढें श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांनीं सरंजाम कांहीं जप्त करून लोकांस दिल्हा. कांहीं

सरकार जाहागिरीकडे दाबला. कांहीं राहिला तो लढाईअखेर कायदोपत्रीं बाहाल आम्हांकडे चालत होता. सर्वत्र पवार मंडळींत वडील घर आमचें व विश्वासराईचें पद आमचे सरदारीस चालत आहे. कलम.

२. फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा, ती तारीख. याचें उत्तर:– आमचे वडिलाकडे फौजेस सरंजाम महाराज राजाराम छत्रपती राजे यांजपासून चालत होता, त्याचा तपशील:—

१ स्वदेशीं विश्वासराईचा सरंजाम मोकाशाचा महाराज राजाराम राजे छत्रपती यांनीं दिल्हा. त्याची वांटणी भाऊबंदाकडे तपशील:—

१ चौथाई सरंजामांत इसम
- १ यशवंतराव पवार मलठणकर.
- १ रामचंद्रराव पवार कवठेकर, माळव्यांत आहेत.
- १ बळवंतराव पवार आमदाबाजकर.
- १ अवधूतराव पवार चितेगांवकर.

४

१ चौथाई सरंजाम शिवराव पवार नगरदेवळेकर.

२

बाकी निम्मे सरंजाम विश्वासराईचा खासगत वांटणीचा चालत होता. त्याचीं राजपत्रें शाहूमहाराज छत्रपती यांचीं, राजशक शके ६२ राक्षसनाम संवत्सरीं बुबाजी पवार विश्वासराव यांस करून दिल्हीं आहेत. ते महाल व गांव तपशील:—

| | |
|---|---|
| १ तर्फ हवेली परगणे संगमनेर. | १ परगणे सातारे हरसूल. |
| १ तर्फ देवपूर परगणे संगमनेर. | १ परगणे कोतूळ. |
| १ तर्फ बेलापूर परगणे संगमनेर. | १ परगणे धुळें प्रांत खानदेश. |
| १ तर्फ राजूर परगणे आकोलें. | १ परगणे चाळीसगांव प्रांत खानदेश. |
| १ परगणे नाशीक. | १ परगणे झडगें प्रांत खानदेश. |
| १ परगणे कुंभारी. | १ वाघलीबार प्रांत खानदेश. |
| १ परगणे बारागांव नांदूर. | १ फुटगांव मोकासे. |
| १ परगणे शेवगांव. | १ जकात महालानिहाय. |

यासी आकाराची बेरीज सरकारांतून लावून स्वार नेमून दिल्हे. त्याचा बेहडा सन इसने सितैनचा करून दिल्हा. ती बेरीज ७९२०२ रुपये. तपशील:–

२०९६१ सरदारीकडे जातीस.

११५० हुजुर जे दरखदार फडणीस व मुजमदार व सबनीस व जमेनीस.

७२३९ महालमजकूर.
४७५२ साहोत्रा पंतसचीव.
४५००० स्वार असामी २२५ दर २०० प्रमाणें. खेरीज हमीरपूरचे महालचे स्वार ७५.

७९२०२

सदरहू सरंजाम होळकराचे दंग्यापर्यंत चालत होता. पुढे श्रीमत राजश्री बाजीरावसाहेब यांनीं कांहीं जप्ती करून लोकांस दिल्हा. कांहीं सरकार जाहागिरीकडे दाबला. कांहीं लढाईअखेर कागदोपत्रीं बाहाल, त्याची बेरीज अजमासें १०००० रुपये.

पुढें आलीशान बडेसाहेब बहादूर यांनीं सर्वत्राचे बंदोबस्त केले, ते वेळेस आह्मांसही जातीनें बेरजेपैकीं पांच हजार रुपये नक्त नेमणूक नगर सुभ्यास करून दिली आहे, त्याप्रमाणें पावत आहेत.

१ हिंदुस्थानप्रांतीं परगणे हमीरपूर प्रांत बुंदेलखंड हा महाल अंताजी माणकेश्वर याजकडे होता. त्याची जप्ती श्रीमंतांनी केली. ते समयीं पवार यास माळवे प्रांतींचे वांटणीखेरीज नवा दिला. त्या महालपैकीं तीन हिस्से तुकोजी पवार व जिवाजी पवार याजकडे; बाकी चौथाई वांटणी आह्मांकडे चालत होती. त्याबद्दल चाकरी स्वार असामी ७५ करीत होतो. तो महाल पेशवाई अम्मल असतां इंग्रजी सरकारांत गेला. कलम.

२

३ आपले जाहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली त्याचें उत्तर:—स्वदेशीं सरंजाम मोकाशाचा अम्मल होता त्याची वहिवाट आह्मी करून महालांतून अम्मल घेत होतों. मौजे सुपें परगणे पारनेर हा गांव मात्र इनाम दरोबस्त शाहूमहाराज छत्रपती यांनीं कृष्णाजी पवार यास राजशक शके ५३ पराभवनाम संवत्सरीं दिल्हा होता. त्याची वहिवाट आमचे आह्मी मुखत्यारीनें करीत होतों. सरकारांतून दखलगिरी कांहीं एक होत नव्हती. याप्रमाणे हिंदुस्थानचे हमीरपूर महालची वहिवाट आमचे आह्मी करीत होतों. कलम.

४ आपलेकडे हल्लीं सरंजाम काय चालत आहे त्याचें उत्तर:—सरंजाम श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब यांनीं जप्ती केला, त्याचा मजकूर वर सदरीं लिहिलाच आहे. जातीचे खर्चाची नेमणूक रुपये २०९६१ पूर्वींची आहे. त्यापैकीं हल्लीं पांच हजार रुपये नगर सुभ्याहून नेमून दिले आहेत. ते खर्चास पुरत नाहींत. पदरीं खर्च लवाजमा बहुत आहे. त्याचा बंदोबस्त करणार सरकार आहे. कलम.

५ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे. त्यांत कमपेश तफावत काय आहे तें वगैरे याचें उत्तरः—

१ मौजे सुपें परगणे पारनेर हा गांव राजपत्रीं शाहूमहाराज छत्रपती यांनीं इनाम दिला होता; तो श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब यांनीं जप्ती करून आपले मावसभाऊ गोविंदराव परांजपे याग दिल्हा होता. त्यास इनामाची जप्ती मोठे अपराधाखेरीज कोणतेही सरकारांतून होत नाहीं. हा विचार कुंपणीसरकारांनीं दिलांत आणून. कोणाकोणाचे गांव पिलाजी जाधवराव वाडीकर व हुजूर पागे वगैरे अशा लोकांचे गांव मेहरबानी करून सोडले. त्या रीतीनें आमचे गांवची मोकळीक खानदानीवर नजर देऊन करणार सरकार आहे. कलम.

१ सर्वत्रांचे बंदोबस्त जातीचे बेरजेप्रमाणें जाले आहेत. आमचे जातीचे बेरजेप्रमाणें बंदोबस्त जाला नाहीं. पांच हजार रुपये खर्चास पुरत नाहींत. खर्च पदरीं बहुत. लवाजमा आहे. हें कुंपणीसरकारांनीं दिलांत आणून जातीचे बेरजेप्रमाणें बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे. कलम.

१ विश्वासराव पद शाहूमहाराज छत्रपती यांनीं बुबाजी पवार विश्वासराव आमचे आजे यास राजशक शके ६२ राक्षसनाम संवत्सरीं दिलें. त्यास शंभर वर्षे जालीं. त्या दिवसापासून नांवापुढें विश्वासराव पद सरकार लिहीत आलें. त्याप्रमाणें कुंपणीसरकारचे कागद येत नाहीत. विसरून राहातें असें वाटतें. तें पद चालविलें पाहिजे. कलम.

१ दसऱ्याचा पोशाख हुजूर असल्यास पावत होता. माधवराव पवार विश्वासराव पर्यंत दाखला सरकारात आहे. त्याप्रमाणें आम्हांस मिळावा. कलम.

४

सदरहू ४ कलमांची कमपेश तफावत आहे. तिचा विचार करणें सरकारकडे आहे. एकूण पांच कलमांप्रमाणें मजकूर आहे. तो सरकारचे दिलांत येईल. तारीख १६ माहे आगष्ट सन १८३३ इसवी मुताबिक अधिक भाद्रपद शुद्ध १ शके १७५५ विजयनाम संवत्सर सन १२४३ फसली.

---

## १८ भोंसले अक्कलकोटकर.

साहेब मुषफक मेहेरबान फर्माय दोस्तां हेनरी ब्रॉनसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलामहू.

छ अर्जी तर्फ शहाजी राजे भोसले इलाखा अक्कलकोट सलाम बादज सलाम अंकी येथील खैरयत तारीख २१ माहे दशंबर सन १८५१ इसवीपावेतों जाणून आपली षादमानी हमेशां कलमी करून दिल आराम करीत असलें पाहिजे. दिगर मजमून आसाकी:

याकडून खत तारीख २६ आगष्ट सन १८५१ इसवी नंबर १०४२ चें आलें, तें पावलें. आपणास किताब राजे हें पद आहे. हें कधीं, कोणत्या सबबीनें, कोणाकडून प्राप्त जालें यांचा व एकंदर खानदान व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं अथवा जुने माहितगार लोकांकडून लिहून यावें, ह्मणून कलमीं केलें. ऐसीयास आमचे मूळपुरुष कैलासवासी फत्तेसिंगबावा भोसले हे दौलत संपादनकर्ते. याविशींचा इतिहास असा आहे कीं, शाहूमहाराज हे दिल्लीहून परत येतां खानदेशांत पारध ह्मणून गांव आहे त्यानजीक मुक्काम केला. तेथें लढाई होऊन तेथील पाटील मृत्यु पावला. त्याची स्त्री आपला मुलगा घेऊन लष्करांत महाराजापाशीं आली आणि चिरंजीवास पायावर घातलें. शाहू महाराज यांणीं त्याचें सौंदर्य व रूप पाहून राजचिन्हाचा प्रकार दिसल्यामुळें आपल्याजवळ ठेऊन घेतला. इतक्यांत त्या सरदेचा मुलूक सर जाहल्याची खबर आली. त्याजवरून महाराज बहुत खुष होऊन, मूल दैववान् आणि यशस्वी असें मनांत आणून, प्रसन्न होऊन फत्तेसिंग भोसले असें नांव ते दिवशीं ठेऊन मोठा उत्साह केला. नंतर सातान्यास सन १११७ फसली सालांत घेऊन आले. हरएक राज्यसाधनाचें काम वगैरे सेवा बहुतेक फत्तेसिंगबावा यांणीं केली. तेव्हां अति प्रसन्न होऊन आपले कुळांत घेऊन चिरंजीव असें म्हणून आपल्यास पादशाहापासोन जाहागीर मिळाली, त्यांपैकीं अक्कलकोटचें राज्य देऊन शिवाय फौजेचे बेगमीस अंमल व सरंजामी सरदार व दरखदार वगैरे तैनातीस देऊन पदवी दिली. त्या वेळेस छत्रचामर चौघडा इत्यादि राजचिन्हें दिलीं. नंतर कांहीं दिवस सातारा येथें राहिले. पुढें सन ११५६ फसली सालीं शाहू महाराज याचा काल जाहल्यावर कांहीं दिवस तेथें राहून सन ११६० फसली सालीं अक्कलकोटास आपले संस्थानावर आले. महाराजांनीं कृपाळु होऊन मानसपुत्र केलें, त्या दिवसापासून सर्वत्र राजे असें म्हणतात. या प्रकारें पदवीचा व खानदानीचा इतिहास आहे. हा मजकूर पदरचे माहितगारमुखें ऐकून लिहिला आहे. दाखल्याचे कागद आहेत, परंतु सन १२४० फसलींत लढाई होऊन गर्दी जाहली, तेव्हां गैरविलेस पडल्यामुळें वखतास सांपडत नाहींत. हमेशां खत पाठवून दोस्तीची बढती असावी. जादा काय लिहिणें. प्यार मोहबत कीजे हे किताबत.

---

## १९ सांवतवाडीकर.

यादी सुरुसन इहदे अशरीन मयातैन व अलफ वाडीकर यांनीं कलमबंदीची यादी दिली त्याचीं उत्तरें:—

१ किल्ले भरतगड व नरसिंगगड घर लोक हातें घेतले ह्मणून दोन कलमें किल्लेचीं तपशीलवार लिहिलीं त्याचा मजकूर:—

सोमसावंत भोसले सरदेसाई याजवर त्याचा पुतण्या रावसाहेब यांनीं जबरदस्ती करून माडीवर कोंडिलें. ते समयीं सोमसावत यांनीं दारूचे बुधले अंथरून कुटुंब

व पुत्र वगैरे माणसें एकूण असामी २० एक ठिकाणीं होतीं. त्या वेळेस सोमसावत यांनीं आपला निदानवेळ जाणून त्या वेळेस वडील पुत्र फोंडसावत हे रेडींचे किल्ल्यांत होते. तेथेंही त्या किल्ल्यास रावसाहेब यांनीं मोरचेबंदी केली होती. ऐसें संकटांत, तेव्हां आपले जिव्हाळेचा सोमसावत यांनीं गडी जंजीरे सिंधुदुर्ग येथें पाठविला कीं, आमचा पुत्र रेडींचे किल्ल्यांत आहे. त्याचा सांभाळ महाराजांनीं करावा. आमचा समय प्राप्त आहे. ऐसें सांगून पाठविलेवरून तोच गडी जंजीरेहून रेडीस रवाना केला. तेव्हां फोंडसावत यांनीं आपला खिजमतगार आपा कामाठी व शामजी नेवरेकर ऐसे दोघे जंजिरेस पाठविले. त्याजबरोबर सांगून पाठविलें कीं, वडिलांनीं सांगून पाठविल्याप्रमाणें माझा सांभाळ महाराजांनीं करावा. त्याजवरून महाराजांनीं राजश्री रत्नाकरपंत राजाज्ञा यासमागमें फौज व लोक देऊन पाठविले; ते व जंजिरेचे लोक ऐसे रेडीस जावयास गेले. सोमसावत यांनीं दारूस अग्नी देऊन वीस असामीसहीत उडाले. हें वर्तमान राजाज्ञा यास कळतांच रेडींचे मुक्कामास जाऊन किल्लेंत हुजूर निसबत व जंजिरेचे मिळून लोक १०० रेडींचे किल्ल्यांत ठेविले; आणि फोंडसावत यासी किल्लेंतून बाहीर महाराजाचे दर्शनास घेऊन करवीरास आले. ते समयीं फोंडसावत यांनीं महाराजांस तमखेसुद्धां किल्ले तपशील:–

१ किल्ले भरतगड.
१ ठाणें निवती.
१ किल्ले सिदगड.
१ किल्ले नरसिंगगड.
४

सहरहू चार किल्ल्यांस हुजूरचें ठाणें बसलें. नंतर रेडीचा किल्ला हुजुरून फोंडसावत याचे स्वाधीन करावा. चार किल्ले हुजूर असावे. याप्रमाणें करार. हें वर्तमान नारायण रुद्राजी यास समजलें, त्यावरून किल्ले सिदगड त्यानें पेशवे यांज-कडे दिला. बाकी तीन किल्ले राहिले त्यांपैकीं कांहीं दिवसांनीं निवतीचें ठाणें वाडीकर यांणीं घेतलें व रेडीही घेतली. हुजूर भरतगड व नरसिंगगड आहेत.

---

## २० शिंदेसाहेब सुभा.

### ( अ )

यादी निळकंठराव शिंदे साहेबसुभा यांसी मेहेरबान ताकरीनसाहेब बहादूर सर कलेक्टर व पोलिटिकल एजंट सुभा धारवाड यांनीं धारवाड मुक्कामीं हुकूम केले जे, आपले दौलतीचा मूळ पुरुषापासून भोगवटा कसकसा चालत आला, हें हस्तकबिल तागाईत कैफियत लिहून

देणेस हुकूम जाला. त्यावरून बहुता दिवसाच्या वैवाटा त्याअर्थी काय स्मरणांत आहे, तें लिहून दिलें आहे. सुरसन खमस अशरीन मयातैन व अलफ माहे सवाल सन १२३३ फसलीपर्यंत.

प्रथम दौलत मिळविली ते मुळ पुरुष जिवाजी शिंदे हे आमचे पणजे. त्यास श्रीमन्त महाराज छत्रपती यांनीं कर्नाटकप्रांत काबीज करून बंदोबस्त करण्यास्तव रवाना केले. तेव्हां कर्नाटकप्रातीं अमील मोगलाई होता. प्रात विशेषेकरून वसत नव्हता. थोडाबहुत वसत होता. तेव्हां कर्नाटकप्रांतीं जाऊन काबीज करून, अमील बसविले. तेव्हां तोरगलचा किल्ला घेऊन तेथें राहिले. तेथील हवा घोड्यास मानेनासी जहाली. सबब कसबा शिदोगी, तर्फेतील खेडें मौजे मनोली हा गांव नवलगुंदकर देसाई यांचा. ते जागा, हवा चांगली ऐसें पाहून, देसाई यांस मुबदला देऊन, तो गांव आपण घेऊन गांव वसविले, आणि किल्ला बांधून रहावयास जागा केली. तेथून कर्नाटकप्रातीं स्वाऱ्या करून साधलें त्या रीतीनें खंडण्या वगैर व गांवगन्ना इनाम शेत मोकासबाब ह्मणून करून घेतले, आणि नवलगुंदकरांनीं शेतें इनाम करून दिलीं. त्या जागीं पडेसूर ह्मणून गांव बांधविलें. तेथून स्वारीचा पल्ला करूं लागले. त्यासमयीं सावनूरकर यानीं कोलवाड हें गांव इनाम करून दिल्हें. शिरहट्टीकरांनीं आपल्यावरी धांदल होऊं नये सबब मौजे कोडलीकवाड गांव इनाम करून दिले. तसाच कितूरकर यानीं काहीं चारी रुपये देणेंही दरसाल देत होते. खरीज कसमला ह्मणून गांव इनाम करून दिलें. आणि मारडगी तरफासही मोकासबाब शेत दिलें. तसेंच कुसगलासही दिलें. तालुक तालुक्यांनी मोकासबाब ह्मणन दिले ते इकडे तोरगलचा किल्ला कडपर्यंत आमचे आजे बाजीराव शिंदे, त्याचे पुत्र आमचे तीर्थरूप सुबराव शिंदेपर्यंत चालला. त्या किल्लेंत आपल्याकडून किल्लेदार ठेविले होते. त्याला आजारानें बहुत काहिला जाला तोंपर्यंत आमचे आजे बाजीराव शिंदे यांनी अनभविलें. ते काल झाले. आमचे तीर्थरूप सुबराव शिंदे यास बोलाव पाठविला जे, आपला किल्ला आपण स्वाधीन करून घ्यावें. ऐसें मनोलीस वडील होते. त्यास बोलाव पाठविला. तेव्हां वडील वयानें लहान होते, आणि त्यासमयीं शरिरांत स्वस्थ नव्हता. सबब जाणें जाले नाहीं. तेव्हां आमचे घराणेपैकीं भाऊबंद संभाजीराव शिंदे सेनाखासखेल यांचे वडील होते. त्याचे स्वाधीन किल्लेचे हात (?) करून तो किल्लेदार काळ जाला. नंतर लक्ष्मीबाई साहेब हे आमची आजी. आमचे तीर्थरूप लहान होते सबब आपणच फौज घेऊन जाऊन राजगड पाडून, तोरगल किल्लेस वेढा देऊन तोफा लाविल्या. किल्ला जेरीस आला. तेव्हां आमच्या पणज्याचे भावाची लेक जिजाबाईसाहेब यांस संभाजी महाराज छत्रपती यांस लग्न आमचे वडील जिवाजी शिंदे यांनी मनोलात करून दिली होती. ती बाई किल्ला जेरीस आल्यासमयीं महाराजांची स्वारी घेऊन आली. तेव्हां तिघाही साहेबांचें ह्मणणें पडलें जे, उभय पक्षीं आम्हांस माहेर, त्या अर्थी उभयतांनीं भांडूं नये.

मनोली संस्थान आपणाकडे आहे. तोरगल त्याजकडे द्यावें. ऐसें म्हणतांच बाईसाहेब यांची आज्ञा मान्य करून तोरगल किल्ला व किल्लेखर्चाबद्दल बनूर कर्यात दिला. आमचे पणजे (यांनीं) सदरहू कामकाजें बहुत केलीं हें खातरेस आणून छत्रपती यांनीं वडिलास 'साहेबसुभा' म्हणून किताब देऊन शिक्के दिले आणि जरीपटका दिला. तोरगल याचा जिमा जाला. त्यासही कांहीं किताब असावा म्हणून अलीकडे 'सेनाखासखेल' म्हणून किताब दिला. आमचे वडील मनोली संस्थान व मोकासबाब व चौथाई वगैरे अनभवून राहिले. कार्य पडलें असतां हुजूर तीनशें स्वारांनिशीं चाकरी करीत होते. पुढें आमचे वडिलांचा काळ झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं माधवरावसाहेब थोरले पेशवे यांची स्वारी सरंजामसुद्धां कर्नाटकप्रांतीं निघाली. मार्ग मनोलीच्या धारीवरून, तेव्हां मनोली किल्ला नारीनाळास त्याची मोकळीक होईल ह्मणून खंडणीरोखा वगैरे बेसुमार होऊन, अखेरीस किल्लेस वेढा देऊन. लढून किल्ला घेतला. तेव्हां आह्मीं लहान होतों. मातोश्री कृष्णाबाईसाहेब यांनी किल्ला सोडून कांही थोडेबहुत जिनजितराबें घेऊन निघाली. ती कांहीं दिवस पटवर्धन इलाखेत राहून दिवस काढले. छत्रपती यांजकडे कारकून पाठवून मजकूर कानावर घालुन, अर्ज केला. तेव्हां तिकडून कांही एक बंदोबस्त जाला नाहीं. मग कांहीं दिवसांनंतर मातोश्रीनीं हुजूर पुणेस जावून अर्ज केला. तेव्हां एकंदर संस्थानच काढून घेतलें. त्याअर्थी कुटुंबखर्चास नेमणूक करून द्यावी हें अंतःकरणांत आणून तर्फ मनोली कर्यात सतीगरखेड अठरापैकीं बेहड्यांतून काढून कुटंबखर्चाबाबत ह्मणून सात गांव इनाम पेशवे यांनीं करून दिले. तेव्हां तेथे येऊन, साती गांवांस लावणी वगैरे करून, योग क्षेम करून राहिले. ते अजी पन्नास पंचावन वर्षे होत आलीं. इस्तकबिल इनाम गांवसंबंधें कोणा एकास पैसा दिला नाहीं आणि चाकरीही केली नाहीं.

मागें राजमंडळकरासंमधीक तोरगलकर वगैरे येऊन आमचे गांवास धांदल केली. तेव्हां श्रीमंतांचे हुकुमावरोन कोन्हेरीराव पटवर्धन शेडबाळकर, गणपतीराव यांचे वडील, यांनीं अक्कलकोटकर राजे यांचे भाऊबंद भवानराव लोखंडे यांस घोडगिरीचे मुकामावरून सरंजामेसुद्धां रवाना केला. त्यांनीं येऊन तगादा उठवून बंदोबस्त करून देऊन गेले. त्या समयी आमचे गांवकरी यांद दहा पांच मेले त्या समयीं पुरावा असा झाला. तदनंतर या साती इनाम गांवांत पोट भरत नाहीं, सबब राजमंडळांत चाकरीस राहिलों. तेव्हां चाकरीपेशाबद्दल खांची गांव व कोळवाड गांव व उमचगी व कोडलीकवाड असे गांव खासगी खर्चास चालवून खर्राज दरमहा खर्चासही देत होते. सरकार फौज ठेवून घेऊन रत्नाकरपंत राजाज्ञे ह्यांनीं गोखले यांसी लढाई दिली. सवापूर मुक्कामावर. तेव्हां आह्मी स्वारीबरोबर होतों. लढाई झाल्यानंतर राजाज्ञे हे मनोलीस आले. आह्मी गोखले यांजकडे पाडाव सांपडलों. तेथून सुटका होऊन आल्यानंतर एक सालाबिषयीं सर्वत्रांस तगादा लाविला. तेव्हां आह्मांसही तगादा केला. तेव्हां मामूल कधी दिला नाहीं. हे दाखला

पाहून तगादा मोकळा केला. अनंतर पेशवे यांचीही चाकरी केली. चाकरीबाबें नेमणूक खर्चही पोक्ता करून देऊन कांहीं दिवस चालविलें. याचा दाखला चिंतोपंत देशमुख यांच्या दप्तरीं कर्नाटकसंबंधीं हिशेबीं आहे. भाऊसाहेब पटवर्धन यांचे पुत्र आपासाहेब यांनीं करवीरास वेढा घालून लढले. तेव्हां आह्मी करवीरास होतों. तेव्हांही सदरहुप्रमाणें गांव खर्चास चालविले. वेढा उठल्यानंतर सर्वत्रासी एक साल ह्मणून तगादा केला. तेव्हांही आह्मांस तगादा केला. त्या समयींही मामूल दाखला पाहून तगादा उठविला. कांहीं दिवस भाऊसाहेब पटवर्धन यांची चाकरी नेमणूक वगैरे घेऊन केली. त्यांनींही बरदास्त बहुत प्रकारें चालविली त्यानंतर रोजगारच नव्हता. इनाम गांवात स्वस्थ राहिलों. अलीकडे निपाणीकराकडे राहिलों. त्यांनीही मौजे कवतूर हा गांव आणि खेरीज दरमहा देऊन ठेऊन घेतलें होतें. असे कांहीं दिवस त्याकडे होतों. एका सालीं आह्मी निपाणी मुक्कामीं निपाणी-करांचा निरोप घेऊन गोकर्णयात्रेस गेलों, तेव्हां निपाणीकरांचा धांदली कारभार. यांनीं आह्मी यात्रेस गेल्या पाठीमागें आमचें इनाम गांवठाणें घालून कुटुंब बाहेर घातलें. जिन-जितराबें झाडून घेतले. आह्मी यात्रेहून आलों. पांच सात वर्षे कुटुंब घेऊन सांगली वगैरे गांवांनीं राहिलो. नंतर पुण्यास गेलों. तेथें वेदमूर्ति मोर दीक्षित नाना यांच्या विद्यमानें बाजीरावसाहेबांस अर्ज केला. तेव्हां मामूल इनाम गांव आपले वडिलांनीं दिलेला दाखला पाहून खातरेस आणून निपाणीकरांस ताकीद करून, आमचे इनाम गांव आमचे आह्मांस सन समान अशर सालीं जिमा केला. गांवी कुटुंब घेऊन येऊन स्वस्थ राहिलों. नंतर निपा-णीकरांकडून चिकोडी व मनोली तालुका काढून महाराज छत्रपती यांस देणेंबद्दल जनरल तामस मनरोल साहेब बहादूर यांनी जप्ती केली: तेव्हां आह्मी साहेबांकडे हुबळीच्या मुक्कामीं भेटीस गेलों. भेट झाली. आमचा इनाम गांवचा मजकूर समजाविला. तेव्हां मामूल दाखला पुणेचा बेहेड्यावरून पाहून आमचे इनाम गांव सात आमचे आह्मांकडे दिले. नंतर जेव्हां मनोलीहून तगादा आला होता, तेव्हां करवीराकडून श्री भाऊमहाराज वकि-लीस होते. त्यांसही ताकीद हरएकविषयीं आह्मांस उपद्रव होऊं नये, तेव्हां तगादा उठविला. असें जाल्यानंतर करवीराहून दहा हजार रुपयांचा रोखा करून पन्नास लोक आमचे गांवांस पाठविले. तेव्हां मामूल आह्मीं कोणास पैसा दिला नाहीं. तेव्हां मेहे-रबान चापलेन साहेब बहादूर यांजकडे धारवाडास वकिलाबरोबर पत्रीं मजकूर लिहून थैली पाठविली. तेव्हां मेहेरबान साहेब यांनीं पुण्याचे बेहेड्याचा दाखला पाहून महाराज छत्रपती यांस थैली दिली जे, बेहेड्यांत खर्चीं गांव इनाम आहेत, यांस उपद्रव होऊं नये अशी थैली दिली; आणि आह्मांसही थैली पाठविली जे, महाराज छत्रपती यांस थैली पाठविली आहे, आपणास उपसर्ग होणार नाहीं. ऐशी थैली आली. तेव्हां वरात उठोन गेली. त्यानंतर आणखी दुसरे सालीं करवीराहून हुजरे व लोक व कारकून यांजसमागमें रोखा घेऊन वरात झाली. तेव्हां मेहेरबान चापलेन साहेबांची स्वारी पुण्यास गेली होती.

आपण समेत होतों. साहेबांचे नांवें मजकूर लिहून, थैली देऊन, वकिलास धारवाड मुक्कामीं पाठविला. तेव्हां महाराज छत्रपती यांजकडून नारोपंत नाना वकील होते. त्यास ताकीद झाली जे, गैर मामुल होऊं नये. पत्र पाठवून वरातेस मनाई देवावे, आणि हुजरे यांस जेवणास ताट वाढून दिलें होतें तें ताट, वाट्या व तपेलें हुजरे यांनीं घेतलें होतें तें माघारें देवणेस वकिलांकडून पत्रें देवविलीं. त्यावरून वरात उठोन गेली. तें आजपर्यंत साहेबांचे मेहेरबानगीवरून, कांहीं एक कोणाचा तगादा नसतां, स्वस्थ होतों. हल्लीं महाराज छत्रपती यांची स्वारी मनोलीस आली. तेव्हां आह्मी गांवांत नव्हतों. देवास गेलों होतों. मनोलीस स्वारी आली. दुसरे दिवशीं आमचे नांवें रोखा स्वारीखर्चाबद्दल ह्मणोन पंचवीस हजार २५००० व मसाला एक हजार १००० असे रोखा होऊन २७ सत्तावीस स्वार व पायाचे लोक पाठविले. तेव्हां आह्मी गांवीं नव्हतों. घरीं कुटुंबांनीं स्वारांस उतरून घेऊन रोजा व पोटगी व दाणाचारा असे दररोज पाऊणशें ऐशी रुपयेपर्यंत देत होते; आणि मनोलीस छत्रपती यांजकडे फडफर्मास देऊन कारकून व भला माणूस पाठविले. त्यांनीं फर्मास पोंहचवून, जाहीर करून, हुजुरचे कारकुनाच्या मार्फतेनें विनंती करीतच होते जे, गैरमामूल होऊं नये. यजमान गांवीं नाहींत. वरातास मनाई व्हावी. यजमानसाहेबाकडे वर्तमान कळवून भेटीस आणवितों. अशी विनंती करीत कारकून तेथेंच होते. स्वारास मनाई झाली नाहीं. स्वारास खर्चास देऊन गांवीं ठेवून घेतलें. मनोलीहून मनाई होत नाहीं. याप्रमाणें विचार झाला आहे, म्हणून साहेबाकडे थैली देऊन कारकुनास पाठविला. गैरमामूल रोखा वगैरे होतो येविषयीं पेशजी मेहेरबान चापलेन साहेब बहादूर यांनीं दाखला पाहून बंदोबस्त करून दिले. सर्वस्व आधार साहेबांचा म्हणून थैली मजकूर लिहून पाठविला. साहेबाकडेस कारकून पाठविला. तो धारवाडीं राहिला. मनोलीस कारकून होते ते तेथेंच राहिले. स्वारास रोजा वगैरे खर्ची देऊन गांवांत ठेवून घेतला. असें असतां छत्रपती यांची स्वारी फौज व तोफसुद्धां मनोलीहून निघोन आमचें इनाम गांव इटनहाळ ह्मणोन आहे तेथें स्वारी गेली. ते तेथील एक दुसरा प्यादा मारून ठार करून गांव दरोबस्त गुरेंढोरें व रयता वगैरे जिनजितराबें लुटून फस्त करून, तसेंच मुंगळीहाळ म्हणून ठाणेचा गांव तेथें नीट गडीपर्यंत फौज चालून गेली. तों तेथील प्यादे दोनी तिनी असामींस तोडिले. ते ठाणेंत जाऊं लागले तेव्हां ठाणेंतून गोळी घातली. मग गोळागोळी होऊन दोन चार मुडदे परस्परें पडले. तेव्हां वरातेस स्वार कोण होते त्यास आणून घेतलें. तोंपर्यंत दहा दिवस दररोज पाऊणशें रुपये सुमारे खर्चास देऊन ठेवून घेतलेच होते. तसाच गोळागोळींत मुंगळीहाळ ठाणा जेरीस आणून आंतील लोकांस कौल देऊन, उतरवून ठाणा घेतला. मुंगळीहाळ व इटनाळ व रासनाळ ऐसे तिनी गांव लुटून फस्त केले. मुंगळीहाळास कांहीं घरें आगी लावून जाळिलीं. गांवांतील घर उकलोन तुळया वगैरे काढून घेऊन गेले. कांहीं नेतात, आणि रयेता वगैरेचे दाण्याचे पेव काढून दाणे नेतात. सर्व लुटलुटी

केली. कांहीं एक ह्मणून पदार्थ राहिला नाहीं. ठाणेचा जागा ह्मणून आमचीं खाजगी सनगें व भांडीं वगैरे जितराबे व कमत संबंधीं दाणे वगैरे आणि बैल वगैरे जनावरें मनस्वी होतीं; ते झाडून लुटून नेले. खराबीस पारावार नाहीं. अशी अवस्था झाली. फौज अद्याप मुगळीहाळावर मुक्काम आहे. चेळकोप म्हणून आमचे गांवासुमारची गढी आहे. तेथें पांच पंचवीस काटक मात्र ठाणा रक्षून आहेत. तोही ठाणा सोडून देण्याविषयीं स्वार वगैरे जाऊन दंगा करीत बसले आहेत. तेही वेढून घेणार ह्मणून पत्रें लिहिलीं होतीं. सत्वर मेहेरबान साहेबास अर्ज करून लष्करांत ताकीद करवावी जे, ठाणा वगैरे ह्मणून दंगा करूं नये असें लिहिलें आहे. त्यास सर्व प्रकारें घात झाला. याउपरी मेहेरबानगी करून बंदोबस्त करून, ठाणा व जीनजिनगी गुरेंढोरें वगैरे आमचे आह्मांस जिमा करून सांभाळ करणार साहेब आहां. मामूल दाखल्याप्रमाणें मेहेरबान चापलेनसाहेब बहादूर यांनीं बंदोबस्त करून दिलेच आणि आपण साहेबांसही चालवीत आला, सबब आह्मी गांवीं स्वस्थ होतों. हल्लीं सर्वोपरी असा विचार झाला. कुटुंब निघून रानोमाळ झालें. सर्व बंदोबस्त करून देणार साहेब समर्थ. आमचा इनाम गांव कांहीं आजकालचा नव्हता. बहुत दिवस चालत आले. नरगुदकर व रामदुर्गकर वगैरेंचे संस्थान तुटक होऊन बाकीचें कसें आजपर्यंत चालत आले, तसेंच आमचेंही इनाम गांव चालत आलें. केवळ सात खेडांचेच मालक पुरातनपासून ऐसे नव्हते. छत्रपती यांचे पदरी अष्टप्रधान दिले आहेत त्या मानकऱ्यांतील दौलत आमची. तशी दौलत काढून घेऊन पोटगी खर्चास इनाम गांव सात करून देऊन पन्नास पंचावन वर्षें झालीं. स्वस्थ कालहरण करून होतों. प्रस्तुत त्यासही ठिकाण नाहींसें करून खराबी केली. हें साहेबांनीं खातरेस घेऊन बंदोबस्त करून देणार साहेब समर्थ आहां. सदरहू मालुमात आमचे वडील सांगत होते. ते पूर्वजाच्या अलीकडील माहिती आह्मांस खास आहे असा विचार असून हे मालुमात लिहून दिले आहे.

( ब )

याद्री निळकंठराव शिंदे साहेबसुभा याजकडे सर्व इनाम चालत आहे त्याची कैफियत दिवाण बापुजीपंतीं लिहिविली तः—

१ यांचे मूळ पुरुष जिवाजी शिंदे यांनी मनोली, मुरगोड, सतीगिरी व ठनाळ वगैरे दरोबस्त तालुके जाहगिरी मिळविले. शिवाय सरकार तालुकांत चौथाई वगैरे आपले ज्याहामर्दीनें बसविलें ह्मणून तर कोल्हापूर महाराजांचे घरास जिवाजी शिंदे यांची कन्या दिली. नंतर त्यांनीं धनी आपले नोकर ह्मणून ह्मणविला. जिवाजी शिंदेचे लेक बाजीराव शिंदे, त्याचे लेक सुबराव शिंदे, त्याचे लेक निळकंठराव शिंदे असे चारी पुरुषपावेतों तालुका चालला. सुमार ६३ वर्षांखालीं पेशवेसरकार थोरले माधवरावसाहेब यांनीं सुबराव शिंदे यांची बाईल ······ बाई शिंदे याजवरी खंडणीविषयीं रोखा केला. ते माघारे बाईसाहेब

नानासाहेब यांचे कारकीर्दीस प्रथम जाले म्हणून जानोजीस 'सुभा साहेब' व मुधोजीस 'धुरंधर' हें पद दिल्हें. पुढें जानोजीस संतान नाहीं, तेव्हां मुधोजीचे जेष्ठ चिरंजीव हल्लींचे रघोजी यास दत्तक जानोजी असतांच घेतलें. पुढें ते वारल्यावर रघोजी यास पुणेयाहून वस्त्रें दिल्हीं. पुढें पुरंधराहून साबाजीस सुभा याचीं वस्त्रें दिल्हीं. तेव्हां साबाजीची व मुधोजीची लढाई जाली. त्यांत साबाजी पडलेयावर मागती रघोजीचा रघोजीस पुरंदराहून सुभा दिल्हा. मुधोजीस रघोजीखेरीज दोन पुत्र. खंडोजी व व्यंकोजी. मुधोजी असतां खंडोजीस सेनाबाहादर हें पद व मंडळे प्रांत सरंजामास याप्रमाणें दिल्हें. ते खंडोजी वारले. त्यास संतान नाहीं. मुधोजी वारल्यावर × × × × देऊन चंद्रपूर वगैरे सरंजाम होता तो लावून दिल्हा. रघोजीचे चिरंजीव परसोजी, व्यंकोजीचे चिरंजीव मुधोजी भोसले हे हल्लीं आहेत. सदरहूप्रमाणें ऐकण्यांत वर्तमान आहे.

---

## २३ चौधरी.

यादी रामचंद्रराव चौधरी सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ. मेहेरबान ज्यान वार्डीन साहेब बहादूर डिपुटी एजंट जिल्हा दक्षण याचें पत्र तारीख ८ सपटंबर १८३२ इसवींचें आलें. त्यांत मजकूर, हजरत बंदगानअल्लीं रैटहनराबल गौरनर कौसल चाहात आहेत कीं, दक्षिणेंतील जहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी ह्मणून कलमी केलें जाते जे, आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशीलः— आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे व पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपनी सरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन. ऐशास आमचे तीर्थरूप कैलासवासी रूपराम चौधरी यांनीं स्वपराक्रमानें पेशवे सरकारचीं कामेंकाजें करून नांवलौकिक मिळविला त्याचा तपशीलः—पूर्वीं चौधरी सरकारचे तोफखान्याची चौधरकी करीत होते. नंतर शके १६९५ वांत श्रीमंत नारायणराव साहेब कैलासवासी जाहाल्यावर श्रीमंत दादासाहेब पुण्याहून स्वारीस निघाले. तेव्हां रूपराम चौधरी यांचे जिमेस रथखाना व तोफखाना करून बराबर घेऊन गेले. पुढें त्रिंबकराव पेठे फौज घेऊन दादासाहेब यांचे पाठीस लागले. त्याची व यांची गांठ सांगोलें येथें पडून लढाई मातबर होऊन त्रिंबकराव यांस पाडाव केलें. त्या लढाईंत चौधरी यांनीं तरवार चांगली केली. नंतर

स्वारी पुढें चालली. मागाहून हरिपंत तात्या फडके यांनीं फौज धरून मागें लागले. त्याची लढाई महीवर शके १६९६ वैशाखमासीं मातबर होऊन हरिपंत तात्या वगैरे फौजसुद्धां माघारे आले. दादासाहेब यांचे स्वारीबरोबर रूपराम चौधरी सुरतेस गेले. तेथें दादासाहेब कंपनीसरकारचे बहादारीनें होते. तेथून कांहीं दिवसी कोपरगांवीं आले. त्याजबराबर चौधरी होते. दादासाहेब यांचा काळ कोपरगांवीं झाल्यावर पुण्याहून कारभारी जाऊन दौलतीचा बंदोबस्त केला. तेव्हां चौधरी याजकडे तोफखान्याचें वगैरे काम होतें. त्याचा बंदोबस्त करून तोफखाना घेऊन पुण्यास आले. चौधरी याजपाशी चारपांचशें लोक कवाइती कुडतीवाले मात्र होते. त्यासुद्धां पुण्यास येण्याविषयीं श्रीमंत माधवराव नारायण यांचे कारकीर्दींत सरकारचें पत्र गेल्यावरून चौधरी पुण्यास आले. नंतर राघो विश्वनाथ गोडबोले, यांचे रिसाल्यांत लोकसुद्धां चाकरीस ठेविले. पुढें सन समान समानीनांत बदामीची स्वारी जाहली. तेथें लढाई होऊन बदामी किल्ला सर करून स्वारी माघारी आली. त्यांत चौधरी यांनीं आपले लोकांसुद्धां तरवार चांगली केली, हें सरकारचें नजरेस येऊन, चौधरी यांचे निसबतीचे पांच सहाशें लोक ज्याजती चाकरीस लाऊन दरमहा वाढविला. पुढें कंपनी सरकारचे मदतीस श्रीरंगपट्टणचे स्वारीसमयीं पेशवे सरकारची फौज गेली, तेव्हां राघोपंत गोडबोले पुण्यास राहून दोन हजार लोक चौधरी याजबरोबर देऊन पाठविले. तेथें लढाईत चौधरी राहून, दुष्काळ पडला सबब कोंकणांत वगैरे हरएक जागा मर्दुमी करून दाण्याची पुरवणी लष्करांत बहुत केली. नंतर स्वारी परत आल्यावर शके १७१६ त खर्ड्याची स्वारी जाली. तेव्हां तोफखान्यासुद्धां चौधरी सडेस्वारींत बराबर गेले. तेथेंही लढाया तलाव्याच्या वगैरे जाहल्या. त्यांत चौधरी यांनीं मर्दुमी फार केली. नंतर मश्रुलमुलूक यांस सरकारानें कैद करून धरून आणिलें. ते समयीं बराबर बंदोबस्तास तोफखान्यासुद्धां चौधरी होते. पुढें श्रीमंत माधवराव नारायण यांचा काळ जाहला. नंतर श्रीमंत बाजीरावसाहेब यांस जुन्नराहून आणावयास परशरामभाऊ पटवर्धन गेले. त्याजबरोबर लोकसुद्धां चौधरी जाऊन बाजीरावसाहेब यांस पुण्यास घेऊन आले. नंतर बाजीरावसाहेब यांनीं चौधरी वडिलांचे वेळेचे चाकर कामेंकाजें केलेले, असें मनांत आणून, एक पलटण चौधरी याचे चाकरीस ठेविलें. व आनंदवल्लीहून तपोनिधी मनोहरगिरबावा गोसावी यास आणून त्याजकडे अलिगोल एक पलटण चाकरीस लाविलें. त्या कामाचा आवर गोसावी याजकडून न होतां पळून आनंदवल्लीस गेले. नंतर श्रीमंतांनीं चौधरी यास त्या पलटणचें काम सांगितलें व तोफखान्याचें काम व शंभर स्वारांची पागा नवी सांगितली. पहिलें एक पलटण चौधरी याजकडील होतेंच. एकूण सदरहूचे खर्चास सरंजाम अजमासें तीन साडेतीन लक्षांचा लाऊन दिला. तेव्हां जातीचे खर्चास अजमासें तेरा हजारांचे सरंजामाची नेमणूक सन मयातैनापासून जाहली. त्यांत खर्चाची बेहेबुदी न होई. सबब चौधरी यांनीं सरकारांत विनंती केली कीं, जातीचे खर्चाची नेमणूक जाहली

त्यांत खर्च निभत नाहीं. तेव्हां आज्ञा जाहली कीं, तुह्मांकडे कामें आहेत यांसुद्धां तेरा हजार रुपयासुद्धां एकंदर साठ हजार रुपये दरसाल घेत जावे. त्याप्रमाणें वहिवाट होत गेली. पुढें त्रिंबक किल्ला पेशजी धोंडो महादेव नगरकर याजकडे होता. त्याजवर अंमल श्रीमंताचा न बसे. सबब दोन्ही पलटणें व तोफखाना व पागा याची नेमणूक तिकडे जाहली. तेथें लढाई होऊन किल्ला सर करून सरकारांत घेतला. पुढें खानदेशांत पेंढारी वगैरे यांचीं बंडें होऊन मुलूख उजाड जाहला, तिकडे पलटण व तोफखाना व पागा यांची नेमणूक झाली. तिकडे चौधरी जाऊन बंडाचा बंदोबस्त करून मुलकांत वस्ती केली. हिकडे माधवराव रास्ते यांचे चिरंजीव बाळासाहेब व बाबा साठे हे सरकाराशीं बदलून कोरीगड बळकावून सरकारचा अंमल उठवून देऊं लागले. याजकरितां चौधरी यास तिकडून आणून कोरीगडावर रवाना केले व आणखीही फौजा रवाना झाल्या होत्या. तेथें जातांच एक लढाई जाहली. व पुढें चार महिने राहणें त्या मुक्कामीं जाहलें. दररोज गोळागोळी चालली होती. दुसरे लढाईत सरकारचे दोन अडीच हजार माणूस पडले. त्यांत पलटणचे दोन अडीचशें लोक कांहीं जखमी व कांहीं मेले. नंतर किल्ला सर होऊन माघारे आले. पुढें कांहीं दिवसीं होळकर पुण्यास येऊन बाजीराव साहेब वसईस गेले. माहाडपर्यंत चौधरीबराबर होते. तेथून श्रीमंत वसईस जाते समयीं विंचूरकर व चौधरी यास बंदोबस्ताकरितां माघारे पाठविले. ते कर्नाटकांत जाऊन बंदोबस्त राखून होते. मोंगलाच्या व पेशवे सरकारच्या फौजेच्या लढाया होऊन मोंगल आपले हद्दींतून पार केला. नंतर मेहेरबां वसलीसाहेब बहादूर व विंचूरकर व बापू गोखले व चौधरी वगैरे फौजासुद्धां पुण्यास आले व बाजीरावसाहेबही वसईहून आले. पुढें सिंहगड व त्रिंबक व पुरंदर व कांगोरी वगैरे आणखी पांच चार किल्ले यांच्या सनदा देऊन किल्ले चौधरी याचे हवालीं केले व सरकारच्या मामलती तीन चार लक्षांच्या सांगितल्या. नंतर मेहेरबां वसलीसाहेब बहादूर पुण्याहून गायलगडचे स्वारीस निघाले, तेव्हां विंचूरकर व चौधरी व गोखले, वगैरे फौजा बराबर दिल्ह्या. ते खानदेशांत गाळण्यापावेतों गेले. तेथें बंडाची लढाई होऊन त्याचा मोड जाहला. तों इकडे भिल्लांचा दंगा ब्राह्मणवाड्यापासून नाशीक, त्रिंबक, खानदेशपर्यंत बहुत होऊन मुलूख उजाड जाहला. सबब चौधरी यांचीं पलटणें व तोफखाना व पागा याची नेमणूक तिकडे होऊन भिल्लांचा बंदोबस्त सांगितला. तेव्हां भिल्लांजवळ लढाया दहावीस होऊन भिल्लांच्या हट्या जागा जागा होत्या, त्या जाळून भिल्लांचा बंदोबस्त करीत पाठीस लागोन, रामनगरपर्यंत दोन तीन वर्षे पाठलाग करून, भिल्ल धरून बंड मोडून टाकिलें. नंतर चौधरी सन अर्बा अशर मयातैनपर्यंत सरकारचाकरी नेकीनें करून होते. पुढें त्यांची तबियत बेआराम जाहली. सबब श्रीमंतास विनंति करून मामलतीचे मुलकाच्या व किल्ल्याच्या सोडचिठ्या सरकारांत पाठवून विनंती केली कीं, माझा जगण्याचा भरंवसा दिसत नाहीं, याजकरितां किल्ले वगैरे माझा जीव आहे तोंपर्यंत सरकारनें हवालीं करून घेऊन

पावती यावी. तेव्हां आज्ञा जाहली कीं, घाबरें होऊं नये. उतार तुह्मांस पडेल. त्याजवरून पुन्हा विनंती केली कीं, मला भरंवसा पुरत नाहीं. याजकरितां सोडचिठ्या घेऊन किल्ले हवालीं करून घ्यावे. प्रकृत चांगली जाल्यास खावंद कृपावंत होऊन माझीं कामें मला देतील त्याजवरून सोडचिठ्या मात्र घेतल्या. पुढें आठ चार दिवसीं चौधरी मृत्य पावले. नंतर तींच कामें किल्ले वगैरे आह्मांकडे कायम ठेविलीं. नंतर सन सीत अशरांत पेठ हरसूल येथील संस्थान तेथील राजे यांनीं बळकावून कोळी व भिल्ल ठेवून मुलुकांत दंगा केला. त्याचा बंदोबस्त सरकारचे आज्ञेवरून पागा पलटणें तोफखाना घेऊन जाऊन लढाई होऊन राजाचा पराभव करून ठाणें बसवून बंदोबस्त केला. पुढें सन समान अशरांत कुंपणी सरकारचा व पेशवे सरकारचा बिघाड जाहला. तेव्हां सिंहगडास आमची स्वारी होती. तेथें दहा दिवस लढाई देऊन किल्ला लढविला. नंतर कुंपणी सरकाराशीं तह करून किल्ला हवालीं जाहला; तेव्हां तहाप्रमाणें कांहीं एक अंतर न पडतां, किल्ला हवाली केला. याजवरून मेहेरबां खुदावंत एल्‌फिस्तन् साहेब बहादूर यांची मर्जी खुष जाहली. याप्रमाणें पेशवेसरकारचे कारकीर्दीअखेरपर्यंत हरवख्त कामें करून चाकरी केली. साठ हजार रुपये जातीचे खर्चाचे रूपराम चौधरी यास घेण्याविषयीं परवानगी होती. त्याप्रमाणेंच पेशवेसरकार अखेरपर्यंत परवानगीनें आम्हांकडे चालत आले. पुढें कुंपणी सरकारांतून बंदोबस्त होते वेळीं, जातीस तेरा हजार रुपये नेमणुकीचा दाखला पाहून त्यांतून चौथाई वजा करून सहा हजार तिनशें रुपये पेनशन व साडेचवतीशे रुपयास मौजे चास तर्फ खेड सुभा पुणे हा गांव सरंजामास लावून दिल्हा, व शभर स्वार सरकारांत आमचे चाकरीस लाविले. ते स्वार पुढें सरकारांतून दूर करून त्याजबद्दल आम्हांस जातीस सहा हजार रुपये पेनशन करून दिल्हें. येणेंप्रमाणें सरकारांतून बंदोबस्त करून दिल्हा आहे. याप्रमाणें आमचे खानदानीचा मजकूर आहे. तारीख १६ आगष्ट सन १८३३ इसवी.

# प्रकरण २ रें.

# ब्राह्मण व इतर सरदार.

## १ आंबीकर.

यादी गोपाळराव विठल व रामराव विठल आंबीकर सुरुसन आर्बा आर्बैन मयातैन व अलफ. आह्मांकडे राजपत्रीं सरंजाम चालत होता. संपादन करणार व मुळ पुरुष कोण व सरंजाम दिल्ह्याची तारीख व हल्लीं काय चालत आहे त्याची कैफीयत लिहून देणें ह्मणोन आज्ञा जाहाली. त्याजवरून येविशींचीं कलमें लिहिलीं आहेत. तीं बीतपशील:—

१ सरंजाम संपादन करणार मूळपुरुष दामाजी माणकेश्वर, आमचे पणजे, यांनीं श्रीमंत बाळाजी विश्वनाथ पेशवे व आबाजी त्रिंबक पुरंदरे यांस, दमाजी थोरात व चिमाजी गाईकवाड पुंड पाळेकरी यांनीं धरून नेऊन बहुत मारहाण करून जैमंगळ भुलेश्वरचे किल्ल्यांत नेऊन तजदी फार करीत होते. तेथें बहुत श्रम साहस करून उभयतांस सोडवून किल्ले सातारे मुक्कामीं श्रीमंत महाराज छत्रपती स्वामीपाशीं नेलें. तारीख ९ माहे अक्टोबर सन १८४३ इसवी. सन १२५३ फसली.

---

## २ इचलकरंजीकर.

### अ.

यादी नारायणराव व्यंकटेश घोरपडे इचलकरंजी सुरुसन आशरीन मयातैन व अलफ.

श्रीमन्माहाराज राजश्री छत्रपती यांची स्वारी फौज सुद्धा सन इसन्ने मयातैन सालीं इचलकरंजीस येऊन शह दिल्हा. ते समयीं राजश्री नारायणराव पाटणकर सरलष्कर यांचेविशीं बोलणें होऊन याद ठरली; त्या करारप्रमाणें नजरेचा ऐवज पावला. बाकी देण्यांत आमचा गांव मौजे बलाळी व देशमुखी व सरदेशमुखीचा ऐवज लावून दिल्हा. करारापैकीं कुळ व जागा बाव वरकड गांव सोडून द्यावे ते दिल्हे नाहींत. बाकी ऐवज देणें त्या ऐवजास झाडून गांव ठेवून घेतले. गांवाकडून ऐवज राहिल्याचा उगावा जाहाला असतां, गांव सोडून दिल्हे नाहींत. त्याजकरितां श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचें विनंतीपत्र गांव सोडावे याविशीं लाविलें, तें मान्य केलें नाहीं. तेव्हां लोक ठेवून गांवाकरितां सिलसिला करीत होतों. इतक्यांत अजम वसलीसाहेब यांची स्वारी कर्नाटकांत आली. त्यांचे भेटीकरितां सरकार मंडळी गेली व आम्हीही गेलों. व राजश्री पंत राजाज्ञा करविराहून आले होते. तें समयीं राजश्री रामचंद्रपंत आप्पा पटवर्धन याचे विशीं बोलणें जाहाले. गांवाविषयीं झटला करूं नये, बोलण्यांत आणून गांव मोकळे करितां येतील. ऐसें सांगितलेवरून शिबंदी दूर करून

खटला मना केला. पुढें साहेबांची स्वारी माघारी फिरली, त्यासमयीं मुक्काम होऊन बोलणें व्हावें, त्यास अवकाश पडला नाहीं. पुढें छत्रपती महाराज यांचा व राजश्री सरलष्कर यांचा कलह वाढून तालुका सरलष्कर यांनीं घेतला. ते समयीं आमचें गांव आम्हीं घेतले. नंतर सरलष्कर यांणीं स्वारीखर्च यावा ह्मणून सन तिसा आशर सालीं रोखे केले, त्याचें बोलणें तेथें जाहले नाहीं, सबब गांवांस ठाणीं बसविली. येविशीं पुण्यांत विनंति करून सरकारचें पत्र गांव सोडून देणेंविशी सरलष्कर यांस घेतलें. परंतु गांव सोडून दिल्हे नाहींत. पुढें सरकार कंपनी बहादूर याजकडील सरलष्कर यांस निकड बसली, तेव्हां गांवच्या सोडचिठ्या सरकारांत दिल्या. ते गांव ९ पैकीं कैलासवासी सदाशिवपंत भाऊ यांनीं इंग्रजबहादूर यांचे विद्यमानें सन खमस आशर सालीं सोडून दिल्हे गांव ४. बाकी सुटून येणें गांव ५ पांच. गांवाविशीं करविरीं महाराजास अर्ज करून सोडून घ्यावे याप्रमाणें सांगितलें. त्यापासून चार वर्षें विनंती हुजूर करीत आहों, परंतु गांव व वेतन सदरहू कराराप्रमाणें सोडीत नाहीं. याजकरितां साहेबीं मेहेरबानी होऊन गांव व वतनें सोडवून दिल्हीं पाहिजेत.

ब.

इचलकरंजीकर घोरपडे यांची कैफियत नारायणराव मूळपुरुष यांनीं करवीर इलाखा कापशीकर संताजी घोरपडे याजकडे चाकरीस होते, त्यांनीं आपल्या पुत्राप्रमाणें मानून दौलतीचा विभाग आपले चिरंजीवाबराबर वाटून दिल्हे. त्याचा वंशः—

नारायणराव
|
व्यंकटराव नारायण ( यास बाळाजी बाजीराव पेशवे यांनी आपली बहीण अनुबाईस देऊन लग्न केलें. )
|
नारायणराव व्यंकटेश
|
व्यंकटराव नारायण ( विष खाऊन मेला; यास बायका दोघा, वडील बायकोचें नांव रमाबाई हिनें दत्त घेतला त्याचें नांव )
|
नारायणराव व्यंकटेश (हल्लीं फौत जाहला.)
|
व्यंकटराव | दुसरा पुत्र आहे.

---

## ३ काळे.

यादी कैफियत कृष्णराव गोविंद काळे यांचे खानदानीची. सुरुसम सलास सलासीन मयातैन व अलफ. रफीउलकदर मेहेरबान वार्डिनसाहेब बहादूर डिपूटी एजंट जिल्हा दक्षण यांनीं तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीस मुताबक हुकूम हुजूर नवाब मुस्तताब बंदगानअल्ली रैट हनराबल गौरनर साहेब बहादूर चाहात आहेत कीं, दक्षिणेंतील जाहागिरदार लोक यांची कैफीयत खानदानी कशी आहे, त्याची वाकीफगारी व्हावी

म्हणून कलमी केलें जाते जे, आपण मेहरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत हकीकत लेहून पाठविले पाहिजे. त्यांतील तपशील आपली खानदानीची बढती, कोणते तेरिखेस खानदानीचा लौकीक महशूर जाला ते, व फौज व जातसरंजाम कोणते तेरीखेस दिल्हा ती तेरीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ते, व आपलेकडे सरंजाम हल्ली काय चालत आहे व पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणी सरकारांतून चालत आहे त्यांत कमपेश तफावत काय आहे ते, वगैरे यादींत दाखल करून जबाब रवाना केला पाहिजे. त्याजवरून बिनाय आमचे वडिलाचे खानदानची हकीगत बंदीमजमुन की

१ आमचे आजे कृष्णराव बल्लाळ कदीम काशीचे राहणार यांनीं दक्षिणेंत येऊन बाबूजी नाईक बारामतीकर यांचे वशिल्यानें पुण्यात पेशवेसरकारांत श्रीमंत कैलासवासी नानासाहेब यांचे हुजूरांत रोजगाराची पैरवी केली. याची तेरीख इस्तकबिलीची ल्याहावी तर वाकफियेतीचा जबाब बरोबर अर्जात येतो. त्यास हरकत सन १२०८ फसली पौष शुद्ध ८ सोमवारी श्रीमंत बाजीरावसाहेब याचे कारकीर्दीत नानाफडणीस यांची इतराजी आमचे तीर्थरूप गोविंदराव कृष्ण याजवर झाली. त्या प्रसंगांत आमचे घरादाराची व कुल आसबाब, चीजवस्त, दरोबस्त कागदपत्र; रुमालसुद्धां याची जप्ती सरकारची जाली. त्यांत बिलकूल कागदपत्र सरकारांत नेले त्याजवरून रोष नच असेल ती अवल पैवस्ती याची तेरीख व साल सरकार दप्तरांत दाखला निघेल. कलम.

१ श्रीमंत दादासाहेब हिंदुस्थानांत स्वारीस गेले, तेव्हां आमचे आजे हमराहा रिकामे होते. त्यावेळेस दिल्लीत हुजर पातशाईत केशवराव हरकारे याचे वशिल्यानें श्रीमंत दादासाहेब यांचे मनोदयानरूप एक दुसरा मतलब पेशवाई दौलतीचे उपयोगी हसल जाहाला. सबब दादासाहेब मवसुफ यानी दाहा हजार रुपये .जातीची तैनात करून व पालखी व लवाजमा वगैरे सरकारनिसबत हमराहा देऊन सरफराज केले. हाही दाखला स्वारीचे दप्तरांत असेल. त्याजवरून रोषन होईल. कलम.

१ श्रीमंत थोरले माधवराव यांचे कारकीर्दीत राक्षसभुवनची स्वारी नवाब निजाम अलीखान बंदगानअली बहादूर याजवर जाहली. राजे विठ्ठल सुंदर सरकारकामास आले. त्या हंगामांत धोंडोराम वकील पेशवाई सरकारांतून हैदराबादच्या वकिलीस होते. त्याजकडून वकालतीचा वाहादा दूर होऊन, आमचे आजे कृष्णराव मरहूम यांस सरकारांतून वकीलीचे कामावर नवाबाचे स्वारीबरोबर रवाना केले. त्या वेळेस पंधरा हजारांची सरंजाम व पंधरा हजार रुपये नगद आसबाब तयारीस देऊन रूसकत केलें. त्याप्रमाणें तीस हजार रुपये नेमणूक चालू जाली. हरदो सरकारांची खैरखाईप्रमाणें तरफैनची खुषी राखून जहूरात सरकार मतालब आणले, यामुळें नवाब बंदगान हजरत यांचे सरकारांतून पंधरा हजाराचा सरंजाम जातीचा व चाळीस हजाराचा पथक, स्वार शंभर याप्रमाणें सरफराज जाहाले. हे

कृष्णराव बल्लाळ जिवंत असतां चालत होता. तेच बदस्तुर ते वारल्यावर त्यांचे पाठीमागें नवाब मरहूम यांनीं आमचे तीर्थरूपास बाहाल बरकरार ठेवून सरफराज केलें. सदरहू-प्रमाणें हरदो सरकारांतून सरंजाम पंचाऐशीं हजार रुपयांचे महाल चालत होते. खेरीज पेशवे सरकारांतून सन ११९८ चे सालीं दाहा हजार रुपये जातीस व तीस हजार पथकास सरंजाम मिळून, सव्वा लक्षांची बेरीज तागाईत सन १२०८ पर्यंत चालत होती. दरम्यान श्रीरंगपट्टणची स्वारी सन १२०० टिपू सुलतान याजवर नवाब बंदगानअल्ली व कुंपणीसरकारचे सरदार साहेबान अल्लीशान लाट कारनवालिस साहेब व आडिकंप मिस्तर चेरी साहेब व जनरल मेडूस साहेब बहादूर व पेशवे सरकारांतून हरीपंत तात्या फडके वगैरे हर सरमोहीम ते साली तहनामे तिन्ही दौलतीचे ठरले. त्या खटपटींत तिन्ही दौलतींतील अमिरांपाशी आमचे तीर्थरूप गोविंदराव कृष्ण यांची वागणूक होती. हे सरकारकुंपणीचे हपीसांत दाखल असतील. तपशीलें लेहून कळविणें नलगे. रोषनच आहे. या कामाचें रोज-नामे सरकार पेशवाईचें दप्तरांत बार आहेत. आमचे कागद दरोबस्त सरकारांत नेले. यामुळें तेरीख शक संवत साल भारती न फसली हे मोकरार लिहिण्यास लाच्यार. कलम.

१ श्रीरंगपट्टणाहून हरीपंत तात्या फडके पुण्यास आले. आमचे तीर्थरूप यांस नवाब बंदगानअल्ली हजरत शिकंदरज्याहा यांचे स्वारीबरोबर हमराहित रूकसत केलें. त्या मुकदम्याचें दरामत बरामदित नवाब मुस्तताब कट करून वालिस साहेब बहादूर यांनीं दोन जरबा तोफा, किल्ले. बेंगरूळाहून आमचे वडिलास इनायत केल्या. कलम.

१ सन १२०४ फसलींत नवाब बंदगान हजरत याची व श्रीमंत सवाई माधवराव साहेब पेशवे खासा स्वारी व मदारूल माहाम नाना फडणीस व दौलतराव शिंदे अलि-ज्याहा बाहादूर व भोंसले व होळकर व गाइकवाड वगैरे कुल अमीर खडर्याचे स्वारींत जमा होऊन नवाबाशीं मुकाबिला जाहाला. त्या दारमदारींत आमचे तीर्थरूप जे दिवशीं फत्ते सरकार पेशवाईची त्या वेळेस नवाब निजाम अल्लीखान बहादूर मरहूम याचे खवाशींत बसून, नवाब मरहूम यांची खुषी बमोजीब मदारूल माहाम यास इतल्ला मना-शिब वक्त करून मुकाबिला तोफाचा सुरू होता. याजवर जिऊबादादा निसबत शिंदे सर-गरम होते. त्यास सरकार पेशवाईंतून इतल्ला करून रफेशर केला व तस्फियाचा नक्षा ठराविला. हे सर्व खुर्द बुजरूख यास माहित आहे. हशील कलम हरदो सरकारचे खैरखा असा इतबार कामील दोन्ही सरकारास होता. कलम.

१ कारकीर्द सन १२०५ फसलींत फाल्गुन मासीं श्रीमंत बाजीराव साहेब यांची जाली. त्या दिवसापासून साहेब मोमी आले. यांचे नोकरींत वागणें कजम जाले. यामुळें मदारूल माहाम नाना फडणवीस यांचे दिलांत वहम येऊन हलाखीचा रोज पाहिला. तो सन १२२७ फसलीपर्यंत पेशवे सरकारांतून दोन गांव व नवाबाचे सरकारांतून एक गांव मौजे जिवलगी परगणे कलबुर्गे हे तिन्ही गांव इनामी चालत होते. याखेरीज श्रीमंत

बाजीराव साहेब दरसाल पांच साहा हजार रुपये नगद (देत) होते. याप्रमाणें लढाई अखेर-पर्यंत चालले कारकीर्द सरकार कुंपणीची जाली, तेव्हां बाजीराव साहेब यांचे स्वारी-बरोबर जे मुक्कामीं बापूजी गणेश गोखले कामास आले, त्या मुक्कामपर्यंत हजर होते. हे सरकार कुंपणीचे अमिरास जाहिर आहे. तेथून बारामतीचे मुक्कामीं आले. लढाई अखेर मोंगलाईतील गाव महकूब जाहाला. बाकी दोन गांव इनामी व तीर्थरूपास पेनशीन साहेब अलिशान एलफिस्टन साहेब बहादूर यानी सन १२२८ फसलीत करून दिल्हें रुपये ३००० तीन हजार, ते सन १२३३ फसलीचे कार्तिकपर्यंत चालले. ते वारल्यावर महकूबच आहे. आह्माकडे हल्ली जुजबी दोन खेडी इनामी मौजे चिचोली देवस्थानाकडे मौजे सिरवली जातीकडे याप्रमाणे चालत आहे

१ आपले वडिलाची मातबरी पेशवे सरकारात काय होती, हल्ली कुंपणी सरकारांतून तुह्मांकडे चालते त्यात कमपेश काय ते ल्याहावे ह्मणून सदरी हुकूम; त्यास वडिलांची मातबरी हरदो सरकारात होती, तिचा बयाज सदरी लिहिला आहे. हल्लीं आह्मांकडे कुंपणी सरकारातून चालले आहे हे सर्व खुदावंदास रोषनच आहे. याचा अर्ज काय ल्याहावा ?

सदरहू सात कलमे लिहिली आहेत रवाना छ १९ माहे जमादिलावल तारीख १४ आकटोबर सन १८३२

---

## ४ खाजगीवाले.

### अ.

साहेब मेहेरबान दोस्ता अलीशान हेनरी ब्राणसाहेब बहादूर इस्कोयर एजंट जिल्हा दक्षण. समलहू.

छ अजीसाहेब अनदराव केशव खाजगीवाले सलाम बाजद सलाम अंकी येथील खैरयत तागायत तारीख २१ माहे नवंबर सन १८५१ इसवीपावेतो आपली षादमानी व खुषीची खबर हमेषा कलमी करीत असोन दिल ताजा केला पाहिजे. दरीविला. आसाहेबानीं मेहेरबानी करून पत्र नंबर १०६२ तारीख २६ आगष्ट सन मजकूरचे पाठविलें. त्यांत हशील मजकूर की, आपल्यास मरातब खासगीवाले, हा आहे. हा कधीं कोणत्या सबबेनें कोणाकडून प्राप्त झाला, व एकंदर खानदानीचा व पदवी थोरपणाचा इतिहास दाखल्यानिशीं लिहून यावा व बराबर दाखला असेल तो पाठवावा. ऐकिव मजकूर असेल त्याविषयीं पुरावा मसल्यास तसें साफ लिहून यावें. जुने कागदावरून व माहितगार लोकांकडून जितके प्रयत्न पूर्वक माहिती सांपडेल तितकी सर्व लिहून यावी म्हणोन वगैरे मजकुराचें पत्र कलमीं जालें; त्यास याचा मजकूर असा आहे कीं, आमचे पणजे जिवाजी गणेश हे पेशवे सरकारचे

फारच उपयोगी पडले, व पुणेशहरची वसाहत ही त्यांनींच बहुतकरून केली. त्यावरून पेशवे सरकार यांनीं मेहेरबानी करून आमचे पणजे जिवाजी गणेश यास खाजगीचें काम सांगोन खाजगीवाले हा किताब दिल्हा आणि सरंजामास गांव व कुरणें वगैरे दिल्हीं त्याजवरून तें खाजगीचें काम जिवाजी गणेश यांनीं व त्यांचे चिरंजीव ह्मणजे आमचे आजे अनंदराव जिवाजी यांनीं कांहीं दिवस केलें. ते मृत्यु पावल्यावर आमचे भाऊबंद यांनींही कांहीं दिवस पेशवे सरकारांत खाजगीकडील काम केलें. याबाबद आह्मीं कागदपत्राचा शोध केला. परंतु होळकर सरकारचे वगैरे दंगे फार होऊन गेले यामुळें कागदपत्र अस्ताव्यस्त जाले. या खताबराबर दाखला पाठविण्यास मिळत नाहीं. आमचे किताबाविषयीं व पदवीविशी इतिहासाचा दाखला पेशवेसरकारचे दप्तरीं आहे. तो आणवून मेहेरबानगीनें नजर गुजराईष केला असतां सर्व आसाहेबांचे दिलांत येईल. आमचे खानदानी व अब्रु पाहून कंपनीसरकारचा अंमल जाला. त्यावेळीं कंपनीसरकारांतून आमचे वडील केशवराव अनंत यांस पेनशीन दरसाल रुपये १००० एक हजार करून दिल्हें, तें त्यांचे ताहायातीपावेतों ह्मणजे ते मृत्यू पावले तेपरियंत मिळाले. व खाजगीवाले हा किताब पेशवे अंमलापासून हाल अंमल आजपर्यंत चालत आला आहे. याप्रमाणें इतिहास आहे तो या खतांत लिहून मेहेरबान साहेबांस जाहीर केला आहे. पूर्वी सरंजाम वगैर काय चालत होता, याविशीं जबाब पाठविण्याचा मजकूर खतांत कांहीं लिहिला नाहीं. यास्तव त्याचा मजकूर तपशीलवार लिहिला नाहीं. ज्यादा काय लिहिणें ? प्यार मोहोबत कीजे हे किताबत.

सही. अनउराव केशव खाजगीवाले.

ब.

यादी गोविंदराव निलकंठ खाजगिवाले. सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ मेहेरबान ज्यान वार्डीन साहेब बहादूर डिपूटी एजंट जिल्हा दक्षण यांनीं तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवींचें पत्र आह्मांस पाठविलें. त्यांतील मजकूर हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल च्याहत आहेत कीं, दक्षिणेंतील जाहागीरदार लोक यांची कैफीयत कैशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी ह्मणोन कलमी केलें जातें जे, आपण मेहेरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफीयत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील आपली खानदानची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला ते व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे चालत होता. व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख व आपले जाहागिरीचे वहिवाटीस पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसर-

कारांतून चालत आहे त्यांत कंपेश तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन कलमी केलें. त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो बितपशील:—

१ आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाला ह्मणोन कलमीं केलें याचें उत्तर:—आमचे पणजे शिवराम गणेश व त्यांचे कनिष्ट बंधू जिवाजी गणेश हे इचलकरंजीकर घोरपडे यांजवळ चाकरीस होते. घोरपडे यांस थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांची बहीण अनूबाई दिल्ही. ते समयीं बाजीरावसाहेब पेशवे यांनीं घोरपडे यांजवळ आमचे वडील शिवराम गणेश व जिवजी गणेश हे बहूत शहाणे, मोठे कामाचे, करएक जाणोन मागोन घेऊन त्याजकडे सरकारांतून मामलती प्रथम सांगोन, नंतर पुण्यांतील शनवारचे थोरले सरकारचे वाड्याचें काम सांगोन दरोबस्त दौलतीची खासगी सांगितली पुढें त्यांचे पुत्र गोविंद शिवराम, आमचे आजे, हे सरकारांत मुत्सदेगिरीचा कारभार व खासगीचें काम करूं लागले. तेव्हांपासोन आमची खानदानीची बढती व लौकिक महशूर जाला.

२ फौज व जात सरंजाम आपले वडिलाकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख व आपले जाहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ते व आपल्याकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे ह्मणोन कलमी केलें. याचें उत्तर:—आमचे वडीलाकडे सरंजाम जातीस व फौजेस व तैनात पेशवेसरकारांतून चालत होती.

१८००० जातीस.

१०५६५ सरंजामाचे गांव वगैरे.

६४२५। परगणे भोसे.
पैकीं गांव.
१ मौजें घोटी.
१ मौजें चिंचोली.
१ मौजें तरटगांव.
१ मौजें खेड.
४

४५।।। तालुके विजयदुर्ग.
१ सदाशिवबाग.
१ उन्हाले.
२

| | |
|---|---|
| ६५० | मौजे पोटठाण. |
| २०७८९ | परगणे अहीरवाडी. |
| | १ मौजें पिढ़ूर. |
| | १ मौजें चंद्रहळ. |
| | २ |
| ६०१ | मौजे सेलू. |
| ५४ | हडपसरची जमीन. |
| १०५६५ | |
| ७४३५ | इतलाख ऐवजाची नेमणूक. |
| | २००० परगणे नाशीक. |
| | ३५० परगणे इंदापूर. |
| | २००० परगणे शिन्नर. |
| | १२०० सोलापूर. |
| | १८८५ खाजगीकडोन रुपये. |
| | ७४३५ |
| १८००० | |
| ६००० | स्वाराचे बेगमीस मौजें हिपरगी परगणे जमखिंडी. |
| २४००० | |

किता कलमे.

१ कसबे वाघोली प्रांत वाली वगैरे गांव येथील कुरणे सुमारी ८.

१ जकातीकडील जिन्नस माफीचीं दस्तकें सालाबादी २.

२

येणेंप्रमाणें चालत होतें. त्यास मूळचे सनदेची तारीख लावावी तर कागदपत्र दंग्यामुळें अस्ताव्यस्त याजमुळें लागली नाहीं. सदरहू सरंजाम आमचे तीर्थरूप वारल्यानंतर आमचे नांवें सरकारांतून करार करून देऊन सनदा दिल्ह्या त्याच्या तारखा छ ५ जिलकाद सन आर्बा तीसैनच्या लागल्या आहेत. याजप्रमाणें भोगोटा तीन पुस्त करीत आलों.

अलीकडे श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब यांनीं सरंजामाची जप्ती कुंपणीसरकारचे लढाई-पूर्वी पांच सात वर्षे केली, याजमुळें हल्लीं सरंजाम आह्मांकडे चालत नाहीं. सरंजाम चालत होता ते वेळेस वहिवाट आह्मीच मुखत्यारीनें करीत होतों. पेशवे सरकार दखलगिरी करीत नव्हते. पुढें कुंपणीसरकारचा अंमल जाल्यानंतर मागील आमची खानदानी पाहून, कुंपणी सरकारांतून मेहेरबानगी करून दोन हजार रुपये पेनशन, पैकीं एक हजार आह्मांस व आमचे कनिष्ट बंधू हरी निळकंठ यांस एक हजार, एकूण दोन हजार करून दिल्हें. त्याप्रमाणें व दसऱ्याचा पोषाख एक, सालाबाद पावत आहे.

३ पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणी सरकारांतून चालत आहे. यांत कमपेश तफावत काय आहेत वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन कलमीं केलें, याचें उत्तरः— पेशवे सरकारांतून आमची मातबरी जोंपर्यंत चालत होती याचा मजकूर सदरीं कलमांत लिहिला आहे. अलिकडे कुंपणी सरकारचे मेहेरबानगीनें पेनशन व पोषाख पावत आहे.

येणेंप्रमाणें तीन कलमें लिहिलीं आहेत, यांजवरून मजकूर सरकारचे दिलांत येईल. मिती आषाढ शुद्ध ६ शके १७५५ विजयनाम संवत्सरे.

## ५ खासनिवीस पोतनिवीस.

साहेब मुषफक मेहरबान कर्मफर्माय दोस्तां हेनरी ब्रौणसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलाम हु.

छ अर्जीसाहेब मनोहर भिवराव खासनिवीस व पोतनिवीस सलामबादज सलाम खेरयत अंजाम आंकें येथील खैरसल्ला जाणून आपली शादमानी हमेषा कलमीं करीत असले पाहिजे. दिगर आपणांस खासनिशी व पोतनिसीचा किताब कोणीं दिल्हा, व कोणीं मिळविला त्याविषयींचे दस्त ऐवजानिशीं लिहिण्यांत यावें ह्मणोन आसाहेबाकडोन ता. २६ माहे आगष्ट व ता. ५ माहे दिसंबर सन १८५१ इसवी अशीं दोन थैलीपत्रें आलीं. त्यास आमचे वडील बाजी मुरार हे कैलासवासी शिवाजी महाराज यांजपाशीं मावळे लोकांचे जमावाची सरदारी करून होते. तेथें सेवाचाकरी बहुत केली. त्यांचे पुत्र महादाजी बाजी हे कैलासवासी संभाजीमाहाराज यांजपाशीं, सदरहू जमावाची सरदारी करोन सेवाचाकरी करीत होते. तेव्हां महाराजांनीं पोतनिशीचा दरक करून दिल्हा. महादाजी बाजी यांचे पुत्र यशवंतराव महादेव, हे आमचे पणजे, कैलासवासी शाहू महाराज यांजपाशीं सरदारी व पोतनिशीचें काम करीत असतां, महाराजांनीं दुसरा खासनिसीचा दरक करून दिल्हा. त्याप्रमाणें आमचे आजे विठल यशवंतराव यांनीं वहिवाट केली, व आमचे तीर्थरूप भिवराव विठल, हे कैलासवासी प्रतापसिंह महाराज व कैलासवासी शाहाजी माहाराज, यांजपाशीं चाकरी करून किताबत वागवीत आले. त्याप्रमाणेंच कुंपणी सरकारही मेहरबानी करोन वागवीत

आहेत. दोन्ही किताबांबद्दल दाखला सातारचे महाराजांचे राज्याची कैफीयत पेशजी गौरनर एलफिस्तन साहेब बहादूर यांनीं नेली त्यांत आहे व सातारीयांतही महाराजांचे संस्थानीं कैफीयती बखरींत सदरहू दाखले आहेत. मालूम होय. तारीख २६ माहे दसंबर सन १८५१ इसवी. ज्यादा काय लिहिणें ? प्यार किजे हे किताबत.

सही. मनोहर भिवराव खासनिवीस
व पोतनिवीस दस्तुरखुद्द.

---

### ६ गोखले.

यादी सौभाग्यवती यमुनाबाईसाहेब गोखले, सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ. तारीख ८ सपटंबर सन १८३२ व तारीख १ माहे जून सन १८३३ इसवी, येकूण दोन खतें साहेबीं पाठविलीं. त्यांत हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षणेंतलि जहागिरदार लोक, यांची कैफीयत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी, ह्मणोन कलमी केलें, ऐशास आमचे खानदानीचा मजकूर बितपशीलः—

१ आमचे वडील धोंडो बल्लाळ गोखले जातीनें जुमामर्द, सरकारआज्ञेप्रमाणें चाकरी हरवक्त करीत आले. त्याजवरून सरकारची मर्जी बहुत संतोष होऊन बदामीचे स्वारीस पंधराशें स्वारांचें पथक, सरकारांतून नगारा, निशाण सुद्धां करून दिल्हें. कलम.

१ कुंपणी सरकारचे व सरकारचे शराकतीमुळें कुंपणी सरकारचे कुमकेस परशरामपंतभाऊ पटवर्धन यांस फौज व तोफखाना व किरकोळ सरंजामी पथकेसुद्धां जाण्याविशीं सरकारची आज्ञा जाहली. त्याजबराबर धोंडोपंत दादा यांची नेमणूक जाहली. पुढें धारवाडचे लढाईंत कामकाज फार जाहलें. हा मजकूर सरकारांत जाहिर जाहल्यावर सरकारची मर्जी बहाल होऊन पालखी व पागा, नगारा, निशाण, नौबत सुद्धां देण्याविषयीं परशरामपंतभाऊ यांस, सरकारची आज्ञा होऊन सदरहूप्रमाणें दिल्हें. कलम.

१ श्रीरंगपट्टणास हरीपंत तात्या फडके जरीपटका व हुजुरात सुद्धां सरकार आज्ञेवरून पुण्याहून निघोन पट्टणास कुंपणी सरकारचे कुमकेस गेले. नंतर परशरामपंतभाऊ पटवर्धन यांनी धारवाड सर करून, फौज तोफखानासुद्धां मजल दरमजल निघोन पट्टणास गेले. त्याजबरोबर धोंडोपंत दादा फौजसुद्धां सरकार आज्ञेप्रमाणें होते. पट्टणास जाऊन कामकाज बहुत केलें. पुढें फौजा देशीं येऊं लागल्या, तेव्हां सरकारआज्ञेवरून जाजती खर्चाची नेमणूक करून देऊन हरीपंत तात्यांनीं धोंडोपंत दादा यांस कर्नाटकांत बंदोबस्ताकरितां ठेविलें. त्यांजवर करवीरकर महाराज फौज घेऊन कर्नाटकांत सरकारचीं ठाणीं घालूं लागले. त्यांशीं लढाई करून त्यांचा मोड केला, आणि तोफा व साहेबनौबत व हत्ती पाडाव आणिले. कलम.

१ धोंडजी वाघ, फौज धरून टिपू सुलतान बहादूर यांचा मुलूख कुंपणी सरकारांत घेतला, तेथें जाऊन ठाणीं घालूं लागला. तेव्हां वाघाचे पारिपत्याबद्दल मेहेरबान वसलीसाहेब बहादूर पट्टणाहून पलटणें व तुरुक व तोफखाना घेऊन श्री-तुंगभद्रा उतरून सावनूर प्रांतीं आले, आणि धोंडोपंतदादा यांस हावनूरचे मुक्कामीं फौजसुद्धां येऊन सामील व्हावें ह्मणोन चकती पाठविली. त्याजवरून फौज घेऊन मेहेरबान वसलीसाहेब यांचे भेटीस जातेसमयीं धोंडजी वाघ याचे फौजेचे दरम्यान मुकाबला जाहला. तेव्हां लढाई मातबर जाहली. त्यांत धोंडोपंतदादा व आप्पासाहेब सरकार कामांत हक जाहले. व त्या लढाईत खाशास जखमा लागल्या. तेव्हां जखमा बांधोन पुन्हा फौजेचा जमाव करून मेहेरबान वसलीसाहेब बहादूर यांची भेट सावनूर मुक्कामीं जाऊन घेतली. नंतर धोंडजी वाघ याजवर फौज व पलटणें सुद्धां चालून घेतलें तेव्हां धोंडजी वाघ याची लढाई मातबर जाहली. धोंडजी वाघ यास ठार मारिलें, व फौज लुटून फस्त केली. तेव्हां कामकाज फार जाहलें. त्याजवरून साहेब यांची मर्जी खुशी होऊन नंतर साहेब पलटणें सुद्धां तुंगभद्रा उतरून निघोन गेले. पुढें खासे फौजसुद्धां कर्नाटक प्रांतीं बंदोबस्तास होते.
कलम.

१ पुण्यास यशवंतराव होळकर फौजसुद्धां येऊन लढाई जाहली आणि श्रीमंताची स्वारी वसईस निघोन गेली. नंतर वसलीसाहेब पलटणें व तुरुक, तोफखाना घेऊन कर्नाटकांतून पुण्यास येऊं लागले. त्यांजबराबर फौजसुद्धां निघोन येणें ह्मणोन सरकारचें आज्ञापत्र आलें. त्याजवरून साहेब यांजबरोबर पुण्यास आल्यावर श्रीमंतांच्या भेटी जाहल्या. तेव्हां खर्चाची नेमणूक करून देऊन मेहेरबान वसलीसाहेब बहादूर यांजबराबर होळकरावर मोहीम जाहली. पुढें अलिजाबहादूर व भोंसले यांच्या फौजेशीं गांठ पडोन लढाई मातबर जाहली व गाईलगड मुक्कामीं लढाई जाहली. तेव्हां अलिजाबहादूर व भोंसले यांचा तह होऊन वसलीसाहेब यांजबरोबर पुण्यास येते समयीं, मार्गी मोंगलाई इलाख्यांत बंडवाले यांनीं पुणें वगैरे येथील रसद बंद करून मुलूख लुटीत होते. त्यांचें पारिपत्य करावें ह्मणोन सरकारचें आज्ञापत्र आलें. त्याजवरून बंडवाले यांजबराबर लढाई करून बंडवाले यांचें पारिपत्य केलें. नंतर साहेब पुण्यास येऊन सरकारचा निरोप घेऊन सरंजामसुद्धां श्रीरंगपट्टणास निघोन जातेसमयीं दोस्तीचा फर्माणा सन १८०३ सालीं करून दिल्हा. कलम.

१ पंत प्रतिनिधी यांनीं आपसांत कटकटी करून फौज धरून माहालमुलूख लुटूं लागले. तो बोभाट सरकारांत आलेवरून, त्यांजवर जाऊन बंदोबस्त करावा ह्मणोन सरकारची आज्ञा जाहली. तेव्हां खासा फौज तोफखानासुद्धां जाऊन सन सीत मयातैनांत लढाई करून, प्रतिनिधी यांस पाडाव आणून, महाल किल्लेकोट यांचा सरकार आज्ञेप्रमाणें बंदोबस्त केला. पुढें सन सलास अशर सालीं खाशास जातीस व फौजेचे खर्चाबद्दल सरंजामास महाल

तूर्त तेरा लक्षांचे सरकारांतून लावून दिल्हे. ते लढाईअखेर चालत होते. त्यापैकीं वीस हजारांचें गांव कर्नाटकांत कुंपणीसरकारांतून दिल्हे, ते चालत आहेत. इनामी गांव कर्नाटकांत संस्थानिक यांनीं दोस्तीचे पोटीं साहा दिल्हे, त्यापैकीं तीन गांव चालत आहेत. बाकीचे कुंपणी सरकारांत आहेत.

---

### ७ देवधर (ढमढेरे).

यादी रामचंद्र पांडुरंग देवधर ऊर्फ ढमढेरे. सुरु सन अर्बा सलासिन मयातैन व अलफ. हजरत बंदगानअली रेट हनराबल गौरनर कौंसल चाहात आहेत कीं, जहागीरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी. ह्मणून कलमीं केलें जातें जे, थोडके मजकुरांत कैफियत सरकारांत रवाना करण्याकरितां लिहून पाठविली पाहिजे. त्यांत तपशील आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलाकडे काय चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपलेकडे हल्लीं सरंजाम काय चालत आहे तें, व पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणी सरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे; ह्मणून तारीख ८ सपटंबर सन १८३२ इसवींचें पत्र आलें व हल्लीं येवेशीं तारीख १ जून सन १८३३ इसवींचें दुसरें पत्र आलें. त्यास आमचे आजे कैलासवासी तीर्थस्वरूप रामचंद्रपंत आबा देवधर ऊर्फ ढमढेरे हे कैलासवासी बाबा फडणीस यांजकडे येऊन राहिले. त्यांनीं कैलासवासी श्रीमंत नानासाहेब पेशवे यांचे कारकीर्दींत दप्तरांत असामी करार करून दिल्ही. त्याप्रमाणें पंधरा वर्षे दप्तरांत चाकरी केली. नंतर पुढें कैलासवासी श्रीमंत माधवराव साहेब पेशवे थोरले यांनीं सन सलास सितैनांत पेशवाईची दप्तरदारी सांगितली, तेव्हां पासून दरोबस्त माहाल मुलूख व किल्ले कोट व पागा वगैरे दौलतीचे हिशेब पाहून चौकशी करण्याचें काम त्यांजकडे होतें. ते सन सीत समानीनचे अखेरीस कैलासवासी झाले. नंतर त्याचे वडील चिरंजीव कैलासवासी मोरोपंत तात्या ढमढेरे यांजकडे कैलासवासी श्रीमंत माधवरावसाहेब पेशवे सवाई यांचे कारकीर्दींत नाना फडणीस यांनीं पूर्ववत्प्रमाणें काम सांगितलें. तें सन तिसैनअखेर मृत्यु पावले. नंतर तें काम कैलासवासी तीर्थरूप पांडुरंगपंत अण्णा ढमढेरे यांजकडे पूर्ववत्प्रमाणें सांगितलें. त्या अन्वयें दप्तरदारीचें काम करीत होते. पुढें सन इसन्ने मयातैनांत श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब पेशवे यांनीं विजयदुर्ग येथील आरमाराची तयारी करण्याचें काम सांगितलें; व तालुके विजयदुर्ग व आरमार दोन्ही ठिकाणच्या फडणिशी सांगून, आरमाराचे तयारीस सरकारांतून पैका देऊन विजयदुर्गास जाण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां आमचे धाकटे चुलते तीर्थस्वरूप रा. हरीपंत भाऊ

ढमढेरे, यांस दप्तरदारीचें कामावर ठेवून अण्णासाहेब विजयदुर्गास निघून गेले. नंतर होळकर यांचा दंगा सन सलास मयातैनांत जाहला. तेव्हां श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब वसईस निघून गेले होते, ते पुन्हा पुण्यास सन अर्बा मयातैनांत आल्यावर अण्णासाहेब पुण्यास येऊन आरमारचा हिशेब समजावून दिल्हा. नंतर सन समान मयातैनांत आमची चुलत बहीण श्रीमंतास देऊन लग्नसमारंभ मोठा केला. दप्तरदारीचें काम पूर्ववत्प्रमाणें करीतच होते; व आणखी कर्नाळा व राजमाची व बेलापूर वगैरे मामलती सन तिसा मयातैनांत सांगितल्या. पुढें दप्तरदारीचें उत्पन्न कारखाने वगैरे मोडल्यामुळें कमी येऊं लागलें, सबब आमचे तीर्थरूप कैलासवासी अण्णासाहेब यांचे नांवें लाख रुपयांचा सरंजाम सन इहिदे अशर मयातैनांत दिल्हा. त्यांत जातीस वीस हजार रुपये व फौजेचा व नगारखाना, चौघडा मिळोन ऐंशी हजारांचा व कैलासवासी तीर्थरूप राघोबादादा ढमढेरे यांस जातीस तैनात पंधरा हजार व फौजेचा चाळीस हजार येकूण पंचावन्न हजारांचा दिल्हा. व आह्मांस जातीस पंधरा हजार व फौजेबद्दल चाळीस हजार एकूण पंचावन्न हजार रुपयांचा दिल्हा. त्याची दरोबस्त वहिवाट आमचे आह्मीं मुखत्यारीनें करीत होतों, व सरंजाम दिल्हा ते सालींच पुढें इतलाखी फौजेचे हजरीचें काम कैलासवासी तीर्थरूप राघोबादादाकडे व आह्मांकडे सरकारांतून सांगितलें, तेंही केलें. पुढें सन इसने अशर मयातैनांत कैलासवासी तीर्थरूप अण्णासाहेब यांनी श्रीमहायात्रेस जावयाचा निरोप घेतला. ते काळीं दप्तरदारीचें काम आमचे चुलत बंधु कैलासवासी तीर्थरूप राघोबादादा व आह्मीं मिळोन करीत होतों. अण्णासाहेब काशीस गेले तसमयी मेहेरबान एलफिस्टनसाहेब बहादूर पुणें मुक्कामीं रसिडंटचे कामावर होते. त्यांनीं श्री गयेचे दहा हजार यात्रेचे हशिलाचे माफीविशीं तेथील साहेबांस चकती देऊन पलटणचे लोकांचे पाहेरे दोन व चपराशी दोन असामी हमराहा बरोबर दिल्हे होते. नंतर श्री काशीस गेले व यात्राही बराबर बहुत होती. यांचें संरक्षण व्हावयाकरितां सरंजामी स्वार बराबर होते. त्याखेरीज नवे स्वार व शिबंदी पेंढारी यांचा वगैरे वाटेनें दंगा फार, याजकरितां ठेऊन यात्रेचा बंदोबस्त ठेविला. यात्रा करून पुण्यास सन अर्बा अशर मयातैनांत अवल सालीं आले. यात्रेस खर्च साडेपांच लक्ष रुपये केले. पुण्यास आल्यावर दप्तरदारीचें काम लढाईअखेर करीत होते, व त्रिवर्गाचा सरंजामही लढाईअखेर चालत होता. सन समान अशर मयातैनांत श्रीमंताची व कुंपणी सरकारची लढाई होऊन श्रीमंत पुण्याहून निघोन गेले. ते मुलखांत फिरत असतां, त्यांजबराबर स्वार शिबंदी सुद्धां कैलासवासी तीर्थरूप अण्णासाहेब व आह्मी होतों. खानदेशांत स्वारी गेल्यावर वडिलांची प्रकृत बिघडली, व कुंपणीसरकारचें आश्वासन परत येण्यविशीं अण्णासाहेबास जालें. सबब ते पुण्यास निघोन आले. आह्मी स्वारीबराबर ब्रह्मवर्तास गेलों. अण्णासाहेब पुण्यास आल्यावर मेहेरबान एलफिस्टनसाहेब बहादूर यांनीं सर्व मजकूर समजोन घेऊन सरदार लोकांचा सर्वांचा बंदोबस्त केला. तेव्हां

जातीचा सरंजाम चालत होता त्याप्रमाणें अण्णासाहेबांचा वीस हजार रुपयांचा व आमचा पंधरा हजार रुपयाचा येणेंप्रमाणें दिल्हा. वडीलांचे भेटीस बहुत दिवस जाले ह्मणून त्यांनीं सरकारास अर्ज केला. त्याजवरून साहेबांनीं चकती पाठविली. त्याजवरून आह्मी सन सलासिनांत पुण्यास आलों. अलीकडे अण्णासाहेब निवर्तल्यावर त्यांचे वीस हजार रुपयांचे सरंजामपैकीं दोन हजार पंचवीस रुपयांचा गांव व नक्त दोन हजार मिळोन चार हजार पंचवीस व आमचा पंधरा हजाराचा एकूण एकोणीस हजार पंचवीस रुपयांचा सरंजाम व नक्त नेमणूक मिळोन चालत आहे. मिति जेष्ट वद्य १२ शके १७५५ विजयनाम संवत्सरे.

---

## ८ नागपूरकर पोतनीस.

कैफीयत रामचंद्रपंतापासून अमृतराव विठ्ठल व मल्हारराव यशवंत याजपावेतों.

आज्ञाधारक अमृतराव विठ्ठल व मल्हारराव यशवंत यांची विनंति ऐशीजे:—आम्ही प्राचीनपासून प्रतिपाळ केला. सेनासाहेब सुभे व बंदगानअल्लींचें व इंग्रजीसाहेब कुंपणीचे सरकारचे मदतीकडोन प्रथमतः आमचे आजे रामचंद्र दादो नवकर ( नौकर ) महंमद सरमस्तखान, सरदार बंदगानअल्लीचे अलजपुरीं राहत आहेत. खानमजकुराशीं व रघोजी मोठे यांची दोस्ती, सबब रामचंद्रपंत बुद्धिवान् जाणून वकिलीवर ठेविले असतां, पंत मजकूर खानमजकूरचा सवाल जाबाकरितां राजे रघोजी पंतमजकूरवर बहुत कृपावंत होते. त्या कामांत अलजपुरची सुभेदारी शुज्यायतखानास होती. सुभे मजकुरीं तिमाजीपंत नामें मुत्सद्दी तथील राहणारास बेहुरमत करून त्याचें घर लुटलें व गांवांतून काढून दिले. म्हणून आप्पाजीपंत मुधोजी, राघोजीचे पुत्र, याजपाशी फिर्यादी केली. त्यांनीं मनास आणून ब्राह्मणाची निरापराध अप्रतिष्टा केली. जाणून अलजपुरावर फौज पाठविली. सुभे मजकुरास जवामर्दीचा गुरुर जाणोन थुगांव परगणे हवेली येथं युद्धप्रसंग झाला. सुभ्याचे शीर लढाईमध्यें कापलें जाऊन नवाबत (नवबद) वगैरे आसबाब घेऊन गेले. तीच नवाबत भोंसल्याचे स्वारींत राहत आहे. सारांश, सुभा मृत झाल्यानंतर कोणी सुभेदारीवर व्हावा, परंतु होऊं शकला नाहीं. तेव्हां भोसल्यांनीं शहर लुटण्याकरितां जमीयत पाठविली. सरमस्तखानांनीं शहर लुटलें जातें जाणून, पंतमजकुरास भोसल्यापाशीं पाठवून देऊन मुकरर करून शहर वाचविलें. परंतु भोंसल्याचे चित्तांत शहर लुटून टाकावें असें होतें. तेव्हां पुन्हां एक हिरा नारायण नाईक साहू याचे येथें होता. याजकरितां जमीयत आली. तेव्हां हिऱ्याची किंमत साठ हजार रुपये ठरून पट्टी करून साहू मजकुरास रुपये देऊन हिरा भोंसल्यास दिल्हा. नंतर एक सुजन ब्राह्मण आला. परंतु भोंसल्याची स्वच्छता झाली नाहीं. सबब तिसरे वेळे(स) रघोजींनीं जमीयत घेऊन येऊन, हिरपुर बऱ्हाण्पानीं शहरांत घुसून लुटीस प्रारंभ केला. सवाईखां वगैरे यवनांनीं हुर्मतीकरितां

मुक्कामीं जयास उभे टाकून जहामर्दीनें कांहीं लुटलबाड भोसल्याची करून, हल्ला फिरवला असतां, पुन्हां भोंसल्याची जमीयत सावरून लुटायाचा मनसुभा करून, परंतु तें शहर शाह रहमान याचे करामतीचे भोंसल्याचे जमीयतीस हिरवें निशाण व जमीयत सफीलीवर दिसू लागलें जाणून, काळे साहेब, मुहे साहेब याचे दरगेवर मुक्काम करून जासूद शहरचे बातमीकरितां पाठविले. जासुदांनीं शहरांत रस्ते बेरुस्ते फिरून खबर आणली जे, शहरांत जमीयत नाहीं. हें कृत्य करामत शाह रहमान पिराचे आहे. याजकरितां भोसल्यांनीं याजवर लक्ष न ठेवून बाण वगैरे सरंजाम पोक्त करून हल्ला करावा, तितक्यांत ईश्वरी इच्छेनें पर्जन्य अतिवृष्टी गारांची झाली. यामुळें सकळ फौज विखरली गेली व शिकस्ती झाली. भोंसले पळून नऊ कोसांवर मुक्काम करून, शहर लुटून मवकूफ करून तानजापूर परगणे आकोल हें लुटून मोहार वगैरे ताराज करून नागपुरास गेले. ते वेळेस अलीवरदीखान सुभा बंगाल्याचा याजला सुभेदारी दक्षणेस झाली, यदर्थीं आसफजहा यांनीं आपली तगीरी पाहून सरमस्तखांस सांगितलें की, "तुमचा भोंसल्याचा स्नेह आहे त्याजकडून कृत्य करावें. येविषयीं सरंजाम कांहीं पाहिजे तर मदत करितों. परंतु बंगाल्यावर स्वारी घडावी." तेव्हां खानमजकुरांनीं पंतमजकुरास भोंसल्याकडे पाठवून संदर्भ केला. भोसल्यांनीं उत्तम म्हणून बाण वगैरे घेऊन बंगाल्यावर मोहीम केली. ते वेळेस जगतशेटाची कोठी लुटली गेली. व ज्यालेसर बादर व बालेसर बादर व किल्ले बाराभाटी व कटक बंगाला भोसले यांनीं हातांत आणिले. व तसेच आसफजहा याचे हारकाऱ्यांनीं कडपे करनूल येथें येऊन एके दिवसांत साठ कोस धावनी करून आर्काटचा सुभा चंदासाहेब याजला धरून मामल्याविषयीं लक्षाधिकाशीं आमीत घेऊन चालले. सांप्रत, यांनीं नवबत आणिली ती नवबत सांप्रत भोंसल्याची आहे. नगरखान्यांत बाजती आहे. चंदासाहेब तीन वर्ष नागपुरीं कैद होता. लक्ष्मणराव खंडागळ्या याजला जहागीर करजघाट व सरकार दवनार ज्यागीर होती. तो नायकी करीत होता. सबब ती जहागीर भोंसल्यांनीं घेतली. तितक्यांत आसफजहानीं परलोक साधन केलें. नासरजंग राज्याधिकारी होऊन फुलचरीचे सफरेंत युद्धास कामास येऊन, सिपायत मोहदीनखान आसफजहाचे कन्येचा पुत्र कारभार दौलतीचा वरती साहा महिने करून मृत्य पावला. नंतर सलाबतजंग आसफजहाचे पुत्र मसनदनिसीन झाले. रघोजी मोठे यांनीं चाळिस हजार जमीयेत मुधोर्जीस जानोर्जीस घेऊन विजयदुर्गावर मोहिमेस पाठविलें. सलाबतजंग यांनीं खंडागळे याची जहागीर घेतली, हें मनांत आणून भोंसल्याची जमीयत दूर गेली. समजून नव्वद हजार जमीयतीनें नागपूरप्रांतीं नमूद झाले. रघोजी तेसमयीं शरीरेंकडोन अशक्त होते. मुकाबला करण्यास उभे न ठाकितां देवगडप्रांत सांभाळून नऱ्होजी जाटक याजला जमीयत देऊन पाठविलें. कीं, जगाचे फौजेचे आसपास होऊन लूटपाट करीत जात. हें वर्तमान जानोजीस व मुधोजीस कळल्यावर विजयदुर्गाहून परत केली. तेव्हां सलाबतजंग घाटावरून गेला कीं,

जाचकांनीं आनंद जमीयतीशी गांवचें गांव लुटून प्रळय करून आहे. वरते जानोजी व मुधोजी आले. व पर्जन्य काळ समीप आला. भोंसल्याची जमीयत आपले मुलखांत व आपण त्याचे मुलखांत, तेव्हां या मोहिमीचा परिणाम नीट लागणार नाहीं, कांहीं बहाणा करून परतावें, याजकरितां सरमस्तखानाशीं मसलत केली कीं, भोंसल्याशीं तुमचा स्नेह आहे. कांहीं युक्ति करणें. त्याजवरून खान मजकूर ती भोंसल्याकडून पत्र लिहून पंत मजकुराचे हातीं लिहून एक स्वारास दिलें कीं, तूं लष्करचे बाहेर जाऊन घोडे धाऊन सरमस्तखानाचा डेरा पुसत येवून हें पत्र भोंसल्यानीं पाठविलें आहे, असें बोलणें. त्याजवरून स्वारानीं लष्करचे हरोळीवरून पुसत येऊन खानमजकुरास पत्र आणून दिल्हें. खानमजकुरानें बहुत संतोषांत होऊन सलाबतजंगापाशीं येऊन पत्र गुजरविलें, व याच लक्षाचा पुरजा पेशकशीचा दिल्हा कीं, भोंसल्यांनीं शरणागत होऊन पाठविला आहे. आपण स्वारी परत करणें हें जगमजकुरांनीं पाहून फतीचा नवबतीस हुकूम करून अवरंगाबादेस चल दिल्हा. खानमजकुरांनीं समागमें न जातां रघोजीची भेट घेतली. रघोजी खानमजकुरास बोलले कीं, आमची शिकार कां गमावली? खानमजकुरानीं उत्तर केलें कीं, आह्मी तुमचे मित्र तुमचें कल्याण जाणून पुर्जा दिल्हा व ऐसें केलें. कांहीं तुमचें अकल्याण केलें नाहीं. तेव्हां रघोजी खुष होऊन पांच लक्ष रुपये खानमजकुरास दिल्हे. या प्रकरणांत पंत मजकूर होते. ते वेळेस जें ठरलें तें पंतमजकुरच्या हातांनीं ठरलें. नंतर रघोजी नागपुरास जाऊन मृत झाले.

पुढें जानोजी भोसले अधिकारी झाले. नवाब निमकल्लीखान अलजपुरीं व बऱ्हाणपुरीं सुभेदारी करीत होते. जानोजीनी राघोजी करोडे याजला जमितीनशीं आपले मुलकाचे संरक्षणार्थ वराडांत ठेविलें. व आपण पुण्यास गेले. निजामअल्लीखानानीं बऱ्हाणपुराहून सरंजामजिनशीं बोलावून जमीयत जमा करूं लागले. हें वर्तमान करोड्यानीं ऐकून खान मजकुरास सांगून पाठविलें कीं, तुमचे यजमान जमीयत ठेवून काय कृत्य करितात? दोन प्रहर रात्रीपर्यंत खुलासा कळावा. त्याजवरून खानमजकुरांनीं नवाबास विदित केलें. नवाबानीं उत्तर दिल्हें कीं, आतां रात्र आहे. उदईक खुलासा कळेल. तैसेंच खान मजकुरानीं सांगून पाठविलें याचें कारण जे जिनशी पोंहचतात, करोडे याशीं युद्ध करावें. तो करोडे यांनीं जिनशीवर छापा घालून गरदी केली. निजामअल्लीखानानीं प्रातःकाळीं लढाई करावी. तो जिनशीची ऐकून करोडे याशीं दोस्तीचा सिलसिला नमोद करून अलजपुरीं राहिले. नंतर जानोजीही पुण्याहून आले. मुधोजीशीं अंतःकरण मलीन होतें. निजामअल्लीखानानीं विठ्ठल सुंदर प्रतापवंत व सरमस्तखानाचे मजकूर जानोजीशीं मोकासाचा तह करून घेऊन नंतर सरमस्तखान मृत्य पावले. या प्रकरणांत पंत मजकूर होते. इसमाइलखान पुतणे खानमजकूरचे जाती आले. हैदरजंग मुसाभुसीचा दिवाण यांनीं सलाबतजंग याजला हातीं ठेवून कुलमुख्यारी करूं लागला. सबब निजामअल्लीखान अलजपुराहून अवरंगाबादेस

कूच करून आले. हैदरजंग मुसाभुशीचा दिवाण कारभार करीत होता. त्यास मारून बऱ्हाण-पूरचे रस्त्यानें वासमास येऊन हैदराबादेस पोहोंचवलें. मुसाभुशी अवरंगाबादेहून निघोन फूलच-रीस गेला. सलाबतजंग त्याचे दोस्ती होता. निजामअल्लीखानानीं हातीं घेऊन कारभार दबल-तीचा करूं लागले. मशीरमुलकास अवरंगाबाद व वराडची सुभेदारी देऊन रुकमदवला दिवाण झाले. रावपंतप्रधान यांजला संमतांत घेऊन टिपू हैदरावर जमीयत श्रीरंगपट्टणा-वर पाठविली. मशिरीमुलक यांनीं आपणाकडून राजारामबापू याजला अलजपूरचे कामा-वर पाठविलें. रावमजकूर यांनीं मामलेपर्यंत येऊन जानोजीस मनस्वी अपशब्द बोलूं लागला. हें त्यांनीं ऐकून परास्त करून वराड घेण्यास उद्युक्त जाले. इसमाइलखानाचे बापाशीं दोस्ती होती. तेव्हां खानमजकुरचें कल्याण घडावें यदर्थी रामचंद्रपंतास रुकमत-दवलापाशीं पाठविलें. कीं, सुभ्यानें जेसें केलें तेसें फळ पावलें. अखेर कामाशीं दोस्ती ठेवणें. मंजूर असेल तर इसमाइलखानास सुभेदारी देणें तर इकडील स्वस्थता असे. तेव्हां रुकमत-दवल्यानीं समय पाहून इसमाइलखानास सुभेदारी अलजपूरची दिल्ही, व प्रेमलोभ भोंसल्यांशीं ठेविला. भोंसल्याची व पंतप्रधानाशीं किंचित् विक्षेपता ठेऊन रामचंद्रपंतास जाहिरदारींत-खानमजकुराकडून अंतस्त आपणाकडोन रुकमतदवलापाशीं पाठवून दोस्ती दौवलामज-कुराशीं करून पंतप्रधानास भोंसल्यांनीं शरीक झाले. नंतर जानोजी भोंसल्याचें जाणें पुण्यास झालें. राज्यास सभाजी भोंसल्याचे बंदोबस्त ठेवण्यास कोणीही मनुष्य इदेबरीज पाहिला. उमरावतीचे मुक्कामीं येऊन इसमाइलखानास आमचे आजे रामचंद्रपंत यांस मागून घेऊन दरयाबाई स्त्री व साबाजी भोंसले व रघोजीस हा वेळ करून परगणे अकोट येथें ठेविलें व आज्ञा केली कीं, फौजा हिकडून पत्ता स्वाधीन असावें. मग खानमजकुरासीं मसलत होऊन अलजपूर इसमाइलखानाचे येथें मेजवानीचा नेम जाहला असतां, जानोजीनीं आज्ञा केली, प्रथमत: रामचंद्रपंताचे येथें मेजवानीचा प्रसंग घडावा. त्याजवरून प्रथम पंतमजकु-राचे येथें येऊन भोजनादि करून, जे आज्ञा कृपायुक्त भाषण केलें त्याचा विस्तार लिहिणें. उपरोध दुसरे दिवशीं खानमजकुराचे येथें मेजवानी घेऊन पुण्यास गेले. पंतमकुरांनीं आकोटीं राहून रघोजी आदिकडोन याजला बहुत संतोषांनी ठेवून कृपा साधन केलें. जानोजी भोंसले यांनीं पुण्यांत जाऊन, मसलत करून परतून येतांना वेरूळ टोक्यावर देहविसर्जन केलें. मुधोजी भोंसले रयासतीस अधिकारी झाले. साबाजी भोंसले यांशीं मलिनता न दर्श-नास आलें असतां मुधोजीनें पंतप्रधान व बंदागानअल्लीचे सरकाराशीं ऐक्यता ठेवून राज्यकारभार चालविला. पंतमजकूर उभयतांचे कृपेंत होते. साबाजी याचीं जमीयत अधिक होती. तेव्हां खानमजकुराशीं व जानोजीशीं स्नेह, त्याजवरून मुधोजीचा पुत्र राज्याचा मालक जाणून मुधोजीचे मदतीकरितां पंतमजकुरास बऱ्हाणपुरास पाठवून इब्राहीमखान गार्दी (?) ज्यांनीं नारायणराव यांजला मारलें, त्याजला बोलावून मुधोजीचे मदत केली. खान-मजकूर तो मुधोजीशीं व साबाजीशीं, नागपुराहून पांचगांव सहा कोसांवर आहेत, तेथें लढाई

झाली. इब्राहीमखान गार्दी व पंतमजकुरांनीं जवामर्दी बहुतशी केली. साबाजी मारले गेले. भावजीपंत दिवाण साबाजीचे याजला नाकावर जखम पंतमजकुरांनीं मारली. गोविंदपंत पंतमजकुराचे धाकटे भाऊ युद्धांत होते. मुधोजी पंतमजकुरास दाणा व जवामर्दी जाणून बहुत कृपा करीत होते. गोविंदपंतास गायेरगडची मुख्त्यारी दिल्ही. व पंतमजकुरास कुल रयातींत ठेविले. कितीका दिवसानंतर मुधोजी व इसमाइलखान मृत्यूस पावले. रघोजी भोंसले त्याचे पुत्र अधिकारी झाले. पुण्याकडील राजकारण नमूद झालें. चिमणाबापू ज्याहील जाणून सलाबतखानास अलजपुराहून बोलावून पंतमजकुरास घेऊन दवलतीचें संरक्षणार्थ ठेविलें व आपण पुण्यास गेले. एके दिवशीं भवानी काळो व चिमणा बापूशीं कांहीं एक बोलतां जीत झाली. तेव्हां पंतमजकुरांनीं चातुर्य गोष्टीकडोन उभयतांचें मनोधर्म रक्षून खुष केलें. ते दिवसापासून चिमणाजी बापू, पंतमजकुरावर कृपा करूं लागले. रघोजी भोंसले पुण्यास जाऊन नानाफडणविसाचा करार मदार करून घेतला कीं, पासष्ट लक्ष रुपयांचा मुलूख बंदगानअलीपासून घेऊन गंगथडीस इलाखा जाहला असावा. ऐसें ठरावून गोविंद भगवंत न गोविंद कृष्ण यांजला वकिलीस बंदगानअलीकडे पाठविलें व आपण नागपुरीं आले व रामचंद्रपंतास आपणाकडून वकिलीस हैदराबादीं पाठविले. याचे आंदेश मशीरमुलकानीं मीर अलमास कळला. त्यास पाठवून टिपूची मोहीम नमुद केली. सबब मशीरमुलकानीं जवाब दिल्हा कीं, मोहीम झालीयावरी तुमचें काम करूं. यदर्थी हरीपंत फडके पानगलास गेले व बळवंतराव, भवानी काळोचे पुत्र भोंसल्याकडोन मोहिमेस आले. लाट कार्नवालीस साहेब या मोहिमेस आंग्रेज होते. मशीरमुलकानीं व गोविंद कृष्णानीं सल्ला प्रसंगाकरितां, पंतमजकुरास लाट मजकुरापाशीं पाठवीत होते. लाटसाहेबही पंतमजकुरास दाणा जाणून कृपा करीत होते. ते दिवसापासून सरकार कुंपणींत पत्राआदिकांचा सिलसिला व वकिलीचा शिरस्ता सरकार कुंपणीचा जारी जाहला. व पंतमजकुरास जवाहीर व खीलत लाटसाहेबांनीं दिल्हें. टिपूची मोहीम झाल्यावर बंदगानअलीस राज्यसंबंधीं इच्छा जाहली. सबब भोंसल्यांचे व पेशव्यांचे सवाल जबाब तसेच राहिले. गोविंद भगवंत पुण्यास गेले व रामचंद्रपंतही नागपुरास जाण्यास सिद्ध जाहले. मशीरमुलक यांनीं पंतमजकुराचे दाणाहीची अधिकोत्तरता जाणून एका शाळेंत विद्याभ्यास केला. याची पासदारी दाखवून माधवराव रामचंद्र यांजला पांचशें स्वार मुसारहमुचे लईनपैकीं पांचशे लोक यांची सरदारी दिल्ही. गोविंद भगवंत यांनीं पुण्यास जाऊन वर्तमान विदित केलें. त्याजवरून पेशव्यांची जमीयत निघाली. भोंसले त्यांचे अंकित, तेव्हां त्याचेही जमीयत राहणें पडली. सारांश खरडें येथें युद्धप्रसंग निजामअलीखानासीं जाहला. मशीरमुलक पुण्यास जाऊन तहनामा करून दिल्हा. शामराव कनिष्ठ पुत्र पंतमजकुराचे तेथें होते. पंतमजकुराची लायकी पाहून नाना फडणविसांनीं कसबें सोनपेठ जागीर नेमली. नंतर सवाईमाधवरावानीं देह विसर्जन केलें. नाना फडणीस महाडास गेले. बापू तात्या व परशरामभाऊ कारभारांत शिरले. मशीर-

मुलूक पुण्यांत होता. गोविंद भगवंत व रामचंद्रपंत यांजला ऐक्यांत घेऊन नानांचें आगमन पुण्यांत करविलें. रघोजी भोंसलेही पुण्यांत पंताचे लिहिण्याप्रमाणें आले. त्रिवर्ग मिळोन मसलत ठरवून नाना फडणविसांनी मुलूख वांटून दिल्हा. गढेमंडल भोंसल्यास साडेतीस लक्षांचा मुलूख चौथाई खड्यांचे समयीं मोंगलाईंतून प्रथमतः बंदगानअल्लीस, शिंद्यास नगर वगैरे दहा लक्षांचा मुलूख देऊन, मजकुरास रवाना केलें. मुलूख मजकुरांनीं रामचंद्रपंताचे बुद्धीवर बहुत खुष होऊन जागीर देणेंचा निश्चय केला. पंतमजकुराचे वडीलपुत्र माधवराव प्रसंगीं होते. त्यांचें नांवें चवसष्टी हजारांची जहागीर पळसखेड व शिराळ वगैरेची सनद करून घेतली. रघोजीनीं केशवराव रामचद्रपंताचे दुसरे पुत्र यास हैदराबादेस वकिलीवर ठेविलें. रावमजकूर प्रथम अल्लीबहादूर यांशीं भोसल्याकडून वकिलीस कारण जे शिंद्याचें जमीयत हिंदुस्थानांतून भोसल्याचे मुलखांतून न यावें येतनमतें होतें. सांप्रत या कामीं मुक्रर होऊन मुलूख मजकूरचे समागमें शहरास गेले. नाना फडणिसांनीं सोनपेट राजेंद्र याजला दिल्हेमुळें परगणे जळगांव

१ हिंगण दरोबस्त        १ मुडगांवनिम्में
१ कसबे सोनालटखी        सरदेशमुखी.

एकूण साडेसाताचे जहागीर पंतमजकुरास करून देऊन रवाना नागपुरीं केलें. मशीर मुलूकही हैदराबादेस गेले. बंदगानअल्लीची भेट घेऊन बंदगानअल्लीचा परवाना रघोजीस पाठविले कीं, रामचंद्रपंतास पाठविणें. मसलती गोष्टी किती सांगणें आहे. त्याजवरून पंतमजकूर हैदराबादीं येऊन एक वर्ष होते. हें वर्तमान नानांनीं ऐकून शेषाद्री सिंहराज यांज हातीं बंदगानअल्लीचे समक्ष पंतास निरोप पाठविला. पंतांनीं उभयतांचे निरोप बंदगानअल्लीस श्रुत केलें व नवाद घेऊन केशवराव याजला वकिलीवर नेमस्त करून माधवराव वडील पुत्र याजला समागमें घेऊन अलजपुरीं येऊन देह ठेविला. सबब नाना फडणीस व रघोजींनीं बंदगानअल्लीस लिहिलें कीं, आमची खातरजमा पंतापासून होती. तसेच त्यांचे पुत्रापासून आहे. वडील पुत्र माधवराव बंदगानअल्लीचे चाकर व केशवराव भोंसल्याकडोन वकिलीवर. यावरते दोघे पुत्र आहेत. त्यांजपैकीं जो कोणी त्या प्रकरणाचे योग्य असल्यास नेमस्त करावें. त्याजपैकीं यशवंतराव वडील होते. माधवरावजी आपले समागमें घेऊन येऊन नागपुरीं पंताचे कामीं ठेविले, व एक वर्ष आपण जातीनें राहून रघोजीची मर्जी संपादन करून शहरास येऊन, मशीरमुलकास वर्तमान श्रुत केलें. मशीरमुलक हें वर्तमान ऐकून, बहुत खुष होऊन यशवंतरावजीस रघोजीपासून बोलावून मसलतीचा तह ठरावून नागपुरास रवाना केलें. नंतर रघोजी भोंसले यांजला राज्यसंबंधीं इच्छा होऊन श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव चिटणीस व यशवंतरावजीस पुण्यास पाठविलें कीं, दोस्तीची दृढता असावी. पेशवे बहादूर ह्यांसीं व यशवंतराव होळकर ह्यांचा किसा नमुद होता. श्रीधर लक्ष्मण याहीकडून यांचे सल्लेनें फैसला होऊन खंडोजी, मल्हारजी होळकराचे पुत्र

दवलतराव शिंदे यांजपाशीं अटकेंत होते (?) त्यांजला यशवंतरावजींनीं फत्तेपूरचे मुक्कामीं होळकराचे स्वाधीन करून किसा तोडला. नंतर सरकार कुंपणीशीं व भोंसल्याशीं जाईते फाकी येऊन आजंठ्याचे घाटावर लढाई झाली. सरकार कुंपणींत सवाल जवाब करण्याचा सांप्रदाय आमचे येथील, सबब यशवंतरावजीस रघोजी भोंसल्यांनीं जनरल वसली सोहबापांशीं पाठवून दिल्हें आणि तहनामा करून दिल्हा. ते वेळेस भोंसले यांनीं व पेशवे बहादूर यांनीं ज्यास ज्यागीरा वगैरे करून दिल्हे तें बहाल असावें, असें ठरलें आहे. आज्ञाधारकाचे तीर्थरूप विठ्ठलराव प्राचीन सिलसिल्यानीं सलाबतखान इसमाईलखान यांचे नौकर होते. फत्तेजंगखान यांनीं कारभारांत शिरून स्पर्धा करूं लागला ह्मणून जनरलसाहेब हातें नौकरी सोडली. जनरल-साहेबानीं बहुत पासदारी करून राज्य महिपतराम बंदगानअल्लीचेकडून सरकारमदतीवर होता त्याजला सांगितलें कीं, विठ्ठलरावजीस जिल्हेदारी द्यावी; अथवा तालुके भोंसल्याकडून जें आलें, त्याचें काम द्यावें. अथवा कामावर ठेवावें. इजाफा जागीर माधवरावास व्हाव्या, व सरदेशमुखीवर राय केशवरावचा सालिना आहे, तो चालवावा. मोकासे वगैरे भोंसल्याकडील जेसें आहे तसें आह्मांकडून इलाख्याचें चालवें. यदर्थी हशमजंग किरक्यातरी(?) रजीदंट हैद-बादेचे होते, त्यांजला लिहिलें आहे. नंतर जनरलसाहेब विलायतीस चालले. यशवंतराव नगरपर्यंत समागमें होते. तेथं यशवंतरावजीस पंचवीस हजारांची ज्यागीर कारल वगैरे देहत महिपतरामापासून देऊन नागपुरास रवाना केलें. जयकृष्ण सिताराम चुलतचुलता, बंधु यशवंतराव, जनरल साहेब गेले ते वेळेस एल्फिस्टनसाहेबापाशीं सवालजवाबाकरितां ठेविले होते. राव जे वेळें नागपुरीं आले, तेव्हां रावमजकूर सवालजवाब करूं लागले पंतमजकूर पुण्यांतच होता. हाताखालीं राहिला. एल्फिस्टनसाहेब विलायतीकडेस गेले. जिनमीलसाहेब(?) त्या कामीं मुकरर झाले. रावमजकुरासीं बहुत रीतीनें सलोखा करून होते, हें सर्वत्रांस प्रगट आहे. जयकृष्णपंत यांचा सिलसिला जे दिवशीं रामचंद्रपंत बंदगानअल्लीचे येथें आले, ते वेळेस रघोजीपाशीं गुलाबसिंगाचें कंपूचे दिवाणींत ठेविले. जे वेळेस सरकार कुंपणीशीं व भोंसल्याशीं वैपरीत्य आलें, तें वेळेस शिंद्याचे सवालजवाबांत होते. तेथून आल्यावर रावमजकुराचे हातांखालीं राहिले. भोंसले यांचे सरकारांतून अडीच हजारांची जागीर जयकृष्णपंतास होती. जे वेळेस मिरखानांनीं जमीयेत नर्मदातीर आणली, ते वेळेस करनेल कुलसही हुसंगाबादेस होते. यशवंतरावजीकडून साहेब करनेलमजकुरापाशीं होते. ऐसीयात लिहिलेपर्यंत जयराय माधवराव व केशवराव व विठ्ठलराव यांजविषयीं महिपतराम व हासमतजंग याजला जनरल वसलीसाहेबानें लिहिलें होतें. महिपतरामाचे जाणें शिरापुराकडे जाहलें, व हासमतजंग विलायतेस गेला. व मशीरमुलकही मृत झाला. मीरअलम दिवाण जाहले. व सिधनमसाहेब रजीदंटीवर कायम झाले. नावाकिफीमुळें इजाफा वगैरे राहून गेले. विठ्ठल-राव हैदराबादेस येऊन सिधनमसाहेब मजकुरीं मीरअलमबहादूरास भेटून हुजूरची मुलाखत घडून तिनशें रुपये दरमाहा मनसबदारींत नेम झाला. विठ्ठलरावजी या दरमाहावर

राजी नवते. तेव्हां मीरअलमांनीं सिधनमसाहेबास फर्माविलें कीं, पुढें बंदोबस्त नीट करून घेण्यांत येईल. तितक्यांत कांहीं दिवसांनीं मीरअलमाचा काळ झाला. मुजीरलमुलक दिवाण झाले. कारभार रयासतीचा नवीन प्रकारें वर्तू लागला. माधवरावजी मृत्यास पावला. रघुपतराव विठ्ठलरावजीचे धाकटे पुत्र त्याचे वोसंगीं झाले. लाटसाहेब येविषयीं पत्र रसिदंटास लिहिलें. जहागिरी साठहजारांची रहीत होऊन ज्यांत जहागीर रघुपतरावचे नांवें कसबें शिराळ जाहलें, त्याप्रमाणें सरदेशमुखी कारल वगैरे तहनाम्याची जहागीर व मोकासे वगैरे चालत होते. सन १२२८ फसलींत केशवराव कन्येचे लग्नाकारितां नागपुरीं गेले. तेथें चार वर्षे राहून भोंसल्याकडून कलकत्याचे वकेलीवर जाऊन तेथेंच देह ठेविला. अमृतराव विठलरावजीचे वडील पुत्र आहे. हैदराबादेस यशवंतराव याजला पुत्रसंतान नाहीं. म्हणून त्यांनीं केशवरावजीस लिहून बोलाविलें. तेव्हां केशवरावजींनीं शिकंदरज्याहापासून रुकसती घेतली. शिकंदरज्याहानी पुसलें कीं, कां पाठवितां ? येथें यासी परवशी होईल. तेव्हां केशवराव यांनीं उत्तर केलें कीं, सहा बधुंत दोंघे पुत्र आहेत. धाकटा येथील संस्थानांत विठलराव राहील. वडीलास नागपुरीं ठेवण्याचा मानस, यदर्थीं मजला नागपुरीं पाठविलें कीं, नागपुरीं जाऊन यशवंतरावजीपाशीं होतो. रघोजी भोंसले यांनीं लाटसाहेब पत्र आह्मांकडून पाठविलें. लिहिणें व इंग्रजी जवाबास सवालांत यशवंतरावजीचेकडून जिनकीन साहेबापाशीं आमदरफत ठेवीत होता. रघोजी भोंसले आह्मांकडून कृपा करीत होते. विठलरावजी व श्रीधर लक्ष्मण मुनसी रघोजीचे काशीस निमित्य करून गेले. त्या समागमें होते. लाट मयेरा साहेबानें यांची मोहीम करून काशीस आले. त्यांनीं विठलरावजीस निम अस्तनी पोषाख वगैरे दिल्हे होते. रघोजी यांचा काळ झाल्यावर येथें काशींत काशीवास करावें जाणून नागपुरीं येऊन हैदराबादेस यावें, विवंचनेंत होते. तितक्यांत सन १२२७ फसलींत आपासाहेब व इंग्रजासी युद्ध झालें, यावर तेथून निघून हैदराबादेस रवाना झाले. मीही विठलरावजीबराबर हैदराबादीस आलों. ते वेळेस जिनकनसाहेबांनी रसुलसाहेब साबीदजंग बहादूर यांजला लिहिलें. केशवराव यांसी वकीलात व सरदेशमुखीचा सालीना व कामांत जागिरींत वगैरे कुळ आमचे इलाख्यांतील चालल्यांत हरकत न यावी. तदनुसार केलें तें होतें. सन १२४२ फसलींत विठलरावजी मृत झाले. त्याचा दरमहा तीनशें रुपये यांत बोलखेड निमें जहागिर होती, ती माझे नांवें करून दिल्ही. सन १२४४ फसलींत केशवराव कलकत्यांत व यशवंतराव एक महिन्याचे अंतरानीं मृत्य जाहले. रघुपतराव आधींच मृत जाहला होता. त्याचे पुत्राचे नांवें शिराळ जहागीर निमें होती, ती सुद्धां मोकासे भोंसले याचे दिल्हे, व जहागीर मौजें कोकरड व पंतप्रधानचे सरकारचे जहागीर व सरदेशमुखीवरील सालीयाना आह्मांकडून राज्य चंदूलाल यांनीं जप्त ठेविलें. याजविषयीं सनदपत्र दाखल सरकार बंदगानअलीचें दप्तरीं हैदराबादेचे रसिदंटाचें येथें दाखले दुखले आहेत. सरकार सेनासाहेब व सरकार पंतप्रधान यांचे मालिक इंग्रज बहादूर मुखत्यार तहनामें याजविषयीं

कीं उभे सरकारचें देण्यास जाहले. ते आचंद्रार्क बंदगानअल्लीकडून निभावणीनें घडतां सांप्रत चंदुलाल यांनीं जप्त ठेविलें. याजमुळें करजदारी महालास बहुत जाली. जहागिरींत उभे सरकारची रामचंद्रपंत याचे आजे यांनीं संपादन केली. याचे लेक आह्मी असून कर्जदारींत आह्मी निमग्न, यदर्थीं विनंती जे जहागीरा वगैरे यासी व गुदास्त होऊन महालास प्राप्त व्हावी.

---

## ९ पटवर्धन.

मूळ पुरुष हरभटजी पटवर्धन पेशजीं कोकणांत आपले वतनाचें गांवावर मौजें कोतवडें तर्फ रत्नागिरी येथें असतां, कांहीं दंग्यामुळें आपला गांव सोडून मौजें माहदण तर्फ सांवताची वाडी येथें कुटुंबासुद्धां राहिले होते. पुढें त्यांचे पुत्र पराक्रमी निघोन दौलत मिळविली. बिपतशील.

१ वडील पुत्र कृष्णंभट वास्तव्य मंगळवेढें. यांस पुत्रः—

१ पुरुषोत्तमराव. यांस सरकारांतून तैनात व इनामगांव मौजें आंबे निमेगांव. मशारनिल्हेस पुत्र चौघे, पैकीं दोन पुत्र नारायणराव यांस दत्त दिल्हे. याचा तपशील नारायणराव यांचें नांवाखालीं लिहिला असे. बाकी पुत्र २.

१ हरीहरराव.

१ विठलराव निवर्तले, त्यांचे पुत्र पुरुषोत्तमराव.

२

१ मेघःशामराव यास सरकारांतून तैनांत मशारनिल्हेचे पुत्रः—

० कोंडोपंत निवर्तले.

० जनार्दनराव धारवाडचे स्वारीस सरकारकामावर आले.

१ कृष्णराव निवर्तले, यांचे पुत्र नारायणराव.

१ माधवराव यांस सरकारांतून तैनात व इनामगांव मौजें नादर. मशारनिल्हे सरकार कामावर आले. सबब इनाम.

० अवरस दामोधर निवर्तले.

१ दत्तक गोपाळराव, बळवंतराव यांचा पुत्र.

१ नारायणराव यांस सरकारांतून तैनात व मौजें आंबे निमें इनाम गांव व जमीन.

० अवरस.

१ दत्तक पुरुषोत्तमराव यांचे पुत्रः—

० प्रथम दिल्हे ते निवर्तले.

१ दुसरे सदाशिवराव दिल्हे ते.

१ बळवंतराव यांस पुत्र तीन; पैकीं माधवराव यांस दत्त दिल्हा. बाकी दोन पुत्रः—

१ आपाराव निवर्तले. यांचे पुत्र लक्ष्मणराव.

१ गणपतराव.

२

१ दुसरे पुत्र बाळंभट यांचे पुत्र मोरोबा आबा हेही कर्ते, सबब त्यांसही सरकारची तैनात जाली. त्यांचे पुत्र श्रीपतराव. त्यांचे पुत्र मोरोपंत, त्यांचे पुत्र बळवंतराव हल्लीं आहेत.

१ तिसरे पुत्र त्रिंबकपंतआपा कुरुंदवाडकर. नारायणराव जोशी इचलकरंजीकर, हल्लीं नारायणराव आहेत, त्यांचा मूळपुरुष, हे उमेदवारीनें थोरले संताजी घोरपडे सेनापती करवीरकर महाराजांकडील यांजकडे चाकरीस राहून, शिपायगिरीचे इराद्याचें कामकाज करून सेनापती यांचे पुत्रवत् वागत होते. नंतर सेनापती यांनीं त्यांचे निखालसतेचे वागण्यावरून, एका ताटांत जेवावयास ही सिद्ध झाल्यावरून, पुत्राबरोबर वांटणी दौलतीची दिल्ही. त्यास जोशी, हरभटजीस वडील असें मानीत होते. याजकरितां त्रिंबक हरी, नारायणराव यांजकडे जाऊन, चाकरीस राहून, लढाईत वगैरे कामकाज करून वाढले. घरचे पागेची दोनशें घोड जालीं. खर्चाची पुरवणी या चाकरीवर न होई, सबब हिंदुस्थानांत रोजगारास जात असतां, नानासाहेब पेशवे यांस विदित जाल्यावरून, मर्द माणूस सरकारचाकरीचे उपयोगी जाणोन, सरकारांतून पंधरा स्वारांचा सरंजाम देऊन ठेवून घेतले. त्यांचे पुत्रः—

१ निळकंठराव कर्नाटकचे स्वारींस नवाब हैदरखान याचे लढाईत सरकारकामावर आले. यांचे पुत्रः—

१ रघुनाथराव यांचे पुत्र त्रिंबकराव, त्यांचे केशवराव बाबा. हल्लीं आहेत.

१ शिवराव निवर्तले त्यांचे पुत्रः—१ प्रथमसंबंधी कृष्णराव. २ द्वितीय संबंधी १ निळकंठराव.

१ कोन्हेरराव निवर्तले. यांनींही सरकार चाकरी बहुत केली. शिपाई होते. यांचे पुत्र गणपतराव आहेत.

१ चौथे पुत्र गोविंदपंत नाना चाकरीचे उमेदवारीनें पुण्यास थोरले बाजीराव साहेब पेशवे यांजकडे जाऊन राहिले. त्यांस हे शाहाणे लिहिणार जाणोन, परगणे सुपें येथील मामलत सांगून इंद्रोजी कदम सरकार पागे होते, त्यांचे पागेची दिंवाणगिरीही सांगितली. पुढें इंद्रोजी कदम निवर्तले, तेव्हां गोविंदपंत मर्दुमीस चांगले व सरकार कामकाजाचे उपयोगी, तीच पागा यांचे नांवें करून दिल्ही, व पुढें कांहीं दिवसीं चार हजार फौजेचा सरंजाम नानासाहेब पेशवे यांनीं दिल्हा. यांचे पुत्रः—

० वडील पुत्र गोपाळराव यांनीं, नानासाहेब त्यांचे पुत्र माधवराव साहेब पेशवे

यांचे कारकिर्दीस बहुत बहुत एक निष्ठपणें सरकार चाकरी जुमामर्दीनें करून सरकारांतून बहुमान दिल्हे. ते गेले. यांचे पोटीं पुत्र नाहीं.

० दुसरे पुत्र वामनराव बाबा हेही कांहीं दिवस सरकारचाकरी करून निवर्तले.

१ तिसरे पुत्र पांडुरंगराव तात्या, सरकार आज्ञेप्रमाणें नवाब हैदरखान यांजवर मोहिमेस गेले असतां, लढाईंत पाडाव होऊन पट्टणास नेले. तेथें त्यांचा काळ जाहला. त्यांचे पुत्रः—

० प्रथम हरीहरराव यांचें नांवें सरदारीचीं वस्त्रें जाहलीं होतीं, तेही निवर्तले.

१ दुसरे चिंतामणराव आप्पा.

० तिसरे विठलराव बापु निवर्तले.

१ चौथे गंगाधरराव बाळासाहेब यांस पुत्रः—

० प्रथम केशवराव वडील

१ दुसरे नारायणराव यांस पुत्रः—

१ गणपतरावतात्या

१ ————————

१ तिसरे माधवराव बाबा

१ चौथे गोविंदराव नाना निवर्तले. यांचे पुत्रः—

१ वामनराव

१ कृष्णराव

० गंगाधरराव, गणपत परशराम तासगांवकर यांस दत्त दिल्हे ते.

१ पांचवे गोपाळराव द्वितीय संबंधी.

———

चिंतामणराव आप्पा यांचें व गंगाधरराव बाळासाहेब यांचें वैमनस्य येऊन विभक्त जाहले. त्यांत मिरजेस बाळासाहेब यांनीं राहावें, सांगलीस चिंतामणराव आप्पा यांनीं राहावें, असें सरंजामाची वांटणी होऊन ठरलें; त्याप्रमाणें आहेत. पुढें बाळासाहेब निवर्तले. त्यांचे चिरंजीवाची वांटणीची व्यवस्था अलीकडे सरकार कुंपणीचे अमलांत जाहली आहे.

१ पांचवे पुत्र रामचंद्रपंत आप्पा हे उमेदवारीनें पेशवे सरकारांत जाऊन चाकरीस राहून मर्दुमीनें सरकारचाकरीस वसईचा किल्ला घेतला. ते समयीं वगैरे लढाईंत भिडाईत बहुत कामकाज केलें, त्याजवरून सरकारांतून पागा देऊन पंचवीसशें स्वारांचा सरंजाम दिल्हा. त्यांचे पुत्र परशरामपंत भाऊसाहेब यांचा लौकिक मर्दुमीचा व एकनिष्ठेनें सरकार-चाकरी करण्याचा, हें जगजाहिर आहे. खर्ड्याचे स्वारीस आघाडी चाकरी सरकार आज्ञे-

प्रमाणें पतकरून शिपाईगिरीची शर्थ केली. त्याजवरून स्वारी पुण्यास आल्यावर सरकारांतून बहुमान जवाहीर व वस्त्रें व चौघडा साहेबनोबतसुद्धां दिल्हा. यांचे पुत्रः—

१ वडील पुत्र रामचंद्रपंत आप्पासाहेब. यांचा धारवाड व खर्डे व कर्नाटक वगैरे स्वाऱ्यांत शिपाईगिरी केल्याचा लौकिक जगजाहीर आहेच. यांचे पुत्र गोपाळरावसाहेब.

० दुसरे पुत्र हरीपंत बाबासाहेब. हेही शिपाई मर्दुमीस खंबीर होते. खर्ड्याचे स्वारींत शिपाईगिरीची शर्थ केली. जखमाही लागल्या होत्या. ते निवर्तले.

१ तिसरे पुत्र माधवराव दाजीसाहेब. हेही शिपाईगिरीस सदरहूप्रमाणेंच होते. यांचे पुत्र गोविंदराव नानासाहेब.

१ चौथे गणपतराव बापुसाहेब. पुत्र संतान नव्हतें याकरितां अंतकाळसमयीं गोविंदराव नाना मिरजकर यांचे धाकटे चिरंजीव दत्तक घेऊन नांव परशरामपंतभाऊ ठेविलें.

चौघे बंधु एकत्र असतां पुढें हरीपंतबाबा यांचा काळ जाहल्यावर गणपतराव बापु विभक्त होऊन सरकारांतून सरंजामपैकीं तिसरे हिश्याची वांटणी घेतली. पुढें रामचंद्रपंत आप्पासाहेब व माधवराव दाजीसाहेब एकत्र असतां, त्यां उभयतांचाही काळ जाहल्यावर आप्पासाहेब यांचे पुत्र रावसाहेबांचे व दाजीसाहेबांचे पुत्र नानासाहेब विभक्त होऊन सरंजामाची वांटणी जाहली आहे.

१ सहावे पुत्र भास्करपंत आप्पा. यांनींही शिपाईगिरीचे इराद्यानें सरकारचाकरी केली. सरकारांतून तैनातही त्यांस आहे. यांचे पुत्रः—

१ वडील पुत्र धोंडोपंत दादा. यांचे पुत्रः—

० विठ्ठलराव बाबा खर्ड्याचे स्वारीस सरकार कामास आले.

१ दुसरे पुत्र यशवंतराव. यांचे पुत्रः—

१ ________

१ ________

१

१ दुसरे पुत्र विनोबा आबा यांनींही सरकारचाकरी मर्दुमीनें केली आहे.

१ तिसरे पुत्र हरबा आण्णा यांनींही सरकारचाकरी बहुत केली आहे. यांचे पुत्रः—

० वडील पुत्राचा काळ झाला.

१ ________

१

१ चौथे पुत्र सदाशिवपंत भाऊ.

० प्रथम खंडेराव

० माधवराव यास वासुदेवपंत दाजीस दत्तक दिल्हा.

१ तिसरे पुत्र चिंतामणराव

१

१ पांचवे रामचंद्रपंत निवर्तले.

१ सहावे वासुदेवपंत दाजी

० अवरस

१ सदाशिवपंत भाऊ यांचे पुत्र माधवराव घेतले ते दत्तक.

१

येणेंप्रमाणें हरभटजींचा वंश. यांत सरकारांतून त्रिंबक हरी यांस पंधराशें स्वारांची व गोविंद हरी यांस चार हजार स्वारांची व रामचंद्र हरी यांस पंचवीसशें स्वारांची, येणेंप्रमाणें नेमणूक करून दिल्ही. त्यांचा रोजमुरा सरकार पेट्याकडून पोंहचत होता. पुढें हिंदुस्थान व कर्नाटकचे वगैरे लांबचे स्वारींत छावणीमुळें मोठ्या मोठ्या पथकास सरकारांतून स्वारींत ऐवज पोंहचवून रोजमुरा पोंहचण्यास अडचण पडूं लागली. सबब सरकारांतून पथक यास सरंजाम नेमून दिल्हा; त्याबरोबर यांसही मिरज प्रांत वगैरे महाल नेमून देऊन यांस कुटुंब ठेवण्याकरितां मिरजेचा किल्ला दिल्हा आहे.

## १० पानसे.

कैफियत राजश्री दामोदरराव गणेश पानशी सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. आमचे पणजे तीर्थरूप कैलासवासी यशवंतराव लक्ष्मण पानसी श्रीराजा शाहू छत्रपती यांचे हुजुरातींत तीनशें स्वारानिशीं सरदारी करून होते. नंतर छत्रपती यांनीं श्रीमंत बाजीराव बल्लाळ प्रधान यांस राज्याचे बंदोबस्ताविषयीं आज्ञा केली. ते समयीं आमचे पणजे फौजसुद्धां पेशवेबहादूर यांचे तैनातीस छत्रपती यांनीं नेमणूक करून दिल्ही. तेव्हांपासून तारीख १४ माहे मे सन १८१८ इसवीपावेतों पेशवेसरकारचे आज्ञेनें वडिलांनीं पुस्त दरपुस्त कामेंकाजें करून लौकिक महशूर केला. त्याचा तपशीलः— कलमें.

१ तीर्थरूप कैलासवासी यशवंतराव पानशी श्रीमंत बाजीरावसाहेब यांजसमागमें स्वारानिशीं हरवख्त सरकारचाकरी बहुत मर्दुमीनें केली; म्हणोन श्रीमंतांनीं तोफखान्याचे सरदारीचीं वस्त्रें दिल्हीं. तीं यशवंतराव यांनीं आपले वडील बंधू माधवराव यांचे नांवें घेऊन फौज व तोफखाना दोन्ही सरदारीचीं कामें आपणच करीत होते. त्या कारकीर्दींत बाजीरावसाहेब व आप्पासाहेब यांजसमागमें वसई वगैरे स्वाऱ्यांत कामेंकाजें बहुत केलीं. नंतर श्रीमंत नानासाहेब पेशवे यांची स्वारी नवाब सावनूरकर यांजवर जाहली. त्या लढाईंत यशवंतराव यांनीं नवाबावर तोफखाना फौजसुद्धां चालून घेऊन, बहुत जवामर्दीनें कामकाज केलें व त्या लढाईंत भाल्याची जखम पायास लागली. सबब श्रीमंतांनीं अंबारी व साहेबनौबत दिली. कलम.

२ श्रीमंत भाऊसाहेब पेशवे यांची स्वारी गुजराथ प्रांतीं गेली. त्यांजबरोबर यशवंतराव यांनीं आपले धाकटे बंधु केशवराव यांस फौज व तोफखाना सुद्धां बरोबर दिल्हें. त्यांनीं सरकारचाकरी बहुत पराक्रमानें केली. सबब परगणे विरमगांव व परगणे दसकुरोई प्रांत गुजराथ येथील मजमू व फडणशीचे दरख केशवराव यांचे नांवें श्रीमंत नानासाहेब यांनीं छ ३ जमादिलावल सलास खमसैनांत सनद दिल्ही. त्याप्रमाणें सन समान कुंपणीसरकारचे अंमलपर्यंत दोन्ही दरख निर्वेध चालले. हल्लीं बंद आहेत. येविशीं अर्ज करीतच आहों. व नवाब निजामअल्लीखां यांसी तांदुळजे येथें लढाई जाहली. त्या लढाईत केशवराव यांनीं फौजेसुद्धां चालून घेऊन, खुद्द नवाबाचे हौद्यांवर जातीनें चढले, तेव्हां खवासनिषस्त यांनीं जोडगोळी मारली, ती कपाळास लागून सरकारकामांत अखेर जाहले. सबब मोठे सरदाराची खिलत यशवंतराव यांस सरकारांतून दिल्ही. कलम.

३ पानिपतचे स्वारींत येशवंतराव यांनीं आपले चौथे बंधु महिपतराव फौज व तोफखानासुद्धां श्रीमंत भाऊसाहेब यांजसमागमें दिल्ही. त्यांनीं सरकारचाकरी बहुत शिपाईगिरीनें करून, थोरले लढाईंत भाऊसाहेब यांसमागमें गिलच्यावर चालून घेतलें. ते समयीं तोंडावर तरवारीची जखम लागून, देशीं आल्यावर कांहीं दिवस तोफखान्याचा कारभारही केला. कलम.

४ कैलासवासी यशवंतराव यांस पुत्र भिवराव व जयवंतराव व कृष्णराव व सखारामपंत व विश्वासराव व पुरुषोत्तमराव. बंधू सहा, पैकीं कृष्णराव यांस माधवराव यांचे पुत्र ह्मणोन तोफखान्याचे सरदारीचीं वस्त्रं त्यांचे नांवें घेतलीं, व फौजेची सरदारीचीं वस्त्रें भिवराव यांनीं घेतलीं आणि दोन्ही सरदारीचीं कामें बंधूसह करून उत्कृष्ट पराक्रमानें लौकिक संपादिला. हा सविस्तर मजकूर ल्याहावा तर थोडक्या मजकुरांत लिहिण्याचा हुकूम यास्तव कार्यकारण लिहिला जातो जे. कलम.

१ भिवराव फौज तोफखानासुद्धां श्रीमंताबरोबर नवाब निजामअल्लीखां यांशीं राक्षसभुवन येथील लढाईत स्वामीसंन्निध बहुत चाकरी केली. ती श्रीमंतांनीं पाहून कोकणांत तोतयानें बंड करून सरकारचा मुलूख फार खराब केला. सबब त्याचे बंदोबस्तास भिवराव यांस सरकारी जरीपटका व मुतालकी शिक्के कट्यार देऊन साहेबसुभा रवाना केलें. त्यांनीं तोतयाचें पारिपत्य करून प्रांताचा बंदोबस्त केला; व श्रीमंत माधवराव नारायण प्रधान यांचे कारकीर्दींत कसबें तळेगांव येथें इंग्रज बहादूर यांशीं लढाई जाहली. त्या लढाईंत भिवराव तोफखाना व फौजसुद्धां इंग्रजबहादूर यांजवर चालून घेऊन, तोफेचें निशाण धरून गोळ्यानें इष्टूर साहेब इंग्रज बहादूर यांजकडील सरदार मारिले, व मोरच्यांत हल्ल्यांत बंधूसह कस्त मेहनत करून बहुत जिमामर्दीनें यश संपादिलें. सबब श्रीमंतांनीं चौघडा, जरीपटका व फौजेच्या बेगमीस सरंजाम नव्वद हजार रुपयांचा छ २१ सवाल सन तिसा सबैन मया व अलफांत दिल्हा; व यशवंतरावनानापासून सरकारचाकरी

हरवक्त बहुत मर्दुमीनें होत गेली. सबब इनामगांव देहे सात व कसबें पानगांव येथील मोकासा व किरकोळ जमिनी दिल्ह्या. त्यांच्या सनदा भिवराव व कृष्णराव यांचे नांवें करून घेतल्या. कलम.

२ जयवंतराव यशवंत श्रीमंत दादासाहेब यांजबरोबर गोहदचे स्वारींत मोठें कामकाज करून अवल निषाण गोहदचे किल्ल्यावर तोफखान्याकडील सही केलें व महीचे लढाईंत इंग्रजबहादूर यांजवर फौजसुद्धां चालून घेतलें. तें समयीं जयवंतराव यांस गोळीची जखम लागली; व आनंदमोगरी व बावापीरचा घाट व रासदेर वगैरे लढाईचीं कामें जयवंतराव यांनीं फार केलीं; सबब श्रीमंतांनीं तोफखान्याचे मजमूचा दरख व मौजें सांगवी तरफ सांडस हा गांव मातोश्रीचे खर्चाबद्दल जयवंतराव यांचे नांवें इनामपत्रें करून दिल्हीं. तो गांव शके १७४२ पावेतों चालला. हल्लीं कंपनी सरकारांतून जप्त आहे. येविशीं अर्ज करीतच आहों. कलम.

३ कृष्णराव कर्नाटकांत फौज व तोफखाना सुद्धां प्रांताचे बंदोबस्ताकरतां हमेश राहात होते. त्यास त्र्यंबक विश्वनाथ पेठ्ये यांची स्वारी हैदर नाईक यांजवर जाहली. त्यास कृष्णराव यांनीं कारखान्यासुद्धां मदत केली. मोतीतलावावर कृष्णराव मयसलतनतसुद्धां चालून घेऊन हैदर शिकस्त केला, व शिरे येथील लढाईंत स्वामीकरितां बहुत कामकाज केलें. हिरेहाळ तालुके डंबल वगैरे......सरकाराशीं बहाली सबब हिरेहाळ ठाण्याशीं लढाई घेऊन हल्ला केला. त्या हल्ल्यांत कृष्णराव यांस गोळीची जखम लागून सरकार कामावर अखेर जाहले. सबब तालुके डंबलपैकीं मौजें गंगापुर हा गांव इनाम करून दिल्हा. तो चालतच आहे. कलम.

४ सखारामपंत, नाना फडणीस यांजबरोबर कर्नाटकांत किल्ले बदामी येथील हल्ल्यांत मोठें कामकाज करून अवल निशाण तोफखान्याकडील सही केलें व स्वारी श्रीरंगपट्टण विद्यमान हरी बल्लाळ यांस तोफखाना फौजसुद्धां मदत करून सरकारचाकरी बहुत केली. व त्या स्वारींत इंग्रजबहादूर यांनीं पेशवे सरकारांत तोफा नग १७ नजर दिल्ह्या. त्या पुणें मुक्कामीं घेऊन आले. सरकारचाकरी दरपय बहुत जाहली. याची खिलत खुद्द श्रीमंत सामोरे येण्याचा दरजा दिल्हा. व नवाब निजामअलीखां यांसीं लढाई खर्ड्यानजीक जाहली. त्या लढाईंत सखारामपंत यांनीं बहुत सेवाचाकरी केली. सबब सरकारांतून जातीस तैनात इजाफा रुपये तेवीस हजार छ ६ साबान खमस तिसैनांत करून दिल्ही. त्याप्रमाणें सन समान अशर लढाईअखेर सखारामपंत यांचे पुत्र यशवंतराव यांजकडे चालली. पुढें कुंपणी सरकारांतून अकरा हजार रुपयांचा सरंजाम करून दिल्हा. तो सबा अशरीनपावेतों चालला. नंतर त्यांची स्त्री यमुनाबाईनीं दत्तपुत्र वामनराव घेतले. त्याजकडे हल्लीं इनाम वृत्तीचें उत्पन्न मात्र आहे. तें अदमासें हजार रुपयेपावेतों. त्यास सरकारांनीं वडीलांचा लौकिक ध्यानीं आणून कांहीं बंदोबस्ताची तजवीज जाहली पाहिजे. कलम

५ विश्वासराव यशवंत फतरगडचे स्वारींत फौज व तोफखानासुद्धां विसाजी कृष्ण बिनिवाले यांस मदत करून सरकारचाकरी बहुत केली, व कर्नेल गाडरसाहेब इंग्रज बहादूर लढाईच्या इराद्यानें बोरघाटनजीक आले. सबब सरकारांतून विश्वासराव यांस तोफखाना व सरकारी सलतनतसुद्धां पाठविलें. तेथें सरकारचाकरी बहुत करून इंग्रज बहादूर माघारी गेले. व श्रीमंत नारायणराव साहेब पेशवे अखेर जाहल्यावर पुरंदर वगैरे मसलतींत सखाराम भगवंत व नाना फडणीस व विश्वासराव पानसी मिळोन सर्व राज्याचा कारभार सरकारी मखलासीसुद्धां करीत होते. व महादजी शिंदे यांस देशी सरंजाम विश्वासराव यांनीं सरकारांत... करून देविला. सबब शिंदे यांनीं मौजें नाणवली तर्फ चाकण हा गांव इनाम करून दिल्हा. तो सन १८१८ लढाईअखेर चालला. कलम.

६ पुरुषोत्तमराव हमेश पुणें मुक्कामीं राहून मोहीमाशिर सरदारांस तोफखान्याकडील सरंजाम रवाना करणें व हुजूर श्रीमंताजवळ राहणें व फौज तोफखानासंबंधीं हिशेब-किंतेब वगैरे सर्व कारभार करीत होते; व सरकारांतून खेरीज पागा पुरुषोत्तमराव यांचे नांवें करून दिल्ही. कलम.

५ गणपतराव विश्वनाथ आमचे तीर्थरूप श्रीमंत कैलासवासी माधवराव नारायण प्रधान यांचे कारकीर्दीत सखाराम यशवंत तोफखाना फौजसुद्धां कारभार करीत होते. परंतु बदामी पट्टण वगैरे स्वारीस मोहीमशिर राहत होते. हुजूर पुणें मुक्कामीं श्रीमंताजवळ तोफ-खान्याचा कारभार गणपतराव करीत होते. नंतर नवाब निजामअल्लीखां यांजवर स्वारी होऊन लढाई खडर्य़ानजीक जाहली. त्या लढाईत आघाडीस फौज रवाना जाली. त्याजबरोबर तोफखानासुद्धां गणपतराव जाऊन सरकारचाकरी बहुत जुमामर्दीनें केली. सबब जातीस तैनात इजाफा रुपये तेरा हजार सहाशें एकतीस छ ६ साबान खमस तिसैनांत करून तोफ-खान्याचे मखलाशीचें काम करार करून दिल्हें. पुढें श्रीमंत बाजीरावसाहेब गादी नषीन जाहले. सखारामपंत परलोकवासी झाले. नंतर फौजेचा सरंजाम भिवराव यशवंत यांचे नांवें होता. तो छ ६ जिल्हेज सन सबा तिसैनांत गणपतराव विश्वनाथ व यशवंतराव सखाराम यांचें नांवें करून दिल्हा. व तोफखान्याचे सरदारीचें काम दरोबस्त गणपतराव यांनींच केलें. कर्नाटकांत कोल्हापूरकर राजे यांजवर फौज व तोफखान्यासुद्धां गणपतराव जाऊन रामचंद्र परशराम वगैरे फौजा घेऊन, त्यांशीं मदत करून सरकारचाकरी बहुत केली. करवीरकरांशीं तह जाहल्यानंतर बाळकृष्ण गंगाधर यांनीं फौज जमा करून ...... मुलूख खराब केला. सबब नानापुरंदरे व बापू गोखले फौजसुद्धां .... कसबें मोहद येथें बाळकृष्ण गंगाधर याशीं लढाई घेऊन...केला. व जिवाजी यशवंत शिंदे यांजकडील यांनीं... मुलूख खराब केला. त्यांचेंही पारिपत्य ... करून बुडविला, त्या समयीं वडीलापाशीं फौज... ...तोफखानासुद्धां सलतनत अजमासें पन्नास हजार यानिशीं...गलगले व गुडूदहाळ वगैरे बहुत ठाणीं व किल्ले पेशवेसरकारांशीं बदलून होते. त्यांचेही पारिपत्य करून सरकारअंमल

जारी केला. व यशवंतराव होळकर यांचे लढाईत तोफखान्याचे तयारीअन्वयें चाकरी केली. त्याअलीकडे श्रीमंत बाजीरावसाहेब यांनीं कदीम सरदार यांजवर गैरमर्जी व राज्यांत कामेंकाजेंही सरकार कंपणीचे दोस्तीमुळें प्रसंग नाहींसा जाहला. ह्मणोन तोफखान्याचे बेगमीस सरंजाम व इतलाख अजमासें अठरा वीस लक्ष रुपये व फौजेस सरंजाम व जातीचा सरंजाम व गड किल्ले वगैरे यांची जप्ती छ २० रजब समान मयातैनांत केली; आणि तोफखान्याचे कामास कार्याकारण प्रसंगोपात हुजुरून खर्चास देत होते. याप्रमाणें जातीसही पावत होते. सन समान अशरांत कंपणी इंग्रजबहादूर व पेशवेसरकारची लढाई जाहली. तेव्हां पुणें मुक्कामीं गारपिरावर महांकाळीसुद्धां तोफा नेऊन इतलमगदूर सामानाअन्वयें कामकाज केलें. पुढें श्रीमंत निघोन देशावर गेले. ते समयीं सरकारचे आज्ञेनें गोखले वगैरे सरदार यांजकडील पायदळ व चंदन वंदन येथें तोफखाना धेऊन आह्मी होतों. त्या तोफखान्यापैकीं पांच तोफा व नवेंही फौजपायदळ ठेवून मेहेरबान जनरल मंदरोलसाहेब बहादूर कर्नाटकांतून सात पलटणें व नवाब पोलादजंग बहादूर यांजकडील फौज दुल्लेखान मदत घेऊन लढाई सोलापूर मुक्कामीं जाहली. त्या लढाईचे पूर्वी सीना व भीमा मध्यदेश घेऊन फौज व तोफखान्यासुद्धां खर्चाचा बंदोबस्त करून देतों ह्मणोन इंग्रजबहादूर यांजकडील बोलणें आलें होतें. परंतु आपले खानदानीवर नजर देऊन लोभ न धरतां तारीख ६ माहे...सन १८१८ रोजीं लढाईच पतली. त्या लढाईत प्रथम बसते घोडींस गोळा लागून ठार पडली. तेव्हां सरदारच पडले असें फौजेच्या मनांत येऊन बेहवा गर्दी जाहली. परंतु खैर होऊन फौज. पायदळ एकत्र करून इंग्रजावर चालून घेतलें. तों उजवे हातास गोळीची जखम लागून, बहुत जेरीस येऊन, दोन घटका आराम होण्याकरितां ××× इंग्रज बहादूर यांनीं तळावर चालून ××× ××× तदनंतर किल्ल्यातून लढाई सुरू ××× लढवाई सरंजाम वरकड बंदोबस्ताप्रमाणें ×××× सबब तहाचें बोलणें उभय पक्षीं होऊन तहनामा ××× छ ८ रजब सन समान अशर तारीख १४ माहे मे सन १८१८ इसवींत जाहला. त्या तहनाम्याचें चौथे कलमांत सरंजामाचा वगैरे पेशजीप्रमाणें बंदोबस्त करून घ्यावा असा करार ठरला असतां, हनराबल एलफिनस्टन साहेब बहादूर यांनीं तेरा हजार दोनशें अठरा रुपयांची जहागीर व पेनशान मिळून करून दिल्हें. तें आश्विन शुद्ध १० शके १७४७ पावेतों वडील विद्यमान चाललें. पुढें तो सरंजाम पेनशन आमचें नांवें चालवावें, परंतु ते समयीं आम्ही दौलतराव शिंदे अलिजाबहादूर यांजपाशीं होतों. पुणें मुक्कामीं मातुश्रीनीं आमचा गैरवाका समजून आपलें नांवें दोन हजार रुपये दरसाल पेनशन करून घेतलें. तें हल्लीं चालतच आहे. वडिलांचा काळ जाहला ह्मणोन आह्मीं पुणें मुक्कामीं आलों. तों मातुश्रीनीं सरकारांत गैरवाका समजाविला होता. त्याची चौकशी तारीख २८ सपटंबर सन १८२७ या रोजीं होऊन इनामवृत्ति, घर, वाडा, आमचा आह्मांस देविला. त्यास इनामवृत्तीचें उत्पन्न अजमासें हजार रुपयेपर्यंत आहे. सबब जातीचे बंदोबस्ताविषयीं

अर्ज केला असतां, विलायतेस लिहिलें गेलें आहे. उत्तर आलें ह्मणजे बंदोबस्त करून देऊं. ह्मणोन सन १८२९ पासून हुकूम होत आहे. त्यास वडिलांचा लौकिक कसा हा मजकूर कैफियतीवरून सर्व ध्यानीं आणून, आमचें त्या लौकिकाअन्वयें चालवणें सरकाराकडे आहे. आजपर्यंत सरकारचे भरोशीयावर हजारों रुपये कर्जभरी होऊन दिवस गुजरले. इतःपर सर्व बरोबरींचे सरदारांत खावंदाचे कदमापाशीं वडिलांचे लौकिकाप्रमाणें बंदोबस्ताखेरीज राहणें फार मुष्किल आहे. तेविशीं तजवीज सरकारांनीं करून वडिलांकडे सरंजाम चालत होता, त्याप्रमाणें आमचा आह्मांकडे चालविला पाहिजे. कलम.

येकूण पांच कलमांत वडिलांनीं ... व लौकिक महशूर करून सरंजाम व इनाम ......त्याचा तपशील लिहिला आहे, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती. व हल्लीं कंपणीसरकारांतून ... ... त्यांत कंपेश तफावत काय आहे ... ... ... ... येविषयींचे उत्तरः— कलम.

१ पेशवेसरकारांतून चौघडा, जरीपटका, आदिकरून साहेब सलतनतची सरदारी करीत होतों. कलम.

२ कुंपणीसरकारांतून वडिलांचे जातीस सरंजाम देऊन चालविलें होतें. कलम.

३ हल्लीं आह्मांस सरकारांतून सरंजाम किंवा पेनशीन कांहीं एक चालत नाहीं. फक्त सरदार लोकांचे दुसरे प्रतींत जाणूहन दसऱ्याचा पोषाख वडिलांप्रमाणें देतात. येविशीं अर्ज सदरहू कैफियतीचे पांचवे कलमांत लिहून दाखल केलाच आहे. कलम.

३ येकूण तीन कलमांवरून कंपेश तफावत ध्यानीं आणून षफकत फर्माविली पाहिजे.

---

## ११ पावसकर देशमुख.

साहेब मुषफक मेहेरबान दोस्तां ज्यान वार्डीनसाहेब बहादूर डिपूटी एजंट जिल्हा दक्षण दाम अलताफ हु.

ॐ अजी साहेब विनायकराव चिंतामण देशमुख सलाम बादज सलाम खैरयत अंज्याम येथील खैरसला तागायत छ १ सफर जाणोन आपली खैर व आफियत कलमीं करीत असलें पाहिजे. दिगर साहेबीं तारीख ८ माहे सपटंबर व तारीख १ माहे जून येकूण दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. त्यांतील हशील आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला. ते लिहून पाठवावें ह्मणोन कलमी केलें, तें कळलें. त्यास आह्मी पावस महाल तालुके रत्नागिरी प्रांत कोंकण येथील देशमुख, पुरातन वतनदार, आमचे आजे तीर्थस्वरूप कैलासवासी लक्ष्मण नारायण यांनीं पेशवेसरकारांत श्रीमंत कैलास-वासी नानासाहेब यांचे वेळेपासून सरकारचाकरी एकनिष्ठेनें करीत आले. त्यांस बहुमान इनाम गांव पुरंदर मुक्कामीं श्रीमंत कैलासवासी सवाई माधवरावसाहेब यांचे वेळेस सरकारां-तून दिल्हा. पुढें आमचे तीर्थरूप कैलासवासी चिंतोपंत रावजी देशमुख सरकारचाकरी बहुत

दिवस करीत आले. त्यांची बरहक्क चाकरी पाहून श्रीरंगपट्टणचे स्वारींस फडणिशीचे कामावर होते. तेव्हां सरकारआज्ञेवरून कैलासवासी परशरामपंतभाऊ पटवर्धन मिरजकर यांनीं पालखी दिल्ही. त्यावर श्रीमंत राजश्री बाबासाहेब यांजवळ मुखत्यारीनें कारभार केला. त्यांनीं मेहेरबानी करून जातीस तैनातेंत सरंजाम गांव वगैरे लावून दिल्हे. त्यांची बेरीज १०१३७ रुपये दहा हजार एकशें सदतीस रुपये सन सीत मयातैनचे सालीं करार करून दिले. तेव्हांपासून सन सबा अशर मयातैनपावेतों चालत आले. पुढें कुंपणीसरकारास पेशवेसरकारांतून मुलूख लावून दिल्हे. ते वेळेस परगणे नसरापूर तालुके लोहोगड येथें नेमणूक नक्त रुपये ६१७॥. सहाशें साडे सत्रा कुंपणीसरकारचे अंमलांत गेले. सबब दुसरीकडे नेमून देण्याविषयीं पेशवेसरकारची आज्ञा जाहली होती. परंतु नेमून द्यावयाचे राहिले. बाकी रुपये ९५१९॥. नऊ हजार पांचशें साडे एकोणीस रुपयांचा गांवचा अंमल व नेमणुकांचा ऐवज आह्मांकडे चालत आल्याप्रमाणें चालत आहे. दरम्यान होळकर दंग्यांत सरकारचाकरीमुळें कसाक बहुत पडला, हे श्रीमंतांचे नेक नजरेस येऊन मेहरबानगी करून कर्ज वारावयाबद्दल रुपये १५०००० दीड लक्ष रुपये सन अर्बा अशार मयातैनांत बक्षीस दिल्हें. याप्रमाणें मजकूर आहे. साहेबास जाहीर होय. ज्यादा काय लिहिणें ? प्यार मोबत असो दिजे. हे किताबत.

---

## १२ पारसनीस.

### ( अ )

साहेब मुष्फक मेहेरबान करम फर्माय दोस्तां हेनरी ब्रौण साहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलमा हू.

ॐ अजीसाहेब कृष्णराव बापूजी पारसनवीस सलाम एंके येथील खैरयत जाणून आपली षादमानी हमेषा कलमी करीत असलें पाहिजे. दिगर आसाहेबाकडून पत्र नंबर १०६५ तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवीचें येऊन, त्यांत तारीख ३० जुलई सन मजकुरीं सरकारचा हुकूम आला कीं, आपणास मरातब पारसनवीस आहे, हें कोणत्या सबबीनें कोणाकडून प्राप्त जालें, त्याचा व एकंदर खानदानी व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं व त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे व ऐकीव मजकूर असल्यास तसेंही लिहून यावें. ह्मणोन वगैरे मजकूर लिहिण्यांत आला. त्यावरून खालीं कलमवार मजकूर लिहिला आहे:—

१ कैलासवासी छत्रपती महाराज यांचेजवळ आमचे मुळ पुरुष भिमरावजी हे फारशनीविसीचें काम करीत होते. तेव्हां छत्रपती महाराज यांनीं भिमरावजीस फारशीनवीस ह्मणोन मरातब दिल्हा. पुढें छत्रपती महाराज यांनीं बाळाजी विश्वनाथ यांस पेशवे व प्रधान पदवीचा अधिकार दिल्हा. नंतर बाळाजी विश्वनाथ यांचे पुत्र बाजीराव बल्लाळ पंत प्रधान

यांनीं आमचे मुळ पुरुष भिमरावजीचे पुत्र, बापूजी भिमराव यांस, फारशी लिहिण्याचें कामाकरितां महाराजापासून मागून घेतलें, आणि छत्रपती महाराज यांनीं मरातब दिल्हा. त्याप्रमाणें पंत प्रधान यांनीं चालविला. याप्रमाणें मजकूर ऐकण्यांत आहे. तो लिहिला आहे. याविषयीं दाखले नाहींत. कारण पेशजी चाकणचा किल्ला आमचे वडिलाकडे होता. तेव्हां कागदपत्र किल्ल्यांत राहत होते, ते लुटीस गेले असें आमचे वडील सांगत होते. यास्तव ऐकिव मजकूर लिहिला आहे. येविशीं माहितगार लोकांकडून माहितगारी करून घ्यावी. तर सदरहू कारकीर्दींतील मनुष्य आमचे पाहण्यांत हल्लीं कोणी नाहीं. कलम.

२ बापूजी भिवराव हक्क जाल्यावर त्यांचे पुत्र कृष्णराव बापूजी हे आमचे पणजे व आजे नारायणराव कृष्ण व तीर्थरूप यांनीं बाजीराव बल्लाळ पंतप्रधान यांचे कारकीर्दीपासून बाजीराव रघुनाथ यांचे कारकीर्दीअखेर होय तोंपर्यंत, हरएक रयासतींतून पारशी पत्रें येत गेल्याचे जबाब व पतप्रधान यांजकडून पत्रें दिल्ली सरकार व कुंपणी सरकार व निजाम सरकार व फरासीस व टिपू सुलतान व चिनापट्टण वगैरेस व हरएक कामाप्रकर्णी ताकीदपत्रें व दस्तकें, तहनामे वगैर, फारशीनवीशीचें काम हिंदुस्थान दक्षणचें आमचे खानदानींतून पुस्त दरपुस्त करीत आले. येविशीं दाखले फारसी आज्ञांपाशीं बहुत आहेत. त्यापैकीं कांहीं कांहीं कागद समक्ष आणून दाखवूं. कलम.

३ पंतप्रधान यांचे कारकीर्दींत तैनात जाबता सुरुसन खमस खमसैनांत आमचे पणजे कृष्णराव बापूजी यांचे नांवें जालेला, व आमचे आजे नारायणराव कृष्ण यांचे नांवें सुरुसन समान समानीन मया व अलफ या सालांत तेनात जाबता जाहला आहे त्याचे दाखले पेशवे सरकारचे मराठी दप्तरीं आहेत. ते पाहणें ह्मणजे फारशीनवीशीची पदवी व मरातब ध्यानास येईल.

४ हल्लीं मराठी कागदाच्या नकला पाठविल्या आहेत. त्या बितपशील:—

१ आमचे पणजे कृष्णराव बापूजी यांचे नांवें पत्र आलें तें तपशील:—

२ माधवराव बल्लाळ पंतप्रधान यांचें छ २६ रबिलाखर व छ १० रजब.

१ बाळाजी जनार्दन उर्फ नाना फडणीस यांचें छ २३ जमादिलावल.

१ महादजी शिंदे यांचें छ ११ सवाल.

४

१ आमचे आजे नारायणराव कृष्ण यांचें नांवें पत्रें आलीं:—

१ माधवराव बल्लाळ पंतप्रधान यांचें छ ८ साबान सीत सितैन मया व अलफ.

२ रघुनाथ बाजीराव पंतप्रधान यांचें छ ९ साबान सीत सितैन मया व अलफ १ व छ १९ रबिलावल १.

१ महादजी शिंदे यांचें छ १७ जमादिलावल.

४

सदरहू आठ पत्रांच्या नकला पाठविल्या आहेत. यांतील मजकुरावरून आमचे एकंदर खानदानीचा व थोरपणाचा मजकूर समजेल. सदरहू कागद अस्सल पाहण्याजी मर्जी असल्यास समक्ष आणून दाखवूं.

येकूण चार कलमें लिहिलीं आहेत. तारीख ५ माहे नवंबर सन १८५१. ज्यादा काय लिहिणें ? प्यार मोहोब्बत असो दिजे, हे किताब्त.

अ.

राजश्री याविराजीत राजमान्य राजश्री कृष्णराव बापूजी स्वामी गोसावी यांस—

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकिये लिहिणें विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. तुम्ही पत्रीं संदेह घेऊन लिहिलें कीं, मी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबाकडे जातों, तेथें सरकार कामच करीन ह्मणून लिहिलें. त्यावरून अपूर्व वाटलें. पहिल्यापासून सरकार काम करीत आलां, व पुढेंही कराल हा भरंवसाच आहे. असें असून संदिग्ध प्रकार लिहावयाचें कारण काय? प्रस्तुत तुम्ही कोठें आहां, वटिलांकडे कधीं जाणार, हें लिहिणें. वाडिलांकडे गेलां असलां तरी तेथील मर्जी कशी आहे, इकडे कधीं येणार; भोंसले, गायकवाड येतात किंवा नाहीं; आणखी सरंजाम्याच्या फौजा जमा जाहल्या किंवा नाहीं; आबा वडिलांकडे कधीं जाणार; वडिलांनीं मशारनिल्हेस बोलाविलें आहे किंवा नाहीं; हें सविस्तर वर्तमान लिहून पाठवणें. इकडील वर्तमान तर धारवाड जेर जाहलें. सुरंगही तयार एका दोन दिवशीं होतील. सत्वरच काम व्हावें असें आहे. मीरफैजुल्ला धारवाडचे कुमक करावयास्तव येतो, अशी गरम अवाई आहे. यास्तव गोपाळराव त्यांचे मार्गावर ठेविले आहेत. आणखीही फौज त्यांचे वाटवर बातमीस आहे. किल्यांतील प्रकार तरी आंतील कानड्यांचें अवसान गेलें आहे. परंतु गाडदी लोक अद्याप दमानेंच आहे(त). आणखी, मीर फैजुल्लाचा भाऊ आंत आहे. तो मजबूत आहे, यास्तव दम धरला आहे. आंत शिसें नाहीं, यास्तव तांब्याच्या गोळ्या मारीत आहे. आतां सत्वरच काम होईल. कळावें. रवाना छ २६ रबिलाखर बहुत काय लिहिणें, हे विनंती.

ब.

राजश्री कृष्णरावजी गोसावी यांस—

छ अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित महादजी शिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळलेखन करीत जावें. विशेष. सांप्रत तुह्मांकडून पत्रें येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी सविस्तर ल्याहावें. इकडील वर्तमानः—तीर्थस्वरूप मातोश्री सखुबाई देशीहून फौजसुद्धां माळवेप्रांतीं आले. हें वर्तमान ऐकोन काल्पीपासून माघारे फिरोन मजल दरमजल आवंतिकेस आलों. येतांच मातुश्रीची व आमची भेट जाहली. तीं आह्मी एकत्र होऊन येथास्थित बंदोबस्त केला. येथून कूच करून हिंदुस्थानप्रांतें जातों. वरकड कित्येक वर्तमान, राजश्री शिवाजी विठल पाठविले आहेत हे

सांगती(ल). त्याजवरून सविस्तर कळेल. तुम्ही दरबारीं आहां; आह्मांकडील कामाकाजाविशींचा, मशारनिल्हे सांगतील त्याप्रमाणें साहित्य करून, बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे. आह्मांकडील कामकाजाविशीं आपण चुकणार नाहींत, परंतु सूचनार्थ लिहिलें असे. रवाना छ ११ सवाल बहुत काय लिहिणें, हे विनंती.

---

## १३ पुणेंकर पिंगळे.

यादी नरहरराव शामराज पिंगळे मुक्काम पुणें. सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ. आपले खानदानीचे बढतीचा व आपले वडिलांकडे सरंजाम किती कोणत्या तारखेस चालू जाहला तें, व पेशवे सरकारांत आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश काय, व हल्ली सरंजाम आपलेकडे काय चालतो, याचे मजकुराची कैफियत लिहून यादी पाठविली पाहिजे असें पत्र आलें. त्याजवरून कैफियत येणेंप्रमाणें बितपशील:— कलमें.

१ आमचे खानदानीची बढती व लौकिक महशूर जाला तो मजकूर. आमचे आजे गोविंदराव भगवंत पिंगळे हे कृष्णराव काळे पेशवेसरकारचे मुत्सद्दी यांजकडून सरकारांत थोरले रावसाहेब पेशवे असतां कामकाजांत वागत असत. तेव्हां गोविंदराव हे अक्कलवंत व हुशार व विश्वासू पाहून ममलतीचे कामांत नाना फडणीस व सखारामबापू व काळे हे घेऊं लागले. ते समयीं नवाब निजामअल्लीखां बहादूर यांजकडे वकिलीस पाठविले. ते समयीं पेशवेसरकारचें काम करून नवाब यांची कृपा संपादिली. त्यावरून नवाब निजामअल्लीखां बहादूर यांनी मौजे निंबगांव व सांगवी, भाळवणी तालुके टेंभुर्णी या तीन गांवांचा जाहागिरीचा अंमल वंशपरंपरेनें इनाम सन ११७९ सालीं दिल्हा. तो मजकूर पेशवेसरकारांत त्या सालीं जाहिर केला. त्या दिवसापासून बढती व लौकिकही वाढत चालला; जामगांवच्या सनदापुढें इनामाच्या सन ११९८ सालीं करून घेतल्या. परंतु वेवाट सन ११७९ सालापासून आम्हांकडे चालली. कलम.

१ सरंजाम फौजेस किंवा जातीस मिळाला त्याचा मजकूर, आह्मी मुत्सद्दी सबब आमचे जातीस सरंजाम मिळाला. येणेंप्रमाणें. कलम.

१ सवाई माधवरावसाहेब पेशवे यांचा जन्म जाहल्यावर दौलतीचा बंदोबस्त नाना फडणीस यांनीं केला. त्या वेळेस सरकारकामांत नाना फडणीस यांचे मर्जीनरूप मसलतीचीं कामकाजें केलीं. सबब पेशवे सरकारांतून जातीचे नेमणुकीबद्दल तैनात जाबता दाहा हजार रुपयांचा करार करून सुरुसन तिसैन मया व अलफ सन ११९० सालीं दिल्हा. त्यांत हजार रुपये पालखीबद्दल व नऊ हजार जातीचे खर्चास येकूण दहा हजार पैकीं इतलाख रुपये ५९५० व गांव चालीसें पन्नास रुपयांचे दिल्हे आणि गांवास सनदा तारीख २७ माहे सवाल सन ११९० सालीं दिल्ह्या. पैकीं नवाब निजामअल्लीखां बहा-

दूर यांजकडील इनाम तीन गांव मिळविले. ते बेरीज २५५० धरून बाकी नवे पेशवे सरकारांतून गांव मौजे वनगली परगणे इंदापूर व मौजें शेलारगांव परगणे कांठी स्वराज्य व जहागीर व मौजें हिंगणगांव बेनवडी येकूण बेरीज रुपये १५०० येकूण इनामी व सरंजामी मिळोन चार हजार पन्नास रुपये यांचे गांव लावून देऊन त्याप्रमाणें दहा हजारांचा तैनात जाबत्याप्रमाणें आह्मांस दिल्हा दिवसापासून वैवाट आह्मांकडे सन १२१५ अखेर चालली. पुढें इतलाख ऐवज देणें तो ५९५० रुपये बंद जाहले, आणि गांव चार हजार पन्नास रुपयांचे सन १२२७ लढाईअखेर पेशवे सरकारांतून निर्वेध आह्मांकडे चालले. कलम.

१ खडर्य्याचे लढाईत नवाबाकडील तह पेशवे सरकारचा जाहला. त्या कामांत आमचे आजे गोविंदराव भगवंत होते. सबब आमचे तीर्थरूप शामराव गोविंद यांशीं पालखी वगैरेबद्दल दोन गांव सन १२०५ सालीं जहागीर दिल्हे. तालुके पेडगांव परगणे कडेवलीतपैकीं मौजें बरडगांव बेरीज रुपये १५८० व मौजें करंजें बेरीज रुपये १५०० एकूण तीसशें ऐंशी रुपये यांचे दोन गांव दिल्हे. त्यांची वहिवाट सन १२०५ सालापासून सन १२१७ अखेर आह्मांकडे निर्वेध चालली. पुढें सन १२१८ सालीं नवाबाचे सरकारचे कमाविसदार यांनीं जप्त केले. कलम.

१ सन १२०८ सालीं गोविंदराव भगवंत आमचे आजे वैकुंठवासी जाहल्यावर बाजीरावसाहेब यांचे कारकीर्दींत आमचे वडील चुलते व्यंकटराव गोविंद यांसीं वकिलीचीं वस्त्रें पहिल्याप्रमाणें तैनात जाबता कायम ठेवून पेशवेसरकारांतत दिल्हीं. नंतर त्यांनीं दोन तीन वर्षे वकिलीचें कामकाज केलें; आणि सन १२११ सालीं ते मृत्य पावले. पुढें आमचे तीर्थरूप शामराव गोविंद यांसी श्रीमंत बाजीरावसाहेब यांनीं वकिलीचीं वस्त्रें नवाबाकडील दिल्हीं, आणि पहिल्याप्रमाणें दहा हजार रुपयांचा तैनात जाबता कायम ठेविला. नंतर आमचे तीर्थरूप सरकारहुकुमावरून नवाबाकडे गेले. तेसमयीं आमचे आजे यांजपासून सदाशिव माणकेश्वर जबाबनिशीचें कामावर कारकून आह्मांपाशीं होते. ते माहितगार सबब त्यांस बरोबर घेऊन आमचे वडील हैदराबादेस नवाब यांजकडे वकिलीचे कामावर गेले. नंतर होळकराची लढाई पुण्यावर होऊन श्रीमंत वसईस गेले. ते समयीं भगवंतराव गोविंद आमचे चुलते यांस नवाब यांजपाशीं वकिलीचें कामावर ठेवून, आमचे वडील शामराव गोविंद हे सदाशिवपंत भाऊ यांशीं बरोबर घेऊन नवाब यांजपासून निघून वसईस श्रीमंतांपाशीं गेले. पुढें कंपनीसरकारचा व श्रीमंत बाजीरावसाहेब यांचा तह झाला. त्या बोलण्यांत सदाशिवपंत भाऊ होते. त्याजमुळें श्रीमंत पुणें मुक्कामीं आल्यावर भाऊस दिवाणगिरी दिल्ही, आणि आमचे तीर्थरूपाकडे वकिलीचें काम होतें. त्याप्रमाणें ठेविलें, त्याची वहिवाट आम्हांकडे सन १२१४ अखेर चालली तोंपावेतों दहा हजार रुपये तैनात जाबत्याप्रमाणें इतलाख व गांव मिळून चालले. पुढें सन १२१५ सालीं नानांनीं माणकेश्वर

यांजकडे वकिलीचें काम नवाबाकडील आह्मांकडून दूर करून सांगितलें. आणि इतलाख ऐवज आह्मांस पावत होता, तो बंद करून सरंजाम इनामगांवसुद्धां आमचे तीर्थरूप शामराव गोविंद यांजकडे चालविला; व भगवंतराव गोविंद याचे नांवें नवीन गांव पालखीचे सरंजामाकरितां मौजें खांबगांव माणकेश्वर यांचे विद्यमानें सन १२१५ सालीं दिल्हा. त्याची वहिवाट आमचे नांवें सन १२२७ अखेरसालपावेतों माणकेश्वर यांचे विद्यमानें चालली. कलम.

१ कंपणी सरकारचा अंमल जाहल्यावर आह्मांकडील इनामी व सरंजामी गांव दरोबस्त नवाबाकडील व पेशवेसरकारचे होते, ते जप्त जाहले. पैकीं कंपणीसरकारांतून नवाबाकडील तीन गांव इनामी होते. ते मोकळे करून घेऊन आह्मांकडे चालविले व सरंजामाचे दोन गांव शेलारगांव व वनगली सुटे तोंपावेतों दरसाल हजार रुपये पेनशन करून दिल्हें. पुढें दुसरे सालीं शेलारगांव व वनगली हे दोन गांव सरंजामी आमचे आह्मांकडे चालविले. तेव्हां पेनशन बंद केलें. त्या दिवसापासून पांच गांवची वहिवाट आह्मांकडे आमचे तीर्थरूप सन १२३५ अखेर वैकुंठवाशी झाले तोंपावेतों चालली. पुढें सन १२३६ सालापासून शेलारगांव, वनगली हे दोन गांव सरंजामी जप्त केले, आणि इनामी मात्र निंबगांव व सांगवी, व भाळवणी अडीच हजार रुपयांचे तीन गांव आह्मांकडे चालविले आहेत. कलम.

येणेंप्रमाणें जातीचा सरंजामाचा मजकूर. कलम.

१ हल्लीं सरंजाम काय चालतो याचा तपशीलः—त्यास इनामी तीन गांव अडीच हजार रुपयांचे मौजें निंबगांव व सांगवी व भाळवणी हे आह्मांकडे चालत आहेत. याखेरीज दुसरें कांहीं चालत नाहीं. कलम.

१ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपणीसरकारांतून चालत आहे. यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे मजकुराचा तपशील पेशवेसरकारांत आमचे आजे व तीर्थरूप शामराव गोविंद हे मुत्सद्दीगिरीचे व वकिलीचे कामांत मोठ्या अब्रूनें वागत होते व सरकारही मेहरबानगी ठेवीत होते. दसऱ्याबद्दल बहुमानाचे पोषाख साल दरसाल घेत होते; व मुत्सदगिरीचें कामकाज सरकार आमचे हातून घेत असत; सबब आमचा मोठेपणा असे. त्या वेळची जुनी पदरची कारकूनमंडळी दहा बारा असामी आहेत, त्यांचें संरक्षण होत असे, व आमचेही लौकिकाप्रमाणें चालत असे. हल्लीं कंपणीसरकारच्या अंमलांत आमचे तीर्थरूप शामराव गोविंद होते तोंपावेतों सन १२३५ अखेर बहुमानाचा दसऱ्याचा पोशाख आम्हांस पावत आला. व पेशजीप्रमाणें आमचा सन्मानही राखिला. परंतु कामकाज आमचे हातून घेतलें नाहीं. सबब कामकाजाचा बोध आम्हांकडे राहिला नाहीं. पुढें सन १२३६ सालापासून सरंजामी दोन गांव पंधराशें रुपयांचे जप्त केले, आणि तीन गांव इनामी अडीच हजारांचे मात्र आम्हांकडे चालविले. सरंजामाचे दोन गांवांविशीं अर्ज केला; परंतु गांव सोडले नाहींत. याजकरितां उत्पन्न थोडें

सबब आमचे कुटुंबाचा व पदरचे मंडळीचा गुजारा होत नाहीं; व दसऱ्याचा बहुमानाचा पोषाख आम्हांस अर्ज केला असतां चवघांप्रमाणें पावत नाहीं. यामुळें सन्मानांत कमी झालें व उत्पन्न कमी याजमुळें खर्चाची फार ओढ आहे. त्यास सरकारानें सर्व हकीकत पाहून चवघांप्रमाणें दसऱ्याचा बहुमानाचा पोषाख साल दरसाल देऊन सन्मान मेहरबानी करून राखिला पाहिजे; व सरंजामी दोन गांव आमचे आम्हांकडे चालविले म्हणजे आणि कांहीं कामकाज आमचे हातून घेतलें म्हणजे चवघांप्रमाणें मोठेपणा आमचा राहून दिनचर्या चालेल. कलम.

४

येकूण कलमें चार कैफयतीचे तपशिलाचीं लिहिलीं आहेत. याजवरून सर्व कच्चा मजकूर जाहिरांत येईल. तारीख १८ माहे जून सन १८३३ इसवी. सन १२४३ शके १७५५ विजयनामसंवत्सरे.

सही. नरहरराव शामराज गोविंद पिंगळे.
अक्षर नारायण बापूजी भिडे कारकून.
निसबत पिंगळे.

---

## १४ पुरंदरे.

यादी कैफियत राजश्री माधवराव निळकंठ पुरंधरे सुरुसन अर्बा सलासीन मयातैन व अलफ सन १२४३. मेहेरबान ज्यान वार्डिन साहेब बहादूर डेप्युटी एजंट यांजकडून तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवींचें पत्र आलें. त्यांतील हशील कीं, आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता; व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे; व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपणीसरकारांतून चालत आहे; त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे म्हणोन. त्याजवरून इकडील सिलसिल्याचा मजकूर तारीख व सन व साल, संवत्सर तपशीलवार ल्याहावें तर सन १२२७ फसली या सालीं सासवडचे वाड्याशीं लढाई होऊन वाडा लुटला. त्यांत कागदपत्र गलत जाहले. याजमुळें कार्याकारण मागील दाखल्यावरून वगैरे जो मजकूर समजुतीस आला, तो लिहीत असों. बितपशीलः—

१ खानदानीचे बढतीस आले ते आंबाजी त्र्यंबक पुरंदरे आह्मांपासून सहावे पुरुष यांणीं दौलत संपादन करून लौकिक मिळविला. त्याचा बयाजः—बाळाजी विश्वनाथ हे शामल जंजीरे राजपुरी यांचे राज्यांतील जमीनदार देशमुख, त्यांजवर कांहीं कसाक गुज-

रून देशमुख यांचा कर्ता पुरुष यास हापशी यानीं गोणत्यांत घालोन समुद्रांत बुडविलें. अशा उपद्रवामुळें बाळाजी विश्वनाथ कोकणांतून निघोन चिपळोणाकडून फिरत फिरत सासवडास आले. त्यांस आंबाजी त्र्यंबक पुरंदरे, यांनीं दिलभरंवसा देऊन, सासवड मुक्कामीं राहावयास जागा वगैरे बंदोबस्त करून दिल्हा. उभयतांची ममता अकृत्रिमपणें चालली. नंतर उभयतांनीं एकरूप विचार करून धनाजी जाधवराव सेनापती यांजपाशीं रोजगारास जाऊन राहिले. नंतर थोरले शाहू छत्रपती महाराज सन १११९ या सालीं दिल्लीहून दक्षिणेंत आले. त्या वेळेस छत्रपती महाराज यांची व जाधवराव यांची येकलाशी करण्याचें काम उभयतांनीं केलें. त्याजवरून छत्रपती महाराज यांनीं आपले संनिध ठेविलें. त्या काळीं छत्रपती महाराज यांजवळ अष्टप्रधान पिंगळे पेशवे, आदिकरून होते. त्या समयीं बाळाजी विश्वनाथ यांस सरसुभेदारी दिल्ही. तें काम उभयतांनीं सरकारमर्जीमाफक केल्यावर बाळाजी विश्वनाथ यांस सेनाकर्ते ह्मणोन किताब देऊन मोकासे गांव दिल्हे व आंबाजीपंत यांस गांवगन्ना वराता देऊन चालवीत होते. नंतर उभयतां विश्वासूक, कर्तेपणास लायख, जाणोन सन ११२३ या सालांत छत्रपती महाराज यांनी बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाई मुख्य प्रधानपद देऊन वस्त्रे दिल्हीं व आंबाजीपंत पुरंदरे यांस पेशवाईची दिवाणगिरी व आपले हुजूरची मुतालकी ही दोन्ही कामें नेमून वस्त्रें दिल्हीं. त्या समयीं आंबाजीपंत पुरंदरे यांस जातीस सरंजाम वगैरे उत्पन्न.

| | |
|---|---|
| ४०००० | एेन सरंजाम |
| २५००० | खेरीज नेमणुकी असाम्या व वर्षासनें सर लष्करची मजमू वगैरे अजमासें बेरीज रुपये. |
| ६५००० | |

येणेंप्रमाणें उत्पन्न त्या काळीं मुलुख उजाड पंचवीस तीस कोसांवर वस्ती जुजबी आणि मुलुखांत दमाजी थोरात हिंगणगांवकर व आणखी कितेक बंडवाले यांचे उपद्रवामुळें वस्ती होऊन सरकार अमदानी होईना असा मुलुख खराब, तेव्हां पेशवे पुरंदरे यांनीं विचार करून रयत लोकांस कौल देऊन आपण मुलुखांत फौज व सरंजामानिशीं फिरूं लागले. तेणेंकरून रयतेस भरंवसा येऊन वसाहत जवळ जवळ होऊन मुलुखाची लावणी होऊन सरकार आबादी होत चालली. दरम्यान सन ११२६ चे सालीं दमाजी थोरात हिंगणगांवकर यानें दगेबाजी करून पेशवे व पुरंदरे यांस धरून कैद करून बहुत तसदी करूं लागला. त्या प्रसंगीं आंबाजीपंत यांनीं पेशवे यांस इजा लागूं दिल्ही नाहीं. थोरात यानें लोखंडाचे सांडस तापवून आंबाजीपंत यांचे आंगचें मांस तोडिलें, असा निकर्ष केला, तो सोसून कांहीं कारस्थान करून पेशवे व आपण सुटोन आले. नंतर आणखी फौज सरंजाम तयार करून दमाजीवर हिंगणगांवीं चालून जाऊन हल्ला करून दमाजीस कैद केला. व त्याची गढी पाडून गांवसुद्धां गाढवाचा नांगर फिरवून जागा गैर-

उपयोगी केली. दमाजीचें बंड मोडलें. येणेंकरून रयतेस बहुत सुख जाहलें. मुलूख आबाद सरकार जमेची आमदानी होत चालली. व मोंगलाई व कर्नाटक वगैरे संस्थानवाले यांशीं लढाया करून मुलूख काबीज करीत चालले. येणेंकरून छत्रपती महाराज यांची पूर्ण कृपा होऊन सर्व राज्यभाराचा अखत्यार पेशवे व पुरंदरे यांजकडे ठेविला. सन ११२९ सालीं बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचा काळ जाहला. त्यांचे वडील पुत्र बाजीराव बल्लाळ उर्फ थोरले बाजीरावसाहेब व आंबाजीपंत सातारीयास गेले. छत्रपती महाराज यांनीं बाजीरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें दिल्हीं व आंबाजीपंत यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिल्हीं. राज्यकारभार पूर्वप्रमाणें वहिवाट चालवून दिवसेंदिवस अधिक मुलूख संपादन करीत चालले. बुंदेलखंडांत राजा छत्रसाल यांजवर वख्त गुजरला त्या समयीं फौजसुद्धां श्रीमंतासमागमें जाऊन छत्रसाल यांजवर फौज चालून आली त्याचा पराभव केला. त्याजवरून बुंधेले यांनीं तिजाई वांटणीचा लाखो रुपयांचा मुलूख सरकारांत दिल्हा. या रीतिनें सरकारसेवा करून सन ११४४ या सालीं आंबाजीपंत काशीयात्रेस जातसमयीं घरीं नातू त्र्यंबक सदाशिव व पुत्र महादाजी आंबाजी उभयतांचीं वयें लहान सबब तुको त्र्यंबक पुरंदरे, आंबाजीपंत यांचे बंधू त्यांचे पुत्र मल्हार तुकदेव यांस हुजूर मुतालकीचें कामावर आपले मुबदला छत्रपती महाराज यांजवळ ठेविले होते. नंतर सन ११४५ चें सालीं थोरले बाजीरावसाहेब पेशवे फौज सरंजामानिशीं हिंदुस्थान प्रांतीं अजमीरपावेतों स्वारीस गेले. तेथें आंबाजीपंत यात्रा करून येऊन पेशवे यांस भेटले. देशी स्वारीसुद्धां माघारे आले. नंतर सन ११४५ या सालीं आंबाजीपंत यांचा काळ जाहला. त्यांचा वंश नातू त्र्यंबक सदाशिव व पुत्र महादाजी आंबाजी याप्रमाणें आंबाजी त्र्यंबक यांची वहिवाट.

१ आमचे पांचवे पुरुष महादाजी आंबाजी. आंबाजीपंत वारल्यावर त्र्यंबक सदाशिव व महादाजी आंबाजी यांजकडे आंबाजीपंताचे वेळचा सरंजाम व नेमणुकी असाम्या वगैरे कायम ठेवून, आंबाजीपंत यांचे उपकार जाणून चिरंजीव ह्मणून पदवी कागदीं पत्रीं पुरंदरे यांस लिहूं लागले. सन ११५० या सालीं बाजीरावसाहेब यांचा काळ जाहला. छत्रपती महाराज यांजवळ पेशवे यांचे पुत्र नानासाहेब व पुरंदरे महादाजी आंबाजी हुजूर असतां, पेशवाई दुसऱ्यास द्यावी असें छत्रपती महाराज यांजवळचे सरदार व मुत्सद्दी बोलणें बोलूं लागले. त्या प्रसंगीं महाराजांनीं, आंबाजी पुरंदरे यांनीं कस्त मेहनत करून व छत्रपती महाराज यांची मर्जी संपादन करून, पेशवाई नानासाहेब यांस द्यावी याप्रमाणें नेमांत आणिलें. नंतर छत्रपती महाराज यांनीं नानासाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें दिल्हीं व दिवाणगिरी व हुजूरची मुतालकी महादाजी आंबाजी यांस वस्त्रें दिल्हीं. त्या समयीं त्र्यंबक सदाशिव उर्फ नाना पुरंदरे यांस मुतालकीचें कामावर सातारीयास महादाजी आंबाजी यांनीं ठेवून, आपण पेशवे यांजबरोबर पुण्यास आले. सन ११५३ या सालीं पेशवे यांनीं महादाजी आंबाजी यांस ज्यास्ती सरंजाम व नेमणुकी करून दिल्हा व बक्षिस दिल्हें. राज्य-

कारभार पेशजीप्रमाणें चालला असतां, दरम्यान सन ११६० या सालीं सदाशिव चिमणाजी उर्फ भाऊसाहेब, नानासाहेब पेशवे यांचे चुलतबंधू, यांचें मनांत आलें कीं, पेशवाईचा कारभार आपण करावा. त्याजवरून त्यांनीं दोन तीन वर्षें वहिवाट केली. परंतु महादाजी आंबाजी यांजकडे सरंजाम नेमणुकी वगैरे दरोबस्त चालत होते. त्याच्या यादी नानासाहेब पेशवे यांनीं आपले हातचे कराराच्या सन ११६२ या सालीं करून दिल्ह्या. सुरुसन सल्लास खमसैन मया व अलफ छ १५ रमजान.

१२०००० जातसरंजाम बितपशील याद:—

१००००० नक्त बेरीज ह्मणोन गांव व महाल लावून दिल्हे आहेत.

२०००० कापड व हरएक दागिना जवाहीर १०००० सोनेंरुपें वगैरे १००००.

१२००००

५०००० शिवाय असाम्या व लष्करची मजमू व वर्षासनें वगैरे याचें उत्पन्न त्याची बेरीज अजमासें रुपये.

१७००००

७०००० फौजेचे बेगमीस सरंजाम, कारण हैदराबादचे नवाब निजामउल्मुलूख मयत जाहले, नासरजंगावर गर्दी जाहली, हें राजकारण जाहलें. त्याकाळीं नानासाहेब पेशवे यांनीं महादाजी आंबाजी यांस सरदारी दिल्ही. त्याबद्दल फौजेचा सरंजाम बरहुकूम यादी व पुत्र निळकंठ महादेव पुरंदरे यांचें नांवें पुणें देशाचा सुभा करार करून देऊन महादाजी आंबाजी यांस पेशवे यांनीं स्वारीबरोबर घेऊन गेले.

येणेंप्रमाणें महादाजी आंबाजी यांचे पेशवे सरकार चालवीत होते. नंतर सन ११७० या सालीं महादाजी आंबाजी यांचा काळ जाहला. त्यांस पुत्र निळकंठ महादेव पुरंदरे याप्रमाणें महादाजी आंबाजी यांची वहिवाट.

१ आमचे चौथे पुरुष निळकंठ महादेव पुरंदरे यांजकडे महादाजी आंबाजी यांचे वेळचा सरंजाम व नेमणुकी चालत होत्या. सन ११७० या सालीं नानासाहेब पेशवे यांचा काळ जाहल्यावर, पेशवे यांचे वडील पुत्र माधवराव बल्लाळ उर्फ थोरले माधवरावसाहेब व निळकंठ महादेव पुरंदरे साताऱ्यास गेले. छत्रपती-महाराज यांनीं माधवरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें दिल्हीं, व निळकंठ महादेव पुरंदरे यांस दिवाणगिरी व हुजूरचे मुतालकीचीं वस्त्रें दिल्हीं. नंतर सन ११७२ या सालीं माधवराव बल्लाळ पेशवे व रघुनाथ बाजीराव उभयतां आपसांत वांकडें येऊन दुतर्फा लढाया होऊन पेशवेसरकारची दौलत खराबींत येती, असा प्रसंग गुजरला. त्याकाळीं कारभारी निळकंठ महादेव व सखाराम भगवंत बोकिल दरम्यान पडून, उभय-

तांची समजूत काढून कलह मना केला. व राक्षसभुवनचे मुक्कामीं पेशवेसरकार यांसी व मोंगलसरकार यासी लढाई मातबर जाहली. त्याप्रसंगीं निळकंठ महादेव पुरंदरे यांनीं आपलें पथक सरंजामसुद्धां कस्त मेहनत करून पेशवेसरकारचें काम मोठें नक्षाचें केलें, त्याजवरून दोन हजार फौजेचा सरंजाम ज्याजती द्यावा असे कराराची यादी करून दिल्ही. नंतर सन ११७५ या सालीं निळकंठ महादेव यांची प्रकृत बिघडली. आवरस पुत्र नाहीं, संस्थान चाललें पाहिजे, याकरितां पेशवेसरकार यांनीं सखाराम भगवंत बोकिल वगैरे पेशवेसरकारचे कारभारी यांस स्वारींतून पत्रें पाठवून, दत्तपुत्र देऊन संस्थान चालवावें असें जाहल्यावरून, त्र्यंबक सदाशिव उर्फ नाना पुरंदरे यांचे धाकटे पुत्र यास दत्तक घेऊन सन ११७५ या सालीं निळकंठ महादेव यांचा काळ जाहला. त्यासमयीं सरंजाम व नेमणुकी वगैरे चालत होते. बितपशील:—

१२०००० जातसरंजाम, कापड व जवाहिर मिळोन रुपये.

१००००० १०००० १००००

५०००० खेरीज नेमणुकी असाम्या वगैरे यांचें उत्पन्न अजमासें बेरीज रुपये.

० शिवाय कलमें.

१ गल्ला हरजिन्नस खंडी ५३।.

१ वजनी हरजिन्नस वजन पक्के ०।४।६॥६.

१ कुरणें गांवगन्ना सुमारीं १०.

१ सुमारीं जिन्नस चरसे सुमारीं ५०.

१ पुणेंनजीक कुरणापैकीं काबाडे व डोईभारे दररोज २०.

१ लष्करचे बाजारची शेव.

१ पुणियांतील गंजीपैकीं गवत ६००००.

१ दस्तकें जकातीचे माफीची. कैली जिन्नस व वजनी व कापड वगैरे सर सालांत हरएक जागांहून आणतील त्याबद्दल.

१ दस्तकें मेंढरें बुध ७००० याचे वनचराईचे माफीचें.

६२४३५७। फौजेचा सरंजाम पैकी महाल व गांव वगैरे बेरीज रुपये.

१ आमचे तिसरे पुरुष महादाजी निळकंठ. निळकंठ महादेव यांचा काळ जाहल्यावर पेशजीचा जातसरंजाम व फौजेचा सरंजाम व नेमणुकी असाम्या कायम ठेवून संस्थान चालविलें. सन ११८२ या सालीं नारायणराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें छत्रपती महाराज यांनीं दिल्हीं. त्या समयीं दिवाणगिरीचीं व हुजूरचे मुतालकीचीं वस्त्रें महादाजी निळकंठ पुरंदरे यांस दिल्हीं. नंतर सन ११८३ या सालीं पेशवे यांजवर गर्दी जाहली. त्या समयीं कस्त मेहनत केली. व हिंदुस्थानांत अलीबहादर यांजबरोबर पथक सरंजाम होता. तेथें गुलाम कादर याचे लढाईत बहुत कस्त मेहनत करून सरकारचाकरी दुरुस्त

केली. सन ११९३ या सालीं गुजराथचे महाल इंग्रजी सरकारांत घेतले. त्यांत आमचे फौजेचे सरंजामापैकीं चार लक्षांचे महाल गेले. ते पेशवेसरकार यांनीं रघुनाथ बाजीराव ऊर्फ दादासाहेब यांचे घालमिलीमुळें सरकारांत ठेविले. बाकी महादाजी निळकंठ यांजकडे चालत होते. बितपशील:—

४०३२९॥≈॥. जातसरंजामपैकीं पोतनिशीचे दरकाबद्दल येकूण रुपये.

 ३०३२९॥≈॥. १००००

२३९१३४।. फौजेचे सरंजामपैकीं.

 २४३५७।. सरदारी खर्चाबद्दल कारकून व कारभारी.

 २१४७७७ स्वार असामी ७१६ येकूण.

 २३९१३४।.

० खेरीज कलमें.

 १ कुरणें गांवगन्ना ४.

 १ दस्तकें जकातीचे माफीचीं सरसालचीं व वनचराईची माफी.

 १ बैलसर १०० शंभर देशांतन व कोंकणांतून हरएक जिन्नस आणतील त्याबद्दल.

 १ मढरें बुध ७००० चे वनचराईबद्दल.

 २

२७९४६३॥≈॥.

येणेंप्रमाणें चालत होतें. सन १२०१ या सालीं महादाजी निळकंठ यांची प्रकृत बेआराम जाहली. आवरस पुत्र नाहीं, सबब पेशवेसरकार सवाई माधवराव साहेब कारकीर्द नाना फडणीस यांनीं दत्तपुत्र देऊन संस्थान चालवावें असें करून, दत्तपुत्र घेऊन महादाजी निळकंठ यांचा काळ जाहला. सन १२०१.

१. आमचे तीर्थरूप निळकंठराव महादेव ऊर्फ आबा पुरंदर यांस पेशवे यांनीं दत्तक देऊन महादाजी निळकंठ यांचे वेळचा सरंजाम जातीचा व फौजेचा व पोतनिशी वगैरे बेरीज रुपये २८०००० दोन लक्ष ऐंशीं हजार रुपयांचा सरंजाम वगैरे कायम ठेवून चालवीत होते. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब, होळकर गर्दीत वसईस गेले. त्यांजबरोबर निळकंठ महादेव होते. सरकारचाकरी दुरुस्त करून सरकारची मर्जी संपादन केली होती. खेरीज सरकार इतलाखी फौज स्वार शिबंदी ठेवण्याचें काम सांगून त्याचे खर्चास ऐवज पोतापैकीं हुजुरून दरमाहाचे दरमाहा देत होते. याप्रमाणें सन १२२७ लढाईअखेर चाललें. नंतर कुंपणी सरकारचा अंमल जाहल्यावर कुंपणी सरकारांतून जातीचे खर्चास सरंजाम गांव लावून दिल्हे. ती बेरीज रुपये ५०३२९॥≈॥. खेरीज सन १२२९ या सालीं आबासाहेब यांचे कन्येचें लग्न जाहलें. त्याजबद्दल कुंपणी सरकारांनीं खजिन्यांतून रुपये १५००० देविले.

नंतर सन १२३५ या सालीं निळकंठ महादेव यांची प्रकृत नादुरस्त जाहली. आवरस पुत्र नाहीं. सबब दत्तपुत्र घेण्याविषयीं सरकारांत यादी दिल्ही. त्याजवर मेहेरबान च्यापलीन साहेब बहादूर यांनीं हुकूम दिल्हा. त्याजवरून सन १२३६ या सालीं आह्मांस आबा-साहेब पुरंदरे यांनीं दत्तक घेऊन त्यांचा काळ जाहला.

१ हल्लीं आह्मीं खुद्द माधवराव निळकंठ पुरंदरे. आबासाहेब यांचा काळ जाहल्या-वर, कुंपणी सरकारांनीं दरोबस्त सरंजाम जप्ती करून, आबासाहेब यांच्या मातुश्रीया २ यांस पेनशीन रुपये ३०००, व आबासाहेब यांच्या स्त्रिया २ यांस पेनशीन रुपये ३०००, व आबासाहेब यांची कन्या, त्यास पेनशीन ३००, व आप्तमंडळी व बायाकडील कारकून यांस पेनशनें करून चालवितात; आणि आह्मांस सरकारांतून हुकूम देऊन संस्थानावर मालक करून ठेविलें. खानदानीचा खर्च, घोडीं, माणसें वगैरे सर्व खर्च आह्मांकडे असतां आमचे खर्चाची तजवीज सरकारांनीं कांहींच केली नाहीं. यामुळें या खानदानीची हुरमत सर्वो-परीं खराब होत आहे. या बाबें सरकारांत अर्ज करीत आहों व हल्लीं सरकारांनीं या कैफियतींतील कलमा कलमांचा बयाज दिलांत आणल्यावर जाहीर होईल.

१. आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ह्मणोन लिहिलें. त्यास ज्या पुरुषाची कारकीर्द त्यांनीं आपले जहागिरीची वहिवाट आपले मुखत्यारीनेंच केली. पेशवे सरकारांतून दखलगिरी कांहीं होत नव्हती.

१. आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे ह्मणून लिहिलें. त्यास आमचे पांच पिढ्यांचे पुरुषांनीं लौकिक करून लाखों रुपयांचा सरंजाम पेशवे सरकारांनीं देऊन चालविलें. व त्याच सिलसिल्यावर कंपनी सरकारचा अंमल जाहल्यावर तीर्थरूप आबा-साहेब यांचें कुंपणी सरकारांनीं कांहीं सरंजाम देऊन चालविलें. हल्लीं आह्मांकडे सरंजाम कांहीं चालत नाहीं, याजमुळें मोठी लाचारी आहे. त्यास तजवीज करणें सरकाराकडे आहे.

१. पेशवे सरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणी सरकारांतून चालत आहे; त्यांत कंपेश तफावत काय आहे ह्मणोन लिहिलें. त्यास पेशवे सरकार यांनीं या खानदानीचा इरादा चिरंजीव ह्मणोन आपले बरोबरीनें मातबरी चालवीत होते. आणि हल्लीं कुंपणी सरकारांतून मातबरी कशी ठेविली आहे, त्यांत कंपेश तफावत किती आहे, हें दरनें कलमावरून दिलांत येईल.

१. खेरीज लग्नें व मुंजी वगैरे हरएक कार्यप्रयोजन प्रसंग आला असतां, पेशवे सरकार यांनीं आपलें घराप्रमाणें मोजून, नक्त ऐवज व सामान सरंजाम आदिकरून सर्वोपरीं तजवीज सरकार करीत होते.

येणेंप्रमाणें लिहिलें आहे. त्यास सरकारांनीं मेहेरबानी करून सारे कलमा कलमांचा बयाज दिलांत आणिला पाहिजे. मिती श्रावण वद्य १२ शके १७५५ विजयनाम संवत्सरे छ २५ रबिलावल.

## १५ पेठ्ये.

यादी त्रिंबकराव अमृतेश्वर पेठ्ये सुरुसन आर्बा सलासिन मयातैन व अलफ. मेहेरबान ज्यान वार्डिन साहेब बहादूर डेपूटी एजंट जिल्हा दक्षण यांनीं तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें पत्र इज्यानिबास पाठविलें. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत जे, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी, यास्तव सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतन कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवेसरकारांतन आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतन चालत आहे, त्यांत कमपेश तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केले पाहिजे ह्मणोन. त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो. बितपशीलः— कलमें.

१ आमचे निपणजे बाबूराव कृष्ण हे नागपूरवाले भोसले यांजपाशीं प्रथम मोठे योग्यतेनें होते. त्यांचे पुत्र आमचे पणजे त्रिंबकराव विश्वनाथ. यांस नागपुराहून संस्थानचें कामाकाजास्तव महाराजांकडे सातान्यास पाठविलें. तेथें राहून नागपूरचें संस्थानचें बोलणें बोलून महाराजापाशीं मोठे इराद्यानें कामकाजांत वागत होते. पुढें पेशवेसरकारांनीं हे मुत्सद्देगिरीचें वगैरे सर्व कामाचे बंदोबस्तालायख याजकरितां आपलेपाशीं ठेवून घेतले. पुढें श्रीमंत पेशवे यांचा शरीरसंबंधही जाहला. त्यानंतर महाराज राजे छत्रपती सातार संस्थानीं त्यांजकडील तेथील बंदोबस्ताचें, सर्व डौलाचें काम, त्रिंबकराव विश्वनाथ आमचे पणजे यांजकडे पेशवेसरकारतर्फेनें सांगितलें. त्याजवरून सातार संस्थानचें काम अखत्यारीनें करीत होते. कलम.

१ सन इसने (सबैन) मया व अलफचे सालीं श्रीमंत कैलासवासी माधवराव साहेब यांनीं हैदरखान यांजवर कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टणास मोहिमेस स्वारी केली. त्या प्रांतीं कांहीं दिवस राहून श्रीमंतांस शरीरीं समाधान नाहीं, याजमुळें माघारे देशीं येण्याचें ठरलें. ते समयीं आमचे पणजे त्रिंबकराव विश्वनाथ यांस कुलफौजेची मुखत्यारी, शिक्के, कट्यार, जरीपटका वगैरे इतमाम फौज हुजूरांत मानकरी सरदार आनंदराव रास्ते, व गोपाळराव मिरजकर वगैरे तैनातीस देऊन श्रीमंत देशीं माघारे आले. त्यानंतर हैदरखान यांजकडील किल्ले व संस्थानें यांशीं लढाया घेऊन, किल्ले, संस्थानें, सर करून, पुढें खासा हैदरखान यांशीं मोतीतलावनजीक श्रीरंगपट्टण मुक्कामीं मातबर लढाई होऊन, हैदरखां यांस शिकस्त करून पट्टणची वगैरे खंडणी घेऊन, याशिवाय संस्थानच्या खंडण्या ठरावून, आणखी मुलूख सर

करण्याचे मसलतींत होते. तों देशीं श्रीमंतांचे प्रकृतीस समाधान नाहीं, याजमुळें फौजसुद्धां देशीं यावें, अशीं पत्रें आमचे पणजे त्रिंबकराव विश्वनाथ यांस गेलीं. त्याजवरून तिकडील बंदोबस्त करून फौजेसुद्धां निघोन माघारे आले. त्यानंतर कांहीं दिवसांनीं श्रीमंत माधवराव साहेब कैलासवासी जाहले. पुढें राज्यांत बखेडा होऊन श्रीमंत नारायणरावसाहेब मारले गेले. पुढें श्रीमंत कैलासवासी दादासाहेब यांनीं नवाब यांजवर मोहिम केली. बेदरचे मुक्कामीं नवाबांचे व यांचे तह रद्द होऊन, कर्नाटक प्रांतीं मोहिम करावी, तों मातुश्री गंगाबाईसाहेब पेशवी पुरंदरास निघून गेली. त्याजमुळें दादासाहेबांचे फौजेंत फितूर होऊन आमचे पणजे त्रिंबकराव विश्वनाथ फौज घेऊन दादासाहेबांचे लष्करांतून बाहेर पडले. आणखी फौज जमावून मातुश्री गंगाबाईसाहेब यांचे तर्फेनें वागूं लागले. सबब दादासाहेबांची व यांची कासेगांवनजीक पंढरपूर येथें लढाई जाहली. त्या प्रसंगीं जखमा लागून आमचे पणजे त्रिंबकराव विश्वनाथ सरकारकामास आले. त्यामागें आमचे आजे विश्वासराव त्रिंबक हे सरकारचे कामकाजांत वागत होते. त्यांचे चिरंजीव अमृतराव विश्वनाथ आमचे तीर्थरूप सरकारांत मुतालकीचें काम करीत होते. याप्रमाणें लौकिक सर्वांस महशूर आहे. वडिलांचे इरायाप्रमाणें आह्मी श्रीमंतांचे स्वारीबरोबर खडर्यास नवाब यांजवर गेलों होतों. कलम.

१ आह्मांकडे सरंजाम जातीस व फौजेस वगैरे बितपशील:—

५०००० खासगत संसारबेगमीस सरंजाम महाल व देहेहाय व इतलाख नेमणूकसुद्धां.

५००० इनामी गांव व जमिनी मिळोन.

६०००० फौजेस सरंजाम स्वार असामी २०० दोनशें एकूण आकार रुपये.

११५०००

येकूण एक लक्ष पंधरा हजारांचा सरंजाम व खेरीज कापडखर्च २००० दोन हजार व कुरणें व बाग. कलम.

१ सरंजामाची वगैरे नेमणुका करून दिल्या. त्या तारखा बितपशील:—

१ खासगत संसारबेगमीस सरंजाम महाल व देहेहाय व इतलाख नेमणूकसुद्धां ठरावून याद सरकारचे कराराची करून दिल्ही. सन समान खमसैन मया व अलफचें सालीं. कलम.

१ इनामी गांव व जमिनी. कलम.

१ कैलासवासी महाराज आईसाहेब यांनीं दिले ते गांव व जमीन.

१ मौजें किवळें दरोबस्त, तर्फ हवेली प्रांत पुणें. सन समान आर्बैन मया व अलफ तारीख २४ जिल्हेजचें सालीं. भोगवट्यास सनद श्रीमंत बाळाजी बाजीराव प्रधान यांनीं करून दिल्ही.

१ मौजें चिंधोली संमत निंब प्रांत वाई याची सनद श्रीमंत माधवराव पंडित प्रधान यांनीं भोगवट्यास करून दिल्ही. सन इसन्ने तिसैन मया व अलफ. शके १६८३ छ २० मोहरम.

१ मौजें सोनगांव तर्फ सातारा प्रांत मजकूर येथील जमीन मोटसस्थळ व पाटसस्थळ व जिराईत व बागाईत कुरणसुद्धां जमीन चाहूर १॥३॥४ याची सनद सन सितैन मया व अलफ छ १९ जमादिलावल भोगवट्यास पत्रें पेशवे यांचीं सन सीत सितैन मया व अलफ. शके १६८७ छ २७ रमजान श्रीमंत माधवराव पंडित यांची.

३

१ पेशवेसरकारांतून गांव व जमिनी इनाम करून दिल्ह्या. बितपशील:—

१ मौजें कोयाली तर्फ चाकण प्रांत जुन्नर येथिल जमीन चाहूर १ एक, सनद सन सीत आर्बैन मया व अलफ छ २४ जमादिलाखर.

१ मौजें जलालपूर प्रांत नाशिक सरकार संगमनेर सुभे खोजस्ते बुनयाद सनद सन आर्बा खमसैन मया व अलफ छ २० रबिलाखर.

१ मौजें मुंगसरें परगणे दिंडोरी सरकार संगमनेर सनद सन समान सबैन मया व अलफ शके १६९९ छ २० जिल्हेज.

२ ३

येकूण देहे ४ व जमिनी.

१ फौजेस नेमणूकी सरंजाम महालानिहाय व देहाय व मोकासे व आसाम्या वगैरे सुद्धां नेमणुकीच्या सनदा सन सबैन मया व अलफचें सालीं.

१ कुरणें व बाग वहिवाटीस होती.

१ बेट बाग कसबें पुणें येथील मुंजेरीच्या जमिनींपैकीं संगम येथें.

१ कुरणें

१ मौजें गहूजें तर्फ हवेली प्रांत पुणें, तालुके सिंहगड नदीचे कांठचे नंबर.

१ कसबें कडूस येथील.

१ मौजें पिंपळगांव तर्फ चाकण येथील नंबर.

३ ४

१ कापडाचे आखाची नेमणूक सन समान खमसैन मया व अलफचें सालीं.

५

कलम.

१. सरंजामाचे वहिवाटींत पेशवे सरकारांतून दखलगिरी होत नव्हती. आमचे आम्ही मुखत्यारीनें दखलगिरी राखून वहिवाट करित होतों. सन अर्बा मयातैन व अलफचें सालीं श्रीमंत बाजीराव साहेब यांनीं आह्मांकडून सरंजाम वगैरे काढून सरकारांत घेतला.

१. आह्मांकडील सरंजाम घेतल्यातागाईत आजपावेतों कांहीं चालत नाहीं. सन

आर्बाचे सालापासून नक्त रुपये पोंचत होते. पुढें कुंपणी सरकारांतून दोन हजार रुपये सालिना पेनशन करून दिल्हें. त्याप्रमाणें पोंचत आहे. खेरीज जमीन मौजें कोयाली तर्फ चाकण येथील चालत आली, त्याप्रमाणें वहिवाटीस आहे. कलम.

१. पेशवे सरकारांतून आमचे मातबरीचे योग्यतेचे इरादे बितपशीलः—

१ पेशवाईचीं वस्त्रें महाराजांकडून आणावयाचीं तीं आह्मीं आणावीं, ऐसा इरादा आह्मांकडे होता. व महाराजांची स्वारी पुण्यास आल्यास महाराजांस सामोरे जाऊन आणावयाचें व पोंचवावयाचें, हा इरादा आमचा आहे. कलम.

१ स्वारींत श्रीमंतांचे पाठीमागें चालावयाचा इरादा व कचेरींत आह्मांस खडी ताजीम श्रीमंत देत होते. कलम.

१ दसऱ्याचा पोषाख सनगे ३॥ किंमत रुपये ३०० तीनशें.

१ आमचे तैनातीस सरकारांतूनः–

१ पिलखान्यांपैकीं हत्ती, अंबारीसुद्धां होता.

१ हुजूरपागेपैकीं खाशीं घोडीं रास ४ चार होतीं.

१ चोपदार सरकारचे जथ्यांपैकीं आम्हांकडे पांच राहत होते. कलम.

३

१ श्रीमंतांची स्वारी संस्थानीं व सरदार यांजकडे मेजवानीस गेले असतां तेथें श्रीमंतांबरोबर आह्मांस पोषाख येत होता.

५

१ हल्लीं कुंपणीसरकारांतून दसऱ्याचा पोषाख सनगें २ दोन येत आहेत.

येणेंप्रमाणें कैफियतीचीं कलमें लिहून पाठविलीं आहेत. त्यांजवरून साहेबांचे दिलांत येईल. पूर्वीच्या वहिवाटींत व हल्लींचे वहिवाटींत कंपेश तफावत काय आहे तें वगैरे सदरीं लिहिल्यावरून दिलांत आणून, आमचा सर्व प्रकारें बंदोबस्त करून देणार, साहेब खुदावंत आहेत. तारीख ६ माहे जुलई सन १८३३ इसवी. छ १७ सफर.

---

## १६ पंडितराव.

यादी राजश्री रघुनाथराव रामचंद्र पंडितराव राजउपाध्ये यांजकडील माहितगारीचीं कलमें:—

१ श्रीमन्महाराज कैलासवासी शिवाजी राजे छत्रपती यांस राज्याभिषेक शके १५९६ आनंदनाम संवत्सरीं जाहला. ते समयीं आमचे पूर्वज रघुनाथभट व भास्करभट ऊर्फ मल्हारभट राजउपाध्ये यांसी पंडितराई रघुनाथभट यांस दिल्ही. हे अष्टाधिकार करीत होते. याचा दाखला परभारा असेल. संभाजीमहाराज व त्यांचे पुत्र शाहूमहाराज यां उभयतांस दिल्लीस नेलें तोंपावेतों अष्टाधिकार करीत आले. कलम.

१ राजारामसाहेब शिवाजीमहाराजाचे कनिष्ठ पुत्र चंदीचंदावरास गेले. त्यांजबरोबर रघुनाथभट उपाध्ये पंडितराव गेले. पुढें राजारामसाहेब देशीं चंदावराहून आले. त्यांसीं राज्याभिषेक जाहला. ते समयीं श्रीकराचार्य यांस पंडितराई जाहली—शाहूमहाराज दिल्लीहून येईपर्यंत. कलम १.

१ संभाजीमहाराज छत्रपती यांचे पुत्र शाहूमहाराज व पत्नी येसूबाई यां उभयतांस दिल्लीस नेलें. त्यांजबरोबर मुद्गलबावा राजउपाध्ये जाऊन श्रमसायास बहुत केले. शाहूमहाराज दिल्लीहून देशीं आले, त्यांजबरोबर मुद्गलबावा राजउपाध्ये आले. महाराजांस राज्याभिषेक शके १६२९ सर्वजितनाम संवत्सरीं जाहला. मुद्गलबोवा राजउपाध्ये यांचे श्रमसायास बहुत जाणून कृपाळु होऊन पंडितराईचे अष्टाधिकार व कटक ज्योतिषपणाची वृत्तीही दिल्ही. पूजा पूर्वापार करीतच होते. पुढें कांहीं कारणास्तव यादवभट उपाध्ये चंदावराहून आणविले. ते वेळेस पंडितराईचे अष्टाधिकार ठेऊन उपाध्येपणाचा अंश व कटक ज्योतिषपणाचा विभाग मुद्गलबावा यांनीं दिल्हा. नंतर मुद्गलबावा व त्यांचे पुत्र रघुनाथराव पंडितराव राजउपाध्ये आमचे आजे हें दरोबस्त पंडितराईचे अष्टाधिकार व पूजा शाहूमहाराज अखेरपर्यंत करीत होते. शके १६७१. कलम.

१ रामराजेमहाराज यांसी राज्याभिषेक जाहला, ते समयीं मातोश्री ताराऊसाहेब यांनीं पेशजीचा आमचे वडिलांचा कांहीं कारणास्तव वांकडेपणा पडला होता. हें आईसाहेबांनीं मनांत आणून, आमचे आजे रघुनाथराव मुद्गल पंडित राजउपाध्ये यांजकडील पंडितराईचा अधिकार काढून धोंडोबा उपाध्ये यांस दिल्हा. शके १६७२ प्रमोदनाम संवत्सरे. आईसाहेब होती तोंपर्यंत आमचे वडिलांस वृत्तीसुद्धां देखील दिल्हें नाहीं. पूर्वी आमचे वडील वहिवाट करीत होते, त्याप्रमाणें रामराजे यांचे अखेरपावेतों दरोबस्त एकंदरीनें तेच करीत गेले. शके १६९९. कलम.

१ धाकटे शाहूमहाराज छत्रपती आबासाहेब यांसी राज्याभिषेक शके १७०० विलंबनाम संवत्सरीं जाहला. ते समयीं पंडितराई आमचे वडील रामचंद्र रघुनाथ यांजकडे जाहली. आबासाहेब महाराज यांची मुंज व लग्न आमचे वडिलांचे मांडीवर जाहलें. त्याप्रमाणें वहिवाट आजपावेतों आह्मींही करीत आहों.

येकूण पांच कलमें लिहिलीं आहेत. तेरीख छ २१ जिल्काद, शके १७४७ आषाढ वद्य ७.

---

## १७ पंत प्रतिनिधी.

यादी श्रीमंत राजश्री पंतप्रतिनिधी यांचे मूळपुरुषास प्रतिनिधीपणाची पद्वी मिळाली व त्या अलीकडे चालत आली त्याचा तपसील. सुरुसन सलास खमसैन मयातैन व अलफ.

१ परशराम त्रिंबक कुळकर्णी मौजें किनई यांणीं कैलासवासी राजारामसाहेब महाराज

जपाशीं नोकरी संपादून लढाया वगैरे करून राज्याचा उपयोग केला. सबब राजाराम महाराज यु पावल्यावर त्यांची स्त्री ताराबाई यांणीं, आपला पुत्र शिवाजी यांस तक्ताधिपती केला; ार सन १६९९ इसवी ह्मणजे शके १६२१ सालीं माहे मार्च म्हणजे फाल्गुनमासीं परशराम बक यांस प्रतिनिधीपणाचें पद दिल्हें.

१ सन १७१८ इसवी ह्मणजे शके १६४० सालीं माहे जून ह्मणजे ज्येष्ठ सुमारें, ्शराम त्रिंबक मरण पावले. नंतर राजा शाहू छत्रपती यांजपाशीं सेवाचाकरी बहुत एक-ष्ठेनें परशरामपंत यांचे पुत्र यांनीं केली. सबब त्यांजकडे प्रतिनिधीपणाचें पद चालवून ोबस्त राज्यकारभाराची अखत्यारी दिल्ही. त्यांचें नांव श्रीनिवास परशराम.

१ सन १७४४ इसवी ह्मणजे शके १६६६ सुमारें, श्रीपतराव मरण पावले. त्यांस त्र नाहीं. यास्तव त्यांचे धाकटे बंधु जगजिवनराव यांस प्रतिनिधीपणाचें पद शाहूमहा-ाज यांनीं दिल्हें.

१ सन १७५० इसवी ह्मणजे शके १६७२ सुमारें, जगजिवनराव प्रतिनिधी ारण पावले. त्यांस पुत्र नाहीं. सबब त्यांचे पुतणे श्रीनिवास गंगाधर ऊर्फ भवानराव ांस विशाळगडाहून आणवून प्रतिनिधीपणाचें पद रामराजे यांचे कारकिर्दीस जाहलें. ान १७६३ इसवी ह्मणजे शके १६८५ सुमारें, रघुनाथराव पेशवे यांणीं भवानराव यांज-कडील प्रतिनिधीपणाचें पद काढून, आपला पुत्र भास्करराव यांस पद देऊन नारो शंकर यांस मुतालिक केलें. नंतर भवानराव यांणीं फौज ठेऊन व निजाम सामील करून घेऊन पुण्यावर चढाई करून आले, व भास्कररावही मृत्यु पावले. तेव्हां पूर्वीप्रमाणें भवानराव यांजकडे प्रतिनिधीपणाचें पद पेशवे यांणीं चालवून भवानराव यांचा समेट करून घेतला.

१ सन १७७७ इसवी म्हणजे शके १६९९ माहे आगष्ट ह्मणजे श्रावणमासीं श्रीनिवास गंगाधर ऊर्फ भवानराव प्रतिनिधी मरण पावले. तो अधिकार त्यांचे पुत्र परशरामपंत यांस जाहला.

१ सन १८०६ इसवी ह्मणजे शके १७२८ सालीं परशराम श्रीनिवास प्रतिनिधी यांची व बाजीराव पेशवे यांजकडील सरदार बापू गोखले यांची लढाई होऊन, पेशवे यांणीं परशरामपंत यांस कैदेंत ठेऊन, मोठा मुलूख होता तो घेऊन, पुढें दोन लक्ष कमालाचा मुलूख जातीचे खर्चाबद्दल देऊन कैदेंतून सोडिलें. त्यांस पुत्र नाहीं, सबब ते असतांना त्यांणीं तारीख १८ माहे मार्च सन १८४७ इसवी चैत्र शुद्ध २ शके १७६९ रोजीं, महाराज सरकार व इंग्रजीसरकार यांचे हुकुमानें मौजें हिवरें येथील आपले गोत्रज वतनभाऊ यांजपैकीं दत्तक पुत्र घेऊन त्याचें नांव श्रीनिवास परशराम ठेविलें. नंतर परशराम श्रीनिवास सन १८४८ इसवी, शके १७७० वैशाख शुद्ध ८ रोजीं मरण पावले.

१ श्रीनिवास परशराम प्रतिनिधी यांजकडे हल्लीं ती दौलत चालत आहे.

येणेंप्रमाणें प्रतिनिधीपणाचें पदाची वहिवाट होत आली. तारीख ३० जून सन १८५२ इसवी.

## १८ फडके.

यादी पांडुरंग माधवराव फडके सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. तारीख ८ माहे सपटंबर १८३२ इसवीचें पत्र डिपुटी एजंट यांचे कचेरीहून आह्मांस आलें. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत जे, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे याची वाकबगारी व्हावी, यास्तव आपण मेहरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडे मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे ह्मणोन. त्याजवरून आह्मांकडील मजकूर लिहिण्यांत येतो. बितपशीलः—

१ आपली खानदानीची बढती कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला. या कलमाचें उत्तरः—आमचे पणजे बाळंभट फडके गुहागरचे वतनदार पुण्यास येऊन सदाशिव दीक्षित पटवर्धन यांचे पदरीं राहिले. आदितवार पेठेची वसाहत यांचे हातें जाहली. त्यांचे पुत्र बापूजी बल्लाळ व आमचे आजे हरी बल्लाळ दिक्षीताचे योगेंकरून सरकारांत जाऊं, येऊं लागले. लिहिणार चांगले. त्याजवरून दप्तरच्या असाम्या फडणीशीकडेस दोघांसही जाहल्या. श्रीमंत भाऊसाहेब पेशवे पाणिपतचे स्वारीस गेले. त्या वेळेस नाना फडणीस यांचें वय लहान, सबब त्यांचा कुलकारभार फडणीशीचा बापूजी बल्लाळ यांनीं केला. त्या लढाईंत ते सरकारकामास आले. पुढें श्रीमंत थोरले माधवरावसाहेब यांनीं हरिपंत तात्या लिहिणार व हजर जबाबी, सरकार उपयोगास एकनिष्ठ, असें ध्यानास आणून, दिवसेंदिवस मोठीं मोठीं कामें धरूं लागले. शके १६९१ त कर्नाटकचे स्वारींत फौजेचें काम सरदार, मानकरी व सरंजामी व इतलाखी फौजेची बरदास्त बाजू ज्याची त्याप्रमाणें यांचे हातें राहत गेली, यामुळें लौकिक महशूर जाहला. कर्नाटकांतील संस्थानिक यांच्या तोडजोडी, खंडणीचे जाबसाल व नागपूरवाले भोंसले यांचें राजकारण तात्यांचे हातें सिद्धीस गेले, वगैरे उपयोग श्रीमंतांनी मनांत आणोन, बाणकोट इलाख्यांत केळसी महालची देशमुखी वतनी करून दिल्ही. पुढें थोरले माधवराव शके १६९४ त वारले. नंतर श्रीमंत नारायणरावसाहेब यांची गर्दी जाहली. त्या वेळेस सखारामबापू सरकारचे कारभारी व नानाफडणीस व हरिपंत तात्या यांनीं बाईसाहेब नारायणराव यांची स्त्री यांस पुरंदरावर नेऊन राजकारण केलें. त्यांस यश येऊन श्रीमंत सवाईमाधवराव जन्मले. त्यांच्या प्रतापें शिंदे, होळकर व गाईकवाड सुद्धां यांचें संधानानें वागों लागले. श्रीमंत दादासाहेब इंग्रजाचें संधानानें वागोन राज्य करावें, या इरायानें फौज धरून स्वाऱ्या करीत होते. त्यांचे मसलतीस भोंसले व मोंगल सामील करून तात्या पाठीस लागले. ते लढाया होतां होतां, आनंदमोगरीवर तह तात्यांचे हातें होऊन, त्यांचें सर्व लष्कर तात्यांचे गोटास मिळालें. नंतर तळेगांवची लढाई जाहली, व येदगीरची स्वारी व बदामीची

स्वारी जाहली. त्याजवर कर्नाटकांतील मसलत, टिपूसुलतान यांजवर, इंग्रज व मोंगल व पेशवे तीन सरकारें एक होऊन जाहली. त्यावेळेस पेशवेसरकारचे कुल कुला हरिपंत तात्या यांचे सलाहास मसलतीस जें आलें, तें हरदू सरकार पसंत करीत होते. मोठ्या तवाया सोसून लढाया देऊन आपली फौज बचावून टिपूसुलतान यांस कबजेंत आणून त्यांची दौलत रक्षिली; आणि लक्षावधी रुपयांचा मुलूख व करोडो रुपयां(ची) खंडणी घेऊन तिन्ही सरकारची आबादी केली. तो मुलूख हाल फिकल(?) सरकारें अनुभवीत आहेत. तात्यांचे पाठीमागें रामचंद्र हरी, त्यांस बाबा फडके ह्मणत, तेही सरकारकामांतच वागत होते. जरीपटका व पांचशें स्वारांचें पथकसुद्धां सरकारचाकरींत होते. आमचे तीर्थरूप माधवराव तात्या यांनीं कुलाबेयाची स्वारी आंगरे यांजवर केली. खर्ड्याचे स्वारींत चुलते बाबा फडके होते. खासां स्वारी नवाबावर होऊन श्रीमंतांची फत्ते जाहली. पुढें श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब राज्यावर आले. त्यांस आमचे चुलते दाजीबा यांची कन्या देऊन शरीरसंबंधही केला. परंतु त्यांनींच जहागीर वगैरे सर्व जप्ती केली. कर्नाटकाचा सरसुभा मुतालकेची शिक्के-कटारसमेत व आणखी मामलती सुवर्णदुर्ग वगैरे चुलत चुलते मोरो बापूजी यांजकडे होते. तेही सरकारांनीं घेतले. कलमें.

२ फौज व जातसरंजाम दोन लक्षांचा चालत होता. त्यापैकीं हल्लीं कांहींच नाहीं. सबब, जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतोन दखलगिरी कोणते तऱ्हेनें केली व सरंजाम कोणते तारखेस दिल्हा, याचें उत्तर लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. कलम.

३ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश तफावत काय आहे? याचें उत्तरः—कंपेश तफावत ल्याहावयाजोगें नाहीं. कोंकणचीं वतनें व गांव व खोत्या वगैरे आमचे इमेल, याचे उत्पन्नाऐवजी श्रीमंत हुजूर खर्चास देत होते. तोच बोध कंपणीसरकारांनीं पाहून आमची वतनबाब आह्मांकडे चालविली व पेनशन करून दिल्हें आहे. त्याजवर गुजारा करून आहों. कलम.

सदरहूप्रमाणें आह्मांकडील खानदानीचा वगैरे मजकूर आहे. तारीख ११ माहे मे सन १८३३ इसवी. मिती वैशाख वद्य ९ शके १७५५.

सही पांडुरंग माधवराव फडके खुद्द.

---

## १९ मेणवलीकर फडणीस.

### अ

साहेब मुषफक मेहेरबान कर्मफर्माय दोस्तां हेनरी ब्रौण साहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण दाम मोहोबत हूः—

छ अजी दिल एखलास महादाजी बल्लाळ फडणीस सलाम बाजद सलाम अंकीं येथील खैरयत जाणून आसाहेबीं आपली खैर अफियत हमेषा कलमीं करीत असलें

पाहिजे. दिगर आसाहेब बहादूर यांजकडून तारीख २६ आगष्ट सन १८५१ इसवीचें खत आलें, तें पाहून फार खुषी जाहली. त्याचें उत्तर लिहिण्यांत येत आहे जें:—

१ आपणास किताब फडणीस हें पद आहे, हें कधीं कोणत्या सबबेनें प्राप्त जाहलें त्याचें उत्तरः—बाळाजी विश्वनाथ राहणार श्रीवर्धन व आमचे पणजे बाळाजी महादेव राहणार वेळास तालुके सुवर्णदुर्ग, यां उभयतांचें राहण्याचें गांव चार कोसांचें अंतरानें आहेत. दोघांचा अती स्नेह. हे उभयतां रोजगाराचे उद्देशें सातान्यास थोरले शाहूमहाराज यांजकडे येऊन महाराजांची भेट घेऊन कृपा संपादन केली. पुढें शके १६३४ सन १७१२ इसवीं सालीं बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाईचीं वस्त्रें जाहलीं. त्या वेळेस आमचे पणजे बाळाजी माहादेव यांस फडणीशीची वस्त्रें होऊन उभयतांस प्रथम दिल्लीचे मोहिमेस पाठविलें. तेथें युद्ध करून बाळाजी विश्वनाथ पेशवे यांजवर गर्दी करावी आणि धरावें असा प्रसंग आला. त्या समयीं बाळाजी विश्वनाथ यांचें संरक्षण व्हावें या हेतूनें त्यांस काढून देऊन त्याचे जाग्यावर बाळाजी महादेव राहिले. बादशाहांनीं शोध करितां बाळाजी विश्वनाथ पळोन गेले. ते बाळाजी महादेव यांनीं काढून लाविले. हें मनांत आणून यांजवर युद्धप्रसंग केला. त्या युद्धप्रसंगांत स्वामीकार्यावर दिल्लीच मुक्कामीं मृत्यु पावले. बाळाजी महादेव यांचे बंधु रामाजी म[illegible]देव व आमचे आजे जनार्दन बल्लाळ यांस फडणीशीचें कामावर मुकरार केलें. उभयतां वारल्यावर रामाजी महादेव यांचे पुत्र बाबूराव राम फडणिशीचे दरकाचें काम करूं लागले. त्या काळीं आमचे वडील नाना फडणीस लहान होते. पुढें भाऊसाहेब पेशवे पाणिपतचे स्वारीस निघाले, तेव्हां पुणें मुक्कामीं फडणीशीचें कामावर बाबूराव राम राहून स्वारीबरोबर भाऊसाहेब यांनीं नाना फडणीस यास घेतलें. ते वेळेस नाना फडणीस यांचें वय चौदा वर्षांचें होतें.

१. एकंदर खानदानीची पदवी व थोरपणाचा इतिहास दाखल्यानिशीं लिहून यावा ह्मणून. याचें उत्तरः—बाळाजी महादेव यांस फडणीशीचें दरकाचें काम थोरले शाहूमहाराज यांनीं दिल्हें. त्यांचे बंधु रामाजी महादेव व पुत्र जनार्दन बल्लाळ व बाबूराव राम व नाना फडणीस यांचे हातून फडणीशीचें दरकाचें काम, थोरले बाजीरावसाहेब व चिमाजी आप्पासाहेब व नानासाहेब व भाऊसाहेब पेशवे यांचे कारकीर्दींत हिंदुस्थान वगैरे स्वाऱ्या केल्या त्यांत मोठेमोठे पानिपतासारखे प्रसंग जिवानिशीं जाण्याचे गुजरले, तितक्यांतून निभावून थोरले माधरावसाहेब यांचे कारकीर्दीअखेर फडणीशीचें काम केलें. पुढें माधवरावसाहेब वारल्यावर नारायणरावसाहेब गादीवर बसले. त्यांजवर दादासाहेबांनीं गर्दी केली. ते वारल्यानंतर नारायणराव यांची स्त्री गंगाबाई यांस पुरंदरास नेली. तेथें सवाई माधरावसाहेब यांचा जन्म शके १६९६ सन १७७४ इसवी सालीं जाहल्यापासून नाना फडणीस यांनीं फडणीशीचे दरकाचें काम सांभाळून दरोबस्त राज्यकारभार करून टिपूवर व खर्ड्यावर स्वाऱ्या केल्या. पुढें माधवरावसाहेब उडी टाकून वारल्यावर दोन वर्षांनीं बाजीरावसाहेब गादीवर

बसल्यानंतर, नाना फडणीस यांनीं विनंती केली कीं, आह्मी अव्वल पेशवे यांचे कारकीर्दीपासून आजपावेतों श्रमसाहस करून फार मेहनत केली, हल्लीं आमचा वृद्धपकाळ जाहला, पुढें दत्तपुत्र देऊन चालविलें पाहिजे. त्याजवरून बाजीरावसाहेब यानीं करारार्ची याद करून दिल्ही. त्यांत तुह्मांस दत्तपुत्र देऊन फडणीशीचे दरकाचें काम घेऊं व पंचवीस हजारांचें इनामगांव दत्तपुत्राकडे देऊन चालवूं, याप्रमाणें करार केलें. पुढें नाना फडणीस वारले.

सदरहू मजकुरावरून, व थोरले शाहूमहाराज यांनीं राजपत्रें करून दिल्हीं, व बाळाजी विश्वनाथ व त्यांचे पुत्र बाजीराव बल्लाळ पेशवे यांनीं इनामपत्रें मौजें वाकसई तर्फ नाणेमावळ या गांवचीं प्रथम करून दिल्हीं, तीं आह्मांजवळ आहेत. त्याच्या नकला करून पाठविल्या आहेत. त्यांजवरून व वर लिहिले हकिगतीवरून फडणीशीचे दरकाचा व खानदानीचा सर्व मजकूर दिलांत येईल. रवाना छ १९ सफर सन इसन्ने खमसैन. ज्यादा काय लिहिणें, प्यार मोहोबत असों दिजे हे किताबत.

व

श्री

शिक्का.

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ४६ विकारी नाम संवत्सरे श्रावण बहुल त्रयोदशी भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती यांनीं

शिक्का शिक्का राजश्री रामाजी महादेव व जनार्दन बल्लाळ उपनाम भानु यांशीं:—

दिल्हें इनामपत्र ऐसीजे, राजश्री बाळाजी महादेव, जनार्दन बल्लाळ यांचे बाप व तुमचे भाऊ यांसी, राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांजकडे मजमूनिसबतीनें फडणीसी लिहिणेंयाचें प्रयोजन होतें. पंडित मशारनिल्हे दिल्लीस गेले. तेव्हां स्वारीबरोबर होते. दिल्लीचे मुक्कामीं युद्धप्रसंग जाहला. ते समयीं बाळाजी महादेव यांस शस्त्रघात होऊन स्वामीकार्यावरीं मृत्य पावले. याकरितां तुमचें चालवणें स्वामीस अवश्यक जाणोन, स्वामी तुह्मांवरी कृपाळु होऊन तुह्मां उभयतांस इनाम मौजें वाकसई तर्फ नाणेमावळ हा गांव कुलकानुदेखील हल्लींपट्टी व पेस्तरपेट्टीखेरीज इनामदार व हक्कदार तुह्मां उभयतांस पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें इनाम दिल्हा असे. तरी तुह्मी मौजें मजकूर चतुःसीमापूर्वक मर्यादेप्रमाणें आपले स्वाधीन करून घेऊन वंशपरंपरेनें इनाम अनुभवून सुखरूप राहणें. जाणिजे. लेखनालंकार (मोर्तब.)

---

## २० सातारा फडणीस.

सन १८५१ इसवी.

कुंपणीसरकारास.

यादी सखाराम बापूजी फडणीस अमात्य हुजूर सातारा सन १८५१ इसवी. तुमची हकीकत कशी आहे ती लिहून देणें ह्मणोन मुंबईसरकारचे हुकुमावरून थामस वोगलवी-

साहेब एस्क्वायर कमिशनर इलाखा सातारा यांनीं हुकूम केला. त्याजवरून लिहून देतों ऐसीजें:—आमचे पणजे धोंडो गोपाळ खांडेकर यांस कैलासवासी शाहूमहाराज यांनीं फडणिसीचे दरखाची नौकरी सांगितली. तेव्हांपासून सातारीयांत महाराज सरकारचे पदरीं अजमासें दीडशें वर्षे नौकर आहों. त्याविशींचे हकीकतीचीं कलमें:—

१ आमचे तीर्थरूप कैलासवासी बापु कानो यांनीं कैलासवासी प्रतापसिंहमहाराज यांचे तीर्थरूप आबासाहेब महाराज यांचे हुकुमावरून त्यांचे बंधु चतरसिंग राजे भोंसले यांजसमागमें सरकारकामाबद्दल या प्रांतीं व हिंदुस्थानांत चाकरी करीत होते. तेव्हां बाजीराव पेशवे यांनीं, चतरसिंग राजे भोंसले यांस तुमचे कामाचा बंदोबस्त मनोदयानरूप करून देतों असें विश्वासानें बोलावून कैद करून कांगोरी किल्ल्यावर ठेविलें. ते तेथेंच मृत्यु पावले. आमचे तीर्थरूप यांस किल्ले जिवधन येथें ठेविलें, व एक इनामी गांव प्राचीन होता तो जप्त केला. कैदेंत सहा वर्षे होते. ते इंग्रजी सरकारचा अंमल सन १८१७ आठरा सालीं जाहला, तेव्हां सुटले. नंतर मेहेरबान ग्रांटसाहेब बहादूर यांची मुलाकत घेऊन त्यांजला आपला मजकूर जाहिर केला. त्यांनीं महाराजसरकारांकडे जाऊन त्यांचें दर्शन घ्यावें असें सांगितल्यावरून, प्रतापसिंह महाराज यांजकडे जाऊन दर्शन घेतलें. त्यांनीं आमचे तीर्थरूपास हुकूम केला कीं, तुम्ही सरकारचाकरी नेकजादीनें व श्रमसाहास करून केली, त्यांत तुह्मांस इजा फार जाहली. आतां तुमचें चांगलें आह्मांकडून होईल तितकें करूं. अशी आज्ञा करून, फडणिशीचे दरखाचें काम खाजगी व दौलतीकडील सांगितलें, व पालखी दिल्ही, व मोठी अत्र् होण्यास्तव अष्टप्रधानांतील आमात्यपद दिल्हें, व एक गांव एक हजार रुपयांचा इनामी वंशपरंपरेनें दिल्हा व पांचशें रुपये पगार दरमहा पावत होता. ते सन १८३६।३७ इसवी सालीं मृत्यु पावले. त्यांचें वय पाउणशें वर्षांचें होतें.

२ आह्मी पंधरावे वर्षापासून प्रतापसिंह महाराज यांचे हुकुमावरून नोकरी करावयास लागलों. महालमुलकी कामांत तयार होण्याकरितां महाराज यांनीं प्रथम पेटा कोरेगांव येथील चौकशीस पाठविलें; व जहागीरदार यांचे मुलखाची जप्ती सरकारांत होती, तेव्हां तेथील चौकशीचें कामावर पाठविलें व हुजूर स्वार शिबंदी तोफखान्याचे हिशेबाचें कामावर कैलासवासी बळवंतराव राजे भोंसले सेनापती यांजकडे नेमिलें; व तीर्थरूपांचे हात [illegible]रीं काम करीत होतों व महाराज सरकार ज्या वेळेस जी नोकरी सांगत होते ती [illegible]ात आलों. तीर्थरूप वारले तेव्हां त्यांनीं बहुत दिवस चाकरी इमानें केली व मीही त्यांचें काम चालवीन अशी महाराज यांची खात्री होऊन, त्यांनीं तीर्थरूपांकडे दौलतीकडील व खासगीकडील फडणिशीचें काम होतें, त्याप्रमाणें सांगोन पगार तीर्थरूपांस होता तितका कायम केला, व पालखी दिल्ही. प्रतापसिंह महाराज होते तोंपर्यंत चाकरी उमेदवारीनें सहा वर्षे व खासगीकडे व दौलतीकडे तेरा वर्षे अशीं एकुणीस वर्षे चाकरी केली.

३ कैलासवासी शाहाजी महाराज यांजपाशीं नऊ वर्षे दौलतीकडील व खासगीकडील फडणिशीचे दरकाची नोकरी करीत आलों व महाराज यांचे खासगी कारभारी व दौलतीकडील दिवाण कामांतून निघाल्यावर त्यांचेंही काम महाराज आमचे हातून घेत होते; व तीर्थरूपांस अष्टप्रधानांतील आमात्यपद होतें, त्याप्रमाणें आह्मांस दिल्हें. मोठे अब्रूनें व लोभांत वागवीत होते. व अंतकाळसमयीं महाराज यांणीं मेहेरबान डाक्तर मरीसाहेब बहादूर यांस बोलावून, आपले मागें बंदोबस्त राहावयाचा मजकूर सांगितला, तो मरीसाहेब यांणीं लिहिला. त्यांत आमचे भरंवशाचा कामगार सखाराम फडणीस आहे असें सांगितलें. तें मरीसाहेब यांणीं त्या वेळचे हकीकतींत लिहिलें आहे.

४ महाराज कैलासवासी जाहल्यावर मेहेरबान फ्रियरसाहेब बहादूर कमिशनर राज्याचें काम पाहूं लागले. तेव्हां त्यांणीं कामाप्रकर्णीं वगैरे जसजसी माहिती विचारली तशी सांगितली व आपले दरखाचें लिहिण्याचें काम संभाळून त्यासमागमें पेठ्यानिहाय जमाबंदीस वगैरे फिरतांना व सातार मुक्कामीं वेळचे वेळेस हजर राहून सरकारनौकरी इमानें व मेहनतीनें करावयाची तशी केली व आह्मांवर साहेब बहादूर यांणीं मेहेरबानीची नजर ठेऊन नोकरी घेतली.

५ फ्रियरसाहेब कमिशनर यांची बदली जाहली तेव्हां त्यांणीं हुकूम केला कीं, तुह्मी आह्मांपाशीं काम करीत आलां त्याप्रमाणें करावें व आपले दरखाची चाकरी करावी. हल्लीं मेहेरबान वोगलवी साहेब आले आहेत ते तुह्मांस आब्रूनें वागवून चाकरी घेतील. असें सांगितल्यावरून पहिलेप्रमाणें फडणिशीचें काम करीत आहों. आजपर्यंत जातीनें चाकरी पंचवीस वर्षे केली.

६ आमची सर्व हकीकत व सरकारचाकरी इमानें अकृत्रिमपणें करण्याची चाल व गरिबीची वागणूक आहे हें फ्रियरसाहेब यांनीं ध्यानास आणून, आमचे चिरंजीव पांच आहेत, मोठें कुटुंब याजकरितां आमचे मागें अब्रूसारखी कांहीं तरी निर्वाहाची सोय असावी असें जाणून, साहेबबहादूर यांनीं सरकारांत पत्र लिहिलें आहे. त्याप्रमाणें आम्हांवर सरकारांतून मेहेरबान होऊन मोठे कृपेचे नजरेनें आमचें कुटुंबाचें संरक्षण होई असें केलें पाहिजे.

७ आह्मांकडे हल्लीं इनामी उत्पन्न वंशपरंपरेचें चालत आहे. तें अजमासें रुपये.

१८६। कैलासवासी शाहूमहाराज यांनीं जमिनी दिल्ह्या त्याजबद्दल.

१५० कसबें तारगांव येथें जमीन जिराईत चाहूर एक बिघे १२० कमाल आकार रुपये २५६ पैकीं हल्लीं वसुली.

३० मौजें सोनगांव तर्फ सातारा येथील कदीम बिघे ८१५ व वाढ्यांतील जाजती जमीन काढिली त्यासुद्धां हल्लीं मोजणीनें बिघे ८३०८३॥ याचा वसुली आकार.

६। कसबें निंब पेटा कोरेगांव येथील मजरे नागेवाडी येथें जमीन बिघे ८२॥ येकूण वसुली आकार.

१८६।

१०४० कैलासवासी प्रतापसिंह महाराज यांनीं मौजें करंजवडें पेटा वाळवें हा गांव व मौजे खेड पेटा सातारा येथील चाळीस रुपयांची जमीन दिल्ही, ती कैलासवासी शाहाजी महाराज यांनीं सरकारांत घेऊन त्याचे मोबदला दुसरे ठिकाणी दिल्हे ते.

१००० आमचे नांवें मौजे कारी तर्फ परळी पेटा सातारा हा गांव दरोबस्त त्याचा कमाल आकार ११३६।-। पैकीं वसुली.

४० चुलतबंधु रावो भोडदेव खांडेकर यांचे नांवें जमीन मौजे सोनगाव तर्फ सातारा येथें.

१०४०

१२२६।

याप्रमाणें स्वास्थ्य आहे, त्याच्या सनदा आहेत.

याप्रमाणें आमची हकिकत आहे. ती सरकारास जाहिर होण्याकरितां सविस्तर लिहिली आहे. त्याजवरून आमची योग्यता ध्यानास आणून, सदरी साहावें कलम लिहिलें आहे त्याप्रमाणें, आमचे पश्चात व हल्ली आमचा गुजारा चालला आहे. त्याप्रमाणें सरकार मेहरबान होऊन चालविले पाहिजे तारीख २० माहे फेब्रुवारी सन १८५१ इसवी.

## २१ बिनिवाले.

साहेब मुषफक मेहरबान कर्म फर्माय दोस्ता हेनरी ओणसाहेब एजंट जिल्हा दक्षिण सलाम हू. ५

छ अर्जी साहेब सिद्धेश्वर महिपतराव बिनीवाले. सलाम बादज सलाम अंकी येथील खेरीयत तारीख १५ माहे सप्टेंबर सन १८५१ इसवी जाणून आपली शादमानी हमेषा कलमीं करीत असले पाहिजे. आसाहेबांकडून पत्र तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवीचें आलें. त्यांतील हशील मजकुर कीं, सरकारचा हुकूम तारीख ३० माहे जुलई सन १८५१ इसवीचा आल्यावरून कलमी केले जातें जेः— आपल्यास किताब बिनीवाले पद आहे. कधी, कोणत्या सबबीनें, कोणाकडून, प्राप्त जाहलें त्याचा व एकंदर पदवी थोरपणाचा व खानदानीचा इतिहास दाखलेनिशीं लिहून यावा व त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठवावा. व ऐकीव मजकुराची हकीगत असेल त्याविषयीं कांहीं पुरावा नसेल तरी तसेंही साफ लिहून यावें; परंतु जुने कागदावरून व माहितगार लोकांकडून जितकी माहिती

सांपडेल तितकी सर्व लिहून यावी. याजबद्दल सरकारास जाब जाणें आहे. ह्मणोन पत्र नंबर १०६६ चें आलें. त्याजवरून आमचे खान्नदानीचा व बिनीचें पदाचा इतिहास कांहीं दाखलेनिशीं व माहितीवरून कलमवार मजकुर लिहून पाठविला आहे.

१ आपल्यास किताब बिनीवाले पदवी आहे, हें कधीं व कोणते सबबेनें कोणाकडून प्राप्त जाहलें याचा इतिहासः बिनीवाले हा किताब व पदवी दरसाल श्रीमंत पेशवे मुलुखगिरीचे स्वाऱ्या शिकाऱ्यास जातात, त्यांजबरोबर आमचे आजे विसाजी कृष्ण, पागा व पथकाचे सरदार या सबबेनें जात होते. त्यांत फौजेचे आघाडीस यांची तलवार, असें सरकारचे नजरेस आलें. तेव्हां हे मर्द माणूस, मोठे हिमतीचे, असें मनांत आणोन, श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे यांनीं बिनीस स्वारी बरोबर चालावें असें सांगितलें. त्याचा सुमार शालिवाहन शके १६७१।७२ या सालापासोन नेमणूक होऊन इतमामाचे खर्चास पोत्यापैकीं ऐवज देत होते. येविषयींचे दाखले पेशवे सरकारचे दप्तरीं असतील.

२ कर्नाटकांत कडप्याचे स्वारीस बळवंतराव गणपतराव मेहेंदळे व विसाजी कृष्ण यांस पाठविलें. त्या स्वारींत शूरत्वाचा लौकिक, बढतीचा जाहला. स्वारी होऊन आल्यावर बिनीचें काम मुकरर सांगितलें. तेव्हांपासोन बिनीवाले असा ह्मणणेचा इरादा चालला आहे.

३ एकंदर पदवी व थोरपणाचा इतिहास.

१ हिशेब गांव पागा निसबत विसाजी कृष्ण यांजकडे गांवच्या खंडण्याचा हिशेब शिक्क्या मोर्तबानिशीं सुरुसन सितैन मया व अलफचा साहा गांवची बेरीज रुपये १०९३९ गांव दिल्हे; सालमजकुरीं नवे गांव दिल्हे; असें लागलें आहे. तेव्हांपासोन सरंजाम व थोरपणाची बढती.

२ पथक पागा निसबत विसाजी कृष्ण सुरुसन सितैन मया व अलफ ह्मणोन आहे. त्यांत सरंजामास महाल लागले आहेत, व निंबाळकरांकडील गांव वगैरे देशाचे मोबदला सुटतील ते दरोबस्त सरकारचा अंमल मशारनिल्हेकडे द्यावे असें कलम ठरलें आहे, व त्याप्रमाणें रांजणगांव वगैरे मुलूख आला तो राक्षसभुवन व सांगोलें दिल्हे. बिनीरखवालीचा ऐवज सालमजकुरीं आकारेल तो सालमजकुरीं पथकाकडे पंधरा हजार रुपये घ्यावे. बाकी सरकारांत जमा करावे. याजवरून बिनीचें काम विसाजी कृष्ण करीत होते. त्याजवरून इतर सरदार, पागे, पथकें यांणीं आपलाले मिसळ राखण्याचें धोरण सर्व बिनीचें निशाण पाहून, कूच मुक्काम बिनीचे नौबतीवर पागे, पथकें यांनीं हुशार होऊन, बिनीचें निशाणामागें चालावें असा इरादा बिनीचा होता. याजमुळें बिनीवाले असा शब्द प्रसिद्ध केला ह्मणोन बिनीवाले ह्मणतात. त्याजवरून जुने कागदावरील नक्कल आह्मांपाशीं आहे ती पाहण्याकरितां पाठविली आहे. अस्सल दप्तरीं आहे. ती पाहण्यांत यावी. व

पहिला हुद्दा कागदोपत्रीं लिहिण्याची चाल नव्हती. लढाया वगैरे करून मुलूख सर करावे. त्याजबद्दल सरकारांतून इनाम जहागिर मिळावी. सर्वांही मोठें ह्मणावें. येणेंकरून तो पुरुष मोठे योग्यतेस आला. असा प्रकार कर्तृत्वावर, योग्यता मोठी. आमचे आजे विसाजी कृष्ण यांनीं शूरत्वावर सरंजाम मिळविला. येविशीं खानदानीचे व सरंजाम चालल्याचे दाखले पेशवे सरकारचे दप्तरीं आहेत.

३ पेशवे सरकारावर पानपतचे गर्दीचा प्रसंग गुजरून भाऊसाहेब पेशवे गारद झाले. त्या तुरकांनीं आबदाली गिलिच्यांचे व रोहिले लोकांचे मोठे मोठे सरदार वगैरे नामधारक लोक यांचा सूड घ्यावयाजोगा पराक्रमी सरदार कोण, याचा विचार श्रीमंत थोरले माधवराव साहेब यांनीं केला. त्यांत विसाजी कृष्ण यांजविशीं खात्री होऊन समागमें रामचंद्र गणेश व शिंदे, होळकर व हुजूरात बरोबर देऊन ते हुकुमांत वागत होते. याप्रमाणें हिंदुस्थानप्रांतीं जाऊन गिलच्यांशीं लढाई करून फतरगड घेतला. पांच चार वर्षें छावणी घालून हिंदुस्थान प्रांताचा बंदोबस्त करून कोट्यावधीची दौलत सरकारांत आणिली; आणि दिल्लीचा बादशाहा शाहाआलम भडकत फिरत होते, त्यांस ऐश्वर्यानिशीं दिल्लीचे तक्तावर आणोन बसविलें. बादशाहा यांनीं आह्मांस मुलूख वगैरे देण्याचा करार केला· या मरातबीचीं पत्रें श्रीमंत माधवराव बल्लाळ व नारायणराव बल्लाळ पेशवे यांनीं आमचे आजे विसाजी कृष्ण यांस ते समयीं पाठविलीं आहे(त). ते वेळेस सरकार काम कसकसें केलें याचा मजकूर सर्व पत्रांत लिहिलाच आहे. तीं अस्सल पत्रें सुमारीं चार पाहण्याकरितां पाठविलीं आहेत. तीं अक्षरशः पाहण्यांत येऊन, ते वेळेस सरकार कामें विसाजी कृष्ण यांनीं कसकशीं केलीं व थोरपणा कसा प्राप्त जाहला, तो त्या पत्रांवरून उघड ध्यानांत येईल. व मेहेरबान ग्रांट साहेब यांनीं पेशव्यांचा इतिहास लिहिला आहे, त्यांत विसाजी कृष्ण यांचें वर्णन लिहिलें आहे.

३

४ खानदानीचा इतिहास बहुतकरून तिसरें कलमांतील पोट ३ चें कलमांत समजावयाजोगा लिहिला आहे. पेशवेसरकारचें चालवणें कोणते रीतीनें होतें कीं, विसाजी कृष्ण यांस प्रथम शालिवाहन शके १६७१।७२ या सालापासून पागेचें काम श्रीमंत राजश्री बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांनीं सांगितलें व इतमामाचे खर्चास पोत्यापैकीं ऐवज देत होते. नंतर कर्नाटक प्रांताची कडपेचे स्वारीहून आल्यावर· श्रीमंत नानासाहेब यांनीं विसाजी कृष्ण यांस सुरसन सितैन या सालीं अकरा हजारांचे सरंजामास

गांव करून दिल्हे. नंतर हिंदुस्थानचे स्वारीहून आल्यावर आमचे आजे यांस जात तैनात रुपये ३५१६० व पालखी व हत्ती व फौजेचे खर्चास मिळोन एकंदर सरंजाम गांव महाल ३०१९३१८४ याप्रमाणें सुरुसन सबा सबैन या सालीं करून दिल्हा. नंतर आमचे तीर्थरूप महिपतराव विश्वनाथ यांस सुरुसन इहिदे समानीन मया व अलफ या सालीं करून दिल्हा. त्यांचे पाठीमागें आह्मांस सुरुसन समान समानीन मया व अलफ या सालीं जात तैनात व पालखी व हत्ती व नेमणुकी खर्च ५६५०० सुद्धां व खेरीज इनामी गांव वगैरे सरंजाम गांव श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे कारकीर्दीपर्यंत कांहीं वर्षे चालला, व आह्मी बदामीचे व खर्ड्याचे स्वारीबरोबर गेलों होतों. असा पुस्त दरपुस्त सरंजाम चालला. याचीं पत्रें या यादींत भिडविलीं आहेत. तीं पाहण्यांत यावीं. पुढें बाजीरावसाहेब यांनीं जुने सरदार मोडावे या इरायानें विनाकारण आमचा सरंजाम व इनामी गांव वगैरे व राहता वाडाही घेतला. त्यांत आमचे दाखल्याचे कागद गेले. नंतर कांहीं थोडी नेमणूक करून दिल्ही.

५ आह्मीं आपले मोठेपणाचें वर्णन आपले मुखें काय करावें ? सरकारांनीं शोध करून किताब लिहून ठेविलाच आहे. मोठेपणा राखणें सरकाराकडे आहे. बाजीरावसाहेब यांनीं सरंजाम घेतल्यावर पागेचे खर्चास दरमहा रुपये ६०० व जात खर्चास सालीना रुपये २००० देत होते. याप्रमाणें पेशवाई अखेर चालले. पुढें कंपनीसरकारचा अंमल झाल्यावर मेहरबान एल्फिस्टनसाहेब बहादूर यांनीं, श्रीमंत देत होते ते मुसुम धरून दोन हजार रुपये सालीना पेनशन आह्मांस करून दिलें. त्याजवर गुजारा करून आहोंत. हल्लीं प्रपंच मोठा वाढला आहे व सदरील लिहिलेले खानदानीचें अवलोकन होऊन पुढें मुला-बाळाचें चालवितील, हा लौकिक सरकारचा आहे.

६ हल्लीं कागदपत्र दाखला पाहण्याकरितां अस्सल व नकला करून पाठविल्या आहेत. सरकारास लिहून कागदपत्र परत पाठविले पाहिजेत. येणेंप्रमाणें पाठविले आहेत व खेरीज कागद आमचे खानदानीचे दाखल्याबद्दल दप्तरी नानाचे वाड्यांत आहेत. त्याजवरून आमचे मरातबीचा इतिहास सर्व ध्यानांत येईल.

१ [illegible]. गांव व पागा निसबत विसाजी कृष्ण सुरुसन सीत सितैन मया व अलफ अस्सल शिक्के मोर्तबीचा दाखला.

१ यादी पथक पागा निसबत विसाजी कृष्ण सुरुसन सीत सितैन मया व अलफ या सालचा अस्सल बरहुकूम नक्कल अस्सल दप्तरीं असे.

१ अस्सल पत्र माधवराव नारायण यांनीं हरी बल्लाळ यांस लिहिलें आहे कीं विसाजी कृष्ण यांचे महालास व गांवास उपसर्ग न करणें ह्मणोन छ १२ रबिलाबल सुरुसन सबा सबैन मया व अलफ.

१ विसाजी कृष्ण हिंदुस्थानचे स्वारीस गेले, ते वेळेस पेशवेसरकार यांनीं पत्रें पाठविली ती अस्सल पाहण्याकरिता पाठविली ती सुमारी ४.

३ सरंजाम पुस्त दरपुस्त चालत होता.

१ विसाजी कृष्ण यास मोठा सरंजाम जाहला. ती याद सुरुसन सबा सबैन मया व अलफ

१ महिपतराव विश्वनाथ यांचे नावे सरजाम सुरुसन इसन्ने समानीन मया व अलफ.

१ खुद्द आमचे नावे सिद्धेश्वर महिपतराव सुरुसन समान समानीन मया व अलफ.

आमचे तीर्थरूप मयत जाहल्यावर आमचे नावे सरजाम चालावा ह्मणोन माधवराव नारायण यानी देशमुख देशपांडे यास अस्सल शिक्या मोर्तबानिशी पत्र छ २७ रबिलावल सुरुसन तिसा समानीन मया व अलफ.

इनामगाव मौजे काबरी तर्फ नदन प्रात वाई हा गाव पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करून दिल्हा. त्या सनदची नक्कल.

[illegible]साहेबानी सर्व आमचे इतिहासाचा व खानदानीचा व मरातबीचा पेशवेसरकारचे कागदपत्र पाहून सरकारास अभिप्राय लिहून पुस्तदरपुस्त मरातबराहून इनामगांव व लढाईअखेर चालली नेमणूक व पेनशन पेशजीचे वहिवाटीप्रमाणे सरकारांतून बंदोबस्त करून देवविण्यास सरकार खावंद मुखत्यार आहेत.

येणेंप्रमाणे मजकूर लिहिला आहे. त्यानी येऊन बंदोबस्त करून देविला पाहिजे. ज्यादा काय लिहिणे ? प्यार मोहबत असों यावी हे किताबत

सही सिद्धेश्वर महिपतराव बिनीवाले, हस्ताक्षर खुद्द.

ब.

[illegible] सिद्धेश्वर महिपतराव बिनीवाले. सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. सरकारांतन मेहेरबान ज्यान वार्डिन साहेब बहादर डिपुटी एजंट जिल्हा दक्षण यांचे कचेरीहून तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचे पत्र आले. त्यांतील मजकूर जे. हजरत बंदगानअली राईट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत की, दक्षिणेंत जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी. यास्तव आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडे मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे, अशा अन्वयाचें पत्र आले त्याजवरून इकडील मजकूर लिहून देतों. बितपशील.

१ आमचे खानदानीची बढती कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला, याचें उत्तरः—आमचे आजे विसाजी कृष्ण यांनीं श्रीमंत कैलासवासी

नानासाहेब पेशवे यांजपाशीं चाकरी बहुत केली. त्यांनीं बाळाजी खंडेराव सरकारचे पागे होते. त्यांची पागेची मजमूची असामी प्रथम दिल्ही. नंतर श्रीमंतांचे स्वारी बरोबर चाकरी लढाईंत कामकाज चांगलें बजाविलें. तेव्हां श्रीमंतांनीं कृपा करून यांस पागा दिल्ही, आणि तैनातही चांगली केली, व बिनीचें काम सांगितलें. तेव्हांपासून बिनीवाले असें ह्मणतात. पुढें बळवंतराव कृष्ण मेहेंदळे सरकारचे सरदार यांस कडपेचे स्वारीस रवाना केले. त्यांजबराबर यांची नेमणूक केली. तेथें कामकाज चांगले केलें. तेथून आल्यावर श्रीमंत भाऊसाहेब पानपतास स्वारीस जाऊं लागले, तेव्हां कर्नाटकांत कोण पाठवावें ह्मणोन विचार केला. तेव्हां विसाजी कृष्ण हे काम करावयास योग्य आहेत, असें श्रीमंतांचे दिलास येऊन यांजबराबर दहा पंधरा हजार स्वार व पायदळ व तोफा वगैरे सरंजाम देऊन कर्नाटकांत अर्काट प्रांतीं यांची रवानगी केली. तिकडून लढाया मारून अर्काट वगैरे संस्थानच्या खंडण्या घेऊन आले. तों पानपतास भाऊसाहेब यांची गर्दी जाहली. हें बहुत दुःख झालें. आणि विसाजी कृष्ण कर्नाटकांतून सरकार कामें बजावून खंडण्या घेऊन आल्यावर नानासाहेबांस बहुत संतोष जाहला. विसाजी कृष्ण यांस बक्षिस व तैनात ही जास्ती करून दिल्ही. नंतर नानासाहेब कैलासवासी जाहले. पुढें दादासाहेब व थोरले माधवरावसाहेब यांजबराबर स्वारी शिकारी करून चाकरी केली. राक्षसभुवनावर नबाबाची लढाई जाहली तेथेंही सरकारचे फत्ते होऊन तो मुलख सरकारांत घेऊन आमचे सरंजामास दिल्हा. पुढें श्रीमंतांनीं जातीची तैनात चाळीस हजार करून दिल्ही, व सात आठ लक्षांचा सरंजाम फौजेस महाल वगैरे लावून दिल्हे. हिंदुस्थानांत विसाजी कृष्ण यांची रवानगी केली. त्या काळीं यांजबराबर सलतान लाख फौज शिंदे व होळकर आदिकरून थोरथोर सरदार आमचे निसबतीस ताबेदारीस दिल्हे. ते यांचे हुकमतींत वागत होते. अशा इतमामानें यांची रवानगी केली. पूर्वीं गिलच्यांनीं भाऊसाहेबांवर गर्दी केली, त्याचा सूड घेईल असा सरदार जवामर्द कोण आहे ह्मणोन याची विचारणा होऊन यांची योजना केली, यांनीं फत्तरगडची स्वारी गिलच्याचें पारपत्य करून लाखों फौजाचा खर्च चालवून कोट्यावधीची दौलत सरकारांत आणिली. ही स्वारी शके १६९० पासोन चार वर्षे झाली. चौदा चौघडे जिलबीस चालत होते. इतकी जमियत खासा स्वारीबरोबरही नसेल. असें ऐश्वर्य श्रीमंतांनीं कृपा करून वाढविलें आणि सरकारचीही फत्ते जाहली. तेव्हांपासून खानदानीची बढती लौकिक महशूर जाहला.

१ फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली व आपणाकडे सरंजाम हल्लीं काय आहे ? याचें उत्तर:—
जातीचा सरंजाम आजाचे वेळेस चाळीस हजार व फौजेचा आठ लक्ष रुपयांचा वसुली होता. पुढें तीर्थरूप महिपतराव विश्वनाथ यांचे वेळेस फौजखुद्दा देसी हजार रुपयांचा

चालत होता. पुढें आमचे कारकिर्दीस पंचावन्न हजार रुपयांचा सरंजाम चालत होता. मुखत्यारीनें वहिवाट आह्मीं करीत होतों. पेशवे सरकारची दखलगिरी कांहीं एक नव्हती. परंतु आमचे पथकास दरकदार होते ते महालचे हिशेब फौजसुद्धां सरकारांत समजावीत होते. त्याखेरीज सरकारांनीं दखलगिरी केली नाहीं. तो सरंजाम श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब यांनीं जप्त केला, सबब हल्लीं आह्मांकडे सरंजाम चालत नाहीं.

१ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कंपनीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश तफावत काय आहे याचें उत्तरः— जी मातबरी तीन पिढ्या चालत आली, ती वरल्या कलमांत लिहिली आहे. हल्लीं कंपणीसरकारांतून मेहरबानी करून दोन हजार रुपये सालीना पेनशन देतात. त्याजवर गुजारा करून आहोंत. येणेंप्रमाणें इकडील मजकूर लिहिला आहे. तारीख छ ५ मोहरम सन १२४२ फसली.

क

पुत्रवत् राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांस

विनंती उपरी इंग्रेज(चें) पातशाहाजवळ प्राबल्य. त्याचे पातशाहास दिल्लीस स्थापावें हा (हेत) पांच सात वर्षे इंग्रजांनीं केला आहे. ते पातशाहास दिल्लीस आणते तर त्यांचें सामर्थ्य नव्हतें ऐसें नाहीं. आणितेच. परंतु ते पाण्यांतील पाव प्यादे, इतकी हिंमत त्यांची नाहीं. ह्मणोन पातशाहास दिल्लीस न जावें ह्मणत होते. परंतु पातशाहांनीं ऐकिलें नाहीं. आलेच. या अर्थें पाहतां पातशाहांनीं इंग्रेजांचा प्रकार तादृश मानिला तोच वृद्धिंगत करावा. इंग्रेजांचा प्रवेश दिल्लीस होऊं देऊं नये. दिल्लींत प्रवेश जालीया उखळणार नाहीं. टोपीकरांत इंग्रेजांनीं डोई उचलली आहे. बंगाला व कलकत्ता व मछलीबंदर वगैरे बंदरें सुरतपावेतों आपले जप्तींत आणिलीं. कर्नाटक पायनघाट कुल इंग्रेज महमंदअलीखानानीं आटोपिला. सुरत तो मुंबईप्रमाणें इंग्रेजांनीं आपली केली. दिल्लींत प्रवेश त्याचा जाल्यास पातशाहा जेरदस्त त्याचा होईल. फार अवघड पडेल. इंग्रज चढी लागला आहे. त्याचे सुख सुजाअतदौला आदीकरून कोण्हास नाहीं. तरी अमीर सर्व आपले करून, सरदारांचीं फूट मोडून, एक होऊन, इंग्रेज माघारे जात तें करावें. इंग्रेजांनीं बंगाला पातशाहापासोन लिहून घेतला आहे, तोही तजविजीनें सुटे तें, पुढें केल्यास होईल. तूर्त त्याचा दिल्लींत प्रवेश न होतां, पातशाहास पाहून माघारे जात इतकेंच करावें. पातशाहा आपला एहसानमंद होऊन पातशाहाचा बंदोबस्त आपले हातून करून घेई, ऐशी कारस्ती जी होईल ती करावीच करावी. मनसुबेबाजपणाचा प्रकार हरहुन्नरें, एकास बैसवावें, एकास उठा ह्मणावें, आपलें वजन पुर्ते त्याजवर पाडावें, ऐसा समय आहे. यांत जो फैल मजबुदीनें कर्तव्य तो करणें. जाणीजे, छ २० रबिलावल बहुत काय लिहिणें हे विनंती.

ड.

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांस.

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहित जाणे. विशेष. तुम्हीं विनंतीपत्रें तीन पाठविलीं, एक छ १६ साबानचें, दुसरें छ ९ रमजानचें, तिसरें छ २६ रमजानचें पाठविलीं, ती एकामागें एक येऊन पावलीं राजश्री महादजी शिंदे पातशाहाकडे गेले होते. बोलणेंचालणें प्रमाणपुर:सर होऊन पातशाहाचे कूच करून चाललीयाचें व सैफुदी महमंदखान याचे मारफतीनें करार मदार जाहाला, त्याप्रमाणें त्याजकडून निकाल न जाहल्यास आपण करून देऊं; ह्मणोन नवाब सुजाअतदौला-कडील एलिचखान व अनुपगीर गोसावी येऊन भेटून सुजाअतदौलास आणावयास गेले. त्याजबरोबर दोन हजार फौज रवाना बाहिरजी ताकपीर व बाळाराव रवाना केली. याचा मजकूर विस्तारें लिहिला तो कळला. ऐशीयास येविशीचें उत्तर अलाहिदा लिहिलें असे, त्याजवरून कळेल. जाणीजे, छ १६ जिल्काद सुरुसन इसन्ने सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें, हे विनंती.

ढ.

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांस.

पोष्य नारायणराव बल्लाळ नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहीत जाणें. विशेष. तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहले. जाबेतखानास मोडून ताराज केलें. तो पळून पहाडांत गेला. युद्ध मोठे जाले. सुकताल घेतलें. पथरगड घेतला. त्याची दौलत, हत्ती, घोडे, तोफा वगैरे सरंजाम पाडाव केला. स्वामीच्या फौजेस मोठे यश आली-याचा विस्तार लिहिला, तो श्रवण होऊन संतोष जाहला. या प्रसंगी तुह्मी सर्वांनी युद्धाची तरतूद फार चांगली केली. अमित यश संपादिलें. शाबास! रोहिला अति गर्वित होता व त्यांनी अन्याय फारच केले होते. त्याचे अन्यायानुरूप पारपत्य यथायुक्त जाहलें. याउपरी तिकडील वर्तमान लिहीत जाणें. जाणीजे, छ २४ मोहरम. बहुत काय लिहिणें, हे विनंती.

फ.

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांस.

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी, येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेष. तुह्मी विनंतीपत्रे दोन छ ३० रमजानचें पाठविले ते छ २९ सवालीं पावलें, व दुसरें छ २ सवालचें पाठविलें, तेंही छ २९ सवालीं पावलें. पातशहास आणून तख्तावर बसविलें हे कीर्ति स्वामीची दिगांतरास गेली. इराण, दुराण, बंदकबदक्षांपर्यंत खबरा गेल्या. तमाम अमीर व राजेरजवाडे व जमीदार वगैरेकडून पातशाहास नजरा येतात. पातशाहा स्वमुखें हा प्रताप स्वामींचा ह्मणोन वारंवार स्वामीचा स्तव करितों ह्मणोन तपशिलें लिहिलें, तें कळलें. ऐशास पातशाहा शाहाआलम बहुत दिवस भटकत फिरत होते.

इंग्रेज व सुजाअतदौलाचा आसरा करून होते. तत्रापी दिल्लीस आणून तख्तावर बसवणें हें त्यास दुरापास्त होतें. त्यास हे गोष्ट न जाहली. तुमची व सरदार होळकरांची विमनस्कता असतां, तुह्मीं व राजश्री महादजी शिंदे यांनीं पातशाहाशीं राजकारण करून त्यांस प्रयागाहून आणून दिल्लीस स्थापना केलीयाचा लौकिक मोठा असाधारण जाहला. कीर्तीस्पद प्रकारांत न्यून नाहीं हें खरें; परंतु पातशाहांनीं तुह्मांशीं पैका व मुलूख द्यावयाचा व कितेक मतालीब करून द्यावयाचा करार केला. त्यास, त्यापैकीं पैका व मुलूख पातशाहांनीं तुह्मांस काय दिल्हा ? तीन छावण्या गुजरल्या; चवथी छावणी समीप आली; फौजेची उस्तवारी कशी केली व करणार ? यांत पातशाहाचा मतलब, जे गोष्ट कोणास न जाहली, ते गोष्ट हिंमत बांधून तुम्हांजवळून करून घेतली, हे गोष्ट मात्र त्याची सिद्ध जाहली. आपले स्वहिताचा प्रकार कसा ? पातशाहा तुह्मांजवळून सलतनतचा बंदोबस्त करून घेणार व सलतनतचा बंदोबस्त करून द्यावा हे हिमत तुमची. त्यास वजीर सुजाअतदौल्यानीं तुम्हांशीं राजकारण एलचखान व अनुपगीर यांजकडून करविलें कीं आपण येतों. पातशाहांनीं पैका कराराप्रमाणें दिल्हा तर उत्तम, न देत तर आपण देऊं. त्यांस आणावयास तुम्हीं फौजही पाठविली. परंतु ते अद्याप कां न आले ? येथें लिहिलीं येतात कीं, करनेल फिरंगी यांनीं पातशाहास दिल्लीस जाऊं दिल्हें. त्याजवरून मकसुदाबाद कलकत्त्यास मुख्त्यार फिरंगी साबीतजंग आहे. त्यांनीं करनेलवर इतराजी केली. बोलावून घेतला. सुजाअतदौलास भेटून पट्टण्यास गेला. तेथें त्यांस कैद केला. तेव्हां करनेल मजकूर पोटकटारी करून मृत्यु पावले. सुजाअतदौलावर फिरंगी गालब आहेत. फिरंग्याची आज्ञा सुजाअतदौला घेणार. त्यांनीं आज्ञा दिल्लीस जावयास दिल्ही तर येतील; न देत तर त्याचे वस्तु येववत नाहीं. ते येत नाहीं. तेव्हां किरकोळ-रोहिले पठाण येतील न येत, पाहावें. पातशाहास घेऊन तुह्मीं जाबतेखानावर जातां. फितुर तो आहे. तत्रापि जाबतेखानांनीं रुजू आणिली तर मनसुबीयास वजन पडेल. पैका मिळेल. जाबतेखानास बक्षीगिरी सांगितलीया तो पैका देईल. जाबतेखानाचें राजकारण होळकरांचेंच. घेऊं त्यास खरें करूं, हें होणें नाहीं, हें तुमच्या लिहिण्यांत आहे. तदनरुप तुह्मीं कराल. करावें. फार चांगलें असे. होळकर मेळवून घेणें. राहतां वजिरी राहिली; त्यास सुजाअतदौला आले तर उत्तम. न येत त्यापक्षीं ज्ञाजुदीखानाचें राजकारण आहे. परंतु हें दो गोष्टींनीं, खाली फौज नाहीं, पैका नाहीं, पातशाहाशीं नाखुषी आहे. ह्या गोष्टी सुधारल्या पाहिजेत. असो. सर्वा गोष्टीची गोष्ट सरकारची फौज खराब झाली, त्याप्रमाणें पैका व मुलूख तों साधलाच पाहिजे. प्रयाग व काशीचे मतलब होऊन यावे, तें तुह्मीं करून घेतलेच असतील. ज्यापक्षीं सलतनतच्या बंदोबस्ताचा होदा तुह्मांकडे लागला, तेव्हां फौजेची उस्तवारी व कर्ज परिहार करणें तुह्मांस आगाध नाहीं. सरकारांत खजाना पाठवून द्याल ऐसें दिसतें व तुह्मी या तरतूद साधनेंत असालच. कसकसें योजिलें आहे तें लिहून पाठविणें. सारांश, फरोका-

बादेहून पातशाहास आणून स्थापना दिल्लीस केली, हे पायाशुद्ध कर्म जाहलें. तुह्मीं उभयतांनीं दम धरून चांगलें केलें. पुढें कर्तव्याचा प्रकार चित्तांत आणिला असेल, तो लिहून पाठविणें. जाणीजे. छ १६ जिल्काद. बहुत काय लिहिणें. हे विनंति.

## २२ बोकील.

यादी यशवंतराव आको बोकील सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ सन १२४३ फसली. मेहेरबान जान वार्डीन साहेब बहादूर डिपुटी एजंट जिल्हा दक्षण यांनीं तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें पत्र पाठविलें; त्यांत मजकूर कीं, हजरत बंदगानअली राईट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत जे, दक्षणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी, यास्तव सरकारांत रवाना करावयाकरितां थोडक्या मजकूरांत आपण कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशीलः आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला तें, व फौज जात सरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरींचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपल्याकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश तफावत काय आहे तें. वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन पत्र आलें. त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो. कलमें बितपशीलः—

१ आपली खानदानीची बढती कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला ह्मणोन लिहिलें, त्याचें उत्तरः आमचे आजे सखाराम भगवंत उर्फ सखारामबापू हे, पुरंदरे पेशवे सरकारचे मुख्य दिवाण, यांचे पदरचे. त्यांनीं सरकारांत पेश करून वाढविले. त्यांचा लौकिक श्रीमंत दादासाहेब व थोरले माधवरावसाहेब यांचे वेळेस महशूर झाला कीं, चौ राज्यांत साडेतीन शहाणे. त्यांची नांवनिशी पेशवे यांचे राज्यांत सखारामबापू व निजामअलीचे राज्यांत विठ्ठल सुंदर व भोंसले यांचे राज्यांत देवाजीपंत व आंगरे यांचे राज्यांत अर्धे शहाणे जिवाजीपंत याप्रमाणें वदंता बुद्रुक माणसें बोलतात. त्यांतून आमचे आजे यांची पैवस्ती

१ शके १६५४ यासाली श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें जाहलीं. त्यांनीं पुण्यांतील शनवारचे वाड्यास काम लाविलें, व स्वारी हिंदुस्थानांत गेली. महादोबा बावा पुरंदरे दिवाणगिरी करीत होते. त्यांनीं सखारामबापू यांस सरकारांत कामास घातलें.

१ शके १६६८ यासालीं श्रीमंत भाऊसाहेब यांची स्वारी कर्नाटकांत जाहली. बरोबर कारभारी सखारामबापू यांनीं फौज जमा करून, फौजेचा बंदोबस्त राखून, बहादूरबिंडा किल्ला घेऊन, मसलत फत्ते करून पुण्यास आले.

१ शके १६७४ आंगिरानाम संवत्सरे यासालीं श्रीमंत दादासाहेब यांची स्वारी गुजराथेंत अमदाबादेस गेली. बरोबर दिवाण सखारामबापू होते.

१ शके १६७५ यासालीं श्रीमंत दादासाहेब यांची स्वारी हिंदुस्थानांत गेली. तिकडे छावणी जाहली. बरोबर कारभारी सखारामबापू होते.

१ शके १६७६ यासालीं कुंभेरीची स्वारी. श्रीमंत दादासाहेब यांचे बरोबर कारभारी सखारामबापू.

१ शके १६७८ यासालीं श्रीमंत दादासाहेब यांची स्वारी हिंदुस्थानांत. बरोबर कारभारी सखारामबापू. ती स्वारी लाहूर, अटकेपर्यंत दोन वर्षे झाली. मोठें यश संपादून खंडेराव हत्ती बहुत गुणी तो हत्ती सरकारांत आणिला. हाही लहानसा लाभ झाला.

१ शके १६८२ यासालीं श्रीमंत दादासाहेब यांची कर्नाटकांत गदकची स्वारी होऊन पुण्यास आले. ते वर्षी नानासाहेब यांचा काळ समीप आला. त्या समयीं थोरले माधवरावसाहेब यांचा हात सखारामपंतबापू व निळकंठराव महादेव पुरंदरे यांचे हातांत हात घालून राज्याचा बंदोबस्त राखणें ह्मणोन स्वमुखें सांगितलें.

१ शके १६८३ यासालीं थोरले माधरावसाहेब यांस साताऱ्याहून वस्त्रें आणून निळकंठराव महादेव पुरंदरे व सखारामबापूंनीं राज्यकारभार चालविला. स्वारी कर्नाटकांत जाऊन खंडणी घेऊन आली.

१ शके १६८४, सन ११७२ यासालीं कर्नाटकांत *श्रीमंत थोरले माधवरावसाहेब यांची स्वारी गेली. बरोबर कारभारी सखारामबापू.

१ शके १६९५ यासालीं थेऊरचे मुक्कामीं थोरले माधवरावसाहेब आजारी होऊन श्रीगणपतीपाशी धरणें घेऊन राहिले. अंतकाळ समयीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांचे हात सखारामबापूंचे हातांत घातले. समीप श्रीमंत दादासाहेब व हरी बल्लाळ फडके व नारो आपाजी तुळसीबागकर बसले होते. यांजदेखत आज्ञा केली कीं, नारायणराव अज्ञान आहे; यांस शहाणे करून राज्याचा बंदोबस्त राखणें. ऐसें बापूस सांगितलें.

१ शके मजकुरीं कार्तिक वद्य ८ बुधवारीं थोरले माधवरावसाहेब यांस देवाज्ञा जाहली. रमाबाईनीं बरोबर सहगमन केलें. श्रीमंत नारायणरावसाहेब यांस आपघात झाला. श्रीमंत गंगाबाईसाहेब नारायणरावसाहेब यांची स्त्री गरोदर होती. तिजला पुरंदरचे किल्ल्यावर (नेलें). नारो आपाजी तुळसीबागकर यांजकडे सरकारच्या स्वाऱ्या गेल्यावर पुण्यांतील कारभार होता. दादासाहेब स्वारीस गेले होते. त्यांचे मागें बाई किल्ल्यावर माघमासीं नेली. ही मसलत सखारामबापूंनीं त्रिंबकरावमामा व नाना फडणीस यांचे संमतीनें केली. पुढें शके १६९६ यासालीं सवाईमाधवरावसाहेब यांचा जन्म झाला.

१ शके १७०० यासालीं श्रीमंत दादासाहेब यांनीं इंग्रजबहादूर मदतीस आणून तळेगांवावर लढाई जाहली. ते समयीं सखारामबापू व नानाफडणीस, व शिंदे, होळकर-

सुद्धां फौजा मिळोन लढाई केली. इट्टुर फाकडे इंग्रजबहादूर उपयोगीं पडले. मसलत शेवटास नेली. दादासाहेब यांस शिंदे यांचे हवालीं केलें. त्याच सालीं सखारामबापू नजरबंद झाले.

१ बापूचें शहाणपणाची तारीफः जे पुढील होणार ते कैद करून हात्तीचे आंबारींत बसवून चालविले. ते समयीं बरोबर राघो विश्वनाथ गडबोले, नानाफडणीस यांनीं दिल्हे होते. त्यांजपाशीं बापूंनीं, नानास निरोप सांगितला कीं, तुह्मीं आह्मांस शिंदे यांचे हातून धरविलें याचें कारण नव्हतें. हेच शिंदे, होळकर तुम्हांस व सरकारास जड होऊन, तुम्हींही त्यांचे हातून धरलें जाल, आणि पेशवेसरकारांस मसलतीत आणून दौलत खराब कराल. कलम १.

२ फौजेचा सरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सरंजाम कोणते तारखेस दिल्हा त्याचें उत्तरः—

१ जातीस सरंजाम रुपये ६०००० साठ हजार रुपयांचा त्याचा तपशीलः—

२३००० तर्फ नामपुर मोराणें बागलाणांतील.

२६०० मौजें निंबगांव, धानोरें तर्फ पाबळ.

५५० मौजें दुधोडी तर्फ पेडगांव परगणे कडेवलीत.

७६६॥= मौजें धिवरी व मौजें नांदुर, परगणे शेवगांव येथील खेरीज मोकासा करून इनाम.

७०० बाबती सरदेशमुखी.

१६०० जहागीर.

२३००

पैकीं वजा दोन हिस्से शंकराजी निंबाजी व शिवाजी बाजी बोकील यांजकडे १५३३।= बाकी तिजाई इनाम.

३०० मौजें भोळी, परगणे शिरवळ.

२४०० मौजें बेलापूर सांगवी, परगणे कुंभारी.

१००० पंतसचीव यांचे जिल्ह्यांतील गांव घेऊन भिक्षुक ब्राम्हणांस श्रीमंताकडून इनामपत्रें करून दिल्हीं, ती खेरीज आपले जातसरंजामांत लिहून घेतली.

५०० मौजें तोंडल, तर्फ निरथडी.

२८००० तर्फ बेलापूर, परगणे संगमनेरपैकीं गांव देहे.

१ मौजें वांकडी.

१ मौजें कडगांव.

२ मौजें मालूंजी खुर्द व बुद्रुक.

१ मौजें पिंपळगांव.

१ मौजें राजूरी.

१ मौजें दायेमाबंद.
१ मौजें भरडापूर.
१ मौजें राजणखोर.
९ बेरीज.

८८३।≈ खेरीज गांव होते. त्यांचीं नांवें लागत नाहींत.
६०००० रुपये.

२५००० श्रीमंत नानासाहेब यांचें देणें सन सबा खमसैनांत सन ११६६.

३५००० श्रीमंत थोरले माधवरावसाहेब यांचें
६०००० देणें सन ११७५.

१ परभारे संस्थानी(क) यांजकडून व सरदारलोकांकडून मिळविले ते.

२०००० मुराराव घोरपडे यांजकडून परगणे रुळी, पेठगिरसागर.
३५०० सरलष्कर यांजकडून परगणे सुपें, येथील मोकासा व निमचौथाई अक्कलकोटकर भोंसले राजे यांजकडून.
३००० मुधोजी नाईक निंबाळकर फलटणकर यांजकडून मौजें खुट, परगणे फलटण.
४०० महाराव जसवंत निंबाळकर यांजकडून गांव मौजें कोंडगव्हाण.
१५० पंतप्रतिनिधी यांजकडून मौजें इटकिरे परगणे आटपाडी.
४०० पंतसचीव यांजकडून मौजें कावरें तर्फ खेडेबारें इनाम.
११०० नारो शंकर राजे बहादर यांजकडून बेलापुर तर्फ पैकीं देहें ४ येणें.
३०००० शिंदे अलिज्याबहादर यांजकडून देहें १७ परगणे सेवगांव पैकीं.
४००० आणखी सरदार लोकांकडून होते. त्यांचीं नांवें तूर्त लागत नाहींत.
६१५ मौजें चाधई, तर्फ वेरडी आंगरे यांजकडून
७३०६५

१ श्रीमंताकडून इनामगांव व जमिनी थोरले रावसाहेब यांजकडून श्रीमंत नानासाहेब यांनीं नेमिले होते; ते तर्फ करेपठार प्रांत पुणें.

१९५० मौजें चांबली.
१००० मौजें खानवडी खेरीज मोकासा श्री तुळसीबाग

३३३८≈ मौजें हिवरें तनखा १०००।≈ पैकीं हिस्से दोन शंकराजी निंबाजी व शिवाजी बाजी रुपये ६६७।. बाकी तिजाई.

३१७ मौजें बोपगांव तनखा रुपये ९५० पैकीं वजा हिशे दोन शंकराजी निंबाजी व शिवाजी बाजी रुपये ६३३ बाकी तिजाई.

जमिनी.

१ मौजें चांवळी

१ मौजे सोनवरी.

१ मौजे पिपळे.

१ मौजे कोढीत खुर्द.

१ मौजें मुंजवडी, परगणे सुपं.

० परभारे निळकंठराव महादेव पुरंदरे यांजकडून आंदण इनाम दिलें कसबे सासवडी.

३६००८≈

२

याप्रमाणें गांव व परगणे मिळविले. आपला इरादा दिवाणगिरीच्या अगत्वे मुत्सद्दी-पणाचा जें मिळविलें तें आकृत्रिम खावंदास कळवीत गेले, म्हणोन सरकारही लोभ करीत होते. मोठेपणाचे हुद्यास कांहीं लवाजमा पाहिजे म्हणोन सरकार आज्ञेनें सदरहू रुपयांत कांहीं फौज खासगत बाळगीत होते. जरूरीचें कामास जाणे पडल्यास आपलेजवळ फौज आहे ती नेईत.

३ आपले जहागिरीचे वहिवाटीत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ह्मणून लिहिलें. त्याचे उत्तरः—बापू आपले जहागिरीची वहिवाट जातीनें मुखत्यारीनें करीत होते. पेशवेसरकारचा इतला किमपी नवता.

४ आपल्याकडे हल्ली सरंजाम काय चालत आहे याचें उत्तरः—बापू धरिले तेव्हां त्यांची स्त्री काशीबाई व जिऊबाई व सून गोदूबाई यांस परभारे संस्थानिक यांजकडून मिळविले ते व इनामगांव, इनामजमिनी मिळून आठ हजारांची बेरीज नेमणूक करून दिल्ही. हल्लीं त्रिवर्ग बाया गत जाहल्या. कुंपणी सरकारांनीं सन १२३६ फसलीपासून नेमणूक बंद केली. तूर्त आह्मांस इनामगांव पैकीं मौजें हिवरें तर्फ करेपठार येथील हिस्सा रुपये ६३३॥ इनाम व इतलाख रुपये ३६६॥ एकूण एक हजार चालतात.

५ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे; यांत कंपेश तफावत काय आहे ह्मणून लिहिलें. याचें उत्तरः—आमची मातुश्री बाया

स्त्रिया हयात असतां कोणते तऱ्हेनें किती नेमणूक होती, व हल्लीं आह्मांस कुंपणी सरकारां-तून नेमणूक देऊन साहेब चालवितात, हें नजरेस आणिल्यानें कंपेश तफावत काय आहे ती ध्यानांत येईल. बंदोबस्त करून देण्याविषयीं अर्ज हरवख्त करीतच आहोंत.

६ श्रीमंतांचे स्वारीसमागमें कर्नाटकांत सखारामबापू होते. तेव्हां मुक्कामीं लष्करांत फौजेचा भरणा काय आहे, कोण सरदार कोणते बाजूस, वगैरे बातमीस, खासा हैदरखान फकिराचा वेष घेऊन रात्रीस गोटांत फिरत असतो, वारंवार येत असतो, अशी बातमी बापूस लागली, तेव्हां बापूंनीं बातमी राखून फकीर आपले राहुटींत बोलावून घेतला आणि त्याची तसबीर होती ती पाहून फकिराचा चेहरा आणि तसबिरीचा मिळाला. त्याजवरून त्याचा हात धरून बोलले कीं, तुह्मी फकीर नव्हे, हैदरखान आहां. तुह्मांस सरकारांत नेऊन गुजरावें लागतें. चौकशीअंतीं फकीरच असें जाहल्यास सुटका होईल. तोंपर्यंत जाऊं देणार नाहीं. इतकें ऐकून बापूजवळ वचन मागून, मी हैदरखान, मजला जीवदान द्यावें. मग बापूंनीं विचार केला कीं, चोहू देशांत चार खुला (?) आहेत. म्हणून सरकारांत फौज बाळगून हुशार राहून दरसाल त्यांजपासून खंडण्याही घेतात. तेणेंकरून लाखो फौज पोसली जाती. यास्तव हैदरखानासारखा मोहोरा हातीं लागला, यांजवर उपकार करून, त्यांज-पासून लाखो लाख रुपयांच्या हुंडीचिठ्या सावकारावर घेऊन, हुंड्या त्यानें दिल्या. त्या घेऊन सरकारांत ऐवज श्रीमंतांनीं खाजगीकडे ठेविला. परंतु आपण कांहीं त्याचा लोभ केला नाहीं. याप्रमाणें सरकारचीं कामें करून खावंदास कच्चा मजकूर समजावीत होते. यामुळें चौमुलखांत लौकिक महशूर जाहला. मसलतीनें राज्याचा बंदोबस्त राखून सरकारकामास प्रतारणा केली नाहीं. सरकारकामें हर प्रकारचीं करून लौकिक मिळविला. तो कोठवर लिहावा ?

सदरहूप्रमाणें मजकूर माहितगारीनें ध्यानास आला तो लिहिला आहे. तारीख २४ माहे जुलई सन १८३३ इसवी, श्रावण शुद्ध ८. सन १२४३.

---

## २३ मुजुमदार.

### अ.

यादी कृष्णराव निळकंठ व जीवनराव नारायण व लक्ष्मणराव गणेश मुजुमदार सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ. हजरत बंदगानअल्ली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतलि जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाक-बगारी व्हावी ह्मणून, तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ या रोजीं डिपुटी एजंटसाहेबांनीं आमचे वडील तीर्थरूप नारायणराव तात्या मुजुमदार यांचे नांवें खत कलमीं केलें जेः— आपली खानदानीची बहती कोणते तारखेस व खानदानीचा लौकिक महशूर जाहला, व फौज व जात सरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस

दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे ते, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी (काय) चालत होती, व हल्लीं कंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें वगैरे यादींत दाखल करून सरकारांत आपण मेहरबानी करून थोडक्या मजकुराची कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यास, आमचे वडील तीर्थरूप यांची प्रकृती बिघडून आश्रम संपादन करून समाधिस्त जाहले; याजमुळें कैफियत पाठविण्यास दिरंग लागला. याजमुळें हल्लीं साहेबांनीं मेहरबानी करून कैफियत पाठवावी ह्मणून पत्र आलें. त्यावरून उत्तरें:— कलमें.

१ पूर्वीं श्रीमंत महाराज राजा शाहू छत्रपती यांस दिल्लीचे पातशाहांनीं मेहेरबानी करून वस्त्रें व सरदेशमुखी देऊन देशीं बिदा केले. ते देशीं आले तों येथें ताराबाईसाहेब राजकारभार करीत होती. त्यांचे सरदार धनाजी जाधवराव मोठे फौजबंद होते. याजमुळें राजश्रीचा प्रवेश होईना. सबब हरतऱ्हेनें प्रयत्न करावा हें महाराजांनीं मनांत आणून आमचे वडील नारो गंगाधर यांस भेटीस बोलाविले. तेव्हां भेट जाहल्यानंतर आज्ञा राजश्रीनीं केली कीं. धनाजी जाधवराव यांचे फौजेंत जाऊन आपलें कार्य सपादन करावें. मग नारो गंगाधर, जाधवराव यांचे लष्करांत जाऊन, बाळाजी विश्वनाथ यांस भेटून, महाराजांकडील मजकूर बोलले कीं, महाराजांची चाकरी करून दाखवावी ह्मणजे तुह्मांस मोठें पद देतील. असें बोलोन निश्चय केला. नंतर बाळाजी विश्वनाथ यांनीं कारस्थान करून, धनाजी जाधवराव यांस भय घालून, ते मोगलाईत निघून गेले. तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांची व राजश्रीची भेट आमचे वडील नारो गंगाधर यांनीं केली. मग महाराजांचे समागमें सातान्यास जाऊन राज्याचा बंदोबस्त करून राज्यकारभार करूं लागले. शके १६२९ सर्वजितनाम संवत्सरे. मग पुढें कांहीं दिवस बाळाजी विश्वनाथ सेवा राजश्रीची करून होते. नंतर बहिरोपंत पिंगळे यांजवर कांही आरोप आला, तेव्हां महाराजांनीं बाळाजी विश्वनाथ यांजवर कृपाळू होऊन पेशवाई पिंगळे यांची काढून वस्त्रे शके १६३५ विजयनाम संवत्सरे माघमासीं, पद बाळाजी विश्वनाथ यांस दिल्हे. ते समयीं आमचे वडील नारो गंगाधर यांस मजमूचें पद दरकाचें देऊन वस्त्रें महाराजांनी दिल्हीं; व सरंजाम देण्याविषयीं राजश्रीनीं बाळाजी विश्वनाथ यांस आज्ञा केली. तेव्हांपासून आमची खानदानी सुरू होऊन दरखाचें कामकाज करीत आलों व खानदानीचा लौकिक महशूर जाहला. कलम.

१ सरंजाम पेशवेसरकारांतून वडिलांनीं संपादन केला. त्याप्रमाणें कुंपणीसरकारांतून चालत आहे देहाय. बितपशील:—

१ मौजें बाळकी, परगणे पाडेपढगांव येथील दरोबस्त अंमल जकातसुद्धां कुलबाब कुलकानूसुद्धां.

१ मौजें वाडिवळें, तर्फ नाणेमावळ येथील मोकासा निमे अंमल दरोबस्त.

१ मौजें वडनेर खुर्द, तर्फ गांजीभोईरें येथील मोकासा वगैरे अंमल.
१ मौजें पिंपरी जलसेन, तर्फ गांजीभोईरें येथील मोकासा वगैरे अंमल कुरणसुद्धां.
१ मौजें ताबेळें बुद्रुक, व मौजें बाणगांव व मौजें राकडें, परगणे चाळीसगांव प्रांत खानदेश येथील जहागिरीचा अंमल कुलबाब कुलकानू मोंगलाईतून नवाबसाहेबबहादूर यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.
१ मौजें मांजरी बुद्रुक, तर्फ हवेली प्रांत पुणें येथील मोकासा व बाबतीचा अंमल शंभुसिंग जाधवराव यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.
१ मौजें दाळिंब, तर्फ सांडस प्रांत पुणें येथील मोकासाचा अंमल फत्तेसिंग भोंसले राजे यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.
१ मौजें भवरापूर, तर्फ सांडस प्रांत पुणें येथील मोकासाचा अंमल रामचंद्र दामोदर यांनीं दिल्हा. तो सरकारांतून करार करून दिल्हा.

१०

सदरहू अन्वयें सरंजाम बहुत वर्षे इनामाप्रमाणें चालत आहे, त्यास आह्मांकडे वंशपरंपरेनें चालवावा. फौजेचा सरंजाम आह्मांकडे नाहीं. कलम.

१ इनामगांव व जमिनी व कुरणें, वगैरे चालत आहेत. कलम.

१ जहागिरी गांव व मोकासे वगैरे अंमलाचे याची वहिवाट आह्मीं करीत आलों. पेशवेसरकारची दखलगिरी नाहीं. कलम.

१ कुंपणीसरकारचा अंमल झाल्यापासून मोकासे वगैरे अंमलाचे देहे याचा ऐवज सरकार खजिन्यांतून पावतो. याजमुळें नुकसान झालें. सबब सरकारांतून मोबदला गांव दरोबस्त अंमलाचे लावून देण्याविषयीं हुकूम गौरनरसाहेब यांचा जाहला असतां गांव मिळत नाहीं. खजिन्यांतून ऐवज पावतो, त्यांत आमची नुकसानी आहे. यास्तव गांवचा हुकूम जाहला, त्याप्रमाणें दिलांत आणून मेहेरबानी करणें लायख आहे. कलम.

१ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यास कंपेश तफावत काय ती वगैरे लिहून पाठवावी त्यांचीं उत्तरें:—

१ मजमुचा दरख आह्मांस छत्रपतीमहाराज राजे यांनीं दिल्हा. तो पेशवे सरकारांतून लढाईअखेर चालला. तोंपावेतों सर्व लोकांत लौकिक व सनदा पत्रें वगैरे सरकारचा जाबता होण्याचा आमचे हातून कायम राहून, परराज्यांतून जहागिरी गांव मिळाले व दरखसंबंधें हजारों रुपयांची प्राप्ती होती. ते अलीकडे कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून दरख चालत नाहीं, येणेंकरून सर्वोपरी कमती आहे. दरखसंबंधें महालीं, मुलुखी व संस्थानीं व सरंजामी यांजकडे वार्षिकाचा सालाबादी ऐवज येणें, तो तसाच राहिला; व सरंजाम आह्मांस थोडका. दरखाचें उत्पन्न मोठें. त्याजवर खर्चवेंच व कार्य प्रयोजनें व संभावितपणाप्रमाणें

खर्च होत होता. त्यास तें उत्पन्न राहिल्यामुळें देण्याचें खराबींत आहों. एवेशीं मेहरबानी करणें लायख आहे. कलम.

१ पेशवेसरकारांतून कारकून निसबतीचे यांस तैनात मोईन पावत होती. व महाली आसाम्या दरखी चालत होत्या. त्या कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून चालत नाहीं(त). सर्व लोकांस पेनशीली करून दिल्ह्या. आमचे कारकुनांचा बंदोबस्त जाहला नाहीं. पेशवेसरकारचे कारकिर्दीत मेहनत बहुत केली, असें असतां सर्व बराबर चालविलें नाहीं. त्यास सरकारांतून कारकुनांचें चालविणें लायख आहे. कलम.

१ कुंपणीसरकारांतून इदीचा पोषाख सालवार पावत होता तो पावत नाहीं.

१ संसार बेगमीस ऐन जिन्नस व गल्ला गांवचा व देशावरील आणावयाविषयीं व एक हजार मेंढरें याजविशीं माफीचीं दस्तकें पेशवेसरकारचीं आहेत. त्याप्रमाणें चालत नाहीं. तीं चालविलीं पाहिजेत.

१ मौजें निधोली, तर्फ चिमणखल प्रांत साकसें हा गांव आंगरे महा सवाई सरखेल यांनीं आह्मांस इनाम देऊन इनामपत्रें करून दिल्हीं. त्याप्रमाणें पेशवेसरकारचा उपराळा राहून लढाईअखेर इनामगांव बहुत वर्षे चालला. कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून गांवचा वसूल आंगरे घेतात. एविशीं कुंपणीसरकारास समजाविलें असतां उपराळा होऊन चालत नाहीं. कलम.

—
५

सदरहूप्रमाणें उत्तरें लिहिलीं आहेत. त्यांजवरून समजोन घेऊन मेहेरबानी केली पाहिजे. तारीख छ २५ मोहरम सन १२४३ फसली.

**ब.**

साहेब मुषफक मेहेरबान करम फरमाय दोस्ता हेनरी ब्रौण साहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलमा हू.

छ अजीसाहेब जीवनराव नारायण मुजुमदार सलाम बादज सलाम अंकीं येथील खैरीयत तागायत तारीख १९ माहे दिजंबर सन १८५१ इसवीपावेतों जाणोन आपली शादमानी हरहमेषा कलमीं करून दिल आराम करीत असलें पाहिजे. दिगर मजमून आसाहेबाकडून तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवीचें पत्र आलें; त्यांतील आभिप्राय कीं, सरकारचा हुकूम तारीख ३० जुलई सन १८५१ इसवीचा आल्यावरून कलमीं केलें जातें कीं, आपल्यास मरातब मुजुमदार पद आहे हें कधीं कोणल्या सबबीनें कोणाकडून प्राप्त जाहलें, याचा एकंदर खानदानीचा व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं लिहून यावा, याबाबें लिहून आलें. व त्याजविषयीं इकडून लिहून जाण्यास आवकाश लागल्यामुळें दुसरें पत्र आ मेहेरबानाकडून तारीख ५ माहे दिसंबर सन १८५१ इसवीचे पहिलें

पत्राचें उत्तर पाठविण्याविषयीं आलें. ऐशीयास, श्रीमन्महाराज शाहू मह. यांनीं सातार मुक्कामीं श्रीमंत राजश्री बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाई पदाच। आर्बा आशर मया व अलफ सन ११२३ फसली, सन १७१३ इसवी व १४ शक माघ मास माहे जिल्काद यांत दिल्ही. त्यासमयीं आमचे पणजे नारो गंगाधर यांस मुजुमदारीचें पद छत्रपती महाराज यांनीं देऊन वस्त्रें दिल्हीं, आणि पेशवे यांचे निसबतीस लावून दिल्हें. त्या दिवसापासून मुजुमदारीचें दरकाचें काम पेशवाईचे कारकिर्दीत आमचे पणजे नारो गंगाधर यांचे हातून चाललें; व त्यांचे पाठीमागें त्यांचे पुत्र निळकंठराव नारायण ह्मणजे आमचे आजे यांचे हातून चालले व त्यांचे पाठीमागें त्यांचे पुत्र नारो निळकंठ ह्मणजे आमचे तीर्थरूप यांचे हातून पेशवाईअखेर सन १८१७ इसवी, शके १७३९, या सालापर्यंत मुजुमूचें काम चाललें. असें मुजुमदारी दरकाचें काम सुमारें १०५ एकशेंपांच वर्षें आमचे वडिलोवडिलीं चालत आलें व त्याबाब दरकाचें उपन्न येत होतें, व शिवाय जातीस सरंजाम व इनामगांव वगैरे सरकारांतून चालत आले आहेत. कुंपणी सरकारचा अंमल जाहल्यावर ते सरंजामी गांव व इनामी गांव वगैरे आमचे तीर्थरूप नारो निळकंठ यांजकडे कुंपणी सरकारांनीं चालविले. आमचे तीर्थरूप शके १७५५ चैत्र वद्य ५ माहे एप्रील सन १८३३ इसवी रोजीं कैलासवासी जाहले. सबब त्यांचे वडील पुत्र निळकंठ नारायण मयत. सबब त्यांचे पुत्र कृष्णराव निळकंठ ह्मणजे आमचे पुतणे यांचे नांवें सरकारांनीं जे आमचे तीर्थरूपाकडे कुंपणीसरकारांनीं चालविलें तें, वडील पुत्राचे पुत्र कृष्णराव सबब त्यांचे नांवें चालविलें. त्यांत निमेचे वारस आम्हीं आहों व त्याप्रमाणें विभागाची वहिवाट त्याप्रमाणें निमेची आमची चालत आहे. हें सरकारास दखल आहे. मुजुमूचे मरातब व मुजुमदारीचें पद आमचे वडिलांस सरकारांतून प्राप्त झालें, त्या दिवसापासून सरकारांत कागदीं आमचे वडिलांचीं निशाणें लागत गेलीं आहेत. तो बहुमान सर्व राखणें, आमचें सरकार समर्थ आहेत. ज्यादा काय लिहिणें प्यार मोहोबत असों दिजे, हे किताबत.

सही. जीवनराव नारायण मुजुमदार दस्तूर खुद्द.

---

## २४ मेहेंदळे.

### अ.

यादी कृष्णराव बळवंत ऊर्फ आप्पा बळवंत यांची वंशावळ सुरुसन सलास अशरीन मयातैन व अलफ.

मूळ पुरुष बहिरवभट मेहेंदळे हे हरिहरेश्वरास रहात होते. त्यांस पुत्र दोनः—

| | |
|---|---|
| वडील विश्वनाथभट | दुसरे गणपतराव मेहेंदळे. यांस पुत्र तीन:— |
| विश्वनाथभट यांचा वंश. | १ वडील रामचंद्रराव ऊर्फ बळवंतराव. |
| बहिरोपंत मेहेंदळे वगैरे. | १ दुसरा बाबूराव. |
| | १ तिसरे आनंदराव ऊर्फ बजाबा बाबा. |
| | ३ |

…घांचा विस्तार:—विश्वनाथभट व गणपतराव हे बाळाजी विश्वनाथ यांचे सख्खे …क. बाळाजी विश्वनाथ यांस सातान्याहून पुण्याकडे सुभ्याचे वगैरे मसलत …ली, तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांनीं, गणपतराव हे भाचे, यांस हरिहरेश्वराहून बहिणीसुद्धां आणिलें. तेव्हां विभक्त होते. पुढें बाळाजी विश्वनाथ यांनीं आपले बहिणीस चोळीस एक गांव मौजें खोर, तर्फ पाटस प्रांत पुणें हा इनाम दिल्हा, आणि गणपतराव यांस पागेचे घोडें देऊन बाळगिलें. कसबें सासवड येथें जमिनी वगैरे इनाम दिल्या व घर बांधावयास तेथें जागा दिल्ही. गणपतराव यांस रामचंद्रराव ऊर्फ बळवंतराव यांनीं थोरले बाजीराव साहेब यांजवळ राहून चाकरी कडण्याची व शिरे मंदगिरी (?) टिपूचे मुलखांत दोन स्वाऱ्या मोठ्या केल्या, व आणखीही स्वाऱ्यांची चाकरी चांगली केली. तेव्हां जातीचे सरंजामास पंचेचाळीस हजारांचे गांव व शागीर्दपेशा चार हजार, एकूण एकूणपन्नास हजारांचा सरंजाम दिल्हा. पुढें नानासाहेब यांनीं बळवंतराव यांजकडे इतलाखी स्वार दोन चारशें दिल्हे. त्यांची फडणिशी आमचे चुलत आजे बाळाजीपंत यांस दिली. बळवंतराव लढाईंत पानपतास पडले. त्यांचे चिरंजीव कृष्णराव त्यांस आप्पा बळवंत ह्मणत होते. त्यांनीं उत्तरोत्तर दौलत मिळविली. स्वाराचा सरंजाम दोन लक्षांचा दिला व जातीस तैनात आणखी पंचवीस हजारांची नेमून गांव नेमून दिल्हे. पेशव्यांनीं स्वाऱ्या केल्या तितक्याबरोबर आप्पा बळवंत यांनीं व फौजेनीं कामें चांगलीं केलीं. चौघडा दिला. कृष्णराव यांस औरसपुत्र दोघे होते. ते वीस वीस वर्षांचे होऊन मृत्य पावले. त्यांस संतान नाहीं. तेव्हां आप्पासाहेब मेल्यावर हल्लीं बळवंतराव आहेत, हे दत्तक घेतले. त्यांजकडे दौलत सरंजामसुद्धां चार वर्षे चालली. पुढें दहा पंधरा हजारांचे गांव ठेवून सारी जप्ती बाजीराव पेशव्यांनीं केली. याप्रमाणें मजकूर. दुसरे बाबूराव त्यांचें नक्कल. तिसरे आनंदराव त्यांस बजाबा ह्मणत होते. त्यांस गणपतराव ऊर्फ बापू मेहेंदळे हल्लीं आहेत. आप्पा बळवंत यांस वाडा व पागा वगैरे बांधावयास जागा पुण्यांत दिली. तेथें मोठ्या इमारती त्यांनीं बांधिल्या. याप्रमाणें विस्तार तपशिलवार छ २४ सवाल.

ब.

यादी राजश्री गणपत आनंदराव मेहेंदळे सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ. आसाहेबी तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें खत पाठविलें. त्यांत मजकूर, हजरत बंदगानअली रेट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी म्हणून कलमीं केलें जातें जें:—आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां कैफियत लिहून पाठविली पहिजे. त्यांतील तपशील, आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाहला तें, व जातीस सरजाम आपले वडिलोपार्जित चालत आहे तो, कोणते तारखेस

सरंजाम कोणीं दिल्हा व कोणी संपादन केला, हें लिहिण्यांत यावें. त्याजवरून लिहिण्यांत मजकूर येतो बितपशील:— कलमें.

१ आमचे आजे गणपतराव बहिरव यांनीं बाळाजी विश्वनाथ यांची चाकरी केली. त्यांनीं त्यांस तैनात जार्तास करून दिल्ही. नक्त रुपये ८९०७॥ व गांवही दिल्हा व जमिनी दिल्ह्या. त्यांचा आप्तपणाही होता. शके १६३५. गणपतराव आमचे आजे यांस पुत्र तीन. कनिष्ठ पुत्र आनंदराव गणपत ते आमचे तीर्थरूप. व त्यास कन्या एक होती. ती नाना फडणीस यांची मातुश्री. कलम.

१ आमचे आजे कैलासवासी जाहल्यावर त्यांचे नांवें चालत होते त्याप्रमाणें आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत यांचे नांवें पेशवेसरकारांतून करार करून देऊन बहाल केलें, व ज्यास्ती खानदेशचे गांव नवीन दिल्हे. कलम.

१ आह्मीं आमचे वडील असतां माधवराव नारायण यांचे कारकिर्दींत सरकारचीं कामें-काजें रामचंद्र गणेश यांजबरोबर केलीं. याजमुळें आह्मांस निराळी तैनात सरकारांतून करून दिल्ही. नक्त रुपये २६०० व गांवही दिल्हा. कलम.

१ आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत शके १७११ चें सालीं कैलासवासी जाहल्यावर सरकारांतून माधवराव नारायण पेशवे यांनीं, वडिलोपार्जीत तैनात वगैरे जमिनी व गांव चालत होते ते, व आमचे नांवें करून दिल्हे होते ते, दोन्ही एकत्र करून आमचे नांवें सनदा करून दिल्ह्या व कर्नाटकांत आमचेबरोबर फौज व पायदळ देऊन परशरामभाऊ पटवर्धन तासगांवकर यांस कुंपणीसरकारचे मदतीस देऊन टिपूवर पाठविलें. त्या समागमें आह्मीं जाऊन सरकार कामगिरीही बजाविली. कलम.

१ शके १७१८ सालीं बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दींत श्रीमंत यांनीं लढाईअखेर पेशजीं चालत होतें त्याप्रमाणें चालविलें. नक्त नेमणूक पावत होती, ती पावली नाहीं. परंतु आह्मांस गांव दोन नवीन दिल्हे. कलम.

१ शके १७३९ चें सालीं कुंपणीसरकारचा अंमल कार्तिकमासीं जाहल्यावर शके १७४० चें सालीं कुंपणीसरकारांतून बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दींत आह्मांकडे गांव व जमिनी वगैरे चालत होते, त्याप्रमाणें बहाल करून चालते केले. बितपशील:—

१ खेरीज तैनात इनामाप्रमाणें:—

१ मौजें सुरपान व मौजें हहरूण, परगणे भाकरे प्रांत खानदेश गांव २ खेरीज मोकासा करून तनखा कमाल रुपये १८१६॥.

१ मौजें खोर, तर्फ करेपठार हा गांव निमे तनखा रुपये ६२९.

१ कसबें सासवड, येथील जमिनी बिघे.

१ मौजें मुंजेरी, तर्फ हवेली येथील जमीन रुके २। आकार रुपये १३॥.

४

१ मौजें बाभुळसर खुर्द, परगणे कर्डे हा गांव दरोबस्त आमचे आजे यांनीं मिळविला. तनखा रुपये १८१४।.

१ मौजें पाधवडी, परगणे इंदापूर तनखा रुपये १६००.

१ मौजें शिर्वे, तर्फ वाडे हा गांव मोकासा खेरीजकरून तनखा रुपये ८००.

१ मौजें कानपोली, तर्फ तळोजे प्रांत कल्याण तनखा रुपये ३२०.

१ मौजें खेराणें, येथील नेमणूक नक्त रुपये ६३॥.

१ मौजें पूर, तर्फ करेपठार येथील जमीन आकार रुपये १२॥.

१ तांदुळ तालुके नेरळ पैकी नेमणूक खंडी २.

१ पेणचे बंदरीं नेमणूक मिठाची कैली खंडी ६.

२ कुरणें.

  १ मौजें देवळी.

  १ मौजें भिंवडी.

  २

१ दसऱ्याचा पोषाख आंख ३५०.

१ दस्तकें तांदुळ व मीठ वगैरे माफीचीं.

येणेंप्रमाणें आह्मांकडे आजपावेतों कुंपणीसरकारांतून चालविलें आहे. दरम्यान समशेनसाहेब यांनीं शके १७४८ चे सालीं मौजें कानपोली, हा गांव व खेरणें येथील नेमणूक व तांदूळ व मीठ महकूब चार कलमें केलीं, व बाकी आह्मांकडे चालत आल्याप्रमाणें चालत आहे. चार कलमें आह्मी असतां सरकारांतून महकूब करूं नये असा कायदा असतां जाहलें. तरी साहेबी मेहेरबानी करून चारी कलमें खुली करावी किंवा त्याचे मोबदला द्यावें. कलम.

येणेंप्रमाणें खानदानीची कैफियत लिहिली आहे. ही खावंदांनीं दिलांत आणून आजपावेतों आह्मांकडे पुस्त दरपुस्त चालत आलें, त्याप्रमाणें पुढेंही चालविलें पाहिजे. तारीख २ सफर.

## क.

साहेब मुषफक मेहेरबान साहेब जान वार्डीन साहेब बहादूर डिपूटी एजंट जिल्हा दक्षण सलमा हू.

• छ अजिदिल येखलास दोस्त गणपत आनंदराव मेहेंदळे बाजत सलाम अंकीं येथील खैर सला जाणून आपली शादमानी हमेषा कलमी करीत जावी. आपण पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें पाठविलें. त्यांत लिहिलें जे, हजरत बंदगानअल्ली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी. ह्मणोन कलमीं केलें जातें जें, आपण मेहेरबानगी

करून सरकारांत रवाना करण्याकरितां कैफियत लिहून पाठविली पाहिजे. दिगर आमचे आजे गणपतराव बहिरव मेहेंदळे कारकीर्द श्रीमंत बाळाजी विश्वनाथ पेशवेसरकार यांजपाशीं व यांचे चिरंजीव बाजीराव बल्लाळ व चिमणाजी आप्पा थोरले, यांजबरोबर चाकरी केली व कामेंकाजें बहुत केलीं. तेव्हां सरकारांतून हत्ती दिला. गणपतराव यांस पुत्र तीन व कन्या एक. वडील पुत्र बाबुराव यांस पुत्र नाहीं. दुसरे पुत्र बळवंतराव यांस पुत्र कृष्णराव. त्यांचे पुत्र बळवंतराव. हल्लीं तिसरे आनंदराव यांस पुत्र गणपतराव हल्लीं कन्येचें नांव रखमाबाई त्यांचे पुत्र नानाफडणीस. आमचे आजे गणपतराव हे श्रीमंत नानासाहेब पेशवे यांचे कारकिर्दींत कांहीं दिवस होते. पुढें कैलासवासी जाहले. नंतर त्यांची तैनात व स्वार वगैरे चालत होते ते आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत यांचे नांवें सरकारांतून करून दिल्हे. पुढें श्रीमंत भाऊसाहेब पेशवे पाणिपतचे स्वारीस गारद जाहले. पुढें कांहीं दिवसांनीं श्रीमंत नानासाहेब कैलासवासी जाहले. पुढें श्रीमंत माधवराव बल्लाळ यांची कारकीर्द अकरा वर्षें जाहली. पुढें कैलासवासी जाहले. नंतर त्यांचे बंधु श्रीमंत नारायणराव बल्लाळ यांची कारकीर्द एक वर्ष जाहली. नंतर कैलासवासी जाहले. पुढें श्रीमंत रघुनाथ बाजीराव दादासाहेब यांची कारकीर्द श्रीमंत सवाई माधवराव यांचा जन्म पुरंदरीं होई तों पावेतों जाहली. आमचे तीर्थरूप सुद्धां आह्मी हुजूर वागत होतों. पुढें कारकीर्द श्रीमंत माधवराव नारायण किल्ले पुरंदर येथील मुक्कामीहून रामचंद्र गणेश यांचे समागमें करवीरचे स्वारीस आम्हांस सरकारांतून रवाना केलें. कांहीं बरोबर स्वार दिले. आमचे तीर्थरूप हुजूर होते. आम्हांस जातीस व पालखीसुद्धां तूर्त रामचंद्र गणेश यांनी नेमणूक करून दिल्ही. ते रुपये ४२०० बेताळीशें. त्या स्वारींत आमचें कामकाज पाहून हत्ती अंबारीसुद्धां आम्हांस दिल्हा. पुढें सरकारांत हुजूर चाकरी करीत होतों. त्यानंतर आमचे तीर्थरूप शके १७२१ त कैलासवासी जाहले. तेव्हां तीर्थरूपांची तैनात व स्वार वगैरे जे चालत होते ते, व आमचे नांवें नेमणूक जाहली होती ती, मिळून आमचे नांवें सरकारांतून करून दिल्ही. नंतर सरकारांतून इंग्रज बहादूर यांचे कुमकेस श्रीरंगपट्टणचे स्वारीस परशरामभाऊ पटवर्धन यांस फौज देऊन रवाना केलें. त्यांचे समागमें आह्मांस दोन हजार स्वार नेहमीं असावे, असा ठराव होऊन आम्हांस रवाना केलें. धारवाडचे मुक्कामीं किल्ल्यास मोर्चे लावावे, असें सिद्ध झालें. त्यावेळेस अजम लिटलीन ( क्याप्टन लिटल ?) साहेब यांनीं भाऊंस सांगितलें कीं, दोन सरदार यांनीं पुढें अंमल बसवीत जावा. मग आपण मोर्चे लावावे. याप्रमाणें ठरोन भाऊंचे चिरंजीव रामचंद्रपंत आप्पा यांस हानागलीचे वगैरे रोखे रवाना केले व आम्हांस सोदेबिदनूर प्रांतीं बरोबर तोफा व तीन हजार गाडद हुजूरची व नामजाद मावळे लोक दोन हजार व कानडे लोक पांच हजार देऊन रवाना केलें. तिकडे आह्मांकडून कामेंकाजें काय जाहलीं तीं भाऊंस माहीत होतीं. ते कैलासवासी जाहले. परंतु श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचें पत्र आम्हांपाशीं आहे तें पहावें. ह्मणजे साहेबांचे दिलांत येईल. भाऊ श्रीरंगपट्टणास गेले.

समागमें आह्मी होतों. तह जाहल्यावर फौजेसुद्धां तासगांवास माघारे आलों. तेथून भाऊंचा निरोप घेतला. निरोपसमयीं आम्हांस वस्त्रें व हत्ती बहुमानाचा देऊन निरोप दिल्हा. मग आम्हीं पुण्यास आलों. आल्यानंतर श्रीमंत सवाई माधवराव यांची कारकीर्दीअखेर होई तों पावेतों हुजूर होतों. पुढें श्रीमंत चिमाजी आप्पा यांस सवाई माधवरावसाहेब यांचे पुत्र जाहले. त्यांची कारकीर्द नऊ दहा महिने जाहली. पुढें श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब आले. यांचे कारकिर्दींत आम्हांस नक्त नेमणूक पावली नाहीं. गांव, बागा व शेतें व कुरणें मात्र आम्हांकडे चालविलीं. पुढें कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यावर श्रीमंत बाजीरावसाहेब यांनीं चालविल्याप्रमाणें कुंपणीसरकारांतून गांव व बागा व शेतें व कुरणें चालविलीं. त्यापैकीं मौजें कानपोली हा गांव दरोबस्त व मौजें खेरणे येथील नेमणूक मिळोन रुपये ३८३॥· तर्फ तळोजे तालुके नेरळ प्रांत कल्याण व तांदुळ बारीक कैली खंडी २ दोन तालुके नेरळपैकीं हे आम्हांकडे सात आठ वर्षे कुंपणीसरकारांतून चालविले असतां आम्हांकडून कोणतेंही अंतर पडलें नाहीं. असें असतां अजम समशेनसाहेब कलेक्टर सुभा साष्टी उत्तर प्रांत कोंकण यांनीं जप्त केलें आहे. त्यास आसाहेबांनीं कोणाचें कमी केलें नाहीं, त्यापेक्षां आमचेंही कमी करूं नये. याउपरी मर्जी खावंदाची. साहेबीं पत्रांत लिहिलें कीं, शक, मित्या लावून लिहून पाठवावें. त्यास होळकर दंग्यांत कागदपत्र गहाळ जाहले. याजमुळें शक, मिती लागली नाहीं. जी वहिवाट जाहली ती जातीनें स्मरणानें लिहिली आहे. व पेशवेसरकारांतून इस्तकबिल कारकिर्दी तागायत अखेरकारकीर्दीपावत आलें त्याची याद आलाहिदा पाठविली आहे. व हल्लीं कुंपणीसरकारांतून पावत आहे तेंही यादींत लिहिलें आहे. त्याजवरून खावंदास कळेल. ज्यादा काय लिहिणें, हे किताबत.

ड.

यादी राजश्री बळवंतराव कृष्ण मेहेंदळे सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. आसाहेबीं तारीख ८ माहे सपटंबरचें खत पाठविलें आहे. त्यांत मजकूर हजरत बंदेगानअल्ली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतलि जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी ह्मणोन कलमीं केलें जातें जें, आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशीलः—आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला तें व फौज व सरंजाम आपले वडिलांकडे चालत होता तो, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली ते, व आपलेकडे हल्लीं सरंजाम काय चालत आहे, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे. त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो बितपशीलः—

१ आमचे पणजे गणपतराव बहिरव हे श्रीमंत बाळाजी विश्वनाथ यांनीं पेशवाई मिळविली, यांचे भाचे, त्यांजपाशीं राहिले. त्यांची चाकरी केली. नंतर श्रीमंत बाजीराव व चिमाजी आप्पा यांची चाकरी केली. त्यांनीं तीन गांव व जमीनी सासवड येथें दिल्ह्या. त्यांस पुत्र ३ तीन, त्यांत वडील आमचे आजे बळवंतराव गणपत.

१ आमचे आजे बळवंतराव यांनीं श्रीमंत बाळाजी बाजीराव व सदाशिवरावभाऊ साहेब यांची चाकरी केली. प्रथम तैनात जातीस एक हजार रुपये केले, व स्वारास पंचवीसशें रुपये व आबदागीर वगैरे नेमणूक याप्रमाणें शके १६७५ तागाईत शके १६७६ पर्यंत चालली. पुढें श्रीमंत नानासाहेब यांजबरोबर कडप्याचे स्वारीस गेले. तेव्हां तैनात जातीस १४००० चवदा हजार रुपयांची जाहली. स्वारींहून आलीयावर पुढें तांदुळज्याची स्वारी नवाबावर जाहली. तेथें आमचे आजे यांस जखमा लागून मोठा उपयोग केला. तेव्हां ज्यास्ती सरंजाम रुपये ३५००० पस्तीस हजारांचा सन इहिदे सितैनांत दिला. एकूण ४९००० रुपये एकूणपन्नास हजारांचा सरंजाम जाहला. पुढें श्रीमंत भाऊसाहेब पानपताचे स्वारीस गेले, त्यांजबरोबर गेले. तेथें लढाई गिलच्या, इराणीशीं केली. त्या लढाईंत ठार सरकारकामावर आले. ते समयीं आमचे तीर्थरूप कृष्णराव आप्पासाहेब बरोबर होते. ते माघारे देशीं आले.

१ आमचे तीर्थरूप आप्पासाहेब पानपताहून आलीयावर श्रीमंत नानासाहेब यांनीं तीर्थरूपांस आजाची तैनात जातीची ४९००० रुपये एकूणपन्नास हजारांची होती, ती करार करून देऊन शेवा घेतली. श्रीमंत माधवरावसाहेब यांचीही चाकरी केली. पुढें श्रीमंत सवाई माधवराव साहेब यांचे कारकीर्दींत शके १६९६ चें सालीं मौजें बोरखळ हा गांव इनाम दिल्हा, व चौघडा व शंभर स्वारांचा सरंजाम शके १६९८ ह्या सालीं दिल्हा. सरकार चाकरी स्वारी बदामी व पट्टणची हरी बल्लाळ फडके यांजबरोबर केली. सरकारचे पदरीं सरदार आणखीं बहुत होते. परंतु विश्वासाचे मनुष्य इतबारी योग्यतेचे नामांकित कोण हें मनांत आणोन, आंबारींत खासा स्वारी जाहली असतां, आप्पासाहेब खवासखान्यांत बसत होते. पुढें शके १७१६ चें सालीं ज्यास्ती सरंजाम अडीचशें स्वारांचा दिल्हा. एकूण सरंजाम जातीचा ४९००० एकूणपन्नास हजारांचा व चौघड्यास ३००० तीन हजारांचा व फौजेस १०५००० एक लक्ष पांच हजारांचा येणेंप्रमाणें व आसाम्या व पोषाख व दस्तकें व बक्षीसें येणेंप्रमाणें पावत होतें. तें शके १७२० चें सालीं आप्पा-साहेब मृत्यु पावले. नंतर आमचे नांवें सदरहू सरंजाम वगैरे करार करून दिल्हा.

१ आमचे नांवें सरंजाम वगैरे शके १७२० चें सालीं वडिलांचे नांवें चालत होता

त्याप्रमाणें, श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांनीं करार करून देऊन, सेवाचाकरी तीन चार वर्षे घेतली. पुढें सरंजाम जप्त करून बाकी ठेविला. तो कुंपणी सरकारचे अंमलापर्यंत चालला. तोच हल्लीं सरंजाम चालत आहे. जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून दखलगिरी कोणते तऱ्हेनें केली? त्यास सरंजाम एक वेळ दिल्हा ह्मणजे त्यांत दखलगिरी पेशवेसरकार करत नवते. आमचे आह्मी जहागिरीची उस्तवारी राखून लावणी उगवणी मुखत्यारीनें करीत होतों. सरंजामीगांव व इनामीगांव व जमीनी, कुरणें वगैरे चालत आहे त्याचा तपशील:—

१ इनाम गांव मौजें बोरखळ समंत निंब प्रांत वाई तनखा २८६४८= रुपये.

॥· मौजें खारे, तर्फ करेपठार देहे १ पैकीं निमे तनखा १२४५॥। रुपये पैकीं तनखा निमे रुपये ६२२॥।= खेरीज तैनात.

११ सरंजामीगांव.

५ मौजें तांबोळें व मौजें गोटेवाडी व मौजें भावेवाडी व मौजें हिंगणी व मौजें पीरटाकळी परगणे मोहोळ तनखा ७१२२॥।≈॥। रुपये.

१ मौजें जवळें, परगणे ढोकी प्रांत बालेघाट देहे १ तनखा ४१३। रुपये.

१ मौजें भांडगांव, तर्फ पाटस प्रांत पुणें तनखा १८०० रुपये.

१ मौजें पूर, तर्फ करेपठार पैकीं शेत जमीन १२॥ रुपये.

१ मौजें सुपें, तर्फ वाडें तनखा २२५ रुपये.

१ मौजें कोथरूड, तर्फ कर्यातमावळ पैकीं रुपये.

७५ २००

२७५ रुपये

१ मौजें बोरखळ, समंत निंब येथील देशमुखीचे कसरेपैकीं तनखा ११४८= रुपये.

११

१ जमिनी.

१ कसबें पुणें, पैकीं माळी मुंजेरीपैकीं बागेस जमीन रुके ८४॥ पैकीं निमे.

१ मौजें हाडपसर, तर्फ हवेली पैकीं जमीन बिघे ८१०.

१ कसबें सासवड, कर्यात मजकूर पैकीं.

८५ इनाम जमीन बिघे.

० प्रत जमीन दुमाला बिघे.

३

१ कुरणें दोन पैकीं निमे.

०॥० मौजें देवढी, तर्फ खेडेंबारे पैकीं.

०॥० मौजें भिंवडी, तर्फ करेपठार पैकीं.

१

१ पोषाख दसऱ्याबद्दल सनगें ३॥.

१ घर बेगमीस किराणा व भुसार हरएक जागाहून येई त्याची माफी होती व मेंढरें वगैरे वनचराईची माफी.

१ हल्लीं पेशवेसरकारांतून मातबरी चालत अलीकडे आली. त्यांत कंपेश तफावत कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत हल्लीं कमती चालत आहे तेः—

१ दसऱ्याबद्दल पोषाख सनगें ३॥ पैकीं हल्लीं सरकारांतून सनगें दोन पावतात.

१ घर बेगमीस किराणा व भुसार वगैरे हर जागांहून येतें, त्यास हशील पडतें, व मेंढरें वगैरे वनचराई पडते.

सदरहू कलमें आब्रूचेबद्दल खातर मेहेरबानी करणें खावंदाकडे आहे. येणेंप्रमाणें खानदानीची कैफियत तारीख ७ माहे मे सन १८३३ इसवी.

सही. बळवंतराव कृष्ण मेहेंदळे.

---

## २५ विंचूरकर.

यादी राजश्री रघुनाथराव विठ्ठल विंचूरकर सुरुसन आर्बा आर्बैन मयातैन व अलफ. मेहेरबान इनविरेरीटीसाहेब बाहादूर इंच्यार्ज कलेक्टर यांचा हुकूम महालानिहायचे मामलेदार यांजला गेल्यावरून, परगणे पुरंदर व परगणे खेड येथील मामलेदार यांनीं व हुजूर दफ्तरदार राव बाहाबूर यांनीं विचारिलें कीं, मेहरबान एजंटसाहेब बाहादूर यांजकडून तारीख १२ माहे जून सन १८४३ इसवीचें पत्राबरोबर तीन सदरांचा तक्ता तयार करून पाठविण्याविषयीं नमुना आला. त्यांत सरदार लोक यांजला सरंजाम दिल्याची तारीख व त्याबद्दल सनद किंवा कांहीं दुसरा दाखला व सरंजाम खेरीज दुसरें कांहीं उत्पन्न त्याची बेरीज व हल्लीं सरंजाम चालतो तो त्यास औरस पुत्र त्यांचें नांव उमर लावून याचा जाब द्यावा ह्मणोन. त्यास श्रीमन्महाराज छत्रपती यांनीं शके १६४२, सन १७२० इसवी सालीं आमचे वडील तीर्थस्वरूप कैलासवासी विठ्ठलराव शिवदेव यांजला ठेविलें. सरकार चाकरी लढायांचे प्रसंगांत हरहमेषा शिपाईगिरी होत आल्यामुळें महाराजांची दिवसेंदिवस कृपा वाढून सिद्धीसाद यांचे लढायांचे प्रसंगांत यांचा फार उपयोग वाटून पागा दिली. पुढें दाउदखां वगैरे मोमलास कबज्यांत आणिलें. नंतर आणखी इतलाख फौजे यांजकडून ठेवून, दय। बहादरांचें पारिपत्य करून आलीयावर साष्टी वगैरे मसलत त्यासमयीं दाहा हजार फौजेसुद्धां पेशवे यांचे हातांत विठलराव शिवदेव यांजला दिल्हें. तेव्हांपासून हरएक लढायांत यश संपादन होत आलें. नंतर उदेपूर, कोटें, दिल्लीं, मकसुदाबाद, बंगाला वगैरे हिंदुस्थानांत

जाऊन डंगाई पैकीं कालपी वगैरे तेहतीस लक्षांचा मुलूख सरकारांत आला. नवाबाचा व पेशवेसरकारचा भाईचारा जाहला. विठलराव शिवदेव यांनीं जाटांचें पारिपत्य करून ग्वाल्हेर किल्ला व मुलूख घेतला. दिल्लीपद पातशाहा यांजवर दुसमानाचा प्रसंग पडला. कांहीं काबू नाहीं. तेव्हां विठलराव शिवदेव यांनीं बचाव केल्यामुळें, पातशाहा यांनीं ' उमदेतुलमुल्ख बहादर ' हा किताब देऊन विंचूर वगैरे इनाम दिल्हें. लढायाचे प्रसंगांत जो मुलूख सुटला, "उमदेतुलमुलूख" बहादर तो यांजकडे फौजेचे खर्चास बहुत दिवस होता. नंतर सोळा लक्ष पंचाऐशीं हजार रुपयांचा मुलूख यांजला देण्याचा ठरून त्याजबद्दल सनद श्रीमंत कैलासवासी माधवराव बल्लाळ पेशवे यांनीं विठलराव शिवदेव यांचे नांवें सनद छ १ साबान सब सलास सितैन मया व अलफ़, शके १६८४ सालीं दिल्ही. तिची नक्कल दिल्ही आहे. याखेरीज हिंदुस्थान प्रांतींचे राजेरजवाडे यांजवर येहेसानें बहुत जाहल्यामुळें त्यांजकडून अजमास पंचेताळीस हजार पांचशें रुपयांचें इनाम वंशपरंपरा मिळालेलें, तेंही विनाकारण सरकारांत सन १८१८ इसवीचे लढाईपासून घेतल्यामुळें मुंबईसरकारांत व कलकत्तेसरकारांत अर्ज करीत आलों. आतां विलायतसरकारास अर्ज पाठविला आहे. हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे तें:—

१ जिल्हा पुणें.

१ बाग मौजें कोथरुड, परगणे हवेली येथें पेशवेसरकारांतून इनाम श्रीमंत कैलासवासी बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं दिल्हा. त्याची बेरीज १५ रुपये, त्याबद्दल सनदेचा दाखला कुंपणीसरकारांतून इसवी सालीं घेतला त्याची नक्कल दिल्ही आहे.

१ परगणे पुरंदर या महालीं वतन व इनाम.

१ कसबें सासवड येथें वतन व इनाम.

१ जमीन इनाम बिघे ८२२ बरहुकूम बेरीज ४० रुपये.

१ जकातीवर दाणीपणाचें वगैरे वतन त्याचा दरसाल आकार अजमासें रुपये ३०० पैकीं निमे हिस्सा.

—
२

१ मौजें वणपुरी, परगणे पुरंदर येथें इनाम जमीन चाहूर .॥. बद्दल बेरीज———————६० रुपये.

—
२

१ मौजें शिंगवें, तर्फ औसरी या गांवीं पाटलकीचें वतन आहे, त्या संबंधें इनाम जमीन चाहूर १.

१ मौजें डोणजें, परगणे हवेली येथील श्री आंबरीनाथाचें कुरण त्याबद्दल बेरीज———————२०० रुपये.

१ मौजें मांडकी, परगणे शिरवळ व मौजें रासें, तर्फ चाकण एकूण दोन गांव पेशवेसरकारांतून राजे विठलराव शिवदेव यांस खेरीज तैनात दिल्हे.

१६४० मौजें रासें, तर्फ चाकण मोकासासुद्धां.

१५५८८≈ मौजें मांडकी, परगणे शिरवळ.

३१९८८≈

५

१ जिल्हा नगर.

१ इनाम गांव दोन.

१ कसबें विंचूर, हा गांव दिल्लीपद पातशाहा यांजकडून त्याची बेरीज ८००१ रुपये.

१ मौजें सायखेडें, परगणे नाशिक दरोबस्त सदरहूप्रमाणें खेरीज मोकासाकरून बेरीज ११७५८≈ रुपये.

२

१ वतन देशमुखी व पाटीलक्या व कुलकर्णी वगैरेबद्दल आकार २००० रुपये.

१ कुरण मौजें चाटोरी, बद्दल बेरीज १०० रुपये.

१ कलालीबद्दल आकार कुंपणी ५६५८।~ रुपये.

१ जातीचा सरंजाम चालतो त्याची कमाल तनख्याची बेरीज ५५५१५ रुपये. पैकी मौजें रासें व मांडकी, दहीवड येथील बेरीज ५७९६ बाकी बेरीज ४९७१९ रुपये.

५

१ जिल्हा खानदेशपैकीं खेरीज तैनात मौजें दहीवड, परगणे वाखारी हा गांव, किरकोळ जमिनी व मौजें अरफळ, संमत निंब इलाखा सातारा वगैरे पेशवेसरकारांतून होते, त्याचे मुबादल्यास लावून दिल्हे बेरीज २५९८ रु.

१ मौजें कोटमगांव, परगणे चांदवड येथील मोकाशाबद्दल २४९॥ रुपये.

१ जकातीबद्दल उत्पन्न दरसाल सरासरी २२०० रुपये येत होतें, परंतु सन १२४७ फसली सालीं सरकारांतून जकात माफ करून मोठेमोठे जागा सरकार घेत आहे. आमचे अंमलांतील आह्मी घेऊं नये, सरकारांतून त्याचेबदला ऐवज मिळेल ह्मणोन पत्र आल्यावरून घेण्याची महकुबी करून जकातीचे हिशेब नगरचे मेहेरबान कलेक्टरसाहेब बहादूर यांजकडे दिल्हे. परंतु अद्यापि बंदोबस्त होऊन आला नाहीं ते दरसाल २२०० रुपये.

१ एकंदर सरंजाम व इनाम मिळोन अठरा लक्षांचे, तेव्हां जातीचे सरंजामाबद्दल

भिस्त नव्हती. ते सारे कुंपणीसरकारांनीं घेऊन फक्त जातीचा सरंजाम व स्वदेशचें इनाम वगैरे सोडलें. त्या सरंजामाचें गांव बहुत खराब, उत्पन्न फार कमी, सबब त्याचा मुबादला करून द्यावा ह्मणून मेहेरबान एलफिस्तनसाहेब बहादूर यांस जाहीर केल्यावरून, त्यांनीं तो सारा आमचे नुकसानीचा प्रकार दिलांत आणून, दोन हजारांचें गांव नवें दिल्हें. पुढें तीर्थरूप कैलासवासी विठलराव ताल्यासाहेब सन १८३६ इसवी सालीं वारल्यानंतर आमचे नांवें सरंजाम कायम केला. तेव्हां तुमचे वडिलांकडे चालत होतें तें तुह्मांकडे बहाल केलें ह्मणोन सरकारचे पत्र येऊन त्याप्रमाणे वहिवाट चालली. नंतर दोन वर्षांनीं सदरहू दोन हजारांचे दोन गांव कुंपणीसरकारांत माघारे घेतले.

१ श्री संस्थान निरानरसिंहपूर, हें आमचें कुलदैवत. तेथील देवस्थानचे खर्चाकडे आह्मांकडून परगणे उरपाड प्रांत गुजराथ येथें दरसाल नेमणूक ६००० रुपये साहा हजार पूर्वापार चालत आली. त्याप्रमाणें ऐवज आह्मांकडे येऊन संस्थानचा खर्च चालत आहे.

१ परगणे उरपाड, प्रांत गुजराथ या महालीं सवाबादीद दामवार देणें बादशाहा यांचे विठलराव शिवदेव यांस, त्यांची नेमणूक पेशवेसरकारांतून रुपये तीन हजार लढाईअखेर चालत आली. पुढें तो महाल कुंपणीसरकारांत घेतला. तेथील धर्मादाय रोजींदार वर्षासनें नेमणूक पूर्वीप्रमाणें चालत आहेत. त्या सदरांत आमची नेमणूक असतां बंद जाह्ली आहे. त्याविशीं सरकारांत बोलणें चाललें आहे.

१ हल्लीं सरंजाम व इनामखेरीज तैनात वतन वगैरे दरोबस्त आमचे नांवें चालत आहे. उमर वर्षे वीस व आमचे कनिष्ठ बंधू चिरंजीव राजश्री कृष्णरावबापू व माधवरावदादा उमर वर्षे सत्रा व बारा.

सदरहूप्रमाणें मजकूर जाहीर व्हावा. छ २७ माहे रजब सन १२५३ फसली मुताबला, तारीख २४ आगष्ट सन १८४३ इसवी.

रघुनाथराव विठल विंचूरकर दस्तुर खुद्द.

---

## २६ मालेगांवकर राजेबहादर.

### अ.

साहेब मुषफक मेहेरबान दोस्तां हेनरी ब्रौणसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षिण सलमा हू.

॥ अजीसाहेब माधवराव त्रिंबक राजे बहादर वयानें लहान, पालन करणार मातोश्री अन्नपुर्णाबाई राजे बहादर संस्थान नाशिक सलाम बाजद सलाम अंकीं खैरयेत.

तारीख १५ माहे सपटंबर सन १८५१ इसवीपावेतों आपली पावमानी हमेषा कलमी करीत असलें पाहिजे. दरविला, आसाहेबांकडून खत तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवींचें आलें, तें तारीख ९ माहे सपटंबर सन मजकुरीं पावलें. त्यांत मजकुर कीं, सरकारचा हुकूम तारीख ३० जुलई सन १८५१ इसवीचा आल्यावरून कलमीं केलें जातें कीं, आपल्यास मरातब राजे बहादर पद आहे, हें कधीं कोणत्या सबबेनें कोणाकडून प्राप्त जाहलें, त्याचा व एकंदर पदवी व थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं लिहून द्यावें. त्याज-बरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे. ऐकींव मजकुरची हकीकत असेल व त्याज-विषयीं कांहीं पुरावा नसेल तर तसेंही साफ लिहून पाठवावें. परंतु जुने कागदावरून व माहितगार लोकांकडून जितकी प्रयत्नपूर्वक माहिती सांपडेल तितकी सर्व लिहून यावी. या बाबतींत सरकारास जाब जाणें आहे ह्मणोन आसाहेबांनीं मेहेरबानगी करून लिहिलें. ऐशी-यास आमचे वडील नारो शंकर नानासाहेब याजला पेशवेसरकारचीं पत्रें नामजाद अशीं आहेत. त्याजनंतर दिल्लीचे बादशाहा अलमगीर गाजी यांजवर दुसमानाचा प्रसंग पडल्यामुळें नारो शंकर यांजकडून दुसमानाचें पारपत्य जाहल्यामुळें बादशाहा संतोष होऊन त्यांनीं तलवार व जवाहीर व गांव इनामी व राजे बहादर हा किताब दिल्हा. याजविषयींचे सन, शकाचा तपास करून लिहूं. कारण आमची व होळकर यांची आदावत होती. त्यामु-मुळें त्यांनीं नाशिकास बंड करून, वाडा नाशिकचा दरोबस्त चिजवस्त वगैरे कागदपत्रा-सुद्धां लुटून नेले, व कांहीं त्रिंबकजीचे किल्ल्यावर होते. तेथें त्यांची आमची लढाई होऊन तेथूनही सर्व नेले. हल्लीं दाखल्याचे वगैरे कागदपत्र जुनी मंडळी यांजकडून ऐकीव मजकुराचा तपास करून व दाखल्याचे कागद मालेगांव संस्थानासुद्धां कारकून पाठवून शोध करून जितके हस्तगत होतील तितके कैफियत लिहूं. त्याजबराबर आसाहेबांकडे दाखल करूं. ज्यादा काय लिहिणें? प्यार मोहोबत असो दीजे. हे किताबत.

ब.

यादी राजश्री शिवराव गोपाळ राजे बहादर—मालेगांवकर सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. मेहरबान वार्डीनसाहेब बहादूर डिपूटी एजंट, जिल्हा दक्षण, यांनीं छ ८ सपटंबर सन १८३२ इसवींचें पत्र पाठविलें. त्यांतील हशील मजकूर कीं, आपले खानदानीची बढती व लौकिक महशूर जाहल्याविशीं व पेशवेसरकारांतून फौजेस व जातीस सरंजाम आपले वडिलांस दिल्हा त्याची तारीख व आपले जहागिरींत पेशवे-सरकार कोणते तऱ्हेनें दखलगिरी ठेवित गेले व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं चालत आहे त्यांत कमपेश तफावत काय आहे व आपलेकडे हल्लीं सरं-जाम काय चालत आहे, त्याची कैफियत, शके संवत्सरवार व तारीखवार वाकबगारी

हाकी अमोल हजरत बंदगानअली राईट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहे. ऐशी-
यास आमचे मूळ पुरुष शंकराजी पंत यांनीं पूर्वीं विजापुरी सुभ्याजवळ दिवाणगिरीचें
काम केलें. त्यांस पुत्र तीन, आबाजी शंकर व लक्ष्मण शंकर व नारो शंकर. यांत कैला-
सवासी तीर्थस्वरूप नारो शंकर हे आमचे पणजे. यांनीं थोरले मल्हारजी बावा होळकर
सुभेदार यांजपाशीं प्रथम शिलेदारीचा रोजगार करून लढाईचे प्रसंगीं तलवारीचे मर्दुमीनें
कामकाज केलें. त्यावरून होळकर यांनीं नगारा, निशाण, पागा देऊन, जमेत हजार पंध-
राशानिशीं वाढविलें, आणि इंदूर सुभ्याचे बंदोबस्ताचें काम सांगितलें. पुढें पेशवेसर-
कारच्या फौजा व नायगांवकर हे हिंदुस्थान प्रांतीं मवास, पाळेगार यांचे बंदोबस्ताक-
रितां होते. त्याशीं दतीया, वोंडसेवाले वगैरे संस्थानिक यांनीं पेशव्यांचे फौजेचा मोड
करून नायगांवकर मारले गेले. फौज बुडवून त्या प्रांतांतील अंमल उठवून दिल्हा. हा
मजकूर पेशवेसरकारांत समजल्यावरून तिकडे कोणी मर्द मनुष्याची योजना करावी
या उद्देशांत होते. तो होळकर सुभेदार यांनीं नारो शंकर यांचे मर्दुमीची तारीफ स्वमुखें
सरकारचे कानावर घालून सरकारआज्ञेनें नारो शंकर यांजला पुण्यास आणविलें. नंतर
सरकारची भेट होतांच मर्जी सुप्रसन्न होऊन, हिंदुस्थानचे मोहिमेचें काम सांगून वस्त्रें दिल्हीं;
आणि मुखत्यारीनें मसलतसीर लागेल ती फौज ठेवून सरकारचा नक्षा तिकडील मुलखांत
व्हावा, अशी आज्ञा करून रवानगी केली. तिकडे नारो शंकर जाऊन फौज ठेवून लाखों
रुपये पयदाश जोर तलबीनें उत्पन्न करून खर्च केला; आणि दतीया, वोडसें वगैरे संस्थानिक
यांच्या जागा हस्तगत करून, मवास पाळेगार यांचीं पारपत्यें केलीं. आणि वोडसेवाले वगैरे यांच्या
संस्थानपैकीं व आसमंतात मवास वगैरे यांचे मुलूख सर करून, झाशी लहान खेडें होतें तेथें
लाखों रुपये खर्च करून मकाण मजबूत बांधून पेठेची वसाहत केली, आणि तेथें सुभ्याचें
ठाणें घातलें. कमकसर झाशी सुभ्याखालीं तीस पसतीस लक्षांचा मुलूख सर करून त्या
प्रांतीं तमाम दिल्लीपर्यंत पेशवेसरकारची जरब बसविली. कोट्यावधी रुपयांची किफायत
सरकारची जाहली. नंतर पेशवेसरकारची मेहरबानी होऊन दिल्लीपद बादशाहांनीं राजे-
बहादरीचा किताब दिल्हा होता. तोच किताब कायम करून जरीपटका व साहेबनौबद
व सरदारीचीं वस्त्रें देऊन फौजेस व जातीस मिळून पंधरा लक्षांचा सरंजाम महाल मुलूख
केले, कोट हिंदुस्थान प्रांतीं गंजबसोदें व सुज्यालपूर वगैरे महाल व किल्ले व स्वदेशीं निंबा-
ईत, बेलापूर, अंमळनेर वगैरे महाल व किल्ले, ठाणीं व गुजराथ प्रांतीं जंबुसर ऐशा जागा
दिल्या; आणि झाशी सुभ्यासुद्धां कायमी ठेवून दिवसेंदिवस ज्याफा मातबरी वाढविली. नंतर
लक्ष्मण शंकर बंधु, झाशी सुभ्याचें कामावर ठेवून नारो शंकर स्वदेशीं फौजेनिशीं आले. नंतर
पेशवेसरकारचे आज्ञेवरून छत्रपती सातारकर यांजकडील प्रतिनिधीपदाचेंही काम कांहीं
दिवस केलें. पुण्याहून शिंदे अलिजाबाहादर यांचे फौजेनिशीं रवानगी हिंदुस्थान प्रांतीं
करण्याबद्दल सरकारआज्ञेनें कोट्यावधी रुपये खर्चाची बेहेबुदी ठेवून, त्यांचे दौलतीचे

बंदोबस्ताची पैरवी ठेविली. मोंगलाई व कर्नाटक प्रांतीं पेशवेसरकारचे मोहिमेचे प्रसंगांत हरवक्त लढाया, भिडाया, ठाणीं, मुलूख सर करण्यांत फौजेनिशीं मर्दुमीच होत आली. सोनपत पाणिपतचे स्वारींत फौजेनिशीं दिल्लीतक्ताचे बंदोबस्तावें काम होतें. लढाईचे प्रसंगीं रसद वगैरे पोंहचावण्याचा बेत ठेवून जुवामर्दीनें सरकारसेवा केली. पुढें आमचे आजे त्र्यंबकरावसाहेब व चुलत आजे रघुपतरावसाहेब यांनींही सरकारचाकरी तलवारीचें कामकाजाची करीत आले, व त्यामागें आमचे तीर्थरूप गोपाळराव बापासाहेब यांनीं आलिजाबहादर पाटीलबावा शिंदे यांजसमागमें फौजेनिशीं जैपूर, जोतपूर वगैरे तिकडील संस्थानिकांचे लढायांचे प्रसंगीं मर्दुमीचीं कामें करून, पाटीलबावा यांची मर्जी संपादन करून सरकारचाकरी केली. नंतर पेशवेसरकारांतून आमचे चुलत आजे रघुपतराव नारायण राजे बहादर यांजला तिसरा हिस्सा दौलतीं व सरंजामांत वांटणी करून देऊन, संस्थान मालेगांव ही जागा तिसरे हिश्शाचे इलाख्यास करून दिल्ही. पुढें ते मृत्यु पावल्यावर त्यांचे संस्थानची वहिवाट वेगळी सरकारांतून केसो कृष्ण दातार त्यांचे दिवाण त्यांचे हातें चालवीत होते. तो हिस्सा पाटीलबावा शिंदे पुणें मुक्कामीं आल्यावर सरकारांतून मेहरबानगी करून तिसरे हिश्शाचें संस्थान मालेगांवसुद्धां आमचे तीर्थरूप गोपाळराव बापासाहेब राजेबहादर यांजला स्वतंत्र करून दिल्हें. आणि मामुलपासून आमचे सरदारींतील फौज व जातसरंजामाचे मुलखांत पेशवेसरकारांनीं कधींही कांहीं दखलगिरी ठेविली नाहीं. पेशवेसरकारांत व सरकारचे तमाम मुलखांत हरएक बाबेचें कामांत आह्मांकडील बाहादरी जाहली असतां, आमची मातबरी चालवीत होते. याप्रमाणें दौलतदारीचे इरायानें इसवी तागाईतअखेर पेशवाईपर्यंत मातबरी सरकारनीं चालविली. कोट्यावधी रुपयांची आमद व लाखों रुपयांचा मुलूख सरकारांत सर करून सरकार किफायत केली व करोडो रुपये स्वपराक्रमानें मेळवून इमारती व ठिकाणें नाशिक व मालेगांव वगैरे जागोजागीं बांधून खर्च केला. कुंपणीसरकारचे अंमलाचे अव्वलीस आमचे तीर्थरूप कैलासवासी गोपाळराव बापासाहेब राजेबहादर यांशीं मालेगांवीं लढाईचा प्रसंग जाहल्यामुळें मागील सिलसिल्याचे शकसंवत्सरवार दाखल्याचें कागदपत्र गर्दींत गेले. पेशवेसरकारचे दफ्तरांत दाखल्याचे कागदपत्रावरून सरकारचे नजरेस येईल. सर्वत्र सरदारांबरोबर हल्लीं आम्हांस जातीस जहागीर, सरंजाम देऊन मातबरी चालवीत आहेत. त्यांत गुदर करून आहों. याहून ज्यास्ती मातबरी वाढविणें व आमचे खानदानीचे मागील सिलसिल्याचे लौकिकानुरूप चालविणें सरकाराकडे आहे. मिती फाल्गुन शुद्ध ३ शके १७५४, सन १२४२.

---

## २७ रामदुर्गकर.

यादी नारायणराव राम रामदुर्गकर फौत जाहले. ऐसियास त्यांची जाहागीर पादशाही तर्फेनें अगर सातारे महाराज यांचे तर्फेनें किंवा नवीन पेशवेसरकार तर्फेनें व मूळ पुरुष

पाहिलीया फौती मजकुरास सगे वारस कोण आहेत येविशीं चौकशी करून ल्याहावें, म्हणून हुकूम, त्याजवरून दप्तरांत दाखला पाहतां व माहितगार यांचे सांगण्यावरून चौकशीकरितां:—

वंशावळी:—मूळ दादाजीराव.

| | |
|---|---|
| रामराव दादाजी [ रामदुर्गकर. ] | बळवंतराव दादाजी [ नरगुंदकर. ] |
| पुत्र योगीराव राम | पुत्र दादाजीराव बल्लाळ |
| पुत्र गोविंदराव | पुत्र भास्करराव दादाजी |
| रामराव गोविंद दत्तक पुत्र | पुत्र व्यंकटराव भास्कर दत्तक |
| पुत्र नारायणराव राम हल्लीं | पुत्र दादाजीराव व्यंकटेश हल्लीं |
| फौत झाले. त्यांची स्त्री राधाबाई | आहेत. त्यांस पुत्र दोन आहेत. |
| व कन्या दोन आहेत. | |

यांची कैफियत.

१ माहितगार यांचे सांगण्यावरून मूळ रामराव दादाजी हे आप्पाजी सूर्यराव किरवंत अर्नीकर करवीरवासी राजे यांचे चाकर यांजपाशीं शागिर्दी करून होते. तेव्हां कांहीं एके दिवशीं चाकरीस चुकले, ह्मणोन आप्पाजीराव रागें भरले, तेव्हां रुसून बाहेर जाऊन निजले. तेव्हां त्यांचे तोंडावर नागानें येऊन फणी धरली, तें आप्पाजीराव यांनीं पाहिलें. तेव्हां विचार केला कीं, हा दैववान् आहे. असें समजोन शागिर्दी करावयाची मोकूफ करून, आपला पुत्र मानून, दौलतीचा कारभार सांगितला. नंतर मशारनिल्हे रामदुर्गकर यांनीं बहुत पराक्रम करून नरगुंद संस्थान वगैरे मुलूख मिळविला. तेव्हां करवीरकर महाराज यांची बहुत कृपा होऊन सचीवपद दिल्हें. त्याप्रमाणें वहिवाट करून होते. पुढें आप्पाजीराव यांचा काळ समीप आला. पोटीं पुत्रसंतान नाहीं, तेव्हां क्रियाकर्म करावयाकरितां बळवंतराव यांस दत्तक देविला, आणि त्यांस कांहीं खर्चापुरता सरंजाम दिल्हा. त्यांचा वंश हल्लीं हेबळीकर आहेत; व रामराव दादाजी दरोबस्त नरगुंद संस्थान अनभवून होते. पुढें काशीस जाण्याकरितां गेले, ते वेळेस मृत्यु पावले. नंतर संस्थानचा कारभार पुत्र योगीराव, पुतणे दादाजीराव बल्लाळ करीत होते. कलम.

१ दप्तरांत दाखला पाहतां.

१ सन इसन्ने आर्बैन मुताबक—११५१ फसली, १७४१ इसवींत दादाजीराव व योगीराव यांचें नांवें वस्त्रें वगैरे परदरबार ह्मणून खर्च पडला आहे. कारकीर्द बाळाजी बाजीराव नानासाहेब पेशवे.

१ सन आर्बा आर्बैन मुताबक ११५३ फसली, १७४३ इसवींत योगीराव राम नरगुंदकर यांचे नांवें तर्जमा हिशेबास वस्त्रें वगैरे परदरबार म्हणोन खर्च पडलीं आहेत. कारकीर्द सदर.

१ सन इहिदे खमसैन मुताबक ११६० फसली, सन १७५० इसवींत आप्पाजीराव यांचे पुत्र बळवंतराव आप्पाजी नरगुंदकर यांजकडील कारकून यासीं वस्त्रें पावलीं, तीं परदरबार ह्मणोन खर्च पडलीं आहेत. कारकीर्द सदर.

१ इसन्ने खमसैन मुताबक ११६१ फसली, १७५१ इसवींत बळवंतराव आप्पाजी नरगुंदकर यांजकडील जासूद पत्रें घेऊन आले. त्यास इनाम परदरबार ह्मणून खर्च पडलें आहे. कारकीर्द सदर.

१ सन तिस्सा खमसैन मुताबक सन ११६८ फसली, सन १७५८ इसवी. कारकीर्द सदर.

१ बळवंतराव आप्पाजी नरगुंदकर यांचें नांवें नेमणूक बेहेडा जाहला आहे. त्याची बेरीज २०६८३२।- सदरहू मुलूख अनुभवून तिनशें राऊतांनिशीं नारायणराव व्यंकटेश यांचे समागमें फौजसुद्धां चाकरी करावी ह्मणोन करार ठरला आहे.

१ योगीराव राम नरगुंदकर यांचें नांवें नेमणूक बेहेडा जाहला आहे. त्यांत मजकूर कीं, मशारनिल्हेचा सरंजाम बळवंतराव आप्पाजी यांनीं करार करून दिल्हा. त्याची बेरीज २८४१९।≈।।।. या बेरजेंत ५० पन्नास स्वारांनिशीं नारायणराव व्यंकटेश यांचे दिमतीस चाकरी करावी ह्मणोन ठरलें आहे.

१ भास्करराव दादाजी यांचें नांवें नेमणूक बेहेडा जाहला आहे. त्यांत मजकूर कीं, मशारनिल्हेस सरंजाम बळवंतराव आप्पाजी यांनीं खाजगत खर्चाबद्दल करार करून दिल्हा ते रुपये १२०००.

३

१ सन इसन्ने सितैन सन ११७१ फसली १७६१ इसवी, कारकीर्द माधवराव बल्लाळ पेशवे, या सालांत नेमणूक बेहेडा योगीराव राम व भास्करराव दादाजी यांचें नांवें जाहला आहे. त्यांत मजकूर लिहिला आहे कीं, संस्थान मजकूर पेशजीपासून रामराव दादाजी यांजकडे होतें. त्यास ते निवर्तल्यावर त्यांचे पुत्र योगीराव राम व दादाजीराव बल्लाळ पुतणे यांजवर सर्व भार होता. तेच कारभार करीत होते. त्यांजवर कांहींएक दिवसांनीं दादाजीराव आदावतीमुळें नरगुंदींच मारले गेले. त्यावर एक वर्षपर्यंत योगीरावच संस्थानीं खावंदगिरी करून होते. तेव्हां सांगितल्याप्रमाणें बळवंतराव वर्तणूक करीत होते. त्यांजवर कांहींकां दिवशीं कैलासवासी संभाजीमहाराज करवीरवासी तोरगळास आले होते. तेथें योगीराव दर्शनास गेले असतां, तेच संधींत बळवंतराव यांनीं नरगुंदचे किल्लेदाराशीं फितवा करून आपणच कारभार करूं लागले. तेव्हां योगीराव निघोन रामदुर्गास गेले. ते समयीं जातीस खर्चास नेमून दिल्हें, तें ते घेऊन होते. व भास्करराव दादाजी अगोदरच निघोन बहुत दिवस सरकारींत होते. पुढें कांहींकां दिवसीं योगीराव यांस रामदुर्गचा पेंच पडून निघणें प्राप्त

जाहलें. त्यास सालगुदस्त सन इहिदेंत ११७० फसली, १७६० इसवींत, तुम्हीं उभयतांनीं तीर्थरूप नानासाहेब यांचे आज्ञेवरून किल्ले नरगुंद व रामदुर्ग वगैरे ठिकाणीं लगामी लावून घेऊन, सांप्रत हुजूर येऊन विनंती केली जे, किल्ले आपले लगामीं लागले आहेत. तालुका बळवंतराव यांजकडे चालत आहे, तो त्यांजकडून दूर करून आमचा आम्हांकडे करार करून याचा आणि सेवा घ्यावी, म्हणोन. त्यांजवरून मनास आणून परंपरा संबंध पाहतां, संस्थानचे अधिकारी तुम्हींच असें जाणून यांजवर कृपा करून, बळवंतराव यांजकडील तालुका दूर करून, सालमजकुरापासून तुम्हांकडे संस्थान मजकूर देखील किल्ले व उभयतांकडे पहिला सरंजाम चालत आहे. त्यासुद्धां साराच करार करून दिल्हा, बरहुकूम बेहेडा, सन तिस्सा खमसैन.

| | |
|---|---|
| २०६८३२।- | बरहुकूम बेहेडा बळवंतराव आप्पाजी यांजकडील. |
| २८४१९।॥।. | बरहुकूम बेहेडा योगीराव राम यांजकडील सरंजाम. |
| १२००० | बरहुकूम बेहेडा भास्करराव दादाजी यांजकडील सरंजाम. |
| २४७२५१।॥०।॥. | |

सदरहू तालुका अनुभवून चाकरी करावयाचा करार पेशजीचे.

| | |
|---|---|
| ३०० | स्वार बळवंतराव आप्पाजी यांजकडे नेमणूक होती ते. |
| ५० | ,, योगीरावराम यांजकडे नेमणूक होती ते. |
| ३५० | |

पैकीं कसाल्यामुळें रयात स्वार दोन तीन वर्षे कमी ५० करून तीनशें स्वारांनिशीं चाकरी करावी. पुढें नेमणुकीप्रमाणें ३५० स्वारांनिशीं चाकरी करावी व बळवंतराव यांस जातीस सरंजाम रुपये १२००० याचा सदरहू बेहेड्यापैकीं नेमून दिल्हा जाईल. त्याप्रमाणें पावधीत जावा. येणेंप्रमाणें बेहेडा करून देऊन सरकारांत नजर रुपये १००००० एक लक्ष घ्यावयाची ठराविली असे.

१ सन आर्बा सबैन मुताबक ११८३ फसली, १७७३ इसवी कारकीर्द नारायणराव बल्लाळ. भास्करराव दादाजी मृत्यु पावले, सबब योगीराव राम व व्यंकटराव भास्कर यांचें नांवें संस्थान पूर्ववत्प्रमाणें बाहाल करून देऊन सनद दिल्ही. त्यासंबंधें नजर सरकारांत घ्यावयाची ठराविली ते ४५०००० रुपये.

१ पुढें कांहीं दिवसांनीं योगीराव राम मृत्यु पावले. तेव्हां व्यंकटराव भास्कर संस्थानची वहिवाट करीत होते. नंतर संस्थान टिपूसुलतान यांनीं घेतलें. तें सन सब्बा समानीन मुताबक ११९६ फसली, १७८६ इसवींत पेशवे यांनीं वापस तहांत घेतलें. तेव्हांपासून सन १२०० फसली १७९० इसवीपावेतों सरकारांत वहिवाट होती, - कारकीर्द माधवराव नारायणराव पेशवे.

१ सन इसन्ने तिसैन मुताबक १२०१ फसली १७९१ इसवी, कारकीर्द सवर. संस्थान मजकूर रामराव गोविंद, व्यंकटराव भास्कर यांचें नांवें करार करून सनदा जाहल्या आहेत. त्यांत मजकूर कीं, पेशजी हरी बल्लाळ यांचे विद्यमानें सरकारचा व टिपूचा तह जाहला, ते समयीं किल्ले नरगुंद व किल्ले रामदुर्ग दोन किल्ले व किल्ल्याखालील मुलूख सरकारांत आला आहे; तो पेशजीप्रमाणें तुह्मांकडे करार करून दिल्हा असे. तरी सरकार लक्षांत राहून एकनिष्ठेनें वर्तत जावें. अलीकडे परशराम रामचंद्र यांनीं सदरहू तालुक्याशिवाय मुलूख सोडविला असेल तो तुह्मांकडे चालणार नाहीं, ह्मणून सनद देऊन, सरकार नजर घ्याव-याची ठराविली, ते २५०००० रुपये पुढें सदरप्रमाणें वहिवाट सन तिस्सा मयातैन सन १२१८ मुताबक १८०८ पावेतों चालली.

१ सन अशर मयातैन मुताबक १२१९ फसली, सन १८०९ इसवी. बाजीराव रघुनाथ पेशवे यांस नारायणराव राम यांनीं विनंती केली कीं, संस्थान मजकूरची वहिवाट आम्हांकडे व व्यंकटराव भास्कर यांजकडे निमेनिम चालावी. तें न होतां, किल्ले रामदुर्ग व कांहीं गांव आम्हांकडे चालतात. बाकी दरोबस्त संस्था-नची वहिवाट व्यंकटराव भास्कर करीतात. त्यास रामराव गोविंद मृत्यु पावले. यास्तव निमे संस्थान आम्हांकडे करार करून चालविलें पाहिजे म्हणोन. त्या-जवरून पेशजी सन इसन्ने सितैन ११७१ फसली १७६१ इसवीपासून उभयतांचें नांवें करार आहे. यास्तव, रामराव गोविंद मृत्यु पावले, त्यांचे पुत्र नारायणराव राम यांजकडे निमे संस्थान चालवावयाचा करार करून किल्ले रामदुर्ग वगैरे गांव तालुके मजकूर येथील अंमल मशारनिल्हे यांजकडे चालत आहे. तो त्यांचे निमे वांटणींत लावून, बाकी निमे वांटणीचे भरतीस देहे १७ सत्रा लावून देऊन, येविशीं सनदा देऊन नजर वगैरे घ्यावयाची ठराविली, ते १००००० रुपये एक लक्ष यासी संस्थान मजकूरची जमेची बेरीज बरहुकूम बेहेडा सन ११७१ फसली रुपये २४७२५१।।।०।।।. सदरहू बेरजेचा मुलूख चालत होता. तेव्हां साडेतीनशें स्वारांनिशीं चाकरी करावी, असा करार आहे. त्यास टिपू सुलतान यांचे तहांत नरगुंद तालुका सरकारांत घेतला. त्याखेरीज अलिकडे परशराम रामचंद्र यांनीं मुलूख सोडविला तो चालणार नाहीं, म्हणोन सन १२०१ फसली सन १७९१ इसवींत, करार जाहला आहे. यास्तव बेहेड्याचे बेरजेपैकीं मोकासबाबेचा अंमल सरकारांत राहिला तो रुपये ८८२५१।।।०।।।. यांचे स्वार हिसेरसीदप्रमाणें वजा १२५. बाकी मुलूख चालत आहे: त्याची बेरीज १५९०००. यासी स्वार असामी २२५; पैकीं वजा निमे व्यंकटराव

भास्कर यांनीं चाकरी करावी. ते स्वार ११२, एकूण बेरीज रुपये ७९५००, बाकी नारायणराव राम यांनीं चाकरी करावी ते स्वार ११३ एकूण रुपये ७९५००.

---

## २८ रास्ते.

### अ.

साहेब मुषफक मेहेरबान करमफरमाय दोस्ता हेनरी ब्रौणसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलाम हू.

अजीसाहेब शामराव लक्ष्मण रास्ते, सलाम बाजद सलाम खैरयत अज्याम अंकी. येथील खैरसला जाणोन आपली शादमानी हमेशा कलमीं करीत असलें पाहिजे. दरविला आसाहेबाचें पत्र नंबर १०४८ तारीख २६ आगष्ट सन १८५१ इसवीचें सरकारचें पत्रावरून आलें, त्यांत रास्ते पद आहे. हें कधीं, कोणते सबबेनें, कोणाकडून, प्राप्त जाहलें, त्याचा व खानदानीचा व पदवी थोरपणाचा इतिहास लिहून यावा ह्मणोन वगैरे कलमीं जाहलें. ऐशी-यास, पूर्वी विजापूरचे आमलांत आमचे पूर्वज गंगाधरपंत गोखले हे मौजें वेलणेश्वर तर्फ गुहागर तालुके अंजनवेल जिल्हा रत्नागिरी, या गांवीं महाजनी या इरायानें राहत असोन, दाभोळ सुभ्याखालीं जें गांव होते, त्यांपैकीं महाल हवेली व ज्याफराबाद या दोन महालचा रसदभरणा सुभे मजकुरीं करीत असत. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांचे नातू हरीपंत गोखले, सुभे मजकूरचा रसदभरणा विजापुरास येऊन करूं लागले. नंतर तेथील बादशाहा यांनीं त्यांची रीति पाहून 'रसदे' = रस्दे असा किताब देऊन विजापुरासच ठेविलें. तेथें कितीएक सुभ्यांचे रसदभरण्याचें काम बादशाहाचे आज्ञेनें त्यांजकडे असोन त्याजला 'रस्दे' पद हमेषा लिहूं लागले. पुढें त्यांस श्रीमंत महाराज छत्रपती कैलासवासी शाहू राजे यांनीं अंमल बसविल्या-नंतर सातारा येथें विजापूर सरकारचे रस्देपणाचे इरादेदार असें जाणून, हरीपंत यांचे नातू शामजीपंत गोखले आपले पदरीं असावे असें जाणून, शनवार पेठेंत राहणेंविषयीं आज्ञा जाहली. तेव्हां त्यांचे चिरंजीव भिकाजी नाईक आप्पा यांनीं वाडा बांधून तेथेंच राहिले; आणि महालचा पोतें भरणा वगैरे व्यापाराचें काम करीत असत. ती वागणूक आणि व्यापार वगैरे धंदा वास्तविक अशी महाराज छत्रपती यांची खात्री होऊन, त्यांनीं 'रस्दे' हें नांव मोडून 'रास्ते' हें पद दिल्हें. तेव्हांपासून रास्ते हें नांव चालूं लागलें. उपरांत बाजीराव बल्लाळ पेशवे यांनीं भिकाजी नाईक आप्पा यांची योग्यता मोठी व व्यापाराची रीति चांगली असोन सरकार खातरजमेचे आहेत असें जाणून, पुण्यांत शनवार पेठेंत, शनवारचे वाड्याचे संनिध वाडा बांधावयास जागा दिल्ही. तेथें वाडा बांधून राहिले. नंतर त्यांची कन्या कैलासवासी गोपिकाबाई ही आपले चिरंजीव बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे यांस केली. त्यांजला पुत्र तीन जाहले तेः—पहिले विश्वासराव, दुसरे माधवराव, तिसरे

नारायणराव पेशवे. हे त्रिवर्ग आमचे पणजे कैलासवासी लक्ष्मणराव भिकाजी वगैरे बंधू यांचे भाचे असून त्यांनींही आमचे पणजे यांची रीति व योग्यता पाहून, योग्यतेनुरूप पूर्वीपासून नक्त नेमणूक पोहोंचत होती, त्यावर कांहीं ज्याजती करून, सरंजाम करून देऊन रास्तेपद चालत आल्याप्रमाणें चालविलें. आतां रास्तेपद मिळाल्याचे कागद दप्तरीं पाहतां आढळत नाहींत. कारण, श्रीमंत बाजीराव रघुनाथ पेशवे यांनीं जप्ती केली होती, ते वेळेस मागील दप्तरचे कागद आस्ताव्यस्त जाहले आहेत. परंतु जुने माहितगार यांचे मुखजबानीवरून आमचे ऐकण्यांत कांहीं मजकूर होता, त्यावरून सदरहू इतिहास सरकारास रास्ते पदाविषयीं समजण्यासाठीं आसाहेबांचें पत्रीं कलमीं करून, एकंदर खानदानीचा तक्ता भिकाजी नाईक यांस रास्ते पद प्राप्त जाहलें, सबब त्यांजपासोन तयार करून पाठविला आहे—भिकाजी नाईक आमचे निपणजे यांजपासून आजपर्यंत स्थावर जंगम इष्टेटीचा विभाग न होतां, एकत्रपणांत वहिवाट चालली आहे. सदरहूवरून योग्यता व खानदानी व रास्ते पद यांविषयीं हकीकत आसाहेबांचे दिलांत येईल. तारीख ११ माहे आक्टोबर सन १८५१ इसवी, ज्यादा काय लिहिणें. प्यार मोहबत असों दीजे, हें किताबत.

ब.

यादी राजश्री बळवंतराव माधव रास्ते, सुरुसन सब्बा आशरीन मयातैन व अलफ, सन १२३६ फसली, शके १७४८ व्ययनाम संवत्सरे. आमचे वडील मूळ पुरुष शामजी हरी रास्ते यांस पुत्र वडील भिकाजी शामराज व धाकटे सदाशिव शामराज यांचे पोटीं संतान नाहीं. भिकाजी शामराज यांस पुत्रः—

१ मल्हारराव यांनीं दौलत मिळविली. शिक्का त्यांचें नांवें जाहला. तो चालत आहे. त्यांचे पोटीं संतान नाहीं.

२ गणपतराव यांस पुत्रः—

| | | |
|---|---|---|
| १ काशीराव यांस पुत्र. मल्हारराव हल्लीं आहेत. | १ यशवंतराव यांस पुत्र गणपतराव हल्लीं आहेत. | १ माधवराव यांस आनंदराव यांनीं दत्तक घेतलें. |

३ आनंदराव यांस महिपतराव पुत्र जाहले होते. ते मृत्यु पावले. पुढें माधवराव यांस दत्तक घेतलें. त्यांस पुत्र हल्लीं आहेत ( ते ):—

१ बळवंतराव. २ गंगाधरराव. ३ यशवंतराव.

आनंदराव यांचे कन्येचा पुत्र रामचंद्रराव साठे हल्लीं आहेत.

४ लक्ष्मणराव यांस संतान नव्हतें. याजकरितां भाऊबंदांखेरीज गोत्रज सदाशिवभट गोखले यांचा पुत्र दत्त घेऊन शामराव नांव ठेविलें. त्यांस पुत्र लक्ष्मणराव हल्लीं आहेत.

५ गंगाधरराव यांस पुत्र वडील व्यंकटराव व धाकटे विश्वासराव. उभयतां मृत्यु पावले. पोटीं पुत्र नाहीं. स्त्रिया त्यांच्या आहेत.

१ व्यंकटराव यांची स्त्री सावित्रीबाई.

२ विश्वासराव यांची स्त्री अन्नपूर्णाबाई.

६ रामचंद्रराव यांचे पोटीं संतान नाहीं. त्यांच्या स्त्रिया आहेत.

१ राधाबाई.

२ वाराणशीबाई (धाकटी).

७ जीवनराव यांचें पोटीं अमृतराव होते. ते मृत्यु पावले. पोटीं संतान नाहीं व स्त्रीही नाहीं.

आमचे चवथे पुरुष भिकाजी शामराज व सदाशिव शामराज. उभयतां बंधू सातारा येथें शाहूमहाराजांची कृपा संपादून एक विचारें होते. महाराजांनीं जातीस सरंजाम करून दिल्हा. सदाशिव शामराज सातारा येथें होते. भिकाजी शामराजांस महाराजांनीं वाईत वाडा बांधावयास जागा दिल्ही. तेथें वाडा बांधून राहिले. त्यांस प्रथम कन्या गोपिकाबाई जाहली. ती महाराजांनीं नानासाहेब पेशवे यांस देवविली. वाईत लग्न जाहलें. नंतर मल्हारराव भिकाजी, पेशवेसरकारांत राहून कामकाज करीत आले. सरकारची स्वारी कर्नाटक प्रांतीं सावनूरकर नवाब यांजकडील महाल घ्यावयाकरितां गेली. बागलकोट किल्ला घेऊन मल्हारराव यांचे हवालीं केला. बदामीचा किल्ला रुस्तुमअलीखान जहागिरदार यांजकडे होता; व देशक, पाळेगार यांची काटकाई होती. त्याचा बंदोबस्त करावयास सांगितला. त्याजवरून फौज व पायदळ ठेवून पाळेगाराचीं पारपत्यें करून कारस्थानानें बदामी किल्ला घेऊन सरकारचा अंमल बसविला. कामकाज केलें, सबब सरकारांतून सरफराजी होऊन, तीन हजार फौजेची सरदारी व जातीस तैनाता करून दिल्ह्या. फौजेचे खर्चास व जातीस नक्त पोतापैकीं ऐवज पावत आला. प्रथम त्रिवर्गाच्या तैनाता जाहल्या, त्यांस स्वदेशचीं खेडीं लावून दिल्हीं. पुढें तैनाता करून दिल्ह्या. त्यास परगणे बागलकोटपैकीं गांव लावून द्यावे, ह्मणून सनदा जाहल्या. परंतु परगणे बागलकोटपैकीं रोख ऐवज घेत आले. वडील मल्हारराव मृत्यु पावले. पोटीं संतान नाहीं. त्यांचे पाठचे गणपतराव. यांचें नांवें सरदारी व्हावी, परंतु आनंदराव यांचे कर्तृत्वावर सरकारची मेहेर होऊन त्यांचें नांवें सरदारी करून दिल्ही. नंतर गणपतराव यांचें बोलणें पडल्यावर त्यांस सरकारांतून तैनात व सरदारी निराळी करून दिल्ही. गत पुरुष जाहले त्यांच्या तैनाता वजा न करितां; परंपरा पुढील पुरुषांचें नांवें करार करून देऊन चालवीत आले. आजपर्यंत चार पिढ्या पुरुष कर्ते होते. परंतु वहिवाट एकत्रपणें चालत आली. घर वांटण्या जाहल्या नाहींत. फौजेचे सरंजामास महाल थोरले माधवराव साहेब यांचे कारकिर्दींत लावून दिल्हे. आनंदराव भिकाजी यांचें नांवें जाबते जाहले त्याचा दाखला दप्तरीं आहे.

## २९ सदाशिव माणकेश्वर.

### अ.

साहेब मुषफक मेहेरबान करम फर्माय दोस्तां वार्डीनसाहेब बहादूर सलाम हू.

छ अजदील येकलास मल्हारराव बाजी, सलाम बाजद सलाम खैरयत. अंजयान अंकीं येथील खैरसला जाणून आपली खैरखुषी हमेशा कलमीं करून दिल आराम करीत असलें पाहिजे. दरविला आसाहेबांनीं मेहेरबानी करून तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें व तारीख १ माहे जून सन १८३३ इसवीचीं खतें पाठविलीं तीं पावलीं. त्यांत हुकूम कीं, हजरत बंदेगान अल्ली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी ह्मणोन कलमीं केलें जातें जेंः—आपण मेहेरबानगी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशीलः—आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडेस चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहेत, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कंपनीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे. ह्मणोन कलमीं केलें. त्यास जबाब.　　बितपशीलः—

१ आमचे खानदानीची बढती आमचे चुलते सदाशिवपंत भाऊसाहेब यांसीं श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब पेशवे यांनीं हैदराबादेस वकिलीचें कामावर शके १७२३, सन १८०१ इसवींत रवाना केलें. नंतर पुणें मुक्कामीं होळकराची लढाई होऊन श्रीमंत वसईस गेले. तेथून आमचे वडिलांस पत्रें पाठविलीं. वसई मुक्कामीं आणून कुंपणीसरकारचा व पेशवेसरकारचा तहनामा भाऊसाहेब यांचे विद्यमानें होऊन पुण्यास श्रीमंत आले. नंतर दिवाणगिरीचें काम सांगितलें. त्या दिवसापासून लौकिक लोकांत महशूर जाहला.　　कलम.

१ भाऊसाहेब यांसीं हैदराबादेस रवाना केलें, ते काळीं जातीस तैनात तीस हजार रुपये करून सरंजाम लावून दिल्हा. शके १७२३ सांत.

१ फौजेचा सरंजाम शके १७२३ पासून आजमासें एक लक्ष साठ हजार रुपयांचे बेरजेचा लावून दिल्हा.　　कलम.

१ कृष्णराव नाना आमचे चुलते व आमचे नांवें पालख्यांचा सरंजाम शके १७२५ चे सालांत आजमासें पंचवीसशें रुपयांचा लावून दिल्हा, व मामल्याचीं कामें सरकारांतून आमचें नांवें सांगितलीं होतीं.　　कलम.

१ भाऊसाहेब यांसी जाजती जातीस तैनात शके १७३१ चें सालीं रुपये सत्तर

हजार सरकारांतून करार होऊन सरंजाम लावून दिल्हा. एकूण जातीस तैनात लाख रुपये करून दिल्ही. कलम.

१ भाऊसाहेब दिवाणगिरीचें काम पुणें मुक्कामीं करूं लागले, ते समयीं कृष्णराव नाना हैदराबादेस रेसिडेंटचें कामावर गेले.

१ पथकाचे स्वार व पायदळ सरंजामी घेऊन आह्मीं पुणें मुक्कामीं श्रीमंतांचे स्वारी-बरोबर चाकरी करीत होतों. कलम.

१ भाऊसाहेब शके १७३९ भाद्रपद वद्य १३ (स) कैलासवासी जाहले. तें काळीं लक्ष्मणराव आपलें घरींहून येथें आले, परंतु भाऊ जिवंत असतां दत्तविधान जाहलें नाहीं. कलम.

१ शके १७३९ आश्विनमासीं पेशवेसरकारचा व कुंपणीसरकारचा बिघाड होऊन वद्य ११ स लढाई जाहली. नंतर आह्मांस श्रीमंतांचा हुकूम जाहला कीं, तुह्मांकडेस सोलापूरचा किल्ला आहे; त्यास तेथें तुह्मीं जाऊन किल्ल्याचा बंदोबस्त ठेवावा ह्मणोन आज्ञा जाहली. त्याजवरून दुसरे दिवशीं वद्य १२ स निघून सोलापुरास आह्मीं गेलों, व मसलतीमुळें पुढील श्रीमंतांकडून बंदोबस्त करून घेण्याचा अवकाश पडला नाहीं.

सदरहूप्रमाणें पेशवेसरकारचे अमलांतील मजकूर आहे. हल्लीं कुंपणीसरकारातून चालत आहे. बितपशील:—

१ भाऊसाहेब यांचे जातीचे लाख रुपयांचे सरंजामपैकीं सरंजाम चालत आहे. आजमासें ३०००० रुपये.

१ रोख पोत्यांतून पावत आहेत. दरमाहा रुपये ५०० प्रमाणें ६००० रुपये.

१ पालखीचे सरंजामाबद्दल आजमासें. १२३९ रुपये.

१००० मौजें चिंचोसी तर्फ खेड हा गांव.
२३९ नक्त सरकार जामदारखान्यांतून पावतात ते.
१२३९

३७२३९

सदरहूप्रमाणें मजकूर आहे. पेशवेसरकारांत भाऊसाहेब यांनीं दिवाणगिरीचें काम केलें. तेव्हां सर्वांहून प्रतिष्ठा त्यांची व आमची विशेष होती. त्याचा बयाज किती लिहावा. येविशींची वाकबगिरी त्या वेळची हजरत अलीशान एलफिस्टनसाहेब बहादूर यांसी आहे. हल्लीं कुंपणीसरकारांतून मातबरी व प्रतिष्ठा चालवीत आहेत, ही आसाहेबास जाहीरच आहे. आह्मीं ल्याहावें, असें नाहीं. जादा काय लिहिणें? प्यार मोहबत असों दिजे, हें किताबत.

ब.

यादी राजश्री लक्ष्मणराव सदाशिव टेंभुर्णीकर, सुरुसन आर्बा सलासीन मयातैन

अलफ. मेहेरबान ज्यान वार्डीन साहेब बहादूर डेपूटी एजंट यांचें पत्र आलें जें:—हजरत बंदेगान अली, रैट हनराबल गवरनर कौंसल चाहात आहे कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी; याजकरितां सरकारांत रवाना करण्यास थोडके मजकूरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील:— आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता, व कोणते तारखेस सरंजाम दिल्हा व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहेत व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे म्हणोन, त्यास आमचे तीर्थरूप सदाशिव माणकेश्वर भाऊसाहेब हे श्रीमंत सवाई माधवरावसाहेब पेशवेसरकार यांचे कारकिर्दींत वकिलीचें वगैरे राजकारणाचें लिहिण्यांत गोविंदराव पिंगळे यांचे अनुसंगें करून सरकारकामांत वागत होते. पुढें श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब पेशवेसरकार यांजपाशीं दिवसानदिवस पेष होऊन सन १२१० चें सालीं जातीस दहा हजार रुपयांचा सरंजाम दिल्हा. नंतर त्याच सालांत दहा हजार सुद्धां तीस हजार रुपयांचा सरंजाम जातीस देऊन शिवाय हत्ती व स्वार यांजबद्दल एकतीस हजार चारशें रुपयांचा सरंजाम दिल्हा. सन १२११ चें सालीं पेशवेसरकारांनीं लवाजिम्यासुद्धां वकिलीचें कामावर नवाबाचे सरकारांत हैदराबादेस पाठविलें. सन १२१२ चें सालीं पेशवेसरकारचा व कुंपणीसरकारचा वसई मुक्कामीं तह होऊन पेशवेसरकार पुण्यास आले. तेव्हां तीर्थरूपांस पेशवेसरकारांनीं दिवाणगिरीचा कारभार दिल्हा. दिवसानदिवस बढती होऊन चौघडा व चौरी सोन्याचे दांडीची व चोपदारी, सोन्याच्या काठ्या व पुरी ताजीम व सामोरे येणें, इत्यादि वगैरे मरातब देऊन जातीस तैनात पहिले तीस हजारसुद्धां लाख रुपयांचा सरंजाम सन अशर मयातैन व अलफ सन १२१९ छ १७ सवाल कार्तिकमास या रोजीं करार करून दिल्हा. व खेरीज तैनात अठराशें एकवीस व चौघड्याकडील तीन हजार व फौजेचे सरंजामास पहिले एकतीस हजार चारशेंसुद्धां एक लक्ष अठावन हजार दोनशें साठ; एकूण दोन लक्ष त्रेसष्ट हजार एक्यांशी रुपयांचा सरंजाम. शिवाय कुरणें व बाग व कमाविशीनें सोलापूर व सुवर्णदुर्ग व लोहगड, विसापूर, वगैरे महाल व किल्ले, व गड असें सरकारांतून देऊन खानदानी वाढविली. पटवर्धन व निपाणीकर व गोखले व अक्कलकोटकर व कित्तूरकर वगैरे सरदार फौजसुद्धां पेशवेसरकारांनीं तैनातीस चालविलें. तीर्थरूपांनीं पेशवेसरकारचे दिवाणगिरीचा कारभार करून कुंपणीसरकारची व पेशवेसरकारची दोस्ती राखून व नवाबसरकाराची दोस्ती ठेवून लौकिक मिळविला. नवाब सरकारांनीं आमचा राहता गांव कसबें टेंभुर्णी नाम दिल्हा. तीर्थरूपांचा काळ सन १२२७, भाद्रपद वद्य १३ या रोजीं जाहला.

त्यांचेमागें आह्मांकडे पेशवेसरकारांतून तीर्थरूपांकडे सरंजामास जहागीर सदरहू जातीची व चौघड्याकडील व फौजेची मिळोन दोन लक्ष त्रेसष्ट हजार एक्यांशी रुपयांची होती. त्याप्रमाणें पेशवेसरकारचे व कुंपणीसरकारचे लढाईअखेर चालली. पुढें कुंपणी-सरकारचा अंमल जाहल्यावर सदरहू सरंजामांपैकीं कुंपणीसरकारांतून आमचे जातीस सरंजाम एकतीस हजार दोनशें साडेपन्नास रुपयांचा मुकरर करून, त्याचे पुरे मोबदल्यास कर्यात बारामती हा महाल अठावीस हजार सातशें सवाऱ्याहात्तर रुपये पाऊण आणा बेरजेचा लावून दिल्हा. तो व कुरणें व बाग याप्रमाणें आह्मांकडे चालत आहेत. पेशवेसर-कारांतून आह्मांकडील जहागिरीचे वहिवाटींत कांहीं दखलगिरी नव्हती. आमचे आह्मीं मुखत्यारीनें वहिवाट करीत होतों. मातबरी सरकारांतून पहिली व हल्लीं चालत आहे यांत कंपेश व तफावत काय आहे, हें सदरहू मजकुरावरून सरकारचें ध्यानांत येईल. तारीख छ १७ माहे सफर.

---

## ३० सरदेशमुख मंत्री.

अजहत सरदेशमुख यांची वंशावळ व कैफियतः— मूळ पुरुष भास्कर राम जात शेणवी, हे मौजें कोचरें प्रांत वाडी येथें राहणार.




भास्कर राम यांचे वडील बंधू नारो राम हे मौजें कोचरें येथून साताऱ्यास येऊन शाहूमहाराज यांची सेवा चांगली केली. तेव्हां मेहरबान होऊन मंत्री पद दिल्हें. त्यांचे धाकटे बंधू भास्कर राम यांस पाण्याचें भय फार होतें. तेव्हां सातारेकर महाराज यांनीं शिमग्याचे खेळांत रंगाचा हौद केला होता, त्यांत टाकिलें. तेव्हां मृत्यु पावले. नारो राम यांस दुःख फार जाहलें. त्यांचे समजुतीबद्दल अजहत सरदेशमुख ह्मणोन किताब देऊन सरदेशमुखीची मामलत सांगितली. सन ११२७ फसलींत मामल्यासंबंधानें वेतन सालीना ३०००० रुपये करून दिल्हें. त्याप्रमाणें त्यांनीं वहिवाट चोवीस वर्षें केली. नंतर वारले. त्यांचे दत्तपुत्र घनःशामराव होते. त्यांस दहनाचा अग्नी घेऊन चलावें ह्मणोन महाराज यांनीं सांगितलें. त्यांनीं ऐकिलें नाहीं. तेव्हां भास्कर राम यांचे पुत्र त्रिंबकराव भास्कर

यांस अग्नी घेऊन चलावें ह्मणोन आज्ञा केली. त्यांनीं अग्नी नेऊन दहन करून क्रियादि कर्मे त्रिंबकराव यांनींच केलीं. सबब महाराज यांनीं मेहरबानगी करून हेही नारो राम यांचे पुत्र असें ह्मणोन त्रिंबकराव नारायण अजहत सरदेशमुख असें सनदेंत नांव लावून सरदेशमुखीचा मामला सांगितला. त्यांनीं मामल्याची वहिवाट तीस वर्षें केली. नंतर मृत्यु पावले. याप्रमाणें माहितगार यांचे सांगण्यांत आहे. दप्तरांत दाखला पाहतां, अव्वल-पासून सरदेशमुखीच्या मामल्यास नांव त्रिंबकराव नारायण अजहत सरदेशमुख म्हणोन लागत आहे. या मामलतींत सुभे बेदर व सुभे विजापूर दोन सुभ्यांपैकीं महाल एकशें चोवीस होते. त्यांची बेरीज २०२०००. यांपैकीं मशारनिल्हे यांस वेतन ३०००० सालींना चालत होती. याप्रमाणें मामलतीची वहिवाट मशारनिल्हे यांजकडे सन ११८० इहिदे सबैनपर्यंत चालली. पुढें मशारनिल्हे यांचे पुत्र भास्करराव त्रिंबक अजहत सरदेशमुख यांजकडे सांगितली. ती खमस मयातैन सन १२१४ फसलीपर्यंत चालत होती. वर्षें ३१. पुढें सरकारांतून जप्ती करून दुसऱ्याकडे मामलत सांगत गेले. नेमणुकीबद्दल तीस हजार रुपयेही मामलेदार यांनीं दिल्हे नाहींत. भास्करराव त्रिंबक यांजकडे लढाईअखेर चालत होते तेः—

३५०० मौजें बागणी हा गांव मंत्री यांचे इनामपैकीं.
१४०० कर्यात कासेगांव येथील सरदेशमुखी श्री विठोबा क्षेत्र पंढरपूर यांचे खर्चाबद्दल.
______
४९००
२००० कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यावर पेनशन सालींना रुपये मुकरर करून चालत आहे.
______
६९००

## ३१ हिंगणे.

यादी अमृतराव पुरुषोत्तम हिंगणे, इनामी जहागिरदार मौजें चांदोरी परगणे नाशिक वगैरे सुभे अहमदनगर, सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. मेहेरबान ज्यान वार्डीनसाहेब बहादूर डेपुटी एजंट जिल्हा दक्षण यांचें पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३१ इसवीचें आलें कीं, हजरत बंदगान अली रैट हनराबल गौरनर कौसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोकांची कैफियत कशी आहे, त्याची वाकफगारी व्हावी ह्मणोन कलमीं केलें जातें जें:—आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठवावी. त्यांतील तपशीलः—आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे काय चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा, ती तारीख

व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलागिरी केली तें ; आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन. त्यास आमचे पणजे महादेव भट हिंगणे. वास्तव्य श्रीजनस्थान क्षेत्रांतील व्रह्मे व पेशवे यांचे तीर्थीचे उपाध्ये वेदशास्त्र-निपुण आणि पिशाच्च लिपी व फारशी जाणत होते. त्यांचें वक्तृत्व बहुत मधुर, पोख्त, मोठे लोकांची मर्जी संपादन करण्यायोग्य होतें, ह्मणोन ते श्रीमंत कैलासवासी बाळाजी बाजीराव पेशवे यांचे स्वारीसमागमें राहून त्यांचे मर्जीनरूप कामेंकाजें करीत गेले. त्यावरून श्रीमंतांची मर्जी प्रसन्न होऊन मोठें काम करावया योग्य जाणोन, हिंदुपद पातशाहा तख्त दिल्ली येथील वकिलातीचें काम सांगितलें. त्याचा दाखला सन ११५० फसलीचे साला-पुढें लागत आहे. त्यांस पुत्र चारः—वडील बापूजी महादेव, दुसरे दामोदर महादेव, तिसरे पुरुषोत्तम महादेव, चवथे देवराव महादेव. पैकीं देवरावतात्या यांस पुणें मुक्कामीं श्रीमंतांचे हुजूर ठेऊन, त्रिवर्ग चिरंजीवास बरोबर घेऊन दिल्लीस जाऊन वकिलातीचें काम करून श्रीमंताचे मातबरीचा मरातब राखून पातशाहाचे मर्जीनरूप कामेंकाजें करीत गेले; आणि पातशाहाची मर्जी बहुत प्रसन्न करून घेतली. त्याजवरून पातशाहांनीं मेहेरबानगी करून दिल्लीनजीक साहानकी गांव मौजें बिजोली वगैरे परगणे सरावा प्रांत अंतरवेद येथें सात हजारांचे, पुत्रपौत्रादि वंशपरंपरा करून दिल्हें. त्याची वहिवाट आजपावेतों चालत आहे. दुसरे दक्षण स्वदेशांत स्वास्थ्य असावें ह्मणोन अर्ज केल्यावरून, श्रीगंगातीरीं मौजें चांदोरी परगणे नाशिक, हा गांव साहानकी इनाम पुस्तदरपुस्त वंशपरंपरा चालविण्याविषयीं फरमान तारीख २१ जमादिलावल सन २५ पंचवीस महमदशाई, हिजरी सन ११५५ चें सालीं करून दिल्हा. त्याप्रमाणें मोंगलाईकडून मौजें चांदोरीची दखलागिरी सुरुसन सलास खमसैन मया व अलफ माहे रबिलाखर छ २२ सन ११६२ फसलीचें सालीं जाहली. उपरांत सरकार श्रीमंत कैलासवासी बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं छ २७ जिल्हेज सन सलास खमसैनचे सालीं इनामपत्रें करून दिल्हीं. नंतर महादेवभटजी यांचा काळ दिल्लीसच जाहला. त्यांचे तिघे पुत्र समागमें होते. त्यांनीं वकिलातीचें काम पूर्ववतप्रमाणें करूं लागले. तेव्हां पातशाहा यांनीं त्रिवर्गाची अक्कलहुशारी पाहून दौलतींत काम करण्यायोग्य दिलांत आणून त्रिवर्गास किताबी बापूजी महादेव यांस राजे, दामोदर महादेव यांस राव व पुरुषोत्तम महादेव यांस महाराव, याप्रमाणें इनायत करून, वकिलातीचें काम राजे बापूजी महादेव शुजयातदौले वजीर लखनौ व राजे जैनगर व होळकर, शिंदे वगैरेसुद्धां करूं लागले; व राव दामोदर महादेव दौलतींत कारभार करूं लागले, व महाराव पुरुषोत्तम महादेव यांजकडे मेरट सुभा वगैरे महाल मुलकी; याप्रमाणें त्रिवर्गही करीत होते. याजमुळें खानदानीची बढती व खान-

दानीचा लौकिक महशूर जाहला. त्यावर श्रीमंत कैलासवासी रघुनाथ बाजीराव पेशवे यांची स्वारी लाहोर प्रांतीं सन सब्बा खमसेनांत गेली. ते वख्तीं दिल्ली मुक्कामीं त्रिवर्ग बंधूंनीं मोठ्या समारंभानें श्रीमंत दादासाहेब यांस मेजवानी केली. तें समयीं राजे बापूजी महादेव यांचे दौलतीचा व कारभाराचा उत्कर्ष पाहून, पहिली नजर राहिली नाहीं. हें श्रीमंत दादासाहेब यांचे दिलांत येऊन इतराजी केली कीं, बापूजी महादेव यांनीं आमचे राज्यांत राहूं नये असें जाहलें. तेव्हां पुरुषोत्तम महादेव यांनीं दिल्लीहून देवराव महादेव पुणें मुक्कामीं हुजूर होते, त्यांस इतराजीचा मजकुर लिहिला. त्यावरून देवराव महादेव यांनीं श्रीमंतांची मर्जी प्रसन्न करून विनंती केली कीं, वकिलातीचें काम आमचें आह्मांकडे सरकारांनीं मेहेरबानी करून सांगितलें पाहिजे. तदनंतर श्रीमंतांनीं विचारिलें कीं, बापूजी महादेव व तुम्हीं एकत्र किंवा विभक्त ह्मणोन आज्ञा जाहली. त्यावरून बापूजी महादेव व आह्मीं विभक्त, याप्रमाणें भाऊपणांत वांटण्या जाहल्या. त्याचे दस्तऐवजानशीं श्रीमंतांस समजाविलें. तेव्हां दस्तऐवज पाहून विभक्तपणाची खातरी श्रीमंतांची होऊन, पुरुषोत्तम महादेव व देवराव महादेव यांचें लक्ष सरकार पायांपाशीं जाणोन, वकिलातीचें काम वगैरे कामाची सोपणूक छ १६ जमादिलावल सन सबैनांत करून, उभयतांचे नांवें सनदा श्रीमंत कैलासवासी माधवराव बल्लाळ यांनीं करून दिल्ह्या. त्याप्रमाणें वकिलातीचें काम होळकर, शिंदे, लखनौ, आदिकरून उभयतां मिळोन करूं लागले. बापूजी महादेव यांस राज्यांत राहूं नये ह्मणोन श्रीमंत दादासाहेब ऊर्फ रघुनाथ बाजीराव पेशवे यांची आज्ञा जाहली होती. त्याजवरून बापूजी महादेव, हिंदुस्थान प्रांतीं बुंदीवाले राजे यांनीं आह्मांस श्रीगंगातिरीं नाशिक क्षेत्रांतील उपाध्ये ह्मणोन ताम्रपत्रीं इनामीगांव वंशपरंपरा करून दिल्हे होते ते त्यांचे वांटणींत लागले, सबब त्या गांवीं कुटुंबासुद्धां राहून गांवचा उपभोग घेत गेले. पुढें देवराव महादेव यांनीं श्रीमंतांस अर्ज केला कीं, पेशजी चांदोरी साहानक करून दिल्ही. त्याजवर आमचे मातबरीप्रमाणें प्रपंचाचा निर्वाह होत नाहीं. याजकरितां स्वामींनीं सरकारांतून स्वास्थ्य आणखी करून दिल्हें पाहिजे. ते समयीं श्रीमंत कृपाळू होऊन कसबें नाशिक येथें नाशरडीचें पाटस्थळांत गज ईलाई बिघे २५ व गंगाबाग बिघे ५ इनाम कैलासवासी श्रीमंत माधवराव बल्लाळ यांनीं छ १ सवाल सुरुसन सलास सितैन मया व अलफचें सालीं सनद करून दिल्ही. त्याप्रमाणें वहिवाट चालत आहे. त्यावर हिंदुस्थान प्रांतीं बुंदेलखंडांत तालुके माखेरी परगणे उरई व मौजें उलदन प्रांत झांशी सुरुसन समान सबैन व स्वदेशांत मौजें चांदोरी परगणे नाशिक येथील मोकाशाची सनद छ २१ साबान सुरुसन समान समानीन व मौजें धागुर परगणे दिंडोरी हा गांव खेरीज मोकासा करून दरोबस्त व सुभा गंगथडी परगणे पाटोदें येथें वार्षीक रुपये १०० शंभर; येणेंप्रमाणें इनामी वंशपरंपरा करून दिल्हे. त्यांचे कागदपत्र सनदा वगैरे येथें होत्या, त्यांजवरून दाखले सदरीं लिहिले आहेत. व कांहीं कागदपत्र हिंदुस्थान प्रांतीं आहेत व कांहीं बंडांत अफरातफर जाहले. याजमुळें

तारखा व साल लागलें नाहीं. परंतु ज्या दिवसापासून सरकारांतून जहागीर, इनाम, वर्षासन वगैरे करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें वहिवाट करून भाऊपणांत उपभोग घेत आहों. पेशवेसरकारच्या वेळेस व हल्लीं कुंपणीसरकारच्या आमलांत कंपेश तफावत लिहावयाजोगा नाहीं. पेशवेसरकार चाहत होते, तसें कुंपणीसरकारही चाहत आहेत. रवाना छ ९ माहे रमजान सन १२४२ फसली.

---

## ३२ होळकर दिवाण.

साहेब मुषफक मेहेरबान करम फरमाय दोस्तां वार्डिनसाहेब बहादूर दामाहेबत हूं.

छ अजदिल येकलास गणपतराव नारायण दिवाणजी निसबत होळकर बहादूर, सलाम बाजद सलाम. अंकीं येथील खैरखुषी जाणोन आपली शादमानी हमेशा कलमीं करून दिल ताजा करीत असलें पाहिजे. दिगर आपलें पत्र तारीख ८ सपटंबर १८३२ इसवीचें पाठविलें तें माहे मजकूर २२ तारीखेस पावलें. मतलब कीं, आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला ते व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवेसरकारांतून मातबरी चालत होती, व हल्लीं कंपनीसरकारांतून चालत आहे त्यांत कमपेश तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे ह्मणोन, त्यावरून आमचे तीर्थरूप कैलासवासी नारो गणेश मौजे रांझें, तर्फ खेडबारें येथून पंचवीस वर्षांचे उमरींत निघोन हिंदुस्थानांत होळकरांचे लष्करांत गेले. तेथें श्रीमंत थोरले मल्हारजी होळकर सुभेदार व त्यांची स्त्री श्रीमंत सौभ्याग्यवती गौतमाबाईसाहेब यांचा लोभ संपादून पोतनिशीचें काम वहिवाटीत होते. त्यावर कांहीं एक दिवसांनीं थोरले सुभेदार व बाईसाहेब यांचा काळ जाहला. मागें त्यांचे पुत्र मालजी होळकर दहा महिने दौलतीवर होते. कारभारी गंगाधर यशवंत. पुढें मालजी होळकरही समाप्त जाहले. मागें श्रीमंत मातुश्री अहिल्याबाईसाहेबांनीं गंगाधर यशवंत यांचा डोळा दौलतीविषयीं मध्यम पाहिल्यामुळें, नारो गणेश यांस हाताखालीं घेऊन, तुकोजी होळकर यांस स्थापिल्यानंतर, पुण्यास थोरले माधवरावसाहेब पेशवे यांनीं तुकोजी होळकर यांस सरदारीचीं वस्त्रें व नारो गणेश यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिल्हावर पेशवेसरकारांतून जातीचे सरंजामास जहागीरही दिल्ही. होळकरसरकारांतून स्वदेशांत दोन गांव इनामी व माळवेप्रांतीं परगणे पंच्याहाड, कोटेकर संस्थानीं यांनीं एक गांव जातीकडे सरंजामास खर्चाचे बेगमीस लावून दिल्हा. तीर्थरूप कैलासवासी जाहलीया मागें होळकरसरकारचे दिवाणगिरी जाहागिरिसुद्धां अनुभव अखेर कुंपणीसरकार इंग्रजबहादूर याचे अंमलपर्यंत आम्हींच घेत आलों. वडिलांची कारकिर्द बढतीची व जहागिरी

संपादल्याची व दखलगिरी कोणते तऱ्हेनें जाहल्याचा बयाज तारीखवार पत्रांत बमोजीब जाब द्यावा, तर पूर्वी तीर्थरूपांवर पुरंदर मुक्कामीं श्रीमंत सवाई माधवरावसाहेब असतां, श्रीमंत महादजी शिंदे पाटीलबावा यांनीं पेशवेसरकारांत गैरवांका समजावून, घर, वाडे जप्त करून, लाखों रुपयांस नागविलें. त्यास सन सितांत श्रीमंत बाजीरावसाहेब वसईचे स्वारीहून आलीयावर आह्मीं श्रीमंत यशवंतराव होळकर यांचे स्वारीसमागमें होतों, सबब आमच्या घराच्या जप्त्या करून लाखों रुपयांची नुकसानी केली. यामुळें कागदपत्र बिलकूल राहूं शकले नाहींत. तेव्हां इस्तकबिल तागायत तारखेचे वगैरे जाब देण्यास आधार कोणता? मातबरीचा व जहागीर देण्याचा वगैरे दाखला सरकारदप्तरीं आहे. पेशवेसरकारांतून पेशजी जायदादीस सरंजाम दिल्ह्याप्रमाणें व होळकरसरकारपैकीं स्वदेशांतील दोन गांव इनामी चालत आल्याअन्वयें हल्लीं सरकार मेहेरबानगी करून चालवीतच आहां. रवाना छ १० साबान. ज्यादा काय लिहिणें? प्यार मोहोबत असो दिजे. हे किताबत.

---

## ३३ सचीव.

### अ.

साहेब मुषफक मेहेरबान दोस्तां हेनरी ब्रौनसाहेब बहादूर एजंट, जिल्हा दक्षण बकियत बाषद.

छ अजिज्यानिब चिमणाजी रघुनाथ सचीव, बाजद सलाम शौकत येथील खैरयत जाणून आपली शादमानी हमेशा कलमीं करीत असलें पाहिजे. दरीविला आसाहेबांकडून पत्र नंबर १०४७ तारीख २६ आगष्ट सन १८५१ इसवीचें आलें, त्यांत आसाहेबास किताब सचीव पंत पद आहे, हें कधीं, कोणते सबबेनें, कोणाकडून प्राप्त जाहलें, याचा व एकंदर खानदानीचा व पदवीथोरपणाचा इतिहास, दाखलेनिशीं लिहून द्यावा व त्याजबरोबर दाखला असेल, तोही पाठवावा म्हणून हाशील मजकूर आहे. त्याचा जाब न गेल्यामुळें दुसरें पत्र नंबर १३३२ चें आलें, त्यास सदरहूची माहिती येणेंप्रमाणें:— कलमें.

१ सचीव पंत हें पद कैलासवासी राजाराम महाराज छत्रपती सरकारांतून आमचे पूर्वज शंकराजी नारायण सचीव यांस अष्टप्रधानातील सचीव पद दिल्हें. त्यापासून खानदानीचा तपशील:—

| | |
|---|---|
| १ शंकराजी नारायण ( मूळपुरुष ) | २ नारो शंकर. |
| ३ चिमणाजी नारायण. | ४ रघुनाथराव चिमणाजी. |
| ५ शंकरराव रघुनाथ. | ६ चिमणाजी शंकर. |
| ७ रघुनाथराव चिमणाजी. | ८ चिमणाजी रघुनाथ. |

याअन्वयें आजपर्यंत खानदानीचा तपशील आहे.

१ हें पद मिळाल्यास अजमासें एकशें साठ पासष्ट वर्षें जाहलीं.

१ महाराज छत्रपती यांजपाशीं शंकराजी नारायण यांनीं, प्रसंगीं सेनासंभार मिळवून यवनाक्रांत राज्य जाहलें होतें, तें मोठें मर्दुमीनें, देश, दुर्ग वगैरे घेऊन, राज्यवृद्धी केली. याविषयीं छत्रपती यांच्या सनदा वतनी, इनामी, सर्व राज्यांत साहोत्रा व गांव दिल्हे त्यांच्या, वगैरे करून दिल्ह्या आहेत. त्यांपैकीं आसाहेबाचे दिलांत पूर्वीची हकीकत लिहिल्याअन्वयें दाखलेसुद्धां ध्यानांत येण्याकरितां दोन सनदाः—

१ राज्याभिषेक शके २६ प्रमाथिनाम संवत्सरें या सालची.

१ राज्याभिषेक शके २७ विक्रमनाम संवत्सरें या सालची.

—
२

एकूण दोन अस्सल पाठविल्या आहेत. ह्या पाहून नकला ठेऊन अस्सल वकील यांजजवळ परत दिल्ह्या पाहिजेत.

—
३

एकूण तीन कलमें मजकूर लिहिला आहे, त्याजवरून मालूम होईल. सुरुसन इसन्ने खमसेन मयातैन व अलफ. रवाना छ '१ रबिलाखर ज्यादा काय लिहिणें, हें किताबत.

## सनद १.

शिक्का.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २६ प्रमाथीनाम संवत्सरें, आश्विन बहुल दशमी, भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती यांणीं राजश्री शंकराजी नारायण सचीव, मदारुलमाहा यांसीं आज्ञा केली ऐसीजेः—तुह्मीं स्वामींच्या पायाशीं एकनिष्ठता धरून, स्वामी कर्नाटक प्रांतीं गेले ते प्रसंगीं, तुह्मीं या प्रांतें राहोन, संपूर्ण राज्य ताम्रानें आक्रमिलें होतें, तें पुनरुक्त हस्तगत केलें. शत्रू पराभवातें पाविला व स्वामींसच जें प्रांतीं शत्रूनें संकट केलें, ते समयीं सैन्यसंभार पाठवून, स्वामींचें संकट निरसन केलें. स्वामींच्या राज्यानिमित्य श्रमसाहस अतिशयेंसी करून, स्वामींस संतोषी केल्यानिमित्य, तुमचे वंशपरंपरेनें चालविणें स्वामींस बहुत अगत्य, याकरितां परगणे कऱ्हाड येथील देशमुखीचें वतन खासा स्वामींचें पुरातन होतें, तें चिरंजीव राजश्री राजा कर्ण यांसीं दिल्हें होतें. तें दूर करून, हल्लीं तुह्मांवरी कृपाळू होऊन, तुह्मांस नूतन वतन वंशपरंपरेनें अजरामऱ्हामत करून दिल्हें असे. व या वतनास हक्क लाजिमा व इनामती व इसाफती व शिक्का, नांगर, मानपान पूर्वीं चालल्याप्रमाणें तुह्मांस चालवण्याची आज्ञा केली असे. तरी तुह्मीं देशमुखीचें वतन आपले दुमाले करून घेऊन, हक्क लाजिमा व इनामती व इसाफती, पानमान, शिक्का, नांगर अनुभवून वतनाची सेवा करून सुखरूप राहाणें. या वतनसंबंधें तुम्हांपासोन दिवाणांत शेरणी रुपये ६००० साहा हजार घेतले असेत. हें वतन तुम्हांस व तुमचे वंशपरंपरेस सुरक्षित चालेल. या वतनास हिंदु होऊन कोणी इस्कील करील त्यास वाराणशीमध्यें गोहत्या व ब्रह्महत्या केल्याचें पातक असें. व मुसलमान

होऊन इस्कील करील, त्यांस मक्केमध्यें सुवर मारल्याचें पातक असें. ऐसीं पातकें जाणोन तुह्मांस वतन सुरक्षित चालवितील. जाणिजे. निर्देश समक्ष. मोर्तब असें ”

## सनद २.

शिक्का

“स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २७ विक्रमनाम संवत्सरें, अधिक अश्विन बहुल चतुर्दशी, इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती यांणीं राजश्री शंकराजी नारायण यांसी वतनपत्र दिल्हें ऐसीजेः—तुह्मीं स्वामीचे एकनिष्ठ सेवक कृतकर्मे केलीं आहां. मागें तीर्थरूप राजश्री आबासाहेबांचे वेळेस ताम्राचें प्राबल्य जाहलें. रायगड आदीकरून सर्वही राज्य यवनाक्रांत जाहलें, याकरितां कैलासवासी स्वामी निधान कर्नाटक प्रांतास गेले. ते प्रसंगीं तुम्हीं श्रमसाहस करून सेनासंभार मिळवून संपूर्ण देशदुर्ग, तांम्रास हस्तगत जाहलीं होतीं, ते कबज केलीं. स्वामींचें राज्य वृद्धीस पावविलें. याकरितां कैलासवासी स्वामी तुम्हांवरी कृपाळू होऊन तुम्हांस वतन अजरामऱ्हामत करून दिल्हें आहे. बितपशीलः—

(शिक्का.)

| | |
|---|---|
| राज देशमुखी दरसदे चौरोत्रा व सरदेश कुळकर्ण दरसदे दुवोत्रा, एकूण दिवाण दस्ताचे बेरजेस, रयत निसबत दरसदे सावोत्रा, यांस सुभे बितपशील. | राज देशमुखी दरसदे चौरोत्रा व सरदेश कुळकर्ण दरसदे दुवोत्रा व राजपट्टी दरसदे चौरोत्रा, एकूण दिवाण दस्ताचे बेरजेस, रयत निसबत दाहोत्रा संपूर्ण राज्यांत कोकणपट्टी खेरीज करून हक्क देवविला असे. |

येणेंप्रमाणें देखील कमावीसबाब व खंडगुन्हेगारी व जकात दिवाण दस्ताचे बेरजेस, सदरहूप्रमाणें हक्क करून दिल्हा आहे. तेणें प्रमाणें स्वामींनें करार करून, देशाधिकारी यांचे नांवें सनदा सादर केल्या आहेत. तरी तुम्हीं वतनाचे कमाविसीस आपले दिमतीचे कमाविसदार पाठवून, हक्काचा वसूल घेऊन, पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून, सुखीं असणें. बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा. लेखनालंकार मोर्तब असें.”

---

## ब.

यादी राजश्री पंत सचीव सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ. कंपनीसरकारचें पत्र आलें तें छ २४ रबिलाखरीं दाखल जाहलें. त्याचें उत्तराचीं कलमें:—

१ खानदानीची बढती कोणते तारखेस व लौकिक महशूर जाहला याचें उत्तरः— आमचे वडील नारो मुकुंद, हे कैलासवासी शिवाजी महाराज यांचे कारकीर्दीत कामकाजांत होते. किल्ले, कोट वगैरे मुलूख घेतला, ते वेळेस किल्ले सुधागड येथील सबनिशी त्यांस दिल्ही. पुढें शंकराजी नारायण महाराजांजवळ होते. महाराज कैलासवासी जाहल्यावर संभाजी महाराज, राज्य करूं लागले. ते पात-

शाहाचे हस्तगत जाहल्यावर राजाराममहाराज चंदीचंदावरास गेले. मागें शंकराजी नारायण यांनीं सेनासंभार जमा करून, राज्य सोडवून वृद्धींगत पावविलें. ऐसें जाणोन कैलासवासी राजाराम महाराज यांनीं, सचीव पद व सुरनिशीचें पदाचीं वस्त्रें, शालिवाहन शके १६१६ सोळा सत्रा या सालांत दिल्हीं. तेव्हांपासून खानदानीची बढती व लौकिक महशूर जाहला. त्याजवर किल्ले, कोट व महाल व संपूर्ण राज्यांत सावोत्रीयाचें वतन व इनामगांव व इनामजमिनी करून दिल्ह्या. कलम.

२ फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा याचें उत्तरः—फौज शंकराजी नारायण यांजबरोबर राज्य काबीज करण्यास होती, त्यास खर्च सरकार खजिन्यांतून जाहला; व त्याजकडे किल्ले, कोट व महाल पदाचीं वस्त्रें जाहल्याचे तारखेपासून चालत होते, ते शाहू महाराज दिल्लीहून येईतोंपर्यंत चालले. महाराज आले ते समयीं शंकराजी नारायण समाप्त जाहले. त्यांचे पुत्र नारो शंकर यांस महाराजांनीं पदाचीं वस्त्रें देऊन वतन, इनाम, सावोत्रा, व किल्ले, कोट व महाल चालत आल्याप्रमाणें चालविले. कलम.

३ आपले जहागिरींचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली याचें उत्तरः—शाहू महाराज राज्य करीत होते, ते वेळेस, किल्ले पुरंदर सरंजामसुद्धां पेशवे यांस आमचे वडिलांनीं दिल्हा. महाराज कैलासवासी जाहल्यावर, पेशवे यांनीं महाराजांनीं चालविल्याप्रमाणें इनाम व वतनी, सावोत्रा व किल्ले, कोट, महाल चालविले. पुढें चिमणाजी नारायण यांचे कारकीर्दींत पेशवे यांनीं किल्ले सिंहगड सरंजाम सुद्धां मागून घेऊन, मुलखाचा मोबदला पुरवून दिल्हा. नंतर महाराज सरकारांत पीलखान्याचे खर्चाबद्दल ऐवज द्यावा लागत होता, त्याजबाबद बाबतीचा वगैरे ऐवज पुरवून देऊन, दहा हजार रुपये रोख दरसाल सातारीयाचे डाकेचे खर्चास पावत गेले. कलम.

४ आपलेकडे हल्लीं सरंजाम काय चालत आहे, त्याचें उत्तरः—इकडे महाल व किल्ले, कोट व वतनी सावोत्रा महालानिहाय व इनामगांव वगैरे चालत आहे. त्याची दखलगिरी कंपनीसरकारांत आहेच. कंपनीसरकारचा अंमल जाहला ते समयीं हजरत बंदगान अली राइट हनराबल एल्फिस्तन साहेब गौरनर बहादूर यांची भेट आमचे तीर्थरूप चिमणाजी शंकर यांणीं सिंहगडाखालीं घेतली. ते समयीं साहेब यांणीं सांगितलें कीं, मोंगलाईतील तुमचा अंमल असेल तो खेरीज करून, लढाई अखेर महाल व किल्ले, कोट व वतन व सावोत्रा व इनामगांव व इनामजमिनी चालत आल्याप्रमाणें चालतील ऐसें वचन दिल्हें. त्या अन्वयें मोंगलाईतील अंमल जाऊन बाकी चालत आहे. कलम.

५ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यांत कंपेश तफावत काय आहे, तें वगैरे लिहावें. याचें उत्तरः— पेशवेसरकारांत आमची मातबरी चालत होती, त्याप्रमाणें कंपनीसरकारांतून ही मातबरी चालवीत आहेत. कंपेश तफावत नाहीं. परंतु मातबरींत हल्लीं कमती यावयाचें कारण, पेशजी मोंगलाईंतील इनामी सावोत्रीयाचा वगैरे अंमल, वसूली पन्नास हजारांचा गेला व अलीकडे सन तिस्सा आशरीनापासून, महाराजसरकारांत नवीन दरसाल रुपये पंधरा हजार द्यावयाचा ठराव जाहला, ते द्यावे लागतात. व तीर्थस्वरूप मातुश्री राधाबाई यांस सत्रा हजार रुपये दरसाल द्यावे लागतात. व अलीकडे महालांत दरसाल आपत्ती होती, याची दखलगिरी कंपनीसरकारचे महालावरून आहे जमा कमी आणि खर्च जाजती वाढल्यामुळें दौलतींत वोढ होऊन मातबरींत कमती आहे, हें कंपनीसरकारचें लक्षांत आहे.

कलम.

एकूण पांच कलमें लिहिलीं आहेत, त्याजवरून दिलांत येईल. छ १९ रविलावल

मोर्तब.

---

क.

यादी सरकारी तपशील दाखल्यावरून सुरुसन समान अशरीन मयातैन व अलफ सचीव पदाचा पदाधिकार जाहला, त्या कारकीर्दीचा तपशीलः—

२ शिवाजी महाराज कारकीर्द तागाईत संभाजी महाराज.

१ शंकराजी मल्हार. २ आण्णाजी दत्तो.

१ राजाराम साहेब कारकीर्द शंकराजी नारायण, हल्लीं सचीव आहेत यांचे वडील.

२ शाहू महाराज कारकीर्द.

१ नारो शंकर. २ चिमणाजी नारायण. (हे दत्तक जाहले.)

२ रामराजे कारकीर्द.

१ सदाशिव चिमणाजी. २ रघुनाथराव चिमणाजी.

२ धाकटे शाहू महाराज कारकीर्द.

१ शंकरराव रघुनाथ. २ चिमणाजी शंकर. (दत्तक) हल्लीं पदाधिकारावर आहेत.

१ प्रतापसिंह महाराज कारकिर्दींत हल्लीं चिमणाजी शंकर सदरीं लिहिले ते.

---

ड.

यादी पंतसचीव यांचे मातुश्रीकडून यादी आली, ती सुरुसन समान आशरीन मयातैन व अलफ.

१ मूळ पुरुष कोनेर विठल चंदावरास होते. त्यांस तेथील सुरनिशी प्राप्त जाहली. त्याजला पुत्र वडील मुकुंदपंत व धाकटे प्रल्हादपंत हे दोघे जाहले. मुकुंदपंत सुरनिशीची वहिवाट करीत होते. त्यांजला पुत्र नारोपंत जाहले. ते या प्रांतीं आले. पाठीमागें मुकुंदपंत यांचा काळ जाहल्यावर, प्रल्हादपंत व त्यांचे पुत्र तेथील सुरनिशी करूं लागले. नारोपंत यांनीं स्वामीजवळ सेवा चाकरी केली. त्यांजला सुधागड येथील सबनिशी दिल्ही, ती करीत होते. त्यास पुत्र शंकराजी नारायण जाहले. त्यांजला सचीवपणाचा पदाधिकार स्वामींनीं दिल्हा. त्यांस पुत्र नाहीं. सबब दत्तक परगोत्री महादाजी शंकर घेतले. नंतर औरस पुत्र नारो शंकर जाहले. त्याजवर शंकराजी नारायण समाधिस्थ जाहले. तेव्हां स्वामींनीं नारो शंकर यांस दौलतीचीं वस्त्रें देऊन, शंकराजी नारायण यांची शिक्केकट्यार होती ती दिल्ही, आणि तोच शिक्का चालविण्याविषयीं आज्ञा जाहली. त्याप्रमाणें नारो शंकर यांनीं दौलत चालविली. महादाजी शंकर दत्तक हे त्यांजवळच होते. पुढें नारो शंकर यांचा काळ जाहला. तेव्हां महादाजी शंकर यांचे पुत्राचें नांव चिटकोबा होतें, तो दत्तक घेऊन चिमणाजी नारायण म्हणोन पदाचीं वस्त्रें दिल्हीं. त्यांनीं दौलत चालविली. त्यांस पुत्र सदाशिवपंत व आनंदराव व रघुनाथराव हे त्रिवर्ग जाहले. चिमणाजी नारायण यांचा काळ जाहल्यावर, सदाशिवपंत यांस पदाधिकार जाहला. त्यांचा काळ जाहल्यावर रघुनाथराव यांस पदाचीं वस्त्रें जाहलीं. ते दौलत चालवीत होते. त्यांस पुत्र शंकरराव होते. रघुनाथराव यांचा काळ जाहल्यावर, शंकरराव यांस पदाचीं वस्त्रें होऊन, ते दौलत चालवीत होते. पुढें दत्तक घ्यावयाचा, त्यास आमचे दशांतील घर कोणी इकडे नाहीं. महादाजी शंकर यांचें घरांत पुत्र नाहीं. चंदावरकरांनीं दत्तक घेऊन चालविलें आहे. भोरपकर तीन दिवसांचे अधिकारी, त्यांचा मुल आणावयास प्रकृतीमुळें अवकाश पडला नाहीं. सबब काशी मोरेश्वर यांजला गांव देऊन त्याचा मुल आणोन दत्तविधान करून घेतलें. त्यांस पदाचीं वस्त्रें जाहलीं.

१ ज्या पुरुषास पदाधिकार जाहला, त्याजपासून कारकीर्द वळंगळी ( ओळीनें ) येणेंप्रमाणें:—

१ शंकराजी नारायण. यांस पुत्र १.

१ नारो शंकर. यांस पुत्र १.

१ चिमणाजी नारायण ( दत्तक ). यांस पुत्र ३.

१ सदाशिव चिमणाजी. यांस पुत्र नाहीं.

१ रघुनाथराव चिमणाजी. यांस पुत्र १.

१ शंकरराव रघुनाथ. यांस पुत्र १.
१ चिमणाजी शंकर ( दत्तक ).
—
७

१ मूळ पुरुषापासून पुरुष जाहले येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १ विठ्ठलपंत. | १ नारोशंकर |
| १ कोन्हेरपंत. | १ चिमणाजी नारायण. |
| १ मुकुंदपंत. | १ रघुनाथराव चिमणाजी. |
| १ नारोपंत. | १ शंकरराव रघुनाथ. |
| १ शंकराजी नारायण. | १ चिमणाजी शंकर. |
| ५ | ५ = १० |

एकूण दाहा पुरुष जाहले. यांत कान्हेरेपंतास दोन पुत्र जाहले. पैकीं एक बंधी चंदावरास सुरनिशीवर राहिला. त्याचे घरांत भाऊपणा नाहीं. दत्तक घेऊन तेथील अधिकार चालविला आहे. बाकी एक एकच पुत्र होत गेला.

१ आमचे सोईरसुतकाचे तीन दिवसांचे अधिकारी यांचीं घरें इकडे आहेत.
१ किल्ले भोरप येथें बाजीराव रघुनाथ.
१ मौजें अळंदे येथें त्रिंबकपंत होते. त्यांचें नक्कल जाहलें.
—
२

---

## इ.

यादी सन १८२९ इसवी सालीं श्रीमन्महाराज प्रतापसिंह राजे छत्रपती, इलाखा सातारा, यांचे सरहद्दींत व यांचे ताबेदारींत व यांचें मुलुखांत व यांचे सन्निध व यांचे चाकरींत व कामगारींत सरदार व अष्टप्रधान व मुत्सद्दी व मोठे मोठे कारकून आहेत व शिपाई मोठे-मोठे आहेत व दौलतदार आहेत व नामांकित आहेत; व यांची वंशावळ व त्यांस हल्लीं सालीना उत्पन्न काय होतें, पूर्वजांनीं पराक्रम कोठें कधीं, कोणाजवळ, कसा केला, आणि नांवास कसें चढलें, ती कैफियत व हल्लीं जे आहेत यांची नांवनिशी व सालीना उत्पन्नाचा अजमास आकार रुपये बितपशीलः—

१२०००० रघुनाथराव चिमणाजी सचीव, हे अष्टप्रधानांत आहेत. वय वर्षें १६ ऋग्वेदी, देशस्थ ब्राह्मण. उपनाम गांडेकर. त्यांचें राहणें सातारीयाहून तीस मैल उत्तरेस, कसबें भोर, निरा नदीचे कांठीं आहे. त्यांजकडेः—
४०००० सरंजाम.
८०००० इनामीगांव सावोत्रा वगैरे.

३०००० खानदेश व नगर व पुणें सुभ्यांत सावोत्रा.
५०००० भोरप्रांतीं गांव वगैरे.

८००००

१२००००

यांसी गांव अजमासें सुमारी पांचशें. यांचा मुलूख वाईच्या डोंगरापासून सह्याद्रीचे घाटमाथ्यावरून, उत्तरेकडे तुंग तिकोना, आंबेगांवपर्यंत लागत गेला आहे. निरेचे उत्तरेस थोडा आहे, परंतु दक्षिणेस फार आहे; व कांहीं रोहे अष्टमीकडे कोकणांतही आहे. त्याचे देहेसुमारीः—

४२ रोहीडखोरें.
३२ वेलवंडखोरें.
४० शिरवळ.
७१ मुसेंखोरें.
५२ पौनमावळ.
५३ हीरडसमावळ.
८१ गुंजणमावळ.
३३ कानंदखोरें.
१९ मुठेंखोरें.
३९ खेडेंबारे.

४६२

यांत कित्येक गांवपैकीं अंमल, लोकांस द्यावा लागतो व कितीक दुसरे याजकडे अजी खोतीही आहेत. याखेरिज कोकण प्रांतीं दुतर्फा अंमलाचे महाल आहेत.

१ तर्फ नागोठणें.
१ तर्फ अष्टमी.
३ तर्फ समिहाल.
  १ तर्फ हवेली.
  १ तर्फ आसरे आधारणें.
  १ तर्फ अंतोणें.
  
  ३

५ महाल.

याकरितां महाराजे सरकारांत चाकरी कांहीं करावी लागत नाहीं. दसऱ्यास मात्र हुजूर यावें लागतें. परंतु नक्त रुपये द्यावे लागतात. येणेंप्रमाणें रुपयेः—

५५०० पीलखान्याचें खर्चास पूर्वी द्यावें लागत होते, त्याप्रमाणें ग्रँटसाहेबांनीं ठराविले ते.

१५००० गुदस्ता रघुनाथ चिमणाजी यांसी दत्त(क) घेतल्यापासून, महाराज सरकारांनीं ते पीलखान्याचे खर्चाऐवजी घ्यावयाचें म्हणोन ठराविलें.

२०५००

याप्रमाणें महाराज सरकारांत द्यावे लागतात. याखेरीज, यांचे तीर्थरुपाची मातुश्री

राधाबाई यांस, ग्रँटसाहेबांनीं यावज्जीव नेमणूक द्यावयाची ठरविली, ते १७००० रुपये द्यावे लागतात. बाईनीं वांई, माहुलीस राहून कालक्षेप करावा. सदरहू प्रमाणें रुपये देऊन, बाकी राहील ते महालमजकूर व शिबंदी व किल्ले व भोजनखर्च व रामनवमीचा उत्सव व हत्ती, घोडे, उंट वगैरे याप्रमाणें खर्च होतो. सदरीं मुलूख लिहिला याखेरीज, पंचवीस हजारांचे सावोत्रा वगैरे उत्पन्न, मोगलाईत कंपनी अंमल आल्यापासून गेलें. महाराज सरकारचीं इनामपत्रें व दुमालपत्रें व सनदा होतील, त्याजवर रुजू सुरनिवीस त्याहावें व यांजकडील कारकुनांनीं सुरू सुद मार लेखांक त्याहावें. सचीव, सुरनीस हा अर्थ एकच आहे. यांचे मुलखांतील सुमारी मनुष्य गणतीची बेरीज लागली नाहीं. यांचे मुलुखांत किल्ले पहाडी सुमारें.

| | |
|---|---|
| १ राजगड. | १ तिकोना उर्फ वितंडगड. |
| १ भोरप उर्फ सुधागड. | १ तोरणा उर्फ प्रचंडगड. |
| १ रोहीडा ऊर्फ विचित्रगड. | १ तुंग उर्फ कठीणगड. |
| ३ | ३ = ६ |

याप्रमाणें आहेत. यांचे मुलुखांतील किल्ले कांहीं पाडिले नाहींत. यांचे मूळ पुरुष राहाणार मौजे गांगडरी, तर्फ भोर, पैकी कोनेर विठ्ठल हे चंदावरास राजाराम साहेबाबरोबर गेले, इसवी सन १६८८ चे सालीं, तेव्हां चंदावर मुक्कामीं, त्यांजला सुरनिशी सांगितली. त्यांजला पुत्र दोन:—

१ वडील मुकुंदपंत हे सुरनिशी करीत असता तिकडेच वारले. त्यांचे पुत्र नारोपंत राजाराम साहेबांसमागमें. महाराष्ट्र देशीं पुन्हा आले. त्यांजला सुधागड येथील सबनिशी सांगितली.

१ धाकटे प्रल्हादपंत व त्यांचे पुत्र, चंदावरास सुरनिशी करीत होते. त्यांचा वंश तिकडे असेल.

२

नारो मुकुंद यांस पुत्र शंकराजी नारायण जाहला. त्यांजला राजेसाहेबांनीं सचीव पद दिल्हें. कारण कीं यांनीं किल्ले. मुलूख घेतले व रक्कम रुपये दिल्हे. त्या शंकराजी नारायणास पुत्र ३:—

१ जनार्दन शंकर, लहान असतां वारले.

१ दत्तक पुत्र, महादाजी शंकर, हे दूरचे स्वगोत्रांतील दत्तक घेतले. त्यांस ३ पुत्र जाहले:—

१ चिटकोपंत, हे नारो शंकर यांस दत्तक दिल्हे.

१ आंबाजी महादेव नक्कल.

१ रामचंद्र महादेव नक्कल.

३

१ अवरस पुत्र नारो शंकर जाहले, यांजला शंकराजी नारायण वारलेवर, शाहू महाराजांनीं सचीव पद दिल्हें. पुढें नारो शंकर वारल्यावर, दत्तक पुत्र चिटको महादेव

दिल्हें. नांव चिमणाजी नारायण ठेविलें, आणि सचीव पद, शाहू महाराजांनीं दिल्हें. चिमणाजी नारायण यांस पुत्र ३:—

१ वडील पुत्र, सदाशिव चिमणाजी, यांस चिमणाजी नारायण वारल्यावर पद दिल्हें.

१ दुसरे, आनंदराव चिमणाजी, हे सदाशिव चिमणाजी असतां वारले.

१ तिसरे पुत्र, रघुनाथ चिमणाजी, यांस सदाशिव चिमणाजी वारल्यावर पद दिल्हें. इसवी सन १७८७ सालीं, धाकटे शाहू राजे यांणीं दिल्हें. पुढें रघुनाथ चिमणाजी वारल्यावर, त्यांचे पुत्र शंकराजी रघुनाथ यांस पद, धाकटे शाहू राजे यांणीं इसवी सन १७९१ सालीं दिल्हें.

३

पुढें शंकराजी रघुनाथ वारल्यावर, त्यांची स्त्री राधाबाई यांणीं काशी मोरेश्वर गांडेकर, राहणार मौजें मांगदरी, नजीक भोर, हे स्वगोत्रांतील त्यांचेच पुत्र दत्तक घेतले. नांव चिमणाजी शंकर ठेविलें. हे दवलत करीत होते. यांचे कारकीर्दीत बाजीराव पेशवे यांचें समयीं, सचीवांचे कारभार आप्पाजिराव निंबाळकर वाठारकर करीत होते. त्यांनीं राधाबाई मातोश्री यांचे विचारें, चिमणाजी शंकर यांस कैद दाखल ठेविलें. त्यांजला बाजीराव यांनीं सोडवून आणिलें आणि आप्पाजीराव निंबाळकर यांस कैद केलें होतें. पुढें मातोश्रीचें व चिरंजीवाचें वाकडें पडलें. इतक्यांत कंपनीसरकारचा अंमल जाहला. तेव्हां ग्रँट साहेब यांनीं बाईस नेमणूक रुपये १७०००, दत्तक यांणीं द्यावें असें ठराविलें. तें चालत आहे. पुढें सन १८२७ इसवी सालीं, चिमणाजी शंकर मरते समयीं, आपलें आदलें घरचे प्रत्यक्ष बंधु दत्तक घेतलें. नांव रघुनाथ चिमणाजी ठेविलें. नंतर चिमणाजी शंकर वारले. महाराजांनीं कृपा करून, रघुनाथ चिमणाजी यांजकडून नजर, दत्तकसबंधीं, एक साला रुपये ४०००० चाळीस हजार घेतलें आणि सचीव पद दिल्हें. सालीना पंधरा हजार रुपये पीलखान्याचे खर्चास ह्मणोन दरसाल घ्यावयाचें ठराविलें. चिमणाजी शंकर यांच्या स्त्रिया दोघी, २ हल्लीं आहेत.

१ थोरली भवानीबाई, वय वर्षे ३० तीस, हल्लीं कारभार करीत आहे. ती वामनराव उपाध्ये यांची बहीण.

१ धाकटी. वय वर्षे १६.

२

---

## ३४ सुमंत.

साहेब मेहेरबान दोस्तां हेनरी ब्रौनसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलाम हू.

छ अजज्यानिब आनंदराव मल्हार सुमंत, हल्लीं मुक्काम कसबें नेवासें बुद्रुक, परगणे मजकूर सलाम अंकी येथील खैरयत जाणोन, आपली खैरखुशी हमेशा कलमी करीत असलें पाहिजे. दिगर मजमून सुमंत पद मरातब आहे. हें कधीं, कोणत्या सबबेनें, कोणाकडोन

प्राप्त जाहलें, त्याचा व एकंदर खानदानीचा व पदवी थोरपणाचा इतिहास, दाखल्यानिशीं लिहून यावा व दाखलाही त्याजबरोबर पाठवावा. ऐकीव मजकूर हकीकत असेल, तर तसें लिहून यावें म्हणोन, वगैरे मजकुराचें पत्र तारीख २६ आगष्ट, नंबर १०५६ सन १८५१ इसवीचें, साहेबाकडोन आलें तें पावलें. ऐसीयासः—आमचे पणजे आनंदराव रघुनाथ हे प्रथम चंद्रसेन जाधवराव पातशाहाचे सरदार फौजबंद होते. त्यांजपाशीं हे अजमासें बाहा पंधरा वर्षे सरदारीस असोन, त्यांजबरोबर स्वाऱ्या, शिकाऱ्या करून, बहुत दिवस लढाया मारल्या. मोठे शूर होते. पुढें महाराज श्रीमंत राजा शाहू छत्रपती हे दिल्लीहून च्याहारम व सरदेशमुखीच्या सनदा घेऊन स्वदेशीं आले. ते वेळेस चंद्रसेन जाधवराव हा मोठा फौजबंद व बाळाजी विश्वनाथ वगैरे सर्व त्यांजपाशीं सरदार होते. यास्तव महाराज शाहू राजे यांजला मोठी मसलत पडली कीं, हा सरदार खाली होईल, तर आपण निर्वेध राज्य करूं. त्याजवरून बाळाजी विश्वनाथ पेशवे जाहले. ते व आमचे वडील आनंदराव रघुनाथ, नारो रामराव मंत्री जाहले, ते वगैरे सरदार यांस महाराजांनीं गुप्तरूपें पत्रें लिहिलीं कीं, तुह्मीं साह्य होऊन चंद्रसेन सरदार यांस खालीं केलें पाहिजे. त्याजवरून सर्व सरदार महाराज छत्रपती यांजकडे मिळोन, चंद्रसेन जाधवराव याचा मोड केला आणि निर्वेध राज्य शाहू छत्रपती करूं लागले. नंतर पूर्वीचे पेशवे, सुमंत वगैरे होते, ते दूर करून, बाळाजी विश्वनाथ पेशवे यांस पद देऊन वाढविलें. तेव्हां आमचे पणजे आनंदराव रघुनाथ यांस सुमंत पद देऊन व मोंगलाईतील वकिलीही दिल्ही आणि मरातबानें वाढविलें. त्या दिवसापासोन आमचे खानदानीची बढती जाहली. पुढें महाराज छत्रपती यांनीं वतनवृत्ती व सरंजाम व इनाम, आमचे मोठेपणाप्रमाणें बहुत मुबलक करून दिल्हें होतें. याप्रमाणें माहिती मिळती, ती लिहिली आहे. कागदोपत्रीं शक मितीचे दाखले आहेत; परंतु आह्मांजवळ नाहींत. महाराज छत्रपती साहेब यांचे येथें साताऱ्यास आहेत व मूळचें एक पत्र आह्मांजवळ आढळत होतें. हल्लीं त्याचाही शोध करून नक्कल करून पाठविण्यांत येईल. वरकड ऐकीव ही खरे प्रकारची माहिती प्रसिद्ध आहे. ती सर्व सरकारास जाहीर होण्याकरितां लिहिण्यांत आली आहे. दाखला मिळण्याचाही यत्न करूं. परंतु राजधानींत गेल्याशिवाय, कागदपत्र वगैरे दाखला मिळण्यास हरकत आहे. या गोष्टीस वर्ष साहा महिने अवधी पाहिजे. यास्तव आपले हुकुमाप्रमाणें जी माहिती होती, ती खानदानीची कैफियत लिहून कळविली आहे. रवाना तारीख २७ माहे सपटेंबर सन १८५१ इसवी. ज्यादा काय लिहिणें प्यार मोहोबत किजे, हें किताबत.　　आनंदराव मल्हार सुमंत.

---

( १४५ पानांतील कैफियतीची वंशावळ. )

## ३५ पंतप्रतिनिधी व.

### वंशावळ.

कैफियतीचे चौदावे कलमांत लिहून दिल्याप्रमाणें:—श्रीनिवासराव उर्फ रावसाहेब तीर्थरुपाचें नांव परशरामपंत रहाणार कसबें औंध, तालुके खानापूर, जिल्हा सातारा, यांणीं मौजें चंचळी व मौजें शेंदुरजणें, तालुके कोरेगांव, या गांवाबद्दल कैफियती देऊन, त्याजबरोबर ही वंशावळ, माहीत असलेले इसमापासून, नमुन्याप्रमाणें लिहून दिल्ही आहे. तारीख १२ माहे मार्च सन १८५८ इसवी.




* इसम मजकूर, हे भगवतराव यांचे पुत्र असून, त्यांस कृष्णराव अमृत यांनी दत्तक घेतले, परंतु कोणते सालीं घेतले, याची माहिती नाहीं.

† इसम मजकूर हरीपंत हिवरकर यांचे मुलगे, शके १७६९ मधील परशरामपंडित यांनी दत्तक घेतलें. हे गोत्रज आहेत, परंतु या वंशावळीत यांचा वंश दाखल झालेला नाहीं.

‡ सदरहू इसम इंग्रजींत मेले किंवा पेशवाईंत मेले, हे माहीत नसल्याकारणानें, त्यांचे नांवाजवळ खुण केलेली नाहीं.

§ इसम मजकूर हे दत्तक गोत्रज आहेत, परंतु कोणाचे घराण्यांतील याची माहिती नाहीं व कधीं घेतलें हेंही माहीत नाहीं.

# प्रकरण ३ रें.

## स्वामी व सत्पुरुष.

### १ करवीरमठ स्वामी.

यादीदास्त श्रीस्वामी जगद्गुरु संस्थान मठ करवीर याच्या शिष्यपरंपरा वंशावळी-बद्दल माहिती. सुरुसन इहिदे खमसैन मयातैन व आलफ, सन १२६० फसली. ऐशीजे:— प्राचीन काळीं पृथ्वीवर बौद्धयादि नाना मतें प्रबळ होऊन श्रुतीस्मृतिपुराणोक्त वैदिक मार्ग विच्छेद जाहला. तंनिमित्य ब्रह्मकर्मास उपाधी येऊन ईश्वरास करुणा आली व महासाधु नारदादि ऋषींच्या प्रार्थनेने वेदमार्ग संरक्षण होऊन, सकल जनांचें कल्याण व्हावें या कारणें श्रीशंकरांनीं भूतळीं चिदंबर क्षेत्री. सर्वज्ञ नामा ब्राह्मण व त्यांची पत्नी कामाक्षीबाई या उभयतांनी आकाशलिंग श्रीचिदंबरेश्वर याची आराधना बहुत केली. तेव्हां श्रीचिदंबरेश्वर प्रसाद होऊन त्यास विशिष्टा नामक कन्या उत्पन्न जाहली, व विश्वजीत नामा ब्राह्मण द्रविड यांस विवाह करून दिल्हा. तिचा पती वेदांत दृढाभ्यासी होऊन निष्प्रपंच, सर्वसंग परित्याग करून तपश्चर्येप्रत जाता झाला. सदरीं विशिष्टाबाई चिरकाल श्रीचिदंबरेश्वराची आराधना करीत असतां, भाग्योदय काळ प्राप्त होऊन देवसंनिध रात्रीं ब्रह्मवृंद यांसमक्ष ईश्वरी तेज बाईचें वदनकमलीं प्रवेश करितें जाहलें. नंतर तो प्रासादिक अवतार गर्भ पूर्णमास जाहल्यावर, श्रीचिदंबरेश्वर, श्रीशंकराचार्य नामें करून बाईचें उदरीं युधिष्ठिर शके २७२३ सर्वधारीनाम संवत्सरें अवतीर्ण जाहले. याप्रमाणें श्रीआचार्य स्वामींचा अवतार होऊन बौद्धादि नाना मतें निरासपूर्वक सरस्वतीसह मंडणमिश्रास यथाशास्त्र विवादें पराजीत करून, शृंगेरी क्षेत्रीं आगमन होऊन षण्मत स्थापना करीत आले ते:—शिव= विष्णु= शक्ति= गणपती= सूर्य= भैरव=अशी आराधना स्थापिली. नंतर चार शिष्य—१ त्रोटकाचार्य, २ हस्तामलकाचार्य, ३ पादपद्माचार्य, ४ विश्वरूपाचार्य, असे चौघांसी चार मठ करून धर्मसंरक्षणार्थ चार शिष्य स्थापन करिते जाहले. नंतर शृंगेरी मठांत किंचित्काल वास्तव्य करून सरस्वती वचन सत्य करावें याकरितां, श्रीकरवीरक्षेत्र दक्षणकाशीस आगमन होऊन तेथें मठ असावा, आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र, इत्यादि हिंदु ज्ञातींतील धर्माधर्म आचार, व्यवहार, प्रायश्चित्तादिक करवून यथाशास्त्र ज्ञात-रिवाजाप्रमाणें सर्वांनीं भवस्थापीत शिष्य यांचे आज्ञेनें वर्तावें, अशी राजाधिकारी व ब्रह्म-वृंद इत्यादि सर्वत्रांस होऊन, विमळ, निर्मलक्षेत्राप्रती गमन करून, समाधिस्थ राहते जाहले. श्रीआचार्यस्थापित शिष्यांनीं मठीं अधिकार करून महायात्रेस जावें, असा मनोदय धरून सर्व प्रांतीं आचार, विचार, प्रायश्चित्तादि धर्माधर्मविचार करून श्रीकाशीक्षेत्रीं आगमन

होऊन, कांहीं दिवस वास्तव्य करून, पुन्हा संस्थानीं आगमन करिते जाहले. करवीरक्षेत्रीं राजाधिकारी समस्त ब्रह्मवृंद यांनीं सेवा करून, मठीं धर्मकृत्यें चालवावीं याजबद्दल स्वास्थ्य ग्राम व भुमी इत्यादि देऊन संस्थानाची मर्यादा संरक्षण करीत आले. संस्थानीं शिष्यपरंपरा आचार, व्यवहार, प्रायश्चित्तादिक सर्व धर्माधर्म विचार ज्ञातीरिवाजाप्रमाणें संस्थांनीं श्रीचे आज्ञेवरून होत आला. शिष्यपरंपरेची पिढी लागत नसून अलीकडील कांहीं श्रीदेवस्वामी शंकरभारती यांजपासून माहिती मिळती. शिष्यपरिणालिका खालीं लिहिली आहे. परंतु श्रीआचार्यस्वामीस आश्रम कधीं होऊन समाधिस्थ जाहल्याचे सन, शक लागून, कोणते स्वामींनीं किती वर्षे संस्थानचा अधिकार केला, याचा तपशील लिहावयाचा; परंतु याबद्दल करवीरचा मठ दग्ध जाहला; त्यांत कितेक दाखलेचें कागदपत्र जळालें. देवस्वामीपासून दहावे स्वामी पुणेंकर नरसिंहभारती यांचे अलीकडे सन, शक, महिना व अधिकार किती वर्षे केला, याविषयींचा दाखला मिळाला, तो खालीं तपशील लिहिला आहे. त्याप्रमाणें:—

१ देवस्वामी, श्रीविद्याशंकरभारती यांची पुण्यतिथि माघ शुद्ध ७.
२ तैलंगस्वामी, श्रीविद्यानरसिंहभारती स्वामी यांची पुण्यतिथि पौष शुद्ध ९.
३ लाटकर स्वामी, श्रीविद्याशंकरभारती स्वामी यांची पुण्यतिथि चैत्र शुद्ध १.
४ काशीकर, श्रीविद्यानरसिंहभारती यांची पुण्यतिथि मार्गशीर्ष वद्य १२.
५ अष्टेकर स्वामी, श्रीविद्याशंकरभारती यांची पुण्यतिथि अश्विन वद्य ४.
६ नूलकर स्वामी, श्रीविद्यानरसिंहभारती यांची पुण्यतिथि माघ वद्य ३०.
७ मुताळकर, श्रीविद्याशंकरभारती यांची पुण्यतिथि पौष वद्य १२.
८ नांदवडेकर स्वामी, श्रीविद्यानरसिंहभारती यांची पुण्यतिथि वैशाख वद्य ९.
९ बाबदेव भट लाटकर स्वामी, श्रीविद्याशंकरभारती यांची पुण्यतिथि चैत्र वद्य ३.
१० पुणेंकर स्वामी श्रीविद्यानरसिंहभारती यांची पुण्यतिथि यांसी सन समानीन शके १७०१ महिना लागत नाहीं. ते वेळीं गुरुशंकरभारती यांची प्रकृति बिघडून अति अवस्था जाहल्यामुळें, आश्रम झाल्यानंतर गुरुशंकरभारती हे पुन्हा बरे होऊन चवदा वर्षे अधिकार पाहिला. ते वेळीं नरसिंहभारती हे उत्तर देशीं संचार करून हतनुरास होते. नंतर सन आर्बा तिसैन शके १७१६ चैत्र वद्य ३ दिवशीं गुरुशंकरभारती हे समाधिस्थ जाहल्यापासून श्रीनरसिंहभारती स्वामी, हे सन समान मयातैन शके १७३० चैत्र शुद्ध १२ पर्यंत, चवदा वर्षे, ११ महिने, चौवीस दिवस संस्थानचा अधिकार करून समाधिस्थ जाहले. चैत्र शुद्ध १२.
११ सरस्वती भट लाटकर, श्रीविद्याशंकरभारती यांसी सन समान मयातैन शके १७३१ चैत्र शुद्ध १० स आश्रम जाहला. शुद्ध १३ पासून संस्थानचा अधिकार सन इसने अशर शके १७३३ भाद्रपद वद्य ३० पर्यंत, तीन वर्षे, पांच महिने, सतरा दिवस संस्थानचा अधिकार करून, शरीरीं समाधान नसल्यामुळें

सदर मित्तीस वाडीकर रामशास्त्री श्रीविद्यानरसिंहभारती यांसी आश्रम दिल्हा-पासून ते संस्थानचा अधिकार पाहूं लागले. शंकरभारती स्वामी दुखणाईत असून त्याच सालीं माघ वद्य २ स समाधिस्थ झाले. पुण्यतिथि माघ वद्य १२.

१२ वाडीकर श्रीविद्यानरसिंहभारती स्वामी यांसी सन इसन्ने अशर शके १७३१ भाद्रपद वद्य ३० स आश्रम प्राप्त जाहला. त्यापासून सन सब्बा सलासीन चैत्र शुद्ध ९ शके १७५९ पंचवीस वर्षे, साहा महिने, आठ दिवस संस्थानचा अधिकार पाहून सदर मित्तीस समाधिस्थ झाले. चैत्र शुद्ध ९.

१३ कऱ्हाडकर श्रीविद्याशंकरभारती गुरुस्वामी यांसी सन सब्बा सलासीन शके १७५९ चैत्र शुद्ध ८ स आश्रम जाहला. शुद्ध १० दशमीपासून शके १७६८ वैशाख वद्य १४ पर्यंत, नऊ वर्षे, एक महिना, एकोणीस रोज संस्थानचा अधिकार पाहून सदर मित्तीस समाधिस्थ जाहले. पुण्यतिथि वैशाख वद्य १४.

१४ आह्मांस शके १७६८ सन सीत सलासीन वैशाख वद्य १४ रोजीं श्रीगुरुशंकरभारती स्वामी यांनीं उपदेश देऊन संस्थानअधिकारी केल्यापासून, संस्थानची मालकी अनुभवून हिंदुज्ञातीरिवाजाप्रमाणें आचार, व्यवहार, प्रायश्चित्तादिक संस्थानचे पूर्वसंप्रदायाप्रमाणें चालवीत आहों.

येणेंप्रमाणें हकीगत आहे. तारीख छ २० माहे सपटंबर, मार्गशीर्ष वद्य ५ शके १७७२ साधारणनाम संवत्सरें. निशाण मोर्तब असें.

---

## २ चाफळकर रामदासी.

श्री रामदासस्वामी, तर्फ चाफळ.

पूर्वीं कसबें जांब परगणे आंबड इलाखा मोंगलाई, येथील कुळकर्णी सूर्याजी त्रिंबक आडनांव ठोसर ह्मणून असून त्यांनीं श्रीसूर्यनारायणाची आराधना केली. त्याजवरून त्यांजला श्रीसूर्यनारायण यांनीं प्रत्यक्ष दर्शन देऊन, मनुष्यदेहानें मी एक व दुसरे मारुती याप्रमाणें तुझे पोटीं जन्मास येऊं ह्मणून वरप्रदान दिल्हें. पुढें सूर्यनारायणाचे अंशेंकरून गंगाधर उर्फ रामीरामदास एक, व दुसरे मारुतीचे अंशेंकरून नारायण उर्फ रामदासस्वामी ह्मणून दोन पुत्र झाले. त्यांपैकीं वडील पुत्र गंगाधरबावा उर्फ रामीरामदास हे कसबें जांब येथील संस्थानीं तेथेंच राहिले, व दुसरे नारायणबावा उर्फ रामदासस्वामी हे महान् पराक्रमी सत्पुरुष होते. ते मारुती अंश सबब त्यांजला मारुतीप्रमाणें पुच्छ ह्मणजे शेपूट होतें. ते लग्न न करितां ब्रह्मचारी आश्रमानें असोन, त्यांनीं नरदेह * धारण केला. सबब तपश्चर्या केल्यावरून, त्यांस श्री रामचंद्रजी देव साक्षात् येऊन, मंत्रोपदेश देऊन, रामदासी सांप्रदाय दिल्हा; व आपले शिष्य असें त्यांजला समजून, रामदास ह्मणून नांव ठेवून देव अदृश्य झाले. पुढें रामदासस्वामी हे संचार करीत करीत, कसबें चाफळ तालुके तारगांव

येथें येऊन, त्यांनीं कसबें चाफळ व किल्ले सज्जनगड येथें श्री रामचंद्रजी व मारुतीच्या मूर्ती स्थापन केल्यानंतर त्यांचे शिष्य शिवाजी महाराज यांनीं स्वपराक्रम करून, गुरुकृपेनें राज्य मिळविलें. तें राज्य श्री रामदासस्वामी आपले गुरु ह्मणोन संपूर्ण राज्य स्वामींस अर्पण केलें. तेव्हां स्वामींनीं, आह्मांस विशेष उपाधीचें कारण नाहीं ह्मणून, सदरहू राज्य पाळणार्थ राजास दिल्हें. तथापि तुमचें मनात श्रीरामचंद्र देवाची व मारुतीची सेवा घडावी अशी इच्छा असेल तर काहीं गांव व भूमी नेमावी, ह्मणोन आज्ञा दिल्यावरून, शिवाजीमहाराज यांनीं इनामगांव, व गांवगन्ना इनामजमिनी, व नक्तनेमणुका. वगैरे उत्पन्न राज्याभिषेक शके ५ कालयुक्ताक्षीनाम संवत्सरे अश्विन शुद्ध १० ची सनद करून दिल्ही. त्याप्रमाणें सदरहू कसबें चाफळ व सज्जनगड येथील देवांचें हरदो संस्थानास खर्च होत असून नंतर सदरहू रामदासस्वामी हे शके १६०३ दुर्मतीनाम संवत्सरांत किल्ले सज्जनगड उर्फ परळी येथें समाधिस्थ जाहले. पुढें सदरहू संस्थानची व्यवस्था स्वामींचे शिष्यांपैकीं अकाबाई वगैरे मंडळी यांनीं शके १६३१ पर्यंत करून, सदर अकाबाई यांचा वृद्धापकाळ झाल्यामुळें अकाबाईनीं, स्वामींची आज्ञा, आमचे बंधुचे नातू गंगाधरबावा यांजला आणून संस्थानचा बंदोबस्त ठेवावा, असा मजकूर शाहू महाराज याजला सांगितला. नंतर शाहू महाराज यांनीं शके १६३२ साली सदर गंगाधरबावा हे गृहस्थाश्रमी असून मोंगलाईत कसबें जांब परगणे आंबड येथील संस्थानांतून आणवून चाफळ व सज्जनगड येथील संस्थानची व्यवस्था पहाण्यास स्थापना केल्यापासून आजपर्यंत गृहस्थाश्रमीच असून वंशविस्तारें वहिवाट करीत आहों.

## सनद.

श्री

श्रीसद्गुरुवर्य, सकळतीर्थरूप, श्री कैवल्यधाम, श्रीमहाराज, श्री स्वामी स्वामीचे सेवेसी.

चरणरज शिवाजी राजे यांनी चरणावर मस्तक ठेऊन विज्ञापना जे—मजवर कृपा करून सनाथ केले. आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म, राज्य साधन करून, धर्मस्थापना, देवब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून, पाळण, रक्षण करावे. हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुह्मीं जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुख लोकांचा नाश करावा; विपुल द्रव्यें करून, राज्य परंपरा अक्षय चालें ऐसीं स्थळें दुर्घट करावीं, ऐसें जे जें मनीं धरिलें; तें तें स्वामींनीं आशिर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केलें. याउपरी राज्य सर्व संपादिलें, तें चरणीं आर्पण करून, सर्व काळ सेवा घडावी, ऐसा विचार मनीं आणिला. तेव्हां आज्ञा झाली कीं, तुम्हांस पूर्वी धर्म सांगितले, तेंच करावें, तीच सेवा होय. ऐसें आज्ञापिलें. यावरून निकट वास घडून, वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठें तरी होऊन, सांप्रदाय, शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण

घडावी, ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात् गिरी गव्हरीं वास करून, चाफळी श्रीची स्थापना करून, सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली. त्यास, चाफळीं, श्रीची पूजा, महोत्सव, ब्राम्हणभोजन, अतीथि, इमारत सर्व यथासांग घडावें. जेथें जेथें श्रीच्या मूर्ती स्थापना जाहल्या तेथें उत्सव, पूजा घडावी. यास राज्य संपादिलें, त्यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी. तेव्हां आज्ञा झाली कीं, विशेष उपाधीचें कारण काय? तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी, हा निश्चय जाहला. त्यास यथावकाशें जेथें जें नेमावेंसें वाटेल, तें नेमावें; व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याच्या वंशाचा विस्तार होईल, तसें करीत जावें. या प्रकारें आज्ञा जाहली. यावरून देशांतरीं सांप्रदाय व श्रीच्या स्थापना जाहल्या, त्यास ग्राम भूमीचीं पत्रें करून पाठविलीं. श्रीसन्निध चाफळीं, एकशें एकवीस गांव, सर्वमान्य व एकशें एकवीस गांवीं, आकरा बिघेप्रमाणें भूमी व आकरा स्थळीं श्रीची स्थापना जाहली, तेथें नैवेद्य, पूजेस भूमी, आकरा बिघेप्रमाणें नेमिली आहे. ऐसा संकल्प केला आहे, तो सिद्धीस नेण्याविषयीं विनंती केली. तेव्हां संकल्प केला, तो परंपरनें शेवटास न्यावा, ऐसी आज्ञा झाली. त्यावरून सांप्रत गांव व भूमी नेमिलें. तपशील.

१ मौजे चाफळ, मौजे नाणेगांव, × × × वगैरे गांव ३३.

१ मौजे दहीफळ बुद्रुक, परगणे ढेवळी, श्रीश्रेष्ठाचे समाधीकडे देहे १.

१ गांवगन्ना जमीन बिघे चारशे एकोणीस.

धान्य, गल्ला हरजिनशी, खंडी १२१ एकशें एकवीस.

एकूण दरोबस्त सर्वमान्य गांव तेहतीस व जमीन बिघे गांवगन्ना चारशें एकूणीस व कुरण एक, श्रीचे पूजा, उत्साहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिलें व उत्साहाचे दिवसास व इमारतीस नक्त ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन. येणेंकरून अक्षय उत्साहादि चालविण्याविषयीं आज्ञा असावी. राज्याभिषेक शके ५ कालयुक्ताक्षीनाम संवत्सरें आश्विन शुद्ध दशमी, बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

मर्यादेयं
विराजते.

---

### ३ चिंचवडकर देव.

कैफियत संस्थान श्रीदेव चिंचवडकर, मूळ मोरया गोसावी. चिंचवड येथें अरण्य होतें. तेथें वडाचीं व चिंचेचीं झाडें होतीं. तेथें श्रीगणपतीची बंदगी करीत होते, आणि चतुर्थी गणपतीचा दिवस, ते रोजीं, श्रीमोरगांवीं गणपती आहे, तेथें दर्शनास जाऊन पूजा करीत असत. याप्रमाणें बहुत वर्षें करीत असतां, एक रोज श्रीगणपती मोरगांवचा प्रसन्न होऊन एक गणपतीची मुहूर्त गोसावी यांस दिल्ही, आणि सांगितलें कीं, तुझेपाशीं मी आहें, आजपासून

दर महिन्याचे चतुर्थीस मोरगांवीं येऊं नये. वर्षांत एक वेळ भाद्रपद शुद्ध चतुर्थीस येत जावें. ह्मणून आज्ञा जाहली. त्याप्रमाणें आजपावेतों वहिवाट चालवीत आहेत. श्रीचिंचवडास वस्ती करून राहून श्रीची पूजा उत्साह करून नंतर जिवंत समाधि घेतली. नंतर त्यांचे पुत्रः—

मोरयागोसावी १
|
चिंतामणदेव २
|
नारायणदेव ३
|
चिंतामणदेव ४
|
धरणीधरदेव ५
|
नारायणदेव ६
|
चिंतामणदेव ७
|
धरणीधरदेव (हल्ली दत्तक आहेत) ८

यांपैकीं श्री मोरयादेव यांनीं गांव वगैरे कांहीं घेतलें नाहीं. त्यांचे पुत्र चिंतामणदेव यांनीं कांहीं गांव श्री शाहू महाराजांजवळून संपादिले, व नारायणदेव यांनींही कांहीं गांव संपादिले. पुढेंही पुत्रांनीं गांव वगैरे संपादिले. त्यास मूळ मोरया गोसावी यांस वर्षे अजमासें सुमारें १५० जाहली. ह्मणोन माहितगार यांचे सांगण्यांत आहे.

---

## ४ डोमगांवकर रामदासी.

( मौजें गोडरें तालुके करमाळें जिल्हा सोलापूर येथील अंमलाबद्दल हणमंतबोवा गुरु महारुद्रबोवा रामदासी डोमगांवकर यांनीं तारीख २० माहे जानेवारी सन १८५४ इसवी रोजीं असिस्टंट इनाम कमिशनर यांचे कचेरीत कैफियत लिहून दिल्ही आहे त्यांपैकीं खालील कलमें. )

४ सदरहू अंमल मुळी कोणी, कोणते सालीं, इनाम करून दिल्हें, तें साल व देणाराचें नांव माहित नाहीं. परंतु सदरहूबद्दल दुमाले पत्रें वगैरे आहेत, त्यांजवरून पाहतां १४० एकशें चाळीस वर्षांपलीकडे दिल्हें असें होत आहे; व आमचे गुरूंचे सांगण्यांत सदरहू अंमल शिवाजी राजे यांनीं दिल्हे, असें माहित आहे. सदरहू अंमलाचा मूळ संपादक कल्याणस्वामी, गुरु रामदासस्वामी हे होते.

५ सदरहू अंमल मौजें डोमगांव परगणे हवेली परांडा इलाखा मोंगलाई. या गांवांत कल्याणस्वामीचा मठ आहे. त्या मठाचे खर्चाकरितां ह्मणजे आल्यागेल्या ब्राह्मणांस अन्नोदक देण्याकरितां व रामदासस्वामींची पुण्यतिथि माघ

वद्य ९ नवमी रोजीं होते, त्याचे खर्चाकरितां इनाम दिल्हें. त्याप्रमाणें सदर संपादन करणार हे हयात होते तोंपर्यंत कामें वगैरे चालून, ते शांत झाल्यामुळें त्यांचे शिष्य मुधोबा गोसावी यांचें नांवें दुमाले पत्रें झालीं. त्यांत सदरहू अंमल सदरहू गांवीं सदर कल्याणस्वामी यांची समाधि आहे, त्या समाधीचें पूजा, नैवेद्य व नंदादीप व सालांतून माघ वद्य ९ ची पुण्यतिथि व आषाढ वद्य १३ चे रोजीं कल्याणस्वामींची पुण्यतिथि, व आलेगेले ब्राह्मणांस अन्नोदक द्यावें याकरितां खर्चास ह्मणोन करार करून दिल्यावरून त्या दिवसापासून आजपर्यंत सदरहू कामें चालत आहेत. सदर कल्याणस्वामी हे कधीं शांत झाले याविषयीं सालाची माहिती आह्मांस नाहीं.

केफियतीचे तेरावे जबाबांत लिहून दिल्याप्रमाणें:—

हणमंतबोवा गुरु महारुद्रबोवा गोसावी रामदासी राहणार मौजें डोमगांव परगणे हवेली परांडा इलाखा मोंगलाई. यांनी मौजे गोडरे तालुके करमाळे जिल्हा सोलापूर येथील चौथाई व सरदेशमुखी अंमलाबद्दल आलाहिदा केफियत लिहून त्याजबरोबर सदरहू अंमल संपादन करणारांचे आजे ××× गुरूंचे नांव माहित नाही, सबब संपादकाचे गुरूंपासून ही वंशावळ लिहून दिल्ही असे. तारीख २१ माहे जानेवारी सन १८५४ इसवी मुक्काम पुणें.

* * गोडरें येथील मोकासे अंमल ह्मणजे चौथाई व सरदेशमुखी अंमलाचा संपादक.

श्री रामदासस्वामी *
|
कल्याणस्वामी * *
|
मधाजाबावा *
|
भिमाजीबावा *
|
महारुद्रबावा *
|
हणमतबावा का० ( केफियत देणार ).
|
मुधोजीबावा का०

---

## ५ धावडशीकर.

### अ.

यादी विष्णू गोपाळ भागवत, संस्थान धावडशी इलाखा सातारा, सुरसन खमसैन मयातैन व आलफ, सन १२५९ फसली. श्रीमत्परमहंस श्री भार्गवरामबावा यांनीं पूर्वीं श्री वाराणशीची यात्रा करून, बद्रिनारायणास जाऊन, तिरस्थळीं उत्तरमानस यात्रा करून, श्रीरामेश्वरास जाऊन, दक्षणमानस यात्रा होऊन, कृष्णातीरास येऊन, कोंकणप्रांतीं मौजें पेढें तर्फ

चिपळूण येथें श्रीदेव परशराम देवाची जागा पाहून, अरण्यांत निवांत स्थळ पाहून बारा वर्षें गुप्तरूपें तपश्चर्या केली. नंतर हें वर्तमान, कसबें चिपळूण येथें हपशी यांजकडून आवजी बल्लाळ यांस सुभा होता, व बाळाजी विश्वनाथ यांस बंदरचें काम होतें, त्यांस कळल्यावर दर्शनास येऊन विनंती केली कीं, आमचा हेत स्वामींचें चरण आमचे आश्रमास लागावे. पुढील कर्तव्यार्थ चित्तांत आणून, प्रगट रूपें मशारनिल्हे यांचे घरास गेले. तेव्हां श्रीचा सत्कार करून विनंती केली कीं, पर्जन्य काळ आहे, आठ चार दिवस येथेंच वास्तव्य व्हावें. त्यांची निष्ठा मनांत आणून राहिले. परंतु श्री भार्गवरामाचें दर्शन घ्यावयाचा नित्य नेम. मध्यखाडींत पाणी फार, पाय उतार नाहीं. चिपळुणाहून रात्रौ सर्वांनीं निद्रा केल्यावर केळीचें पानावर आसन घालून खाडी तरून परशरामीं देवदर्शन घेऊन यावें. असें दोन तीन दिवस जाहल्यावर हें वर्तमान बाळाजी विश्वनाथ व आवजी बल्लाळ यांस कळलें. त्यांनीं आपले दृष्टीनें चमत्कार पाहून फारच भक्ति करूं लागले. याजमुळें श्रीस्वामींचीही कृपा होऊन आशीर्वाद दिल्हा कीं, तुजला महत्पद मिळेल. असें वचन देऊन आह्मीं श्रीरांनिध जातों, येथें देवालयाची वगैरे इमारत करावी, ही इच्छा आहे. तुह्मीं सर्वांनीं साहित्य करावें असें सांगून शके १६२९ सर्वजीतनाम संवत्सरें पौष शुद्ध १५ मेस श्रीपरशरामीं प्रगटरूपें राहिले, आणि देवालयाचें काम लाविलें. त्या प्रांतीं हपशी याचा अंमल. त्यांनीं स्वामींची कीर्ति ऐकून करामत पहावी ह्मणोन जंजिऱ्याहून कारकून विनंती करण्यास पाठविला कीं, आह्मांस दर्शन द्यावें. त्यांचे मनांतील हेतु जाणोन रुकार दिल्हा. त्याजवर कारकून जंजीऱ्यास जाऊन हपशी याकूदखान यास, स्वामी येतात असें सांगितल्यावरून, कारकून यास सांगितलें कीं, जाऊन स्वामीस घेऊन यावें. समागमें मनुष्यें येतील तीं तरी उतरून आणावीं. बावा केळीचें पानावर उतरून येतात हा चमत्कार पाहणें आहे. त्याप्रमाणें केळीचें पान पाठवून समागमेंची मंडळी उतरून आणिली. एक स्वामी मात्र पलीकडे राहिले. खानाचें चित्तांतील कल्पना मनांत आणून, केळीचें पानावर आसन घालून जहाज चालतें याप्रमाणें पाण्यांतून जजिऱ्यास दंडाराजपुरीस गेले. हा चमत्कार याकूदखान यानें आपले दृष्टीनें पाहून किल्ल्यांतून बाहेर येऊन खुरनिषात करून गुन्हा माफ करावा अशी विनंती बहुत प्रकारें करून, किल्ल्यांत नेऊन, मौजें पेढें व मौजें आंबडस हे दोन्ही गांवचें इनामतीच्या सनदा करून दिल्ह्या. नंतर स्वामी निघोन श्रीपरशरामीं आले. तेथें इमारतीचीं कामें दरोबस्त करून गांवची व ब्राह्मणांची वसाहत केली. दिवसेंनदिवस कीर्ति वाढली. आमचे पणज्याचे वडील, चिमणाजी कृष्ण भागवत हे पूर्वी कोकणप्रांतीं होते. शरिरानें अशक्त, निराश्रित. तेव्हां कोठें तरी सेवेशीं जावें ह्मणोन निघाले. ते देवधामापूर येथें श्रीसोमेश्वर महास्थान पाहून तेथें राहिले. बहुत सेवा जाहलीयावर प्रत्यक्ष दृष्टांत जाहला कीं, तुह्मीं परशरामास जावें, ह्मणजे तेथें सिद्ध पुरुषाची भेट होऊन तुमचे पुत्राचें कल्याण होईल. त्याजवर परशरामीं येऊन श्रींचें दर्शन जाहलें. उभयतांचे

गरीबीची वृत्ती पाहून सेवेशीं राहण्याची आज्ञा जाहली. निष्ठा पाहून दिवसेंनदिवस कृपा होऊन, चिमणाजी कृष्ण यांचें लग्न केलें. व कामाची देखरेख करण्यास सांगितली. स्वामीची कीर्ति ऐकोन कान्होजी आंगरे सरखेल यांनीं मौजें गोठणें तर्फ राजापूर हा गांव दरोबस्त इनाम करून दिल्हा. तेथें देवालय करून श्रीची स्थापना केली, व कोकणप्रांतीं भिक्षाद्रव्य मिळवून बहुत ठिकाणीं देवालयांचीं वगैरे कामें केलीं. नंतर इकडे श्रीमन्महाराज शाहू राजे हे, पादशाहाची आज्ञा घेऊन फौजेसुद्धां किल्ला सातारा हस्तगत करावा, या उद्देशानें चंदनवंदन किल्ल्यानजीक येऊन राहिले. हें वर्तमान स्वामींस कळल्यावर आपली कटीसूत्र व कौपीन महाराजांकडे प्रसाद पाठविला. नंतर सातारा हस्तगत जाहला. मोंगलाई ठाणें उठोन राज्याचा बंदोबस्त जाहला. बाळाजी विश्वनाथ बंदरचें काम सोडून चंद्रसेन जाधवराव यांजकडे गेले. तिकडोन शाहू महाराज यांस भेटले. महाराज यांनीं कर्ते मनुष्य पाहून पेशवाईचीं वस्त्रें दिल्हीं. श्री स्वामी वरघांट सातार प्रांतीं कृष्णातीरास आल्याचें वर्तमान श्रीमन्महाराज शाहू छत्रपती यांस निवेदन होतांच, दर्शनास येऊन साताऱ्यास सन्मानेंकरून बावा यांस वाड्यांत नेऊन, सत्कारानें पूजा करून, मौजें धावडशी व मौजें विरमाडें व मौजें आनेवाडी हे तीन गांव राजपत्रीं इनाम करून दिल्हे. स्वामी यांनीं मुख्यत्वें धावडशी संस्थान करून, कृष्णातीरीं मठ बांधून तपश्चर्येस वास्तव्य केलें. स्वामी सिद्धपुरुष जाणून प्रतिनिधी यांनीं आपले तालुक्यांतील मौजें डोर्ले व मौजें माहुळंगें तर्फ पावस हीं दोन्हीं गांवें राजपत्रीं इनाम करून दिल्हीं. स्वामींचा वार्षिक नेम श्रावणमासीं एकासनी गुंफेंत तपश्चर्येस बसावें. याप्रमाणें एकवीस दिवस वार्षिक नेम. नेहमीं अन्नरहित. बारमाहा गोमूत्र मात्र प्राशन करावें. त्याप्रमाणें कांहीं दिवस चालून परशरामास जाऊन धावडशीस यावें. पुढें हपशी यांनीं हत्तीचे खटल्याबद्दल परशरामीं उपद्रव केल्यामुळें किल्ले रसाळगड येथें सन समान आशरीन सालीं देवाची वस्तवानी व कागदपत्र वगैरे गडास नेऊन ठेविले, आणि स्वामी यांनीं कारकुनाचे कबीलेसुद्धां धावडशीस रवाना केले; व मागाहून आपणही वरघांटीं आले. तेव्हां शाहू महाराज यांनीं बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली कीं, मौजें पिंपरी तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें हा गांव इनाम देणें. त्याप्रमाणें दरोबस्त इनाम करून दिल्हा. सन सलासिनामध्यें महाराज महालसुद्धां प्रतापगडास श्रीचें दर्शनास गेले. येते समयीं धावडशीस येऊन मौजें माळशिरस परगणे सुपें हा गांव दरोबस्त इनाम देऊन स्वदस्तूर हातरोखा छ २२ मोहरमचा करून दिल्हा. मौजें मजकुरीं श्रीभुलेश्वर महास्थान तेथें देवालयाचें शिखर व मंडप वगैरे कामें केलीं. सन इहिदे आर्बैन सालीं चिमणाजी कृष्ण यांस देवाज्ञा झाली. त्याचें सार्थक कृष्णातीरीं करून मठासंनिध त्यांचें वृंदावन बांधून ठेविलें आहे. नंतर मशारनिल्हे यांचे चिरंजीव जगन्नाथ चिमणाजी यांस सर्व कारभार स्वामी यांनीं सांगितला. पुढें खमस आर्बैन सालीं शाहू महा-

राज श्रीचें दर्शनास आले. ते समयीं पुढील कर्तव्यार्थ मनांत आणोन विचारिलें कीं, चिमणाजीचें पुत्रवत् पाळण केलें, तो गेला. त्यांचे चिरंजीव जगन्नाथपंत यांचें पाळग्रहण तुह्मीं करावें. मानवाचा देह आह्मीं समाधिस्थ होणार. असें बोलून जगंनाथपंताचा हात महाराजांचे हातीं दिल्हा, आणि आज्ञा केली कीं, आतां तुमचे शाहू चालवील. राजांनीं आज्ञा मान्य करून साताऱ्यास गेले, व स्वामीही परशरामास गेले. तेथोन जगंनाथपंतास पत्र व शाहू महाराज यांस पत्र व प्रसाद नारळ पाठविलें. नंतर सन सीत आर्बैनांत श्रावणमासीं शुद्ध ९ शके १६६७ सालीं श्री स्वामीनीं कृष्णातीरीं देह ठेविला. नंतर शाहू महाराज यांस वर्तमान निवेदन होतांच, अष्टप्रधान, मुत्सद्दी, मानकरी, शास्त्री, पंडित यांस समागमें घेऊन कृष्णातीरीं येऊन समारंभानें स्वामीस धावडशीस आणोन समाध दिल्ही. दहा दिवस उत्साहाचा समारंभ होऊन, नंतर महाराज यांनीं जगंनाथपंतास आज्ञा केली की, संस्थानची सर्व मंडळी व गांवगन्नाचे पाटील, कुळकर्णी यांस बरोबर घेऊन सातारीयास यावें. त्याप्रमाणें मंडळी समागमें घेऊन गेले. महाराज यांनीं सत्कार करून, जगन्नाथपंतास मंदील बासन, शालजोडी दिल्ही, व दरकदार, कारकून यांस व पाटील, कुळकर्णी यास अनुक्रमानें वस्त्रें दिल्हीं, आणि आज्ञा केली कीं, आजपावेतों स्वामींचे आज्ञेत वागत होतां. त्याप्रमाणें जगनाथपंताचे आज्ञेत वागावें. अशी आज्ञा होऊन सर्वत्रांस निरोप दिल्हा. त्या दिवसापासोन श्रीचा उत्साह व गांवगन्ना देवास नैवेद्य, नंदादीप व धर्मादाय वगैरे खर्च मालकाईनें करीत आहों, व सन आर्बा खमसैन मया व अलफ सालीं संस्थानचे शिलकेचे एवजाची ठेव एक लक्ष रुपये विष्णु विश्वनाथ पंडित यांचे मारफतीनें, महाराज सरकारांत होती; ती संस्थानीं खर्चास बाळाजी बाजीराव पंडित प्रधान पेशवेसरकार यांनीं, आमचे पणजे जगन्नाथ चिमणाजी यांस रुपये देऊन, त्याचें फारखत विष्णु विश्वनाथ यांस शके १६७५ सालीं मालकाईनें दिल्हें आहे. संस्थानचें आधिपत्य आमचे पणजे जगन्नाथ चिमणाजी यांस श्री स्वामींनीं देऊन पेशवेसरकार यांनी पत्रें करून दिल्ही, त्याप्रमाणें अधिकारानें वहिवाट करीत आहों, व संस्थानचा कारभार भाऊपणांत चौघांचे विचारें होत आहे.

---

### च.

यादी कैफियत विष्णु गोपाळ भागवत, संस्थान धावडशी सुरसन सलास सलासीन मयातैन व अलफ. आसाहेबांनीं तारीख ८ माहे सपटेंबर सन १८३२ इसवी या तारखेचें पत्र पाठविलें. त्यांतील मजकूर कीं, सरकारांत रवाना करण्याकरितां थोडक्या मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. ऐशीयासः—आमचे निपणजे चिमणाजी कृष्ण यांस पोटदुखीची व्यथा होती. ह्मणून त्यांचे मातुश्रींनीं श्रीअश्वत्थाची सेवा बहुत केली. ते समयीं दृष्टांत जाहला कीं, तूं मौजें पेढें येथें जावें. तेथें अरण्यांत कोणीएक योगी आहे, त्याची सेवा करावी. ह्मणजे तुझे पुत्राची व्यथा दूर होऊन कल्याण होईल. त्याजवरून

मातुश्रींनीं पुत्रास घेऊन मौजें पेढें येथें गेली. तों तेथें गौळीयांची वस्ती. त्या जाग्यांत राहून योगी याचा शोध केला. तों गौळीयांनीं सांगितलें कीं, रानांत एक बावा आहे, तुह्मांस दाखवितों. मग गौळीयांचे समागमें मातुश्री व चिमणाजीपंत, योगी यांचे दर्शनास गेले. दर्शन जाहल्यावर चरणावर मस्तक ठेवून नमस्कार करून, सविस्तर वृत्त निवेदन केलें. त्यावर चिमणाजीपंत यांचें मस्तकीं हात ठेवून तुझी व्यथा दूर होऊन कल्याण होईल, असा आशीर्वाद दिल्हा. नंतर उभयतां सेवेंत तत्पर राहिलीं. उपरांत श्रीपरशराम देव यांचें देवालय बांधावें. कारखाना चालवावयाचा ह्मणोन चिमणाजीपंत यांस सांगोन कारकून मंडळी आणवून कारखाना चालवावयाची तरतूद केली. नंतर शके १६२९ सर्वजीतनाम संवत्सरीं पौषमासीं देवालयाचे कामास प्रारंभ केला. तें समयीं दंडाराजपुरी येथील अधिकारी सिद्दी साद हपसी यांजकडे भेटीस जाण्याचें, तेव्हां खाडींत केळीचें पानावर आसन घालून खाडींतून जंजिऱ्यास गेले. हा चमत्कार सिद्दी साद हपसी यानें पाहून स्वामींचा सत्कार बहुत करून, आपले तालुक्यांत पट्टी करून द्यावयाची, तें समयीं नामाभिधान विचारलें. तेव्हां स्वामींनीं आपलें नांव ब्रह्मेंद्रस्वामी सांगितलें. तें समयीं आपण श्रीभार्गवाचा अवतार आहां ह्मणोन आपले तालुक्यांत गांवगन्ना भार्गवपट्टी करून दिल्ही, व मौजें पेढें तर्फ चिपळूण व मौजें आंबडस तर्फ खेड हे दोन्हीं गांव इनाम दिल्हे. नंतर स्वामी पेढें मुक्कामीं आले. तें समयीं बाळाजी विश्वनाथही दर्शनास येत होते. त्यांस आशीर्वाद दिल्हा कीं, तुझें कल्याण होईल. उपरांत कांहीं दिवसांनीं पेशवाईचीं वस्त्रें जाहलीं व आंगरे, स्वामींचे दर्शनास येऊन मौजें गोठणें तर्फ राजापुर हा गांव इनाम दिल्हा. तदनंतर श्रीपरशरामाचें संस्थान कायम करून घाटावर आले. हें वर्तमान श्रीमंत राजश्री शाहू महाराज छत्रपती यांस श्रुत होतांच, स्वारी तयार करून, स्वामींस सातार मुक्कामीं आपले वाड्यांत आणून बहुत सत्कार केला, आणि उभे राहून विनंती केली कीं, हें राज्य स्वामींचे आशीर्वादाचें आहे असें बोलून, मौजें धावडशी गांव वगैरे इनाम दिल्हे. त्याचा तपशीलः—

२ हपसी यांनीं इनामगांव दिल्हे तेः—
  १ मौजें पेढें, तर्फ चिपळूण.
  १ मौजें आंबडस, तर्फ खेड.
  —
  २

  शिवाय आपले तालुक्यांत भार्गवपट्टी गांवगन्ना व पन्नास बैलांचें दस्तक, कोठीचे बैलास जकात घेऊं नये ह्मणून दिल्हें तेः—

१ आंगरे यांनीं मौजें गोठणें, तर्फ राजापूर हा गांव इनाम दिल्हा.
५ श्रीमन्महाराज राजश्री शाहू महाराज छत्रपती यांनीं दिलें तेः—
  १ मौजें धावडशी, तर्फ परळी.
  १ मौजें अनेवाडी, तर्फ कुडाल.

१ मौजें विरमाडें, प्रांत कऱ्हाड.
१ मौजे पिंपरी, तर्फ कऱ्हेपठार.
१ मौजें माळशिरस, परगणे सुपें.
---
५

खेरीज कुरणें.
० मौजें आंकलें तर्फ सातारा.
० डोंगर शूळपाणी नजीक सायगांव.

२ परशराम श्रीनिवास प्रतिनिधी यांनीं दिलें तें:—
१ मौजें डोरलें, तर्फ पावस.
१ मौजें माहळुंगे, तर्फ पावस.
---
२

१ मुधोजी नाईक निंबाळकर प्रांत फलटण यांनीं मौजें रावडी खुर्द हा गांव इनाम करून दिल्हा.

पेशवेसरकारांतून चालत होते ( ते ):—
१ जामदारखान्यापैकीं नक्त रुपये व कापड पोंहचत होतें.
१ दस्तक जकातीचें माफीचें शंभर बैलांचें.

येणेंप्रमाणें इनामगांव व कुरणें वगैरे दरोबस्त वहिवाट चिमणाजी कृष्ण यांचे हातें स्वामी करवीत होते. त्यांचा काळ स्वामी असतांच जाहला. त्यापुढें त्यांचे पुत्र जगंनाथपंत यांचे हातून काम चालविलें. श्रीमन्महाराज शाहू राजे छत्रपती व पंत प्रतिनिधी व पंत प्रधान इत्यादि करून स्वामीचे आज्ञेंत चालत होते. उपरांत सहा महिने अगोदर स्वामींस भविष्यार्थ समजला कीं, आपलें देहावसान समीप आहे. असें जाणोन, छत्रपती यांस दर्शनास येणें ह्मणोन सांगून पाठविलें. नंतर छत्रपती दर्शनास आले. ते वेळेस स्वामींनीं त्यांस आज्ञा केली कीं, माझे मागें संस्थानास अधिकारी जगंनाथपंत आहेत. हें संस्थान चालवितील. मीं त्याचें पुत्रवत् चालविलें आहे. त्या अन्वयें तुह्मीं चालवावें. असें सांगून महाराजांचे हातांत जगंनाथपंत यांचा हात दिला. पुढें संकेताप्रमाणें शके १६६७ क्रोधननाम संवत्सरीं श्रीकृष्णातीरीं श्रावण शुद्ध ९ नवमीस समाधिस्थ जाहले. नंतर महाराज छत्रपती अष्टप्रधानासुद्धां कृष्णातीरीं येऊन स्वामींस धावडशी मुक्कामीं आणून समाधीचा समारंभ केला. तेरावे दिवशी जगंनाथपंत मंडळीसुद्धां व गांवगन्नाचे पाटील वगैरे सर्व मडळी सातान्यास घेऊन गेले. तेथें संस्थानचे अधिकाराचीं वस्त्रें मंदील देऊन, कारकूनमंडळीस व गांवगन्नाचे पाटील, कुळकर्णी यांस महाराज छत्रपती यांनीं आज्ञा केली कीं, स्वामींचे आज्ञेंत चालत होतां त्याप्रमाणें जगंनाथपंत यांचे आज्ञेंत चालावें. अशी आज्ञा होऊन सर्व मंडळीस बहुमानाचीं वस्त्रें देऊन निरोप दिल्हा. त्या अन्वयें वहिवाट आमचे पणजे जगंनाथ-

पंत व आजे कृष्णाजीपंत व तीर्थरूप गोपाळपंत व हल्लीं आह्मीं एकूण पांच पिढ्या वहिवाट श्रीमंत महाराज छत्रपती शाहूमहाराज व पेशवेसरकार यांनीं निर्वेध चालविली. त्याच अन्वयें कुंपणीसरकारही चालवीत आहेत; परंतु अलीकडे मौजें माळशिरस परगणे सुपें येथील कुळकर्णी यांनीं नवीन वतनबाब गांवकरी यांजपासून करून घेतली. ते खटले परभारे गांवकरी यांजकडे असतां, त्याजबद्दल मौजें मजकूर व मौजें पिंपरी तर्फ कऱ्हेपठार हे दोन्ही गांव कुळकर्णी यानें जप्त करविले आहेत. याजमुळें संस्थानचे लौकिकास कमी होऊन बहुत नुकसान जाहलें. याजमुळें संस्थानास कर्ज भारी जाहलें, आणि खर्चाची बहुत अडचण आहे. जाहीर होण्याकरितां कलमीं केलें असे. तारीख २७ माहे मे, सन १८३३ इसवी, शके १७५५ विजयनाम संवत्सरें.

---

## ६ स्वामी मंचाली मठ.

यादी सुज्ञानेंद्रस्वामी संस्थान कुंभकोन मठ मंचाली वास्तव्य नजणगुड इलाखा म्हैसूर, यांची संस्थानची हकिकत लिहून देण्याविषयीं इनाम वगैरेची कमीटीकडून स्वामीकडील मुखत्यार व्यंकटाचार्य बिन व्यंकटाचार्य पंपू वस्ती हुबळी यांस विचारल्यावरून त्यांचे रुबरू ह्मणणें आहे तें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१ मुळीं शालिवाहन शके १००० सालीं शंकराचार्य यांचें मत प्रबल होऊन वैष्णव सिद्धांतास विरोध करूं लागले. तेव्हां शंकराचार्य यांचे शिष्य यांनीं वैष्णव मतास भेद करूं लागले. त्याजवरून सकळ लोक ऐक्य उपासनांनीं, योग्य लोक वाईट होतील असें समजलें. त्याजवरून श्रीमारुती देव एकरुपें करून मदगेहेभट ह्मणणार ब्राह्मण यांचे पोटीं अवतार १०९५ शकांत घेतला. तें समयीं पुष्पवृष्टी जाहली, व श्रीमारुती देव अवतार जाहला ह्मणून आकाशवाणी जाहली. नंतर त्याचें नांव मदगेहेभट यांनीं वासुदेवभट ह्मणून ठेविलें. नंतर शके ११०३ सालीं वासुदेवभट यांची मुंज केली. नंतर वासुदेवभट यांनीं शके ११०७ सालीं अच्युतप्रेक्षस्वामी यांजकडून संन्यास आश्रम घेऊन त्यांचें नांव आनंदतीर्थस्वामी ठेविलें. त्यांनीं स्मार्तमत निराकरण करून, पुंडरीकपुरीं ह्मणणार पंडित स्मार्त होते, त्यांजबरोबर प्रसंग करून जिंकिलें; आणि कांहीं लोक स्मार्तमतास अनुसरून होते. त्यांसही जिंकून मुद्रा धारण केलें, आणि बहुतेक देशांत प्रसंग करून जिंकिले. लोकांस तप्त मुद्रा दिल्या. नंतर स्मार्ताचा पक्ष निराकरणपूर्वक आपला पक्ष साधला. अनेक ग्रंथ निर्माण करून बद्रिनारायण देवास जाऊन, तेथें ग्रंथ समर्पण करून, पुन्हा या देशांत येऊन, समुद्रतटाकीं बसले होते. इतक्यांत समुद्रांतून एक जहाज येत होतें. तें समुद्राचे मध्यें बुडूं लागलें. तेव्हां त्याजवरील सर्व लोक घाबरे होऊन ओरडूं लागले, तें स्वामींनीं पाहून

त्या जहाजास अलिकडे ये, ह्मणून अंगावरील छाटीनें खूण केली. त्याजवरून तें जहाज स्वामीजवळ आलें. नंतर जहाजाचे मालक यांनीं स्वामींस विनंती केली कीं, आपणास या जहाजांतील कोणत्या जिनसाची अपेक्षा असेल तें घ्यावें. नंतर स्वामींनीं गोपीचंदन मात्र मागितलें. त्याजवरून त्यांनीं गोपीचंदनाचे खडे दिल्हे. ते घेऊन श्रीविष्णूची स्तुति करीत उडपीस आले, तेव्हां त्या गोपीचंदनाचे खड्यांत श्रीकृष्णाची प्रतिमा सांपडली. ती प्रतिमा उडपीस स्थापन करून, देवालय वगैरे बांधिलें. नंतर तेथें असणारे लोकांस भेदशास्त्र सांगून, श्रीस्वामीजवळ बहुतेक शिष्य होते; त्यांपैकीं एकास संन्यास आश्रम शके ११६९ सालीं देऊन, त्याचें नांव श्रीपद्मनाभतीर्थस्वामी ठेवून त्यांची संस्थानावर स्थापना करून, आपण श्रीबद्रिकाश्रमीं जाऊन तेथें अदृश्य जाहले. तेव्हांपासून कोणकोणते स्वामी यांनीं किती वर्षे संस्थान केलें, त्यांचीं नांवें व वर्षे खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| नंबर. | स्वामीचें नांव. | वर्षे. | नंबर. | स्वामीचें नांव. | वर्षे. |
|---|---|---|---|---|---|
| १ | मूळ आनंदतीर्थ स्वामी ...... | ६२ | १५ | विजयेंद्रतीर्थ स्वामी......... | ५७ |
| २ | पद्मनाभतीर्थ स्वामी ......... | १६ | १६ | सुधिइंद्रतीर्थ स्वामी......... | २८ |
| ३ | नरहरीतीर्थ स्वामी ......... | ९ | १७ | राघवेंद्रतीर्थ स्वामी ......... | ४२ |
| ४ | माधवतीर्थ स्वामी............ | १७ | १८ | योगेंद्रतीर्थ स्वामी ......... | १७ |
| ५ | आक्षोभ्यतीर्थ स्वामी......... | १७ | १९ | सुरेंद्रतीर्थ स्वामी............ | ४ |
| ६ | जयतीर्थ स्वामी ............ | २१ | २० | सुमतींद्रतीर्थ स्वामी ......... | ३३ |
| ७ | विद्याधिराजतीर्थ स्वामी ...... | ४ | २१ | उपेंद्रतीर्थ स्वामी ............ | ३ |
| ८ | कवींद्रतीर्थ स्वामी ......... | ४१ | २२ | वादिंद्रतीर्थ स्वामी ......... | २२ |
| ९ | वागीशतीर्थ स्वामी ......... | ३० | २३ | वसुधेंद्रतीर्थ स्वामी ......... | ११ |
| १० | रामचंद्रतीर्थ स्वामी ......... | ३३ | २४ | वरदेंद्रतीर्थ स्वामी............ | २४ |
| ११ | विभुजेंद्रतीर्थ स्वामी ......... | ४९ | २५ | भुवनेंद्रतीर्थ स्वामी ......... | १४ |
| १२ | जितामित्रतीर्थ स्वामी......... | २१ | २६ | सुबोधेंद्रतीर्थ स्वामी......... | ३६ |
| १३ | रघुनंदनतीर्थ स्वामी ......... | २७ | २७ | सुजनेंद्रतीर्थ स्वामी ......... | २ |
| १४ | सूर्येंद्रतीर्थ स्वामी............ | ११ | *२८ | सुज्ञानेंद्रतीर्थ स्वामी ......... | १४ |
| | | | | वर्षे सुमारें | ६६५ |

येणेंप्रमाणें सदरीं लिहिल्याअन्वयें २७ सत्तावीस स्वामी, यांनीं मूळपासून ६५१ वर्षेपर्यंत संस्थानची वहिवाट केली व आह्मांस शके १७५८ दुर्मुखीनाम संवत्सर सालांत आश्रम मिळाल्यापासून, आजपर्यंत १४ वर्षे वहिवाट करीत असों. एकूण आजपर्यंत मुळापासून ६६५ वर्षे सुमारें संस्थान निरंतर चालत आहे व नंबर २४ वरदेंद्रस्वामी यांनीं वीरेंद्रतीर्थस्वामी यांस संन्यास आश्रम देऊन, संस्थानचा अधिकार न देतां मठांत

* हल्लीं हकिकत लिहिणार.

ठेविलें होतें. तेव्हां त्यांचें व वरदेंद्रतीर्थस्वामींचें बनेना, तेव्हां वरदेंद्रतीर्थस्वामी यांनीं दुसरे शिष्य भुवनेंद्रतीर्थस्वामी यांस संन्यास देऊन ठेविलें. मठांत पुढें कांहीं दिवसांनीं हिरेंद्रतीर्थ स्वामी यांनीं मृत्यु पावले. नंतर वरदेंद्रतीर्थस्वामी यांणीं भुवनेंद्रतीर्थस्वामी यांची संस्थानावर स्थापना करून, आपण देवाधीन झाले. येणेंप्रमाणें संस्थानची हकिकत लिहून दिल्ही. तारीख ९ माहे मे सन १८५० इसवी.

---

## ७ सिद्धेश्वरबोवा महाराज.

यादी श्री हरिहर पंडित उर्फ तात्या महाराज यांचे घराण्याची एकंदर माहिती समजणेंकरितां लिहिली ती. सुरुसन इसन्ने खमसैन मयातैन व अलफ. शके १७७३ विरोध-कृतनाम संवत्सरें.

१ मूळ पुरुष आमचे आजे श्री सिद्धेश्वरबोवा महाराज. हे अवरंगाबाद प्रांतीं वृत्तीचें गांवीं राहून, विद्याभ्यास आपण करून, त्याप्रमाणें लोकांकडूनही करवीत होते, व ब्राह्मण आदिकरून, सर्व लोकांस अन्नोदक देत होते. नंतर श्री क्षेत्र काशीस जाऊन आणखी विद्याभ्यास करून, तीर्थयात्रा करीत करीत, कऱ्हाड प्रांतीं श्री कृष्णातीरीं क्षेत्र नरसिंहपूर येथें येऊन तपश्चर्या बहुत केली. जें बोलावें तें व्हावें. असाध्य रोगी दर्शनास आले त्यांचे रोग व समंधादिक उपद्रव वगैरे कोणतींही संकटें आशीर्वादेंकरून परिहार जाहलीं, व मृत मनुष्यें-ही वचनेंकरून उठलीं. असे बहुत प्रकारचे चमत्कार सिद्धि होत होत्या. असें केवळ साक्षात् ईश्वरी स्वरूप, मोठे आवलिया, ब्रह्मरूप होते. हा लौकिक तमाम मुलखांत प्रसिद्ध जाहला. हें ऐकून श्रीमंत महाराज छत्रपती व पेशवे, पंत प्रतिनिधी व शिंदे वगैरे थोरथोर लोक दर्श-नास येऊन, आज्ञेनें वागून सत्कार करूं लागले; व श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपती यांनीं क्षेत्र करविरस्त श्रीदेवीचें दर्शनास यावें ह्मणोन विनंति करून, मोठ्या समारंभानें क्षेत्रास आणोन, आपल्या वाड्यांत ठेवून घेतले: आणि बहुत प्रकारें सेवा करून अनुग्रह घेतला. पुढें इनामगांवें व जमिनी व हक्क व वतनें व घर, जागा वगैरे इनाम, धर्मादाव करून दिल्हें. नंतर छत्रपती महाराज यांचे दौलतीस सिलसिल लागून, मोठीं संकटें पडलीं. तेव्हां श्रीबोवा महाराज यांजपाशीं येऊन विनंती केली. त्याजवरून संकटें निवारण होतील, अशी आज्ञा ऱ्ल्यावरून संकटें निवारण झालीं. पुढें तमाम मुलखांत इंग्रजी राज्य होणार आहे, तुह्मीं त्याशीं स्नेह करावा ह्मणजे तुमचें चांगलें होईल. असें पूर्वीं पंचवीस तीस वर्षे आज्ञा जाहली होती. त्याजवरून छत्रपती यांनीं आज्ञेप्रमाणें स्नेह करितों अशी विनंती केली. पुढें छत्रपती यांणीं पुत्र संतती व्हावी ह्मणोन विनंती केली. त्याजवरून दोन पुत्र होतील ह्मणोन सांगितलें. त्याप्रमाणें दोन पुत्र जाहले. त्या वेळेस शिवाजीमहाराज यांशीं मोठा आनंद होऊन, आमचे आजे श्रीसिद्धेश्वरबोवा महाराज हे गुरुस्थान जाणून, त्यांची मोठी सत्कारपूर्वक पूजा करून चौघडा, व मोर्चेलें व आणखी

इनामगांवें व इनामजमिनी धर्मादाव करून दिल्हें, आणि नित्य प्रातःकाळीं दर्शनास येऊन, नंतर भोजन करीत होतें व बहुत सेवा करून आज्ञेंत वागत होते. पुढें आमचे आजे श्री सिद्धेश्वर-बोवा महाराज यांसी शके १७२३ दुर्मतीनाम संवत्सरें वैशाख वद्य ६ सोमवारीं परधामवास करून समाधिस्थ जाहले. त्यांची समाधी श्रीक्षेत्र करविरीं पंचगंगातीरीं बांधून, पादुका स्थापन करून, त्यांची पूजा, उरज्या व नैवेद्य, नंदादीप व सालाबाद रथोत्साह व छबिन्याची पालखी, वगैरे मोठा समारंभ छत्रपती महाराज आपण खुद्द येऊन करीत होते. हल्लींही त्याप्रमाणे चाललें आहे. त्यांसी पुत्र त्रिवर्ग बधू आमचे तीर्थरूप श्रीवासुदेवपंडित उर्फ भाऊमहाराज व आमचे चुलते श्रीरामचंद्रपंडित उर्फ बाबामहाराज व श्रीनारायण पंडित उर्फ नानामहाराज, असे त्रिवर्ग मोठे विद्वान्, लौकिकवान् थोर होते. पुढें शिवाजी महाराज यांनीं आपले पुत्र आबासाहेब महाराज छत्रपती यांसी आमचे चुलते श्रीबाबामहाराज यांजकडून, अनुग्रह देवविला. त्या वेळेस इनामगांवें दिल्हीं, आणि नित्य त्यांचे व आमचे तीर्थरूप यांचें दर्शनास, पेशजीप्रमाणें आबासाहेब महाराज छत्रपती व बोवासाहेब महाराज छत्रपती असे उभयतांही येत होते. पुढे निपाणीकर यांनी महाराजांचे मुलखांत सिलसिला लावून, दौलत बहुत खराब केली. तेव्हां आमचे आजे श्रीबोवामहाराज यांनी शिवाजीमहाराज यांसी इंग्रजीसरकारचा स्नेह करावा ह्मणजे बंदोबस्त होईल, ह्मणोन आज्ञा केली होती; तें छत्रपती यांनीं मनांत धरून, आमचे तीर्थरूप श्रीभाऊमहाराज यांजकडे येऊन, मजकूर सांगोन विनंती केली कीं, मीच साहेबाकडे जावें, परंतु आमचा वृद्धापकाळ व प्रकृतीसही नीट नाहीं आणि सर्व भरंवसा आपल्यावर आहे. दौलतीचें संरक्षण जाहलें पाहिजे. याजकरितां माझें ठिकाणीं आपण साहेबाकडे जाऊन, दौलतीचा बंदोबस्त करावा. असें बोलून मालवण किल्ला इंग्रजीसरकारांत दिल्हा. नंतर मेहेरबान एलफिस्तनसाहेब बहादूर यास थैली माझें ठिकाणीं श्रीभाऊसाहेब महाराज आले आहेत, अशी दिल्ही. तें समयीं महाराज छत्रपती यांशीं संकट जाणोन आमचे तीर्थरूप साहेबाकडे गेले. साहेबांनीं सर्वांपेक्षां मानमरातब चांगला राखून, बंदोबस्त करून देतों ह्मणोन बोलून ठेवून घेतलें, व महाराज छत्रपती यांचा व इंग्रजीसरकारचा तहनामा आमचे तीर्थरूप यांचे विद्यमानें जाहला. पुढें साहेबांनीं पेशवेसरकारांत बोलून निपाणकराचा सिलसिला दूर करून, कांहीं मुलूखही वसूलसुद्धां निपाणीकर यांजकडून माघारा देवविला. पुढें चिकोडी, मनोळी तालुके पेशवाईअखेर जाहल्यावर, आमचे तीर्थरूप यांचे विद्यमानें महाराज छत्रपती यांशीं दिल्हे. त्या वेळेस आह्मांस इंग्रजसरकारांतून इनामगांवें करून दिल्हीं व आबासाहेब महाराज यांस, छत्रपती यांनींही आणखी इनामगांवें व जमिनी व वतनें, व हक्क, व घर, जागा व वाडे, वगैरे इनाम करून दिल्हें. त्याच्या सनदापत्रें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम, धर्मादाव चालेल ह्मणून करून दिल्हे आहेत; व आमचा मानमरातब आह्मीं अगर आमचे घराण्यांतील खाशी मंडळी कोणी करविरास गेली असतां, महाराज छत्रपती समारंभानें समोरें येऊन,

ठिकाणास पोंचवून जात असतात, व आमचा मानमरातब सर्व प्रकारें वडिलांप्रमाणेंच करितात, व पत्रेंही वडिलांप्रमाणेंच लिहितात. व आमचे इनामगांवचे हरएक खटले व न्याय, इनसाफ आमचे आह्मीं पाहत होतों, व हल्लींही पाहत आहों. व आह्मांस स्वास्थ्य महाराजसरकारांतून व कुंपणीसरकारांतून आहे. त्याशिवाय पंत प्रतिनिधी व पंत अमात्य व सेनापती यांनीं इनामगांवें व जमिनी व हक्क वगैरे इनाम करून देऊन सनदा करून दिल्या. त्यांस छत्रपती महाराज यांनींही दुमाल राजपत्रें करून दिल्हीं आहेत; व देशमुख व देसाई व देशपांडे वगैरे वतनदार यांनीही इनामजमिनी व हक्क व घर, जागा वगैरे इनाम करून दिल्हे आहे; व कऱ्हाडप्रांतीं श्रीक्षेत्र नरसिंहपूर येथें सेवेकरी यांनीं वाडा बांधून देऊन गांवगन्ना इनामजमिनी, मळे वगैरे करून दिल्हे; व श्री कृष्णेस घाट बांधून दिल्हा व वाड्यांत श्रींच्या पादुका आहेत, तेथेंही पूज्या, उरज्या, नैवेद्य, नंदादीप वगैरे हल्लीं चालले आहेत, याप्रमाणें आह्मांस इनामगांवें व जमिनी व हक्क वगैरे इनाम, धर्मादाव, खैरात, पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें स्वास्थ्य चालत आहे. त्याचा अनुभव आम्हीं करीत आहों. त्याची याद तारीखवार सनदापत्रें पेशजी धारवाड मुक्कामीं सरकलेक्टर पोलीटिकल एजंट बेबर साहेब बहादूर यांनीं मेहेरबान हनराबल गव्हरनर एलफिस्तन साहेब बहादूर यांचे हुकुमावरून पाहून व सनदांवर सही करून सनदाबरहुकूम याद रजिस्टर करून, आपले सहीसुद्धां थैलीबरोबर इकडे पाठविले व त्याप्रमाणेंच रजिस्टर यादीचा दाखला कुंपणी-सरकारांत मुंबईत व बेळगांवांत ठेऊन, छत्रपती महाराज सरकारांतही दिल्हा आहे. यादी-बरहुकूम इंग्रजीसरकारची बहादरी पुस्त दरपुस्त इनाम, धर्मादाव चालवावे असें श्रीमन् बोवासाहेब छत्रपती व कुंपणीसरकारचा तहनामा अलीकडे जाहला त्यांत आहे, व सर-कारांतून इकडील नांव अव्वल दरज्यांत दाखल आहे; व मेहेरबान एलफिस्तन साहेब बहादुर' गवरनर यांणीं आमचे तीर्थरूप यांसी पुण्यास अगत्यानें बोलावून नेऊन, ठेऊन घेतले आणि तेथें बंगल्याचा बाग व कुर्णे वगैरे बक्षीस, इनाम, धर्मादाव करून देऊन सनदा करून दिल्या आहेत. व मानमरातब सालाबाद दसरेचें रोजीं पोषाख शालजोडी वगैरे साडेतीन सनगें देऊन, हरएक प्रकारें चांगला राखीत होते. त्याप्रमाणें आज तागाईत हल्लीं सरकारांतून चाललें आहे. याप्रमाणें आमचे आजे श्रीसिद्धेश्वरबावा महाराज यांज-पासोन बढती व लौकिक महशूर होऊन, आज तागाईत सरकारांतून मानमरातब व मुख-त्यारी वगैरे सर्व यथास्थित चाललें आहे. पुढेंही वंशपरंपरेनें चालविणें सरकारांकडे आहे. तारीख २५ माहे सपटंबर सन १८५१ इसवी रोज गुरुवार.

## प्रकरण ४ थें.

# मुसलमान सरदार.

### १ नवाब कविजंग बहादूर.

कैफियत नवाब कविजंग बहादूर बमय बिरादरान.

१ खाजे अमानतखां उमर वर्ष.
१ खाजे महंमद जाफरखां उमर.
१ हसन मिरजाखां उमर.
१ खाजे महंमद हुसेन.
४

यांजकडील श्रीनिवास गोविंद वकील यांणीं हुजूर नगर मुकामीं विदित केलें कीं, आमचे यजमानाचे संपादक नवाब टेकेताजखां हे बुखाराचे बादशाहाचे बंधु, हे रुसवा करून दिल्लीचे बादशाहापाशीं आले. त्यांणीं आपलेजवळ ठेवून घेतलें. त्यांस पुत्र दोघे:—वडील नवाब खाजेखां व धाकटे नवाब तुरकताजखां. हे उभयतां बंधु यांचे वडील नवाब टेकेताजखां मृत्यु पावले. त्यांचे जाग्यावर नवाब खाजेखां वडील पुत्र राहिले. नंतर आसफजा नवाब निजामअलीखां यांचे बाप यांची रवानगी बादशाहांनीं दक्षणेस केली. त्याजवर आमीन तुरकताजखां करून बराबर दिल्हे. पुढें दक्षणेंत येऊन काबीज करून, उभयतां अंमल बसविले. नंतर हैदराबादची सरद नवाब आसफजा यांजकडे व तुरकताजखां यांजकडे औरंगाबाद बालाघाट पुणें देशपरीयंत संस्थान दिल्लीहून हुकूम परस्परें येईल त्याप्रमाणें करीत असावा. पुढें नवाब तुरकताजखां मृत्यु पावले. त्यांस पुत्र तिघे:—वडील नवाब कविजंग बहादूर व मधले खाजे अमीदखां व धाकटे खाजे शेरीफखां. या त्रिवर्गाकडे वहिवाट चालली. पुढें दिल्लीचें संस्थान बादशाहापासून पेशवे यांणीं घेतलें. सबब नगरचा किल्ला गोळी न वाजवितां, पेशवे यांचे स्वाधीन करून, आमचे जातीस कुटुंबाचे बेगमीस जहागीर होती ती कायम ठेवून, संस्थान पेशवे यांचे हवालीं केलें असें.

---

### २ नवाब बेल्हेकर ऊर्फ शिवनेरकर.

#### अ.

यादी नवाब महमुद अलमखान साहेब बहादूर शिवनेरकर सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. अकरम फर्मायाकडून आष्फाकनामा तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ —इसवीचा सादर जाहला. त्यांत मजकूर कीं, हजरत बंदेगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहात आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे

त्याची वाकबगारी व्हावी. ह्मणोन कलमीं केलें जातें जें, आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडे मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील:—आपली खानदानाची बढती कोणते तारखेस व खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व फौज व जातसरंजाम आपले वडिलांकडे चालत होता व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरकारांतून कोणते तऱ्हेनें दखलागिरी केली तें, व आपलेकडे सरंजाम हल्लीं काय चालत आहे तें, व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे या यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे. ह्मणोन ऐशास, आमचे खानदानांतील मूळपुरुष नवाब मकबुल अलमखान ऊर्फ आबदुल आजीजखान बहादूर यांस पुत्र चार:—

१ नवाब महमुद अलमखान बहादूर यांचे पुत्र नवाब गुलाम मोहिदीखान साहेब बहादूर. पुढें नकल.

१ नवाब मसूद अलमखान बहादूर यांस पुत्र:—

१ बडेमिया.

१ बक्षुमिया.

—

२

सदरहू उभयतां मयत. पुढें नकल.

१ नवाब आबदुल रसूलखान साहेब बहादूर यांस पुत्र नवाब आबदुल हुसेन खानसाहेब बहादूर. त्यांचे पुत्र आह्मीं नवाब महमुद अलमखान बहादूर असों.

१ नवाब महमुद अलमखान बहादूर चौथे. पुढें नकल.

ऐशास आमचे खानदानांतील नवाब आबदुल आजीजखान बहादूर यांजपासून बढती व लौकिक महशूर जाहला.

१ नवाब आसिफदौला सैद महमदखान बहादूर जेफरजंग यांनीं माजी आबदुल आजीजखान मामलेदार यांजला तगीर करून आमचे वडील नवाब आबदुल आजीजखान बहादूर यांचे नांवें सनद किल्ले शिवनेर येथील सन ६ सहा जुलूस, तारीख २९ माहे सफर. खेरीज देहे येथील अंमल. कलम.

१ नवाब आसिफजा निजामुनमुलुक यांणीं माजी मामलेदार आबदुल रसूलखान यांजला तगीर करून, नवाब आबदुल आजीजखान बहादूर यांचे नांवें सनद परगणे मोमिनाबाद ऊर्फ चाकण किल्लेदारी व फौजदारी व जहागीर छ १ माहे जमादिलावल सन १६ सोळा जुलूस. कलम.

—

२

सदरहू महाल फौज व जातसरंजाम मिळून दिल्हे, त्यांचा उपभोग करून होते.

अवांतर महालोमहालाचा ऐवज फौजखर्चास पावत होता. त्याजवर पेशवे पंतप्रधान हे मुलूख काबीज करीत चालले, तेव्हां आमचे वडील शिवनेर किल्ला मात्र मजबूत राखून तेथें राहिले. त्याजवर बाळाजी बाजीरावसाहेब पेशवे यांणीं नवाब आबदुल आजीजखान साहेब बहादूर यांचे चिरंजीव नवाब महमुद अलमखान साहेब बहादूर यांसीं तह करून त्याजपासून शिवनेर किल्ला घेऊन, जातीस चाळीस हजार रुपयांची जहागीर शफतपुरस्कर करार करून, सन सब्बा खमसैन मया व अलफ, छ ३ जमादिलावल कराराच्या यादी व सनदा भोगवट्यास दिल्या. देहे सातः—

१ कसबें बेल्हें तर्फ मजकूर परगणे जुन्नर दरोबस्त अंमल.
३ परगणे नसिराबाद प्रांत खानदेश.
 १ मौजें भादली बुद्रुक.
 १ मौजें नेरी.
 १ मौजें मुऱ्हारखेडें.
 ——
 ३
——
४

१ मौजें मखमुलाबाद ऊर्फ आंद्रटे परगणे दिंडोरी इनामीगांव.
२ तर्फ देपूर परगणे संगमनेर.
 १ मौजें नादणज.
 १ मौजें जऊलकें.
 ——
 २
——
३ =७=७

१ खेरीज मौजें बारव तर्फ हवेली परगणे. जुन्नर पैकीं बाग, जमीन.

येणेंप्रमाणें बाळाजी बाजीराव पेशवे यांनी शिवनेर किल्ल्याचे मुबदला जातीस चाळीस हजार रुपयांची जहागीर दिल्ही. त्याची वहिवाट बाजीराव रघुनाथ पेशवे यांचे कारकिर्दीपर्यंत बाळोजी कुंजीर कारभार करीत होते. तोंपावेतों भोगवटा जाहला. त्याजवर बाजीरावसाहेब यांणीं आमचे वडिलांपाशीं घोडा चांगला मातबर होता, तो आणविला. आमचे वडिलीं घोडा पाठविला नाहीं. याजमुळें कुंजीर यांजकडून पांच गांवच्या जप्त्या करविल्या. मौजें भादली व नेरी व मुऱ्हारखेडें व नादणज व जऊलकें येणेंप्रमाणें. व त्रिंबकजी डेंगळे यांणीं आमचा इनामी गांव मोंगलाईपासून मौजें मखमुलाबाद ऊर्फ आंद्रटे परगणे दिंडोरी हा गांव नाशिक येथील मामलत डेंगळे यांणीं केली, तें काळीं दाबला. गांवचे मोकळिकेविशीं बोलणी आह्मांकडील वकील बोलत होते. पुढें होळकर यांची लढाई पुणें मुकामीं होऊन बाजीरावसाहेब वसईस निघोन गेले. तेथून आल्यानंतर गांव मोकळे करण्याविशीं बोलणें चाललेंच होतें, तों कुंपणीसरकारचा अंमल जाहला. त्यास गांव मोकळे होण्याचें तैसेंच राहिलें. हल्लीं कुंपणीसरकारांतून बेल्हें गांव एक व इनामबाग जुन्नर येथें आहे, असें मात्र चालत आहेत. आमचे जातीस चाळीस हजार रुपयांची जहागीर दिल्ही होती. त्यास पेशजीपासून संस्थानचा खर्च आहे तोच आहे. उत्पन्न एका गांवचें कांहीं पुरत नाहीं. त्यास कुंपणीसरकारांतून मेहेरबानी होऊन

आमचे जातीचे सरंजामाचे गांव व आमचा इनामी गांव मखमुलाबाद हे मोकळे करून देण्याविशीं हुकूम जाहला पाहिजे. कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यानंतर मेहेरबान पार्टेंजर साहेब बहादूर यांणीं आमचे कागदपत्र पाहून इनामीगांव मोकळा केला होता. एक वर्ष वहिवाट आह्मांकडे जाहली. त्याजवर मेहेरबान ब्रिग साहेब बहादूर यांणीं गांवची जप्ती केली आहे. त्यास साहेबीं करमबक्षी करून आमचा इनामी गांव मखमुलाबादसुद्धां मोकळे करून दिल्हे पाहिजे.

---

## ब.

रफाअत व आलीमर्तबत शौकत व मा अलीमंजलत करम फर्माय आले मिया हेनरी ब्रौणसाहेब बहादूर एजंट प्रांत दक्षण दाम आलताफ हू.

७ अजदिल येकलास नवाब महमुद अलमखान बहादूर ठाणं कसबे बेल्हें सलाम बादज सलाम मजमुन अंकी येथील खेरसला जाणून, आंकरम फर्माय यांची शादमानी हरहमेशा कलमीं करून, मौरजेन्य व मुत्फखेर करीत असिलें पाहिजे. दरिविला आंकरम फर्माय यांजकडून आलताफनामा सादर जाहला. त्यांत मजकूर कीं, आपणांस किताब नवाब हें पद आहे. हें कधीं, कोणत्या सबबेनें, कोणाकडून प्राप्त जाहलें, ह्मणोन वगैरे मजकूरचें पत्र तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवी नंबर १०५३ चें आलं. ऐसीयास आमचे पणजे नवाब मकुबुल अलमखान बहादूर हे दिलींत बंदगान अली नवाब मुस्तताब मो आल्ला आलकाब नवाब आशफतदवला सैय्यद महंमदखान बहादूर जफरजंग सिपाहसाला निजामसरकार यांचे तीर्थरूप यांचे सरकारांत सरदारीचे हुद्यानें होते. दिलीहून हैदराबादेस आल्यानंतर आमचे पणजे यांजला या जिल्ह्यांतील बावन लक्ष रुपयांचा मुलूख तोडून देऊन, नवाब व बहादुरीची मरातब देऊन या मुलखांत पाठविलें. त्याजवर दहा वीस वर्षांनीं आमचे आजे, पणजे यांचा व सुरतवाले नवाब साहेब यांचा वांकडेपणा आल्यामुळें, हे सुरत अठ्ठाविशी जिल्ह्यांत गेले. नंतर त्यांची व यांची लढाई होऊन आमचे पणजे तेथें लढाईतच मारले गेले. त्याजवर आमचे आजे या मुलखांत होते. ते वेळेस निजामसरकार व पेशवेसरकारची लढाई जाहली. तेव्हां पेशवेसरकार आमचे आजे यांस निजामसरकार यांजकडे जाऊं देईनात; आणि त्यांसीं लढाई करून शिवनेर किल्ला वगैरे मुलूख घेतला. जातीचे खर्चीस मात्र सात आठ गांवें ठेविलीं. त्या लढाईचे गर्दींत कागदपत्र बहुत अफरातफर जाहले, व कुंपणीसरकारचा अंमल जाहला, तेव्हां निजामसरकारचें पत्र आमचे आजाचे नांवें मात्र आलें होतें; तें बंदगान अली नवाब मुस्तताब मो आल्ला आलकाब गौरनर बडे साहेब बहादूर यांचें हुजुरांत, बाबजी मल्हार जुन्नरकर हे वकिलीचें काम करीत होते, त्यांजबराबर पाठविलें. तेव्हां अलीशान बुलंद मकान गौरनर साहेब बहादूर मवसूफ यांणीं आह्मांवर करमबक्षी करून नवाब व बहादुरीचा मरातब दिल्हा. हल्लीं गौरनर कौसलांतून पत्रें आमचे नांवें आज-

परीयंत येतात. त्यांत नवाब व बहादूर करमबक्ष करम फर्माय बडे साहेब बहादूर यांचे हुकुमाबमोजिब पत्रांत नवाब बहादूर लिहीत आहेत. त्यास बडे साहेब बहादूर यांणीं खुद्द आह्मांस मरातब दिल्हा आहे. हें चालविणें सरकाराकडे आहे. अस्सल कागदपत्र पाठवावे, तों बाबजी मल्हार वकील हे मयत जाहले. त्यांचे पाठी-मागें त्यांचे बंधु बाबुराव मल्हार यांजपाशीं होते. ते आह्मांस न देतां, कोणते मुलखांत निघोन गेले त्यांचा आजपरीयंत ठिकाण नाहीं, व जुने माहितगार मनुष्य कोणी-एक राहिलें नाहीं. जाहला मजकूर हुजुरांत जाहीर होण्याकारितां लिहिला आहे. तारीख २३ माहे सपटंबर सन १८५१ इसवी. जादा दरयाये मेहेरबानी मौजदर मौजबाद.

---

## ३ सावनूरकर नवाब.

### अ.

साहेब मुषफक मोकरम मेहेरबान आलताफ फर्माय बेगीरा हेनरी ब्रौणसाहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण दाम आषफाक हू.

छ आ न्यानिब नवाब आबदुल दलेलखां दलेरजंग बहादूर सावनूर सलाम बादज सलाम खैर व षौक मुलाकात बहुजत आयात मषहूद जमीर मुनीर गर्दानीदाके आहेद. येथील हकिकत तारीख छ ३० माहे जिल्काद सन १२६७ हिजरी, तारीख २७ सपटंबर सन १८५१ इसवीपावेतों, खेरीयत जाणोन आसाहेबांनीं आपले खैरीआफीयतेस हमेषा कलमीं करून दिलषाद करीत असलें पाहिजे. दरी आयाम आसाहेबांनीं तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवीचे थैली इबलाग फर्माविणें जाहलें कीं, सरकारचा हुकूम तारीख ३० माहे जुलई सन १८५१ इसवीचा आल्या-वरून कलमीं केलें जातें कीं, आपणास मरातब नवाब दलेरजंग बहादूर पद आहे. तें केव्हां, कोणत्या सबबेनें व कोणाकडून प्राप्त जाहलं, त्याचा व एकंदर पदवीचा, थोरवीचा व खानदानीचा इतिहास दाखलेनिशीं लिहून यावें व त्याजबरोबर दाखला असेल तोही पाठविला पाहिजे ऐकीव मजकुराची हकिकत असेल व त्याजविषयीं कांहीं पुरावा नसेल तर तसेंही साफ लिहून यावें. परंतु जुने कागदावरून व माहितगार लोकांकडून जितके प्रयत्नपूर्वक माहिती सांपडेल तितकी सर्व लिहून यावी, ह्मणोन कलमीं करणें जाहलें. त्यास, पेशजी आमचे पूर्वज यांजकडे जवेरासा भवरासा कदीम पातशाहांकडून जागीर चालत आलेल्या आहे. त्याजवर मलक आबदुल करीमखां याणें बहादूर लागायेत पंधरावे खुरशीचा मलक अवतारखां मयाणे बहादूर तयमूरशाहा पातशाहा याचे जमानेपरी-यंत सदरहू जागीर अनुभवून पादशाही हुजुरांत होत. सोळा (?) व खुरशीचा मलक माहूरखां मयाणे बहादूर यांणीं बाबरशाहा पादशाहाचे जमानेंत सदरहू जागीर अनुभविले.

तोंपरीयंत किताब मलक होता. मलक सारकखां मयाणे बहादूर यांस हुमायून बादशाहा यांणीं नवाबगिरीचा किताब दिल्हा. नवाब दोडाखां मयाणे बहादूर यांस शेरशा पादशाहा यांणीं आपले विजारत देऊन सरफराज केलें. एकोणिसा खुरशीचा नवाब आबदुल हसनखां मयाणे बहादूर यांस अकबर पादशाहा दिल्ली यांणीं आपले विजारत देऊन सविसावे खुरशीचा नवाब बहलोलखां मयाणे बहादूर यांणीं कितीएक वजिराचे नाइंतिफाकी सबब जहागीर पादशाहा यांचे जमानेंत दिल्लीहून विजापुरासी आले. विजापुरीं अल्ली आदिलशा यांनीं पादशाहात करीत होते. नवाब साहेब याच सुभ्यांतील व नामवारीवर मेहेर नजर फर्माऊन, नांदेड बसवंत जहागीर नेमणूक करून देऊन सरफराज केलें. एकविसावे खुरशीचा नवाब आबदुल रहीमखां मयाणे बहादूर यांनी सदरहू पादशाहा मोसूफ यांचे जमानेंत सदरहू जहागीर तसरुफ करून घेऊन हुजुरांत होते. बाविसावे खुरशीचा नवाब आबदुल करीमखां मयाणे बहादूर यांसी शिकंदर बादशाहा विजापूर यांणी आपली विजारत देऊन सरफराज केलें, व नवाबसाहेब यांणीं मसूदखा वजीर यांचे लडकीशी शादी करून घेतली. सबब परगणे बागलकोट तैनात दिल्ही होती. त्या वखीं प्रांत कर्नाटकांत जमीदार वगैरे यांणीं बागी होऊन पादशाही हुकूम न मानतां, काटकाई करून मुलकाची ताराण केले. प्रांतांत झाडी वाढून मुलक पायमल्लीस आला, सबब जमीदाराचे तंबीवास्ते तालुके सरकार बंकापूर मधे बावीस महालची बंदोबस्तीकरितां नवाबसाहेब यांस कर्नाटक प्रांती रवाना फर्माविलें. त्याजवरी आलमगीर पादशाहा दिल्लीहून विजापूरची पादशाहात घेणेकरितां येऊन विजापुरास वेढा घालून मोर्चे बसविले. कितेक दिवस हरदो पादशाहाचे लढाई जाहली. नंतर आलमगीर पादशाहा खुद्द मुतवजें होऊन किल्ले हल्ला करणेस हुकूम लष्करास दिल्हे. मुळ गलबा होऊन विजापूरचे शिकंदर आदलशाहा पादशाहा यांणीं घाबरा होऊन तेविसावे खुरशीचा आबदुल रौफखा साहेब वसुलाचे पेगामकरितां आलमगीर पादशाहाचे हुजुरांत पाठविले. खान मोसुफांनीं फार मेहनत करून सुख ठराव करून विजापूर पादशाहास व आलमगीर पादशाहाची भेट करवून विजापूर पादशाहास सालीना लाख रुपये नगद नेमणूक ठराव करून देऊन विजापूरचा किल्ला आलमगिरी पादशाहाचे स्वाधीन देवविला. या मेहनती व सुजाआती व कदिमी खानदानवर मेहेरनजर फर्माऊन, ५।१र आबदुल रौफखान साहेब यांस मनसब हम हजारी व सहा हजार स्वार इनायत करून, 'दिलेरखां बहादूर दलेरजंग' ऐसे किताब सरफराज फर्माऊन, सरकार बंकापूर व सरकार अजमनगर वगैरे बावीस महालची सनद १०९७ हिजरींत देऊन, कर्नाटक प्रांतीं रवाना फर्माविलें. ते नवाब साहेब यांणीं कर्नाटकप्रांतास येऊन येथील जमीदार वगैरेसी तंबी मोहचाऊन, शेर मसेकेस एक शेत देऊन या बमोजीब रयतासी कौल करार देऊन, तालुकेची आबादी करून कमाल आकारास आणिलें. तें एकूण कसबें बेळगांव किल्ले जात जागीर व ठाणेजात सहित एकंदर बेरीज नाणे रुपये १७५५०७॥॥= सतरा लाख पंचावन हजार पावणे आठ

रुपये दोन आगेची जहागीर. सविसावे खुरशीचा नवाब आबुल गफारखां बहादूर दलेरजंग याजपरीयंत, फरुखशेर बादशाहाचे जमानेपावेतों सन ११५९ हिजरीपर्यंत, सुदामतपणानें चालला. सन ११६० सालीं पंचविसावे खुरशीचे नवाब मजीदखां साहेब बहादूर दलेरजंग याच वख्तीं बापुजी नाईक सरदार निसबत पेशवे यांजकडून, लाख दीड लाख फौजेनिशीं सावनूर प्रांतीं येऊन स्वारी केली, सबब लढाई कामील होऊन अखेर तह ठरला जेंः—सदरहू प्रांतासी दरसाल पौण लाख रुपये बतरीक तसरीफ द्यावे. त्यांनीं सबबजहेनें दोस्ती ठेऊन नवाबसाहेबाचे पुस्तपन्हा ठेवीत असावा. याप्रमाणें करार मदार ठरोन तहनामा लिहून दिल्हा. त्या बमोजीब सन ११६९ सालपरीयंत, सुदामतपणानें हरदो तर्फेनें चालला.सन११७० सुरुसन सीत खमसैन मया व अलफ सालीं, सविसावे खुरशीचे नबाब आबदुल हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांनीं तख्तनसीन होते. त्यावेळीं मुजफरजंग नामें सरदार निसबत श्रीमंत पेशवे यांजकडून, यागी होऊन नवाब हकीमखां साहेबाचे पाठीसों येऊन पडला. मशारनिल्हेचे तंबी वास्ते खुद्द नानाराव व सदाशिवराव व रघुनाथराव पेशवे दोन तीन लाख फौजानिशीं सावनूर मुक्कामीं आले. मुजफरजंग यांसी मागितलें. पाठीसीं पडला आहे, त्यांस दिल्हा असतां नामोसी जातो, यावास्ते लढाई अखत्यार केले. सहा महिने कामील लढाई. होऊन शेवटीं तह ठरला जेंः—मुजफरजंग यांसी पेशवेकडे देऊं नये. पार करून द्यावें. त्याबद्दल नवाब साहेबांकडे मुलूख होता त्यापैकीं निमे तालुके पेशवेकडे सलहेत द्यावे; निमे तालुके नवाबसाहेबांकडे चालावे. हरदो तर्फेनें दोस्ती राहावी, सबबजहेनें पेशवे यांनीं नवाबसाहेब यांसी दोस्ती ठेऊन, मसलतच्या वख्तीं मदतगारी करीत असावें. या बमोजीब आहद शरत होऊन, तहनामा ठरोन तालुकेची वांटणी जाहली. ते पेशवे यांचे हिसेस तालुका दिल्हा तो एकंदर रुपये ८५९१३९८॥ वजा जातां, बाकी नवाबसाहेबांकडे राहिला तो ८८५८६८॥। रुपयांचा. सदरहू तालुके वांटणी जाहली. त्याचा तहनामा तपशिलवार अलाहिदा असे. तहनाम्याचा करार बमोजीब सन ११९९ परीयंत, सदरहू जहागीर नवाब हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांजकडे सुदामतपणानें चालला. सन १२०० सालीं पेशवे यांनीं आपले खंडणीकरितां टिपुसुलतान यांजवरी स्वारी करावयाबद्दल परशराम पंडत पटवर्धन व हरीपंत फडके व गणेशपंत ढेरे व होळकर ऐसें चौघे सरदारांची नेमणूक ठराऊन, दोन लाख फौजेनिशीं कर्नाटकप्रांतीं रवाना केलें. ते सावनूर मुक्कामीं येऊन उतरले. पठाणाकडून टिपुसुलतान यांनीं आपले जमावसहित मौजें हुरलीकोपानजीक शहर सावनूर येथें येऊन उतरले. *पेशवेकडील सरदारांसी मिळूं नये म्हणोन नवाब हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांसी खत लिहून. पाठविलें होतें. परंतु पेशजी पेशवे यांसीं आहाद शर्त होऊन तह ठरला आहे, त्यापक्षीं इमान सोडूं नये. ह्मणोन आपले इमानावरी कायम होऊन, बाबजयुद टिपुसुलतानाचें व आमचें घराणेंसी निसबत असतां, टिपुसुलतानांसी न मिळतां पेशवेकडील सरदारांसीं मुलाखत करून शहरांत राहिले. पेशवे सरदारांसीं व सुलतानांसीं लढाई सावनूर

मुक्कामीं जाहली. शेवटीं पेशवेचे सरदाराचे ठराव न होतां निघोन जाऊं लागले, त्यावक्तीं नवाब हकीमखांसाहेब बहादूर दलेरजंग यांसी शहरांतून हमरहा घेऊन गेले. तीन चार करोड रुपयांची जिंदगी व मुलख व दौलतेसहित पेशवे यांचे दोस्तींत आबारा करून, नवाब साहेब पुणेंस गेले. तेथें माधवराव पेशवे व नाना पंडत फडणीस होते. त्यांनीं नवाबसाहेबांसी बहुत वजहेनें खातरीजमा सांगोन करार केलें कीं, सुलतानाचा तह पांच सालचा आहे. नंतर मोहीम त्याजवरी होतो. मोहीम वक्तीं आपले तालुके कबजेंत येतांच सुपुर्द करून देववीत आहों. तोंपरीयंत जियाफत तरीक आम्हीं नगदी खर्चास देववितों. ते घेऊन पुणें मुक्कामीं स्वस्थ असावें. या बमोजीब करार ठरल्यावर नवाबसाहेब पांच वर्षेपरीयंत पुणें मुक्कामीं राहिले. याजवर चंदरोजांनीं टिपुसुलतान यांजवरी मोहीम करावयाबदल आणिखीं दुसरे मोहिमेस परशराम पंडत पटवर्धन याजला हमरहा जरीपटका देऊन लाख दीड लाख फौजेनिशी कर्नाटक प्रांतेसी रवाना केलें. रवानगीचे वक्तीं नाना पंडत फडणीस व माधवराव पेशवे यांणीं सरदार मोसुफापाशीं ताकीद केले कीं, नवाबसाहेब यांसी हमरहा घेऊन जावें. त्यांचा तालुका कबजेंत येतांच त्यांचे सुपुर्द करून देणें. पेशवे यांचे हुकुमावरून नवाबसाहेब यांसी हमरहा बोलावून घेऊन, शहर सावनूर येथें राहविले आणि तालुका कबजेंत आलाच होता. तालुका सुपुर्द करून देणें ह्मणोन परशराम पंडत यांसी नवाबसाहेब बहादूर दलेरजंग यांणीं बोलिलें. याजवरून त्यांणीं करार केले कीं, मोहीम अखेर होऊन पुणेंस जाते वक्तीं तालुका जिमेसी देऊन जाऊं. बिलफेल कारडिगी महाल सत्तर हजार होनांचा आहे. आपले कबजांत ठेवावा ह्मणोन नवाबसाहेब बहादूर दलेरजंग यांसी खातरजमा सांगोन, कारडिगी महाल सुपुर्द करून देऊन, परशराम पंडत यांणीं पट्टणांसी निघोन गेले. तेथें लॉर्ड कार्नवालीस, मेडस (मेडोज?) सरदार निसबत कंपनी इंग्रेज बहादूर यांजकडून आले होते. सुलतानाची व सरदाराची लढाई कामील होऊन शेवटीं तह ठरला होता. परशराम पंडत यांणीं सावनूर तालुका पेशवे यांजकडे हिशेंत लावून घेतले. मोहीम अखेर होऊन पुणेंस जाते वक्तीं तालुका सुपुर्द करून द्यावा ह्मणोन, नवाब साहेब बहादूर दलेरजंग यांचें बोलणें पडलें. त्यास पेशजी करार ठरला होता ते बदलून परशराम पंडत यांनीं बोलूं लागले जे, मोहीमच्या खर्चास पन्नास लक्ष रुपयेपरीयंत सावकारी कर्ज जाहलें आहे, सबब तालुका कर्जांत आहे. श्रीमंतांचे सरकाराकडून सावकारी कर्जाचा उलगडा करून घेऊन, मुलूख आपलेकडे देऊं. तूर्त कारडगी महाल मात्र आपलेकडे आहे तैसा असों द्यावा. या बमोजीब करार करून परशराम पंडत पुणेंस गेले. दोन सालपरीयंतु कारडगी महाल दरोबस्त नवाब साहेबांकडे चालला. तिसरे सालीं रामचंद्रपंत पटवर्धन यांनीं तालुकेची दरीयाफ्त वास्ते सावनूर प्रांतीं आले होते. त्या वक्तीं कारडगी महालची जप्ती करून, नगदी चार हजार रुपये दरमहा सरसुभेकडून नेमणूक ठराऊन देऊन गेले. कांहीं दिवस

चालले. नंतर नवाब आबदुल हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांचा अंतकाळ सन १२०८ हिजरी सालीं जाहला. तेव्हां इजानिबेचे किबलगा सत्ताविसावे खुरशींचे नवाब आबदुल खैरखां साहेब बहादूर दलेरजंग यांणीं पट्टणांत टिपूसुलतान यांजपाशीं होता. हें खबर समजल्यावर सुलतान यांणीं आमचे किबलगा साहेब यांस रुकसत देऊन, सावनुरासी रवाना केलेंवरून त्यांणीं येथें येऊन तख्तनिसीन जाहले. येथें श्रीमंत पेशवे यांजकडून मोरो बापूजी सरसुभेचे कामावरी होते. पेशजी नवाब साहेब बहादूर दलेरजंग यांजकडे कारडिगी महाल चालत होता. त्याबमोजीब चालवावा अथवा खर्चास नगद द्यावा. या बमोजीब जाबसाल केले असतां, ताजा सनद पाहिजे म्हणोन उजूर केलें, तरी पुणेंत जाबसाल करवून आठेचाळीस हजार रुपयेची सनद आपले नांवीं आणोन सरसुभेस दिल्हा, त्याजवरी कांहीं दिवस चालला. नंतर नवे सरसुभे येऊं लागले. नेमणुकीचे रुपये सनदबरहुकूम सुदामतपणानें पोंहचेनात, सबब तकलीफ नेहायत गुजरु लागले. तों इतक्यांत बफजलइलाही मेहेरबां दोस्त जनरल वसली साहेब बहादूर इंग्रज, यांची स्वारी धोंडजी वाघ याचे तंबीकरितां सावनूर प्रांतेस आली. त्या वख्तीं सरसुभा बाळकृष्ण पंडत पटवर्धन यांजकडे होता. इकडील आहवल दरीयाफ्त फर्माऊन मेहेरबानगी करून सरसुभेसी ताकीद केले कीं, सनदबरहुकूम आठेचाळीस हजार रुपये नगदीच्या पुरवण्या तुम्हांकडून होत नाहीं. त्यापक्षीं सदरहू रुपयेची ऐवजी हाल वसुली तालुका लाऊन देणें, म्हणोन ताकीद करून त्यांणीं गेले. नंतर सरसुभे यांणीं आठेचाळीस हजार रुपयेची ऐवजी शहर सावनूर व देहे २५ सुद्धां कमाल आकारानें इंजानिबचे वडिलांचे नांवानें दिल्हे आहे, ते चालतात. परंतु खेडीं अगदीं उजाड आहेत. जुजबी लावणी आहे. आमचा खर्च भारी आहे. आमदनी जुजबी, यांत बिलकुल निभावणी होत नाहीं. या बाईस बहुत हलाखी गुजरत आहे. कदीमपासून आमचा घराणा पादशाहीकडून सरफराज होऊन, पादशाहाकडून परवर्ष जाहलेला आहे. बिलफेल हकताकजी खुषकी व तरीच पादशाहींत आपलें घर दिल्हें आहे, यांत आपलेसी मुनासब दिसेल त्या बमोजीब आमचा बंदोबस्त ठराऊन द्यावा. यांत आपली नेकनामी आहे, ह्मणोन इजानिबच किबलगा साहेब यांणीं अलीषान एलफिस्टन साहेब बहादूर गवरनर यांस जाहीर केलेंवरून, साहेब मोसुफांनीं या दौलतीचा आहवाल व पेशजी मुलूख चालत होते ते दाखला दरीयाफ्त करवून, सालीना साहा हजार रुपये पेनसीन करून दिल्हें होतें. इजानिबचे वडील नवाब आबदुल खैरखां साहेब बहादुर दलेरजंग यांचा अंतकाळ जाहलेवर, अठाविसावे खुरशी इजानिबचे वडील बंधू नवाब फय्याजखांसाहेब बहादूर दलेरजंग यांणीं तख्तनसीन जाहले. नंतर सुमारें दोन महिन्यानें त्यांचा अंतकाळ जाहला. त्यांचे पोटीं फर्जंद नसणेंकडून इंजानिबचे दुसरे वडील बंधू २९ एकोणितिसावे खुरशीचे नवाब मुनवरखां-साहेब बहादूर दलेरजंग यांसी गादीनिषीन जाहले. त्यांणीं सुमारें साहा वर्षे

दौलत करून अंतकाळ जाहला. त्यांचे पोटींही फर्जंद न होणेंकडून अली षान सरकार मेहेरबानगी करून इंजानिबास गादीनिषीन केलें आहे. आंमुषफाकांनीं एकंदर लिहिलें तें आहवाल खालीं लिहिलेल्या सनदपत्राच्या नकला व खुरशीनामा मुतालेंत आणून, सुदामदपासून चालत आलेले मर्यादेप्रमाणें, किताब आलकाब वगैरे चालवणेंचे बोजे आंमुषफाकडे आहे. पूर्वी इंजानिबचे दौलतीस मुलूख पुष्कळ चालत होते, ते सारे जाऊन जुजबी राहिला. परंतु मर्यादा व आलकाब किताब जें सुदामदपासून चालत आहे, त्याचप्रमाणें आ अलीषान सरकारही आजपरीयंत चालवीत आहेत. येइंदाही चालवितील अशी इजानिबांस उमेद आहे. सब वजहेनें इजानिबावर आंमुषफाकाची मेहेरबानगीच नजर असली पाहिजे. आंमुषफाकाचे मुतालेकरितां सनदपत्राच्या नकला पाठविल्या तें तपशीलः—

१ आलमगीर पादशाहा गाजी यांनीं नवाब आबदुल रौफखां साहेब यांस मनसब हफ्त हजारी व साहा हजार स्वार सरकार बंकापूर, सरकार आजमनगर वगैरे मुलख व दलेरखां बहादूर दलेरजंग ऐसे किताबसहित सरफराज करून सन १०९७ हिजरींत सनद दिल्ही, त्याची नक्कल.

२ आलमगीर पादशाहाचे वजीर आमिरुल—उमराव यांनीं सरकार तोरगलची सनद, नवाब दलेरखां बहादूर दलेरजंग यांस इनायत फर्माऊन सन ४८ जुलुस दिल्ही. त्याची नक्कल.

३ आहमदशाहा पादशाहा गाजी यांचे वजीर गाजोदीखां बहादूर फेरोजंग निजामुल्मुलक यांनीं पादशाह[illegible]ावरून, पालखी झालरदार देऊन, [illegible] करून सन ११६४ हिजरींत सनद दिल्ही. त्याची नक्कल.

४ इजानिबाचे पडदादा नवाब आबदुल मजीदखां साहेब बहादूर दलेरजंग यांस श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांस सुरुसन सब्बा आर्बैन मया व अलफ सालीं तहनामा जाहला, त्याची नक्कल.

५ सब्विसावे खुरशीचा नवाब आबदुल हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांनीं आपले लेक दलेलखां ह्मणून होता तो आपले समक्ष वारला. मूळ ते देलरखां, यांचे लेक आजीजखां ह्मणोन होता, त्याचें नांवीं शहाआलम पादशाहा गाजी यांजकडून सनद दिलावरजंग ह्मणून किताब सन ११९१ हिजरींत आणविले. त्याची नक्कल. आजीजखांही पांच वर्षे उमरेचा होऊन सदरहू नवाब हकीमखां साहेब बहादूर दलेरजंग यांचे समक्ष वारला.

६ श्रीमंत बाजीराव पेशवे यांनीं इजानिबचे वडिलांस चार हजार रुपये मुक्रर करून मोरो बापूजी यांचें नांवीं सुरुसन मयातेन व अलफ सालीं सनद दिल्ही, त्याची नक्कल.

७ श्रीमंत बाजीराव यांची सदरहू चार हजार रुपयांविशीं परशराम रामचंद्र यांचे नांवीं सुरुसन मयातेन व अलफ सालीं सनद दिल्ही, त्याची नक्कल.

८ श्रीमंत बाजीराव यांनीं सदरहू चार हजार रुपयांविशीं धोंडो बल्लाळ यांचे

नांवीं सुरुसन मयातैन व अलफ सालीं सनद दिल्ही त्याची नक्कल.

९ सदरहू नेमणुकींत शहर सावनूर-सुद्धां २५ गांव नेमून दिल्हाविशीं बाळकृष्ण लक्ष्मण यांनीं कृष्णाजी वेंकाजी याचे नांवीं लिहिलें, ती सनदेची नक्कल.

१० इजानिबचे वडिलांस सालीना ६००० रुपये पेनसीन आअल्लीषान सरकारांतून करून दिल्हाविशीं सन १८२० इसवींत सनद दिल्ही, त्याची नक्कल.

११ इजानिबानीं गादीनिषीन जाहल्या वख्तीं मेहेरबां बाबर साहेब बहादूर यांनीं सन १८३४ इसवींत जाहिरनामा दिल्हा, त्याची नक्कल.

१२ इजानिबास सनदेशिवाय दिवाणी व फौजदारीचा आख्तीयार पुरा आहे, ह्मणोन आअल्लीषांन सरकारांतून सुरुसन सीत मयातैन व अलफ सालीं पत्र आलें, त्याची नक्कल.

१३ खुरशीनामा.

येणेंप्रमाणें यांत मलफुजआस आमुषफकांनीं मुलाहिजा फर्मावितांना जाहिरात येईल. हमेषा खत खडीं पाठऊन दोस्तीची तरकी करीत असलें पाहिजे. ज्यादाचे नवी सद आयाम षादमानी मुदाम मुसादामबाद.

---

ब.

नवाबसाहेब सावनूरकर यांजकडोन, त्यांचे वंशजापैकीं कोणी राज्य मिळविलें व तेव्हांपासून एकमेकांपुढें कोणकोणते सालीं पुरुष गादीवर बसले व त्यांचे शिक्के कशाप्रकारचे होते त्याजबद्दलः—

अवक नंबर ११६ पैवस्ती तारीख ८ आक्टंबर सन १८५३ इसवी. मुक्काम बेळगांव, साहेब मुषफक मोकरम मेहेरबान आलताफ फर्मायिबंगश मेस्तर येथरीजसाहेब बहादूर इस्कोयर, आसिस्टंट इनाम कमिशनर दाम आशफाम हू.

छ अजजानिब नवाब आबदुल दलेरखां दलेरजंग बहादूर सावनूर, सलाम बादज सलाम. षरहषौक मुलाकात बहुजत आयात मषहुद जमीर मुनीर गर्दानीदाम आयेद येथील हकीकत तारीख छ २५ जिल्हेज सन १२६९ हिजरी, ता. २९ माहे सपटंबर सन १८५३ इसवीपावेतों खेरयत जाणोन, आसाहेबांचे खैर व आफयतेस कलमीं करून, दिलषाद करीत असलें पाहिजे. दरीआयाम आसाहेबांनीं तारीख २५ माहे जुलै सन १८५३ इसवींचे थैली इबालाग फर्माविलें, तें पोहोंचून मजमून जाहीरेंत येऊन, जबाब कलमीं करणेंत येतो कीं:—आमचे मूळपुरुष दिल्लीहून या कर्नाटक प्रांतास येऊन, सन हिजरी १०९७ सालीं, नवाब आबदुल रऊफखांसाहेब, किताब 'दिलेरखां दलेरजंग बहादूर' यांनीं दौलत संपादन करून, सदरहू सनापासून, सन ११३९ हिजरी सालपरीयंत, दौलत अनुभवून इंतिकाळ जाहले. नंतर सदरहू नवाबसाहेब यांचे ज्येष्ठ पुत्र नवाब आबदुल फताखांसाहेब बहादूर दलेरजंग यांणीं वडिलांचे जागेवर मसनदनसीन होऊन, तीन महिनेंत इंतिकाळ जाहला.

नंतर सदरहू फताखांसाहेब बहादूर यांचे पोटीं अवलाद नसल्यामुळें त्यांचे लहान बंधु नवाब आबदुल महमदखांसाहेब बहादूर दिलेरजंग यांणीं सहा महिनेपरीयंत, दौलत अनुभवून इंतिकाळ जाहले. नंतर नवाब आबदुल गफरखांसाहेब बहादूरखां दिलेरजंग यांणीं सन ११३८ हिजरीपरीयंत दौलत करून, इंतिकाळ जाहले. नंतर नवाब आबदुल मजीदखांसाहेब बहादूर दलेरजंग यांणीं गादी नसीन होऊन सन ११६८ हिजरी परीयंत दौलत अनुभवून इंतिकाळ जाहले. नंतर सदर सन ११६८ हिजरी नवाब आबदुल हकीमखांसाहेब दिलेरजंग बहादूर हे गादीनसीन जाहले, तों सन १२०० हिजरीपर्यंत दौलत अनुभवली. येणेंप्रमाणें आमचे पूर्वज लोकांनीं दौलत अनुभविली आहे; परंतु मूळपुरुष नवाब आबदुल रऊफखांसाहेब बहादूर दलेरजंग बिन नवाब आबदुल करीमखासाहेब यांस, बादशाहाकडून किताब होणेंपूर्वीं, आपलें नांव आबदुल रऊफ इबने आबदुल करीम ह्मणोन, मोहर तयार करवून तीच मोहोर चालवीत होते. नंतर आलमगिरी पादशाहा गाजी यांजकडून दलेरखां दलेरजंग बहादूर ह्मणोन, सन १०९७ हिजरींत किताब जाहलेवर, सदरहू किताब दलेरखां बहादूर दलेरजंग ह्मणोन मोहर तयार करविली, ती कितेक दिवस चालली आहे. नंतर जे ज्या सनांत गादीनसीन जाहले त्या सनांची नवी मोहर करवून पूर्वीचा किताब दिलेरखां बहादूर दिलेरजंगचे किताब कायम ठेऊन, शिक्का करून चालवीत होते. येणेंप्रमाणें ही दौलत सन १२०० हिजरीपर्यंत चालत आली; तेच सालीं टिपु सुलतान यांचा आमचा आजा नवाब आबदुल हकीमखांसाहेब बहादूर दिलेरजंग यांचा नाइतफाकी होते. सबब लढाई होऊन शेवटीं टिकाव न होतां, शहर सोडून जातांना करोडों रुपयांची जिंदगी व जवाहीर, वगैरे सोडून गेले. तेव्हां खजानेंत असतील त्या मोहराही साऱ्या सोडून गेले. ते वख्तीं स्वारीबरोबर दोन मोहोरा मात्र लहान१, व थोरली१; ऐशा दोन मोहोरा होत्या. त्या शिलकींत असतील त्या दोन मोहोरा हल्लीं इजानिबापाशीं आहेत. अलाहिदा एका कागदावर छापून त्याचे बाजूस शेरा लिहिला आहे. तो या लगत आहे. मुताला फर्मावितांना जाहीर होईल. याशिवाय इकडील दौलतींत दिवाणगिरी केली ते लोकांस, इनाम वगैरे देणेंचें स्वतंत्र कांहीं नाहीं; परंतु जें इनाम वगैरे देणेंचे असल्यास, गादींवर असणार नवाबसाहेब यांस अर्ज करून, नवाबसाहेब यांचा परवाना करवून, त्या बमोजीब ताकीद दिवाण यांनीं देणेंचा दस्तूर आहे व ही दिवाणगिरी केली त्या लोकांच्या मोहरा कांहीं शिलकेंत नाहींत. हमेशा खत खुतूत पाठवून दोस्तीची तरकी व मेहेरबानगी करीत असलें पाहिजे. ज्यादा छे नवीसद . आयाम षादमानी मुदाम मुस्तताम बंद.

---

क.

यादीदास्त सावनूर नवाब यांचें संस्थानचा सिलसिला कैफियत, वंशावळी वगैरे तपशील सुभा धारवाड.

१ अवरंग चवथामध्यें सावनूरचे सिलसिला पादशाहाची कैफियत तारीफ करीत आहे. ज्यानीसारखां आफगाण पठाण आडनाम मयाणा ह्मणणार अमीर, विजापूरची पादशाहात ही आदिलषाहाची आहे. इसमाईल आदिलशाहांनीं २५०० स्वाराची मनसब देऊन ठेविले होते. खानमजकूर फार काळा होता. कारण काळा पाहडा ह्मणून नांव ठेविलें होतें. इबराहिम आदिलशाहाचे सरकारांत बहुत बढती होऊन होता. अहमदनगरचे लढाईत बादशाहाचे बुरहान निजामशाहाचे मोकाबिलेंत फार मेहनत करून मरून गेला. त्याचे लेक दोघे होते. थोरले लेकाचें नांव अजीजमिया किताब. त्याचे फते हे लष्कर खालील लेकाचें नांव नबीखां किताब, त्याचे रणमस्त हजारी मनसबेनें ७०० स्वार, उंटावरी नगारा, लष्करचे मक्तेसरी यासी देऊन शिंदे बाजूवालेंत दाखल केले. थोर लेकास बापाचे जागेवरी बसविला. सदरी आजीजमियांनीं लष्करांत सामील होऊन लढाईत फार मेहनत केली. करितां तीन हजारी मनसब, थोर झेंडा, नगारात इनायत केलें. खानमजकुरांनीं गुलबरगाचेजवळी पादशाहा कुतुबशाहाचे लढाईत गोळीचा मार लागून मरून त्याचे लेक जबरेखान बापाचे जागेवरी बसला. यानें शिपाई लोकांस दिलासा करून फार हुषीयारीनें ठेविलें होतें. फार शाहणपण करून राहत होता. जेव्हां बादशाहाचे हुकूम जे होतील ते बजाऊन फार हुषीयारी करून राहत होता. सर्वत्र मनसबदारांचे मध्यें फार बुद्धिवंत ह्मणवून घेऊन राहत होता. मागून कितेक दिवसांनंतर विजापूरची पादशाहागिरी अली आदिलशाहास जाहल्यानें तमाम मनसबदारास जहागीर मोकरर पावली. तेव्हां यासही बंकापूर वगैरे २२ महाल कमाल ५००००० लाख आणखी कितेक हजार इतकी जहागीर देऊन पंजे हजारी मनसब्याचे नांवीं मोकरर केलें. यांनीं चार हजार स्वारांनिशीं चाकरी केली होती. आपला लेक बहलोलखां यास नायबी मोकरर करून मुलुकाचे बंदोबस्ताकरितां पाठविला. हा आपले जहागिरीचे मुलकास आला. तो काळा होता, त्याजवरी मलिन वस्त्र नेसत होता. करितां लष्करचे लोकांनीं तमाम काळा पाहडा ह्मणून नांव ठेविलें होतें, आणि लोकांस उपद्रव देत होता. अंतःकरण ह्मणायाचें तों नाहींच नाहीं. याजकरितां रकटे बहलोलखां काळा पहाड ह्मणून लोकांनीं नांव ठेविलें होतें. याचा बाप जंबरखान यानें आनागोंदीस राजा रामराजास मारिलें. याचे हंगामांत कितेक दौलत तोडून टाकिली. अखेरीस लढाईमध्यें भाल्याचे मारेकरून मरून गेला. मागोन पंजे हजारी मनसब २२ महालचे सुभा बापाचे वेळीं जें काय होतें तें सारें बहलोलखानें आपले नांवें सनद करून घेऊन खिलात वगैरे घेऊन १०२२ हिजरींत येऊन दाखल जाहला. मुलकाची बंदोबस्ती वगैरे लोक पूर्वभागीं आठरा कोसांवरी जान वारनहळ्ळी ह्मणून होते, ते गांवचें पाणी व गांव चांगला आहे ह्मणून थोर थोर घराणदारांस आणून ठेवून, थोर वस्ती करून सावनूर ह्मणून नांव ठेऊन तेथें आपण राहिला. बंकापूरचे किल्ल्यांत ठाणें ठेविलें. किताबामध्यें बंकापूर प्रसिद्ध आहे. तेव्हां वस्ती चांगली होती. बंकापुरचे दोन कोसांवर जाबीनगडा

ह्मणून किल्ला नाहीं, तो एक पहाड होता. त्या पाहडांत एक गुहा आहे. ती जागा मोठें रंम्य स्थळ तपस्वी लोक राहण्याची आहे. पहाड व बंकापुरचेमध्यें बागाईत होती. भरपूर शहर पर्वताचेमध्यें हऱ्याली असणेंकडून बेहष्ता यानें वैकुंठसारखे शोभत होते. अलीकडे वस्ती खराब जाहल्यामुळें दोजखां यानें एक नरक लोकापेक्षां खराब जाहलें आहे असें कांहीं वर्णिलें आहे. कितेक दिवसांनंतर विजापूरचे बादषाहींत आदिलषाहाचे लष्करांत फितूर जाहला. हाही फितूर जाहला. इतक्यामध्यें आवरंगजेब यांनीं दिल्लीचे पादषाहाकडून रुकसत घेऊन मुलकाचे बंदोबस्त करितां निघून अहमदनगर वगैरे किल्ला जयानें घेऊन येत असतांना कितेक अमिरांनीं जाऊन मिळून नजर वगैरे नेऊन दिल्ही. या खानमजकुराहीं तीन लाख रुपये नजर आणिली. कितेक अपरूप पदार्थ मेवा जिन्नस वगैरे नजर देऊन, पुरातन उमदा मनसबदार आलमगिरींत दाखल जाहले सारखें करून घेऊन, सनदा वगैरे करून घेऊन, करनूलचे इजरे खादनी व बेडे जर्ब यांस शिफारस करून यांणींच करनूलचे मनसबीदारी देवविली. मागून कितेक जमीयत ठेवून खानमजकुरानें कितेक पाळेगारांस दस्तगीर करून, ४९ वर्षें सुखरूप दौलत करून, विजापूरचे अखेर दौलत शिकंदर आदिलशाहाचे वेळीं बहलोलखान मरून गेला. त्याचा लेक दिलेरखां किताब हाच पिरखां बहादर बापाचे जागेवरी बसला. मुलकाचा बंदोबस्त केला. आदिलषाहाचे वेळीं जाहीरीयानें पाहणारे लोकांत दोस्ती ठेवणें-सारखे कागदपत्र पाठवून दोस्ती ठेवीत होता. परंतु मनःपूर्वक नाहीं. कितेक दिवसांत दिल्लीची बादषाहात आलमगिरी बादशाहास जाहल्यानें दक्षणचे बंदोबस्ताकरितां निघाला. हें वर्तमान ऐकून यांणीं २००० स्वार, ३००० प्यादे जुमला पांच हजार जमीयतसुद्धां घेऊन हुजूरांत मुलाकात केले. बादषाहाचे खातरदारी ठेविले. ११९७ हिजरींत विजापूर आलमगिरानें फतेह केला. तेव्हां हा सांगात होता. षाहाजादा सुलतान मोजम अहमदाबाद बिदरचे किल्ला सोडवणेंकरितां रुकसत जाहला. एक महिना सलह केले. मागून त्या स्थळाचे किल्लेदार व मीरजान नबखषी आदिलषाहा किल्लेदार यांणीं बरुद करून जळून गेला. फते जाहला. जफराबाद म्हणून नांव ठेविलें. मागोन हिंमत कलजी सरदारानें खमष मुकरमखां सिराजी मोहमद खलिल आखबरा बंदीयाकिकाफीत नाम उठविणार फंदफितूर केला. ही सर्वत्र दौलत आपण करावी ह्मणोन मनांत करून घेऊन, फितूर करून नानाप्रकारें बोधन करून शाहाजादेस बोलावून घेऊन जाऊन, बिदरचे शहरांत कुतबाव नेईल, आणिखी बहुत ज.ा षाहाजादेस फिरवील. तेव्हां सुलतान आलमगिरीनें आपले सांगात होते, ते अमीर आणखी दक्षणवाले तमाम अमिरास फुसलकी षाहाजादेस मार लागेनासारखे जाननिशीं कोणी धरून आणील काय ह्मणून म्हटलें. हें फर्मान ऐकून सर्वत्र अमीर खामोष राहिले; तेव्हां या खानमजकुरांनीं उठून बंदगी बजा लाऊन, गुलामास हुकूम जालीया बदस्तूर हुकूम षाहाजादेस आणूं म्हणून अर्ज केले. हे अर्ज खातरेस आणून बहुत खुषीकरून दिलेरखां म्हणून किताब व हत्ती देऊन जरेचे आंबारी वगैरे इनायत केले. मागून रुखसत घेऊन तो जमीयत-

सुद्धां रातोरात निघून षाहाजादेचे जवळ जाऊन हा बंदा आपला आहे; आपले दौलतेचे सरफराज पावले आहे; आपली दौलत खाऊन आह्मीं जाइफ यानें वृद्ध जाहलों असों. कांहीं अर्ज लिहून पाठविले. हें ऐकतांच षाहाजादेनें कोणी आमचे आसच असेल म्हणून बार तुम्हींच निमक हलाल आहां, तुम्हीं येणेंचें आम्हास अगत्य आहे म्हणून हुकूम सादर जाहले. बमोजीब हुकूम यांणीं येऊन मिळाले. भेट जाहली. खास सडेच आसपास बघतां गुलाल बड यानें बनांतच कनाथ तेथें उतरणेंस जागा दाखविली. फार आदर केलें. मागून स्वल्प दिवसांत बादशाहाजादेस व यास अत्यंत मित्रत्व पडलें. एक दिवस स्वारीस जावे म्हणून तजवीज करून खानमजकुरानें आपले हत्तीवर आंबारी सिद्ध करून आणविली. पहिले षाहाजादेस बसवून पाठीमागें आपण बसून हत्ती चालविला. वाटेंत षाहाजादेचे संगांत बोलत बोलत, आलमगिरी कोट होता त्याची वाट धरली. षाहाजादेचे संगांत कितेक लष्करवाले तमाम येऊन त्यांणीं हें पाहून दगा जाहला म्हणून लष्करवाले तमाम लोकांस येऊन कोठें जातां म्हणून हरकत केली. त्या सर्वत्रांस मारून नीट घेऊन येऊन बादशाहाजवळ लेकास हजर केला. येणेंकरून बादषाहानें फार संतोषें करून गुलाल बड यास मोखमाली कनात कांहीं मरातब इनायत केले. इतके आमिरामध्यें आह्मांस फार बहुमान जाहले म्हणून खानमजकूरास गर्व जाहला मागोन कितेक दिवसांत सोलापूर वेंकटप्पा नाइक म्हणून होता. मोठा मजबूत होता. जमीयतही फार ठेविली होती. सोलापूरचा किल्ला घ्यावा म्हणून दोन तीन वर्षे बादशाहानें खस्त केलेनेंही साध्य जाहलें नाहीं. म्हणून मागून दिलेरखां यास आज्ञा जाहलीया जफर फंदफितूर करून त्यास बोलावून आणून बादशाहाचे रुबरु केले. तेव्हां दोन लाख सत्तर हजार रुपये पेश-कष मोकरर करून, एक लाख रुपये तकसीर नजरान इतका त्याजकडून वसूल करून, खजानेस दाखल करून त्याचे मुलूक त्यास सुपूर्द केले. मागून कितेक दिवसांनंतर १११८ हिजरींत आलमगीर पादषाहा मरून गेला. कितेक दिवस भाइबंदाचे इतीफाकरून बरोबर चालिले. मागून स्वल्प दिवसांनंतर महमद आजम बहिरशाहा व सुलतान मोजमशहा हे उभयतां भाऊ भाऊ आपण दौलत करावी ह्मणून कजीया सुरू जाहला. दोघांचे लढाईमध्यें दिलेरखांचे काका नबीखां रणमस्त यांचे लेक आजमखां यानें बहादरशाहाचे रुबरु हातीं चालवून मरून गेला. मागून दिलेरखान किनारा होऊन स्थळास येऊन ३२ वर्षें दौलत करून मिजाजचे नादुरुस्तीमुळें मरून गेला. मागून त्याचे जागेवरी त्याचा लेक आबदुल गफूरखान जाहला. खान जाहाखान दखनचे ६ सुभेचा बंदोबस्त करणेंस्तव बहादूरषा हे आलमगिरीचे हजुरांतून रुकसत घेऊन निघाला; तेव्हां खानमजकूर अवरंगाबादेवरी होता. यानीं येऊन खानजाहाचे सांगात मिळून आपले तालुकेचा बंदोबस्त करून घेऊन त्याचे हातीं रुखसत घेऊन आपले स्थळास येऊन राहिला. कितेक दिवसानंतर शिरहट्टीवाल्याचें फार प्राबल्य जाहलें आहे, त्याचें खतल करणें मनासब

आहे ह्मणून आपले खानजाखानमियास सरदार करून त्याचे संगात कितेक जमीयत देऊन शिरहट्टीवाल्याची खतल करणेंकरितां पाठविलें. शिरहट्टीवालेही जमीयत घेऊन आले. ते खबर ऐकून थोडेबहुत जमीयत करून येऊन रातोरात लष्करावरी पडून, तमाम लोकांस मारून आपआपले स्थळीं जाऊन राहिले. ही खबर खानमजकुरानीं ऐकून यास मारणें-करितां भारी जमीयत व जंगी सामान सिद्ध करीत होता. इतक्यामध्यें मराठे येत आहेत ह्मणून खबर ऐकून याचे संगात लढाई करणेंचे मोकुफ करून, कितेक ऐवज घेऊन सलाह करून तिकडील तयारींत राहिले. इतकीयांत खान जाहाखान मरून गेला. त्याचे बदली हुसेन मिरअलीखां अमिरुल उमरा सैदचे जातीचा यासी हुकूम होऊन आला. तेव्हां खानमजकूर आबदुल गफरखां यांणीं आपला लेक गफरमियांसी मैअसबाब तोहफा वगैरे देऊन बुरहानपुरावरी चाल केली. तेथून बहाली मनसब जागीरीच्या सनदा आणून घेतल्या. मागून २८ वर्षे खानमजकुर दौलत करून मरून गेला. मागून त्याचा लेक गफरमिया बापाचे जागेवरी बसला. रास्ते मराठ्याची फौज घेऊन याचा मुलूख ताराज करणेस्तव निघाले. खानमजकुरांनीं जंगी सरंजाम घेऊन जाऊन तो तेथें दाखल जाहला. तो त्याचे मुकाबिला मिश्रीकोटावरी जाहला. चांगली लढाई जाहली. मराठ्यावरी यानें जबरदस्ती केली. मराठे शिकस्त जाह-ल्यानें मिश्रीकोट फते करून घेतला. मागून मराठ्यांनीं बाकी फौज घोरपड्याची, मिरजेचे गोपाळरावसाहेबाची फौज घेऊन खानमजकुरचे तालुके लुटणें सुरू केलें. त्यांनीं याचे लष्करास धक्का दिला होता. मागोन मराठ्यांनीं काय उगच खटपट ह्मणून बेजार होऊन मिरजवालेचे मारीफत ६०००० रुपये आह्मीं द्यावें. दिल्हेनंतर खानमजकुरांनीं मिश्रीकोट सोडून द्यावे. असे कांहीं जाबसाल लाऊन मागून कराराप्रमाणें ऐवज देऊन मिश्रीकोट सोडून घेतले. ते आपले स्थळास गेले. हें आपले स्थळास आले. यांनीं आपले स्थळांत येऊन ९ वर्षे दौलत करून खानमजकुर मरून गेला. त्याचा लेक आबदुल महजीदखान बसला. मागोन असफजाही अवरंगाबादेहून गोलकुंडेस आला. तेथून हैदराबादेस येऊन तेथेंच राहणें मोकरर केलें. त्या मैदानांत दोन किल्ले गच्च तयार करविले. असफजाही बहादरनें व सायानें लेकीचे लेक हिदायत मोहदीन यासी दाबा-करितां आणि बंदोबस्तकरितांही विजापुरास पाठविलें. मागून खानमजकुर हुजूरचे हुकूमशिवाय तख्तनिसीन जाहला आहे म्हणून वर्तमान ऐकून, मर्जी बिघडून सावनूरचे तर्फे कूच केलें. कूच करितांच स्वाराचे खुदलणेंत कितेक गांव पायमाल जाहले. तेव्हां गदगचे व शिरहट्टीचे आणि कितेक पाळेगारांनीं जाऊन मिळून सावनूरवाल्यानें बेइल्लिनें ऐसें काम केलें आहे. त्याचे दवलत बुडवणें म्हणून सलाह दिल्हा. नवाब बहादर यांनीं काना बाहोष होत. करितां त्याचे सलाह खातरेस न आणितां कर्नुलवाल्याचे मारीफत खानमजकुर भेटीस येईजे सारखे जाबसाल करविलें. आह्मांस ताजीम दिल्ही तर आह्मीं भेटीस

येऊं म्हणून खानमजकुरांनीं सांगून पाठविलें. मागून सावनूरवाल्यास सांगून पाठविलें कीं, तुम्हीं घराणदार आहां. तुम्हांस ताजीम देणें लाजम आहे म्हणून हुकूम केले. मागून सावनूरवाल्यानीं कितेक तबकें मेवाजात जिन्नस वगैरे घेऊन जाऊन नजर ठेवून मुलाकात केल्यास हात धरून जवळ बसवून घेतलें. हे तिनी घरवालेस नवाबांनीं हत्तीवरी बसविले तेव्हां हा आंबारींत बसला. तेव्हां थोडा झुकून सलाम करणेंचा कायदा आहे. आमीर बसणेंचे दिवाणखानेंत ह्या तिघांनीं हुक्का पिणेंचा कायदा आहे, हे लोकांनीं जाबसाल केले. तरी मसलतीची बोली जाणून कबूल करीत होते. सावनूरवाला फारसा विचार करीत होता. करितां फार अंतःकरणकरून होता. ११५७ हिजरींत कर्नाटक पाया-घाटेचे बंदोबस्त करणेंस्तव कूच करून तेथून निघाले. तेव्हां खानमजकूरही संगातच होता. तेव्हां नथणी नगर ऊर्फ त्रिचनापल्लीचे किल्ल्यांत मुरारीराव घोरपडे होते. ते किल्ला घेणेंकरितां मैजमीयतसुद्धां आला. तोंही आपली जमीयत घेऊन बाहेर आला. उभयतांचे लष्करांचे दरम्यानेंत सीम्युवर म्हणून जागा आहे त्या जागेंत कावेरी नदी वाहत आहे. तेथें याची त्याची सख्त लढाई जाहली. तेव्हां खानमजकुरांनीं फार मेहनत केली. नवाबचे सरकारांत नामवर जाहला. नवाब तीन वर्षे त्या मुलकांत होते. त्या लोकांकडून पेषकार फार घेतला. कितेक बेहतर जवाहीर, पैसे, कापड वगैरे कितेक पाळेगारांकडून घेऊन हैदराबादेस येऊन दाखल जाहले. चार वर्षे पुरी, चवथी तारीख जमादिसानी ११६१ हिजरींत नवाब मरून गेला. मागून आसफजाहाचे थोरला लेक सैद अहमद नासरजंग बहादर हा बापाचे जागेवरी बसला. पहिले बापाचे वेळीं मुलकाचे बंदोबस्ताकरितां सांगितल्या त्या गोष्टी जवानीचे बाहीरकडून खातरेस न आणितां, मोरोपंत ह्मणार फितना उठवणार होता. यास आसफजाह्या यांनीं कैद केला होता. करितां मुलुखांत तुफान राहिले होतें. त्यास यांनीं कैदींतून काढून आपणच पेषकारी दिल्ही. त्याकडून परंतु नफित नाषुरु जाहले. कितेक दिवस गेले. नंतर मोहमदषाई बादषाहाचे हुकूम बरहुकूम नासर-जंग यांणीं दिल्लीस जातांना आपले भानजे हिदायत मोहदीन मुजफरदौला यासी आपले जागेवर ठेवून आपण गेला. मागून तळघाटचे कितेक अमिरापट्टणची वगैरे आपण दौलत केली तरी बरें आहे म्हणून मुजफरदौलास सलाह देऊन त्याचे संगात ६ सुभेचे बंदोबस्ता-करितां निघाले. हुसेन दोस्त अलीखां ऊर्फ चंदासाहेब यांनीं तुफान उठवणार नवयेतच जातचा यानें कृत्रिमपणानें फुलेचरी फरासिसाचे जमीयतसुद्धां बोलावूं पाठवून, गोषामिवाले आलवरदीखां षाइमजंग यांसी आरकाटचा सुभा आसफजाहाचे वेळीं बहाल जाहला होता. त्यास मरणें फर्माविलें. हे गोष्टी सर्वत्रांस ठाऊक आहेत. हरकारेनीं हे खबर घेऊन जाऊन दिल्लींत नासरजंगास इतल्ला केला. तेव्हां याचा भाऊ गाजीवदीनखां यास हजुरांत वकि-लाचें काम होतें. यानें जाऊन आपले भाई नासरजंगांनीं हजुरास येतांना भानजा हिदायत मोहदीन यासी कामावरी ठेवून आला असतां, त्यानें मुलकांत फार बखेडा

केला आहे म्हणून आपले भाईस हुकूम व्हावा म्हणून हजुरांत इतल्ला करितांना जाणें म्हणून आज्ञा जाहली. तेव्हां यांनीं निघोन नर्मदातीरावरी येऊन तमाम जमीयतसुद्धां तेथें राहून हिदायत मोहदीन यासी बोलावूं पाठवावे म्हणून तजवीज केली. तेव्हां याणीं चेंजी पायाघाटेंत होतां तेव्हां सैद लष्करखां अमिरुल उमराव षाहानवाजखां समसामदौला यांनीं हजूर दिवाणखानेचे बक्षी व अनवरखां बादषाही लष्कर या तिघांचे संगात मैजमीयत ककमुल्ला सुदा देऊन त्यांस बोलावूं आणणेंकरितां पाठविलें. यांनीं जाऊन येणें ह्मणून हिदायत मोहदीन यासी बोलाविलें. त्यांनीं ककमुल्ला दिल्हा तरी येतो ह्मणाले. तेव्हां ककमुल्ला देऊन बोलाऊं घेऊन येत होता. तेव्हां इकडे नासरजंगाजवळ असणारे क्षुद्र लोक दौलत नासवणार, पाहाणार लोकांस दोस्ती ठेविणेंसारखें, परंतु मनांतून नाहीं. अस्सल कृत्रिम पठाण लोकांनीं तुमचे भानज्यास कैदेंत घालून आणितात ह्मणून नासरजंगास इतल्ला केला. हे खबर ऐकून नवाब रागे भरून मैजमीयतसुद्धां निघाला, तेव्हां सावनूरचे खानमजकुरांनीं कृत्रिमपणानें तबीयत नादुरस्त आहे. ह्मणून हींक उठवून आपला लेक करीममियास लष्करचे सांगात पाठविलें. ११६४ हिजरींत पूर्वभागीं चेंजी ह्मणून आहे. त्या किल्लयांत फरासिसाचें ठाणे होतें. तेथें पठाणांनीं सर्वत्र एक होऊन नवाब संगात फार लढाई करून नवाबचे डोई मारून झेंडे-वरी चढविलें. हिदाइत मोहदीन खान हा तेव्हां घटाटोपांत होता. तेव्हां बाहीर काढून सर्वत्र नजर दिल्ही. यांचे मनांत नासरजंगास मारून आपण दौलत करावी ह्मणून नव्हतें परंतु पठाणाचे भयेंकरून असें जाहलें. मागून मुसाभुसी आणि कितेक अमीर वगैरेनीं नवाबसहित जमीयत कोतल वाटेत रामळाचेरउहून राचोटीस पाठविली. तेव्हां पठाणांनीं आपले कजियाकरितां हिदायत मोहदीनखांचे संगात नाहीं ते कजीया उचलून लढाई सुरु केली. त्या लढाईत हिदायत मोहदीनखां मरून गेला. खानमजकूरचा लेक करीम हा मरून गेला. ११६४ हिजरींत सूर्य अस्तंगत जाहला आहे ह्मणून वर्णिला आहे. मागून नासरजंगचे ठाईं यांचा भाऊ सलाबतजंग यांणीं काइम लोकाना भाइच जाहले. ५।६ वर्षपावेतों घरांत व मुलकांत बेबंद होते. फरासिसानें आपले दिवाण हैदरजंगाचे हुजूरांत रुजू करून चिकाकोन राजमहेंद्री हे मुलक दरोबस्त आपले माहेबार तनखीस घेतले. शहानवाजखां समसामदौला यांनीं नवाब सलाबतजंग याचे वकील यानें कितेक दिवस मुलखाचा बंदोबस्त केला. मागोन हैदरजंगचे सबबेनें कैदेंत आले. निजामलीखा बसालतजंग या उभयतांनीं एकदिल होऊन हैदरजंगानें इतका तंटा केला आहे त्यास मारून सोडावें ह्मणून मसलहत करून त्याचे डेहरेंत बलावून हैदरजंगास फरासिसाचे हातीं मारविला. मारवून यांनीं बडा डचवट स्वर फरासिसानें हें वर्तमान ऐकून आपले वकिलास मारिलें ह्मणून वर्तमान ऐकून मैजमीयतसुद्धां सलाबतजंगाचे डेरेस येऊन पाहिले, तेव्हां यांनेंही आवरंगबादेची वाट धरली होती. मागून षाहानवाजखां कैदेंत. होता. यास मुसामुसानें गोळीनें मारिला. मागून कितेक दिवसांत सलाबतजंग यासी कैद करून निजामलीखां

यानें दौलत केली, तेव्हां आबदुल महजीदखां किनारा होऊन आपले स्थळांत होता. हा ३२ वर्षें दौलत करून मरून गेला. त्याचा लेक आबदुल हकीमखान बापाचे जागावरी बसला. मागून कितेक दिवसांत नाजमदखां यास निजामल्लीखां, बाळाजीराव नाना, सवाई माधवराव मिळाले. सावनूर घावें ह्मणून खस्त करून निघाले. निजामल्लीखां आपले भाईस यांचे भाऊ, यांचे बाप मिळून मारून टाकिले ह्मणून याचे मुलकांत ताराज करीत आले. मराठ्यांनीं मिश्रीकोट, गदग घेतले, ते आबदुल हकीमखां यानें इषकबाजींत मग्न होऊन लढाईत बेजार होऊन अखेरीस बसालतजंगाचे दिवाण रुजू करून दौलाचे सांगात दोस्ती करून दोन लाख रुपये नगद देऊन आपले स्थळीं राहून मराठ्यांचे हातीं ११ महाल गेले होते ते निजामल्लीचे सांगात सांगून घेऊन सोडून घेतले. नासरजंगास अपराध नाहीं ते मारिले. लागाइत याचे घराणेंत द्रोह येऊन घडला ह्मणून याचे घरांत खलल पडलें. हे गोष्टीचे खुलासा करनूलवालेचे किताबेंत बयाज केला आहे. मागून कितेक दिवसांत हैदरअल्लीखां बहादूर समशेरचे जोरकरून बुद्धिचातुर्य साहसकरून फौज फार जमा करून आजू-बाजू पाळेगारास दस्तगीर करून, हैदरनगर ऊर्फ बिदनूर घेणेंकरितां आला. हकी-मखान बिदनूरचे राणीचे कुमकेकरितां दोन हजार फौज देऊन पाठविला होता. नवाबबहादु-रांनीं राणीस धरून खानमजकूरचें लष्कर तोडून हैदरअल्लीखांचे सवारी खानमजकूरचे लष्कर-वालेचे पिछाडीस लागून यांचे घरपावेतों दवड करून सावनूरास घेरा घेतला. तेव्हां लाचार होऊन किल्येक ऐवज मोखमली डेरा, उंट, हत्ती वगैरे बापाचे वेळीं जें काय जमा केलें, तें सर्वही देऊन सलहा करून घेऊन चाल गेले. मागून बाळाजीराव नाना यांचा लेक सवाई माधव-राव इकडे फौज घेऊन आला. तेव्हां खानमजकूर त्या संगात मिळून आपलें लष्करही त्याचे संगांत पाठविलें. तेव्हां त्र्यंबकमामा मराठा फार लष्कर घेऊन चिरकुलीचे मैदा-नांत आला होता. चिरकोली पट्टणचे दक्षणेस राहत आहे. तेथें लढाई जाहली. नवाब हैदरअल्लीखांचें लष्कर लढाई होऊन शिकस्त जाहलें. १४ सवाराचे संगात नवाब गाजीखां बयखरसदा फरारी होऊन पट्टणास दाखल जाहले. मागून टिपू जखमी होऊन सवाराचे संगांत पळून आला. तेव्हां नवाबसाहेबाचें लष्कर फार खराब जाहलें. तेव्हां बहदरानीं फार शाहाणपण करून स्नेहभाव करून आपला मुलूक सोडवून घेतला. मागून बहादरांनीं निजामअल्लीखांचे संगात स्नेह संपादून त्यांनीं यांनीं मिळून पायनवाटेचे सिराजदौला मोहमद अल्लीखां इंग्रेज त्याचे संगात कितेक दिवस गेले. नंतर सलहा करून घेऊन फिरला. येतांना वाटेंत कडपेवली करनुल वेच मुस्त कैद करून त्याजकडून पेषकश घेऊन मुरारीराव चिटवलेवालेचे सांगात लढाई करून त्याचे मुलक कितेक घेऊन आपले स्थळास येऊन दाखल जाहले. सावनूरवालेस तंबी करणेंस निघाले. हें वर्तमान ऐकून खानम-जकूरांनीं आपणाकडून एक वकील नेमणूक करून कितेक जवाहीर अपरूप जिन्नस पाठविले. नवाबसाहेबांनीं बरे ह्मणून कबूल करून सलहा करून खातरजमेनें राहणें

१ मौजें वडनेर खुर्द, तर्फ गांजीभोईरें येथील मोकासा वगैरे अंमल.

१ मौजें पिंपरी जलसेन, तर्फ गांजीभोईरें येथील मोकासा वगैरे अंमल कुरणसुद्धां.

१ मौजें ताबेळें बुद्रुक, व मौजें बाणगांव व मौजें राकडें, परगणे चाळीसगांव प्रांत खानदेश येथील जहागिरीचा अंमल कुलबाब कुलकानू मोंगलाईतून नवाबसाहेबबहादूर यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.

१ मौजें मांजरी बुद्रुक, तर्फ हवेली प्रांत पुणें येथील मोकासा व बाबतीचा अंमल शंभुसिंग जाधवराव यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.

१ मौजें दाळिंब, तर्फ सांडस प्रांत पुणें येथील मोकासाचा अंमल फत्तेसिंग भोंसले राजे यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.

१ मौजें भवरापूर, तर्फ सांडस प्रांत पुणें येथील मोकासाचा अंमल रामचंद्र दामोदर यांनीं दिल्हा, तो सरकारांतून करार करून दिल्हा.

१०

सदरहू अन्वयें सरंजाम बहुत वर्षे इनामाप्रमाणें चालत आहे, त्यास आह्मांकडे वंशपरंपरेनें चालवावा. फौजेचा सरंजाम आह्मांकडे नाहीं. कलम.

१ इनामगांव व जमिनी व कुरणें, वगैरे चालत आहेत. कलम.

१ जहागिरी गांव व मोकासे वगैरे अंमलाचे याची वहिवाट आह्मीं करीत आलों. पेशवेसरकारची दखलगिरी नाहीं. कलम.

१ कुंपणीसरकारचा अंमल झाल्यापासून मोकासे वगैरे अंमलाचे देहे याचा ऐवज सरकार खजिन्यांतून पावतो. याजमुळें नुकसान झालें. सबब सरकारांतून मोबदला गांव दरोबस्त अंमलाचे लावून देण्याविषयीं हुकूम गौरनरसाहेब यांचा जाहला असतां गांव मिळत नाहीं. खजिन्यांतून ऐवज पावतो, त्यांत आमची नुकसानी आहे. यास्तव गांवचा हुकूम जाहला, त्याप्रमाणें दिलांत आणून मेहेरबानी करणें लायख आहे. कलम.

१ पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे, त्यास कंपेश तफावत काय ती वगैरे लिहून पाठवावी त्यांचीं उत्तरें:—

१ मजमुचा दरख आह्मांस छत्रपतीमहाराज राजे यांनीं दिल्हा. तो पेशवे सरकारांतून लढाईअखेर चालला. तोंपावेतों सर्व लोकांत लौकिक व सनदा पत्रें वगैरे सरकारचा जाबता होण्याचा आमचे हातून कायम राहून, परराज्यांतून जहागिरी गांव मिळाले व दरखसंबंधें हजारों रुपयांची प्राप्ती होती. ते अलीकडे कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून दरख चालत नाहीं, येणेंकरून सर्वोपरी कमती आहे. दरखसंबंधें महालीं, मुलुखी व संस्थानीं व सरंजामी यांजकडे वार्षिकाचा सालाबादी ऐवज येणें, तो तसाच राहिला; व सरंजाम आह्मांस थोडका, दरखाचें उत्पन्न मोठें. त्याजवर खर्चवेंच व कार्य प्रयोजनें व संभावितपणाप्रमाणें

खर्च होत होता. त्यास तें उत्पन्न राहिल्यामुळें देण्याचें खराबींत आहों. एवेशीं मेहरबानी करणें लायख आहे. कलम.

१ पेशवेसरकारांतून कारकून निसबतीचे यांस तैनात मोईन पावत होती. व महाली आसाम्या दरखी चालत होत्या. त्या कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून चालत नाहीं(त). सर्व लोकांस पेनशीली करून दिल्ह्या. आमचे कारकुनांचा बंदोबस्त जाहला नाहीं. पेशवेसरकारचे कारकिर्दींत मेहनत बहुत केली, असें असतां सर्व बराबर चालविलें नाहीं. त्यास सरकारांतून कारकुनांचें चालविणें लायख आहे. कलम.

१ कुंपणीसरकारांतून इदीचा पोषाख सालवार पावत होता तो पावत नाहीं.

१ संसार बेगमीस ऐन जिन्नस व गल्ला गांवचा व देशावरील आणावयाविषयीं व एक हजार मेंढरें याजविशीं माफीचीं दस्तकें पेशवेसरकारचीं आहेत. त्याप्रमाणें चालत नाहीं. तीं चालविलीं पाहिजेत.

१ मौजें निधोली, तर्फ चिमणखल प्रांत साकसें हा गांव आंगरे महा सवाई सरखेल यांनीं आह्मांस इनाम देऊन इनामपत्रें करून दिल्हीं. त्याप्रमाणें पेशवेसरकारचा उपराळा राहून लढाईअखेर इनामगांव बहुत वर्षे चालला. कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यापासून गांवचा वसूल आंगरे घेतात. एविशीं कुंपणीसरकारास समजाविलें असतां उपराळा होऊन चालत नाहीं. कलम.

—
५

सदरहूप्रमाणें उत्तरें लिहिलीं आहेत. त्यांजवरून समजोन घेऊन मेहेरबानी केली पाहिजे. तारीख छ २५ मोहरम सन १२४३ फसली.

ब.

साहेब मुषफक मेहेरबान करम फरमाय दोस्ता हेनरी ब्रौण साहेब बहादूर एजंट जिल्हा दक्षण सलमा हू.

छ अजीसाहेब जीवनराव नारायण मुजुमदार सलाम बादज सलाम अंकीं येथील खैरीयत तागायत तारीख १९ माहे दिजंबर सन १८५१ इसवीपावेतों जाणोन आपली शादमानी हरहमेषा कलमीं करून दिल आराम करीत असलें पाहिजे. दिगर मजमून आसाहेबाकडून तारीख २६ माहे आगष्ट सन १८५१ इसवीचें पत्र आलें; त्यांतील अभिप्राय कीं, सरकारचा हुकूम तारीख ३० जुलई सन १८५१ इसवीचा आल्यावरून कलमीं केलें जातें कीं, आपल्यास मरातब मुजुमदार पद आहे हें कधीं कोणत्या सबबीनें कोणाकडून प्राप्त जाहलें, याचा एकंदर खानदानीचा व पदवी थोरपणाचा इतिहास दाखलेनिशीं लिहून यावा; याबाबें लिहून आलें. व त्याजविषयीं इकडून लिहून जाण्यास आवकाश लागल्यामुळें दुसरें पत्र आ मेहेरबानाकडून तारीख ५ माहे दिसंबर सन १८५१ इसवीचे पहिलें

पत्राचें उत्तर पाठविण्याविषयीं आलें. ऐशीयास, श्रीमन्महाराज शाहू महाराज छत्रपती यांनीं सातार मुक्कामीं श्रीमंत राजश्री बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाई पदाचीं वस्त्रें सुरुसन आर्बा आशर मया व अलफ सन ११२३ फसली, सन १७१३ इसवी व १४ शके १६३५ माघ मास माहे जिल्काद यांत दिल्हीं. त्यासमयीं आमचे पणजे नारो गंगाधर यांस मुजुमदारीचें पद छत्रपती महाराज यांनीं देऊन वस्त्रें दिल्हीं, आणि पेशवे यांचे निसबतीस लावून दिल्हें. त्या दिवसापासून मुजुमदारीचें दरकाचें काम पेशवाईचे कारकिर्दींत आमचे पणजे नारो गंगाधर यांचे हातून चाललें; व त्यांचे पाठीमागें त्यांचे पुत्र निळकंठराव नारायण ह्मणजे आमचे आजे यांचे हातून चालले व त्यांचे पाठीमागें त्यांचे पुत्र नारो निळकंठ ह्मणजे आमचे तीर्थरूप यांचे हातून पेशवाईअखेर सन १८१७ इसवी, शके १७३९, या सालापर्यंत मुजुमूचें काम चाललें. असें मुजुमदारी दरकाचें काम सुमारें १०५ एकशेंपांच वर्षें आमचे वडिलोवडिलीं चालत आलें व त्याबाबें दरकाचें उपन्न येत होतें, व शिवाय जातीस सरंजाम व इनामगांव वगैरे सरकारांतून चालत आले आहेत. कुंपणी सरकारचा अंमल जाहल्यावर ते सरंजामी गांव व इनामी गांव वगैरे आमचे तीर्थरूप नारो निळकंठ यांजकडे कुंपणी सरकारांनीं चालविले. आमचे तीर्थरूप शके १७५५ चैत्र वद्य ५ माहे एप्रील सन १८३३ इसवी रोजीं कैलासवासी जाहले. सबब त्यांचे वडील पुत्र निळकंठ नारायण मयत. सबब त्यांचे पुत्र कृष्णराव निळकंठ ह्मणजे आमचे पुतणे यांचे नांवें सरकारांनीं जे आमचे तीर्थरूपाकडे कुंपणीसरकारांनीं चालविलें तें, वडील पुत्राचे पुत्र कृष्णराव सबब त्यांचे नांवें चालविलें. त्यांत निमेचे वारस आम्हीं आहों व त्याप्रमाणें विभागाची वहिवाट त्याप्रमाणें निमेची आमची चालत आहे. हें सरकारास दखल आहे. मुजुमूचें मरातब व मुजुमदारीचें पद आमचे वडिलांस सरकारांतून प्राप्त झालें, त्या दिवसापासून सरकारांत कागदीं आमचे वडिलांचीं निशाणें लागत गेलीं आहेत. तो बहुमान सर्व राखणें. आमचें सरकार समर्थ आहेत. ज्यादा काय लिहिणें प्यार मोहोबत असों दिजे, हे किताबत.

सही. जीवनराव नारायण मुजुमदार दस्तूर खुद्द.

## २४ मेहेंदळे.

### अ.

यादी कृष्णराव बळवंत ऊर्फ आप्पा बळवंत यांची वंशावळ सुरुसन सलास अशरीन मयातैन व अलफ.

मूळ पुरुष बहिरवभट मेहेंदळे हे हरिहरेश्वरास रहात होते. त्यांस पुत्र दोनः—

| | |
|---|---|
| वडील विश्वनाथभट | दुसरे गणपतराव मेहंदळे. यांस पुत्र तीनः— |
| विश्वनाथभट यांचा वंश. | १ वडील रामचंद्रराव ऊर्फ बळवंतराव. |
| बहिरोपंत मेहंदळे वगैरे. | १ दुसरा बाबूराव. |
| | १ तिसरे आनंदराव ऊर्फ बजाबा बाबा. |
| | ३ |

या तिघांचा विस्तार:— विश्वनाथभट व गणपतराव हे बाळाजी विश्वनाथ यांचे सख्खे बहिणीचे लेक. बाळाजी विश्वनाथ यांस सातान्याहून पुण्याकडे सुभ्याचे वगैरे मसलत सांगितली, तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांनीं, गणपतराव हे भाचे, यांस हरिहरेश्वराहून बहिणीसुद्धां आणिलें. तेव्हां विभक्त होते. पुढें बाळाजी विश्वनाथ यांनीं आपले बहिणीस चोळीस एक गांव मौजें खोर, तर्फ पाटस प्रांत पुणें हा इनाम दिल्हा, आणि गणपतराव यांस पागेचे घोडें देऊन बाळगिलें. कसबें सासवड येथें जमिनी वगैरे इनाम दिल्या व घर बांधावयास तेथें जागा दिल्ही. गणपतराव यांस रामचंद्रराव ऊर्फ बळवंतराव यांनीं थोरले बाजीराव साहेब यांजवळ राहून चाकरी कडप्याची व शिरे मंदगिरी (?) टिपूचे मुलखांत दोन स्वाऱ्या मोठ्या केल्या, व आणखीही स्वाऱ्यांची चाकरी चांगली केली. तेव्हां जातीचे सरंजामास पंचेचाळीस हजारांचे गांव व शागीर्दपेशा चार हजार, एकूण एकूण-पन्नास हजारांचा सरंजाम दिल्हा. पुढें नानासाहेब यांनीं बळवंतराव यांजकडे इतलाखी स्वार दोन चारशें दिल्हे. त्यांची फडणिशी आमचे चुलत आजे बाळाजीपंत यांस दिली. बळवंतराव लढाईत पानपतास पडले. त्यांचे चिरंजीव कृष्णराव त्यांस आप्पा बळवंत ह्मणत होते. त्यांनीं उत्तरोत्तर दौलत मिळविली. स्वाराचा सरंजाम दोन लक्षांचा दिला व जातीस तैनात आणखी पंचवीस हजारांची नेमून गांव नेमून दिल्हे. पेशव्यांनीं स्वाऱ्या केल्या तितक्याबरोबर आप्पा बळवंत यांनीं व फौजेनीं कामें चांगलीं केलीं. चौघडा दिला. कृष्णराव यांस औरसपुत्र दोघे होते. ते वीस वीस वर्षांचे होऊन मृत्य पावले. त्यांस संतान नाहीं. तेव्हां आप्पासाहेब मेल्यावर हल्लीं बळवंतराव आहेत, हे दत्तक घेतले. त्यांजकडे दौलत सरंजामसुद्धां चार वर्षे चालली. पुढें दहा पंधरा हजारांचे गांव ठेवून सारी जप्ती बाजीराव पेशव्यांनीं केली. याप्रमाणें मजकूर. दुसरे बाबूराव त्यांचें नक्कल. तिसरे आनंदराव त्यांस बजाबा ह्मणत होते. त्यांस गणपतराव ऊर्फ बापू मेहेंदळे हल्लीं आहेत. आप्पा बळवंत यांस वाडा व पागा वगैरे बांधावयास जागा पुण्यांत दिली. तेथें मोठ्या इमारती त्यांनीं बांधिल्या. याप्रमाणें विस्तार तपशिलवार छ २४ सवाल.

ब.

यादी राजश्री गणपत आनंदराव मेहेंदळे सुरुसन आर्बा सलासीन मयातैन व अलफ. आसाहेबी तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें खत पाठविलें. त्यांत मजकूर, हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे, त्याची वाकबगारी व्हावी म्हणून कलमीं केलें जातें जें:—आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील, आपली खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर जाहला तें, व जातीस सरंजाम आपले वडिलोपार्जित चालत आहे तो, कोणते तारखेस

सरंजाम कोणीं दिल्हा व कोणी संपादन केला, हें लिहिण्यांत यावें. त्याजवरून लिहिण्यांत मजकूर येतो बितपशील:— कलमें.

१ आमचे आजे गणपतराव बहिरव यांनीं बाळाजी विश्वनाथ यांची चाकरी केली. त्यांनीं त्यांस तैनात जातीस करून दिल्ही. नक्त रुपये ८९०७॥ व गांवही दिल्हा व जमिनी दिल्ह्या. त्यांचा आप्तपणाही होता. शके १६३५. गणपतराव आमचे आजे यांस पुत्र तीन. कनिष्ठ पुत्र आनंदराव गणपत ते आमचे तीर्थरूप. व त्यास कन्या एक होती. ती नाना फडणीस यांची मातुश्री. कलम.

१ आमचे आजे कैलासवासी जाहल्यावर त्यांचे नांवें चालत होते त्याप्रमाणें आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत यांचे नांवें पेशवेसरकारांतून करार करून देऊन बहाल केलें, व ज्यास्ती खानदेशचे गांव नवीन दिल्हे. कलम.

१ आह्मीं आमचे वडील असतां माधवराव नारायण यांचे कारकिर्दींत सरकारचीं कामें-काजें रामचंद्र गणेश यांजबरोबर केलीं. याजमुळें आह्मांस निराळी तैनात सरकारांतून करून दिल्ही. नक्त रुपये २६०० व गांवही दिल्हा. कलम.

१ आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत शके १७११ चें सालीं कैलासवासी जाहल्यावर सरकारांतून माधवराव नारायण पेशवे यांनीं, वडिलोपार्जीत तैनात वगैरे जमिनी व गांव चालत होते ते, व आमचे नांवें करून दिल्हे होते ते, दोन्ही एकत्र करून आमचे नांवें सनदा करून दिल्ह्या व कर्नाटकांत आमचेबरोबर फौज व पायदळ देऊन परशरामभाऊ पटवर्धन तासगांवकर यांस कुंपणीसरकारचे मदतीस देऊन टिपूवर पाठविलें. त्या समागमें आह्मीं जाऊन सरकार कामागिरीही बजाविली. कलम.

१ शके १७१८ सालीं बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दींत श्रीमंत यांनीं लढाईअखेर पेशजीं चालत होतें त्याप्रमाणें चालविलें. नक्त नेमणूक पावत होती, ती पावली नाहीं. परंतु आह्मांस गांव दोन नवीन दिल्हे. कलम.

१ शके १७३९ चें सालीं कुंपणीसरकारचा अंमल कार्तिकमासीं जाहल्यावर शके १७४० चें सालीं कुंपणीसरकारांतून बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दींत आह्मांकडे गांव व जमिनी वगैरे चालत होते, त्याप्रमाणें बहाल करून चालते केले. बितपशील:—

१ खेरीज तैनात इनामाप्रमाणें:—

१ मौजें सुरपान व मौजें हहरूण, परगणे भाकरे प्रांत खानदेश गांव २ खेरीज मोकासा करून तनखा कमाल रुपये १८१६॥.

१ मौजें खेर, तर्फ करेपठार हा गांव निमे तनखा रुपये ६२२.

१ कसबें सासवड, येथील जमिनी बिघे.

१ मौजें मुंजेरी, तर्फ हवेली येथील जमीन रुक्के २। आकार रुपये १३॥.

१ मौजें बाभुळसर खुर्द, परगणे कर्डे हा गांव दरोबस्त आमचे आजे यांनीं मिळविला. तनखा रुपये १८१४।.

१ मौजें पाधवडी, परगणे इंदापूर तनखा रुपये १६००.

१ मौजें शिवें, तर्फ वाडे हा गांव मोकासा खेरीजकरून तनखा रुपये ८००.

१ मौजें कानपोली, तर्फ तळोजे प्रांत कल्याण तनखा रुपये ३२०.

१ मौजें खेराणें, येथील नेमणूक नक्त रुपये ६३॥.

१ मौजें पूर, तर्फ करेपठार येथील जमीन आकार रुपये १२॥.

१ तांदुळ तालुके नेरळ पैकीं नेमणूक खंडी २.

१ पेणचे बंदरीं नेमणूक मिठाची केली खंडी ६.

२ कुरणें.

  १ मौजें देवळी.

  १ मौजें भिंवडी.

  २

१ दसऱ्याचा पोषाख आंख ३५०.

१ दस्तकें तांदुळ व मीठ वगैरे माफीचीं.

येणेंप्रमाणें आह्मांकडे आजपावेतों कुंपणीसरकारांतून चालविलें आहे. दरम्यान समशेनसाहेब यांनीं शके १७४८ चें सालीं मौजें कानपोली, हा गांव व खेरणें येथील नेमणूक व तांदूळ व मीठ महकूब चार कलमें केलीं, व बाकी आह्मांकडे चालत आल्याप्रमाणें चालत आहे. चार कलमें आह्मी असतां सरकारांतून महकूब करूं नये असा कायदा असतां जाहलें. तरी साहेबीं मेहेरबानी करून चारी कलमें खुलीं करावीं किंवा त्याचे मोबदला द्यावें. कलम.

येणेंप्रमाणें खानदानीची कैफियत लिहिली आहे. ही खावंदांनीं दिलांत आणून आजपावेतों आह्मांकडे पुस्त दरपुस्त चालत आलें, त्याप्रमाणें पुढेंही चालविलें पाहिजे. तारीख २ सफर.

क.

साहेब मुषफक मेहेरबान साहेब जान वार्डीन साहेब बहादूर डिपूटी एजंट जिल्हा दक्षण सलमा हू.

.छ अजिदिल येखलास दोस्त गणपत आनंदराव मेहेंदळे बाजत सलाम अंकीं येथील खैर सला जाणून आपली शादमानी हमेषा कलमी करीत जावी. आपण पत्र तारीख ८ माहे सपटंबर सन १८३२ इसवीचें पाठविलें. त्यांत लिहिलें जे, हजरत बंदगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षणेंतील जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी. ह्मणोन कलमीं केलें जातें जें, आपण मेहेरबानगी

करून सरकारांत रवाना करण्याकरितां कैफियत लिहून पाठविली पाहिजे. दिगर आमचे आजे गणपतराव बहिरव मेहेंदळे कारकीर्द श्रीमंत बाळाजी विश्वनाथ पेशवेसरकार यांजपाशीं व यांचे चिरंजीव बाजीराव बल्लाळ व चिमणाजी आप्पा थोरले, यांजबरोबर चाकरी केली व कामेंकाजें बहुत केलीं. तेव्हां सरकारांतून हत्ती दिला. गणपतराव यांस पुत्र तीन व कन्या एक. वडील पुत्र बाबुराव यांस पुत्र नाहीं. दुसरे पुत्र बळवंतराव यांस पुत्र कृष्णराव. त्यांचे पुत्र बळवंतराव. हल्लीं तिसरे आनंदराव यांस पुत्र गणपतराव हल्लीं कन्येचें नांव रखमाबाई त्यांचे पुत्र नानाफडणीस. आमचे आजे गणपतराव हे श्रीमंत नानासाहेब पेशवे यांचे कारकिर्दीत कांहीं दिवस होते. पुढें कैलासवासी जाहले. नंतर त्यांची तैनात व स्वार वगैरे चालत होते ते आमचे तीर्थरूप आनंदराव गणपत यांचे नांवें सरकारांतून करून दिल्हे. पुढें श्रीमंत भाऊसाहेब पेशवे पाणिपतचे स्वारीस गारद जाहले. पुढें कांहीं दिवसांनीं श्रीमंत नानासाहेब कैलासवासी जाहले. पुढें श्रीमंत माधवराव बल्लाळ यांची कारकीर्द अकरा वर्षे जाहली. पुढें कैलासवासी जाहले. नंतर त्यांचे बंधु श्रीमंत नारायणराव बल्लाळ यांची कारकीर्द एक वर्ष जाहली. नंतर कैलासवासी जाहले. पुढें श्रीमंत रघुनाथ बाजीराव दादासाहेब यांची कारकीर्द श्रीमंत सवाई माधवराव यांचा जन्म पुरंदरीं होई तों पावेतों जाहली. आमचे तीर्थरूप सुद्धां आह्मी हुजूर वागत होतों. पुढें कारकीर्द श्रीमंत माधवराव नारायण किल्ले पुरंदर येथील मुक्कामीहून रामचंद्र गणेश यांचे समागमें करवीरचे स्वारीस आम्हांस सरकारांतून रवाना केलें. कांहीं बरोबर स्वार दिले. आमचे तीर्थरूप हुजूर होते. आम्हांस जातीस व पालखीसुद्धां तूर्त रामचंद्र गणेश यांनी नेमणूक करून दिल्ही. ते रुपये ४२०० बेताळीशें. त्या स्वारींत आमचें कामकाज पाहून हत्ती अंबारीसुद्धां आम्हांस दिल्हा. पुढें सरकारांत हुजूर चाकरी करीत होतों. त्यानंतर आमचे तीर्थरूप शके १७२१ त कैलासवासी जाहले. तेव्हां तीर्थरूपांची तैनात व स्वार वगैरे जे चालत होते ते, व आमचे नांवें नेमणूक जाहली होती ती, मिळून आमचे नांवें सरकारांतून करून दिल्ही. नंतर सरकारांतून इंग्रज बहादूर यांचे कुमकेस श्रीरंगपट्टणचे स्वारीस परशरामभाऊ पटवर्धन यांस फौज देऊन रवाना केलें. त्यांचे समागमें आह्मांस दोन हजार स्वार नेहमीं असावे, असा ठराव होऊन आम्हांस रवाना केलें. धारवाडचे मुक्कामीं किल्ल्यास मोर्चे लावावे, असें सिद्ध झालें. त्यावेळेस अजम लिटलीन (क्याप्टन लिटल ?) साहेब यांनीं भाऊंस सांगितलें कीं, दोन सरदार यांनीं पुढें अंमल बसवीत जावा. मग आपण मोर्चे लावावे. याप्रमाणें ठरोन भाऊंचे चिरंजीव रामचंद्रपंत आप्पा यांस हानालीचे वगैरे रोखें रवाना केले व आम्हांस सवदे बिदनूर प्रांतीं बरोबर तोफा व तीन हजार गाडद हुजूरची व नामजाद मावळे लोक दोन हजार व कानडे लोक पांच हजार देऊन रवाना केलें. तिकडे आह्मांकडून कामेंकाजें काय जाहलीं तीं भाऊंस माहीत होतीं. ते कैलासवासी जाहले. परंतु श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचें पत्र आम्हांपाशीं आहे तें पहावें. ह्मणजे साहेबांचे दिलांत येईल. भाऊ श्रीरंगपट्टणास गेले.

समागमें आह्मी होतों. तह जाहल्यावर फौजेसुद्धां तासगांवास माघारे आलों. तेथून भाऊंचा निरोप घेतला. निरोपसमयीं आम्हांस वस्त्रें व हत्ती बहुमानाचा देऊन निरोप दिल्हा. मग आम्हीं पुण्यास आलों. आल्यानंतर श्रीमंत सवाई माधवराव यांची कारकीर्दीअखेर होई तों पावेतों हुजूर होतों. पुढें श्रीमंत चिमाजी आप्पा यांस सवाई माधवरावसाहेब यांचे पुत्र जाहले. त्यांची कारकीर्द नऊ दहा महिने जाहली. पुढें श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब आले. यांचे कारकिर्दींत आम्हांस नक्त नेमणूक पावली नाहीं. गांव, बागा व शेतें व कुरणें मात्र आम्हांकडे चालविलीं. पुढें कुंपणीसरकारचा अंमल जाहल्यावर श्रीमंत बाजीरावसाहेब यांनीं चालविल्याप्रमाणें कुंपणीसरकारांतून गांव व बागा व शेतें व कुरणें चालविलीं. त्यापैकीं मौजें कानपोली हा गांव दरोबस्त व मौजें खेरणे येथील नेमणूक मिळोन रुपये ३८३॥· तर्फ तळोजे तालुके नेरळ प्रांत कल्याण व तांदुळ बारीक कैली खंडी २ दोन तालुके नेरळ-पैकीं हे आम्हांकडे सात आठ वर्षे कुंपणीसरकारांतून चालविले असतां आम्हांकडून कोण-तेंही अंतर पडलें नाहीं. असें असतां अजम समशेनसाहेब कलेक्टर सुभा साष्टी उत्तर प्रांत कोंकण यांनीं जप्त केलें आहे. त्यास आसाहेबांनीं कोणाचें कमी केलें नाहीं, त्यापेक्षां आम-चेंही कमी करूं नये. याउपरी मर्जी खावंदाची. साहेबीं पत्रांत लिहिलें कीं, शक, मित्या लावून लिहून पाठवावें. त्यास होळकर दंग्यांत कागदपत्र गहाळ जाहले. याजमुळें शक, मिती लागली नाहीं. जी वहिवाट जाहली ती जातीनें स्मरणानें लिहिली आहे. व पेशवे-सरकारांतून इस्तकबिल कारकिर्दी तागायत अखेरकारकीर्दीपावत आलें त्याची याद आलाहिदा पाठविली आहे. व हल्लीं कुंपणीसरकारांतून पावत आहे तेंही यादींत लिहिलें आहे. त्याजवरून खावंदास कळेल. ज्यादा काय लिहिणें, हे किताबत.

ड.

यादी राजश्री बळवंतराव कृष्ण मेहेंदळे सुरुसन सलास सलासीन मयातैन व अलफ. आसाहेबीं तारीख ८ माहे सपटंबरचें खत पाठविलें आहे. त्यांत मजकूर हजरत बंदेगानअली रैट हनराबल गौरनर कौंसल चाहत आहेत कीं, दक्षिणेंतलि जहागिरदार लोक यांची कैफियत कशी आहे त्याची वाकबगारी व्हावी ह्मणोन कलमीं केलें जातें जें, आपण मेहेरबानी करून सरकारांत रवाना करण्याकरितां थोडके मजकुरांत कैफियत लिहून पाठविली पाहिजे. त्यांतील तपशील:—आपले खानदानीची बढती व कोणते तारखेस खानदानीचा लौकिक महशूर झाला तें व फौज व सरंजाम आपले वडिलांकडे चालत होता तो, व सदरहू सरंजाम कोणते तारखेस दिल्हा ती तारीख, व आपले जहागिरीचे वहिवाटींत पेशवेसरका-रांतून कोणते तऱ्हेनें दखलगिरी केली तें, व आपलेकडे हल्लीं सरंजाम काय चालत आहे व पेशवेसरकारांतून आपली मातबरी चालत होती, व हल्लीं कुंपणीसरकारांतून चालत आहे त्यांत कंपेश व तफावत काय आहे तें, वगैरे यादींत दाखल करून रवाना केलें पाहिजे त्याजवरून इकडील मजकूर लिहिण्यांत येतो बितपशील:—

देसाई प्रमाणें राज्य केलें. एकूण देहे, एकूण वर्षे पस्तीस यांत अंमल जाहले. त्याचा तपशील वर्षे:—

३ अली आदिलशा पादशाहा अंमल वर्षे १६ पावेतों.

१४ सुलतान शिकंदर पादशाहा अंमल १४ पावेतों.

१८ आलमगिरी पादशाहाचे अंमल ३३ पावेतों.

३५

१५ नरसप्पा नाईक देसाई गुडद तिमप्पाचे पुत्र यांनीं अनुभव केला. इस्तकबील शके १५६१लागाईत १५७६ पर्यंत. यांत अमल आलमागिरी बादशाहा वर्षे ३३ पैकीं पंधरा सदरहू अमल चालवीत असतां, मध्यें गुलदगुडकरांनीं किरकोळ उपद्रव केले होते. तरी पुण्योदयेंकरून कांहीं जाहलें नाहीं. दौलत यथासांग सुरक्षित चालली. वर्ष.

१७। विजापूर पादशाहाची व मोंगलांची लढाई बहुत विजापूरप्रांतीं होऊन तेव्हां अनुभव केले तपशील.

१७ मुरारी नाईक देसाई यांनीं अनुभव केले. इस्तकबील शके १५७६ लागाईत १५९३ मिनहू वडील दर्जा चालत आल्याप्रमाणें दरोबस्त चालत आले. अनभविलीं वर्षे.

·।· कदंब नाईक देसाई यांनीं तीन महिने दौलत सदरहूप्रमाणें दरोबस्त केली.

१७।

३४।।। अंमल मोंगलाई. विजापूर पादशाही मोडून मोंगलाई जाहली.

२५ हिरपावडी नाईक देसाई याचा अनुभव वर्षे इस्तकबील शके १५९३।. लागाईत शके १६१८।. मिनहू सदरी वडिलांनीं अनुभव केला.

·।।· रामचंद्र नाईक देसाई यांनीं, वडिलांनीं अनुभव केलेप्रमाणें नऊ महिने दौलत केली. इस्तकबील १६१८।. लागाईत शके १६१९ परीयंत.

९ आचेप्पानाईक देसाई यांनीं वडिलाप्रमाणें अनुभव केले. इस्तकबील शके १६१९ तागाईत शके (१६२८).

३४।।।

५१ अमल सावनूर नवाब यांची वर्षे.

२० अमल पेशवे.

१२ बेदर नवाब याचे अमल इस्तकबील १६९९ लागाईत शके १७११ मिनहू.

२८ अमल पेशवे.

२ अमल कुंपणी हल्लीं घेणेचें खुद्द कृष्णव्वा देसाईणी इस्तकबील शके १७३९ लागाईत १७४१ मिनहू पेशवे याचे अमलांत चालत आल्याप्रमाणें अनुभवून आहे.

येणेंप्रमाणें दोनशें सहेतालीस वर्षे सालवार अमलवार चालिलें. कैफियत लिहून दिल्ही असे. तारीख छ माहे आगस्ट.

---

## ३ नंदगडकर सरदेसाई.

कैफियत सन १२३१ फसली विषुनाम संवत्सरें माहे आक्टोबर छ १० रोजीं जयंतीबाई व्यंकटाद्री श्रीनिवास बहादूर देसाई व देशकुळकर्णी व नाडगौडा परगणे गदग व रौडकुंदा सरदेसाई परगणे शिदनूर व नाडगौडा किल्ले बदामी व नाडगौडा देशकुळकर्णी संमत कलकेरा यांनीं लिहून दिल्ही कैफियत पैकीं वेंकटपैया यांनीं सन ११८९ फसलींत दौलती गादीवर बसल्यावर मोहीम वगैरे केल्यापासून सन १२२९ फसलीपरीयंत कैफियतीचा उतारा:—

१ हैदर अलीखान नवाब याची पत्यांत असून मुदतपासून चालल्याप्रमाणें संस्थान कायम राखून घेऊन सिरणी सरकारास देणेचा साल बसाल ३२५०० साडेबत्तीस हजार रुपये देऊन आठ वर्षे संस्थानचा अविच्छिन्न उपभोग केला. कलम.

१ सन ११९६ फसली पराभव सवत्सरांत टिपुसुलतान याची आमदानी होऊन धांदल होऊं लागली. सबब वेंकपैयांनीं स्थल सोडून कृष्णा नदीपलीकडे श्रीमंताचे मुलुकांत जाऊन रहात असतां. टिपूसुलतान यांनीं डबल किल्ला ठाणें घेऊन संस्थान दरोबस्त सरकारांत जप्तीस ठेविलें. ते ( कांहीं ) वर्षे सुलतान याजकडेस संस्थानावर जप्ती अंमल बसला होता. नंतर श्रीमंतांकडून राजश्री परशरामपंत भाऊ यांस साहेबसुभा होऊन जरीपटका फौजसुद्धां टिपुसुलतानास मोडावयाकरितां कर्नाटक धारवाड मोहीम केली. त्यावेळीं सदरी वेंकपैयांनीं पुणें मुक्कामीं आपले संस्थानचा मजकूर जाहीर करून, श्रीमंत माधवरावसाहेब यांचें पत्र राजश्री परशरामपंतभाऊ यांस घेऊन आले कीं, डंबलकर यांचें संस्थानाचें टिपूसुलतानानें जबरदस्तीनें ठाणें घतलें आहे ते तुह्मी देसाई यांचे अंमल बसवून देणें ह्मणोन पत्र दिल्हें. बदस्तूर धारवाडचे सालीं स्वारींत कर्नाटक मुलुकाचे बंदोबस्त होऊन टिपुसुलतान यासी काबीज करून मोहीम फत्ते करून स्वारी परते तोंपर्यंत स्वारीत असून सदरहुप्रमाणें आमचें संस्थान आम्हांस सुपूर्द करून द्यावें असें वेंकपैया देसाई याचे बोलणें होत असतां, भाऊसाहेब यांनीं पैक्यावर नजर ठेवून अडी घातली कीं, पुणें मुक्कामीं जाऊन मसलती खर्चाची तोडी जाहल्यावर संस्थान तुह्मांसी दुमाला होईल. अजूनपर्यंत दरोबस्त महाल आपल्या खाजगीकडे ठेविले आहेत. येविशीं श्रीमंताचे हुजूर तुमचा जाबसाल होऊन मग स्वाधीन होईल. असें बोलून पुण्यास स्वारी जात असतां, बरोबर वेंकपैयांनीं आपले कारभारी यांस पाठवून खुद्द आपण कुरुंदवाडास राहिले.

पुणें मुक्कामीं जाबसाल संस्थानसंबंधीं लौकर न होतां मुलतमेस पडले. सबब तूर्त पोटगी-खर्चाबद्दल चालवावें यासारखे आज्ञा व्हावी. मागाहून संस्थान दुमाला करून देववावें म्हणोन हुजूर विनंती करीत असतां, पंधरा हजार रुपयेची खर्चासीं सरंजामी नेमणूक बेहडा जाहला. बदस्तूर आठ दहा वर्षे नगदी ऐवज सदरहू नेमणुकीप्रमाणें घेऊन कुरुंदवाड मुक्कामीं वेंक-पैया होते. कलम.

१ सन १२१० फसली रौद्रीनाम संवत्सरें सुरुसन इहिदे मयातैन व अलफ पेशवाईंत पुणें मुक्कामीं धांदल पडले समयीं वेंकपैया देसाई यांनीं संस्थानचे जाबसाल ठेपेस न लागे, सबब त्रास होऊन कुरुंदवाडास राहिले. तें समयीं कर्नाटकांत धोंडजी वाघ यांनीं गदग वगैरे ठाणीं घेत होता. त्यासी कुमक करून घेऊन आपलें डंबलचें ठाणें आपण गाढून घेऊन, तीन महिने साबक बदस्तूर दौलत उपभोग करून राहत असतां, हजरत जरनेल वसलीसाहेब बहादूर याची स्वारी वाघ याचें पारिपत्य करावयास येती जाहली. त्या समयीं बापूसाहेब गोखले वगैरे यांणीं देसाईवर दाव्यानें नाहींत गैरवाका वसलीसाहेबास समजावून वाघ याचे खजिना व कारभारी डंबलांत आहे ऐसें गैरवाका सुनावणी करीत असतां, साहेब मौसुफ यांणीं फौजेसह डंबलास येऊन हल्ला करून ठाणें घेतलें. सदरहू गैरवाकाप्रमाणें वाघ याचे निसबतीचा खजीना मोकसर केला. कोणी डंबलांत नव्हते. नाईक दोषारोपण होऊन अनाहूत जाहला. तेव्हां किल्ल्यांत वेंकपैया देसाई हे होते. त्यांसी धरून गळीं दिल्हें. ते गर्दी जाहले. सन १२१० फसली रौद्रीनाम संवत्सर. कलम.

१. सन मजकुरीं हजरत वसलीसाहेब यांनीं नरगुंदच्या मुक्कामीं वाघ याचें पारपत्य करून, मोहीम करून परतून जातावेळेस संस्थाननिसबत कारकून भिमराव यांणीं लष्कर-मध्यें जाऊन राजश्री विष्णोपंत बदामी याचे विद्यमानें साहेबास भेटून अर्ज करून घेतले कीं, आमचे बहुत कदीम जमीदारी संस्थान आसाहेबांनीं उद्धार करून, पुढें काय हुकूम करणें तें करून, मामूलपासून चालले ते दौलत कायम करवितां, अर्थ करावें. ह्मणून बहुत प्रकारें अर्ज करीत असतां, साहेब मोसुफानें मेहेरबान होऊन देसाई मेला त्याचे बायकांस पालक बेटा करून घेऊन, मामूलप्रमाणें तुमचें संस्थान तुम्हीं करून घ्यावें असा हुकूम करून साहेबाची स्वारी गेली. त्या उपरांतिक भिमराव यांनीं वेंकपैयाची बायको मथुराबाई देसा-इण इजपाशीं येऊन सदरहू मजकूर समजाऊन पूर्वापर संस्थान रिवाज चालत आल्या-प्रमाणें देसाई याची भाई बिरादर याचे लेकास पांच सहा वर्षे उमरच्या मुलास पोषणा आणविलें. ते मथुराबाई देसाईण पोषण पुत्र करून त्यासी दत्तविधान हिंदूंच्या मर्यादानुसार विधान करून सिनपैयास पालक बेटा केला. ते सन १२११ फसली दुर्मुखीनाम संवत्सरें सुरुसन इसन्ने मयातैन व अलफ. कलम.

१. सन १२११ फसली सुरुसन इसन्ने मयातैन व अलफ दुर्मतीनाम संवत्सरांत सिनपै-या व मथुराबाई यांनीं भिमराव तिमाजी याजकडे संस्थानचा कारभार सारा सोंपून देऊन

आपण डंबळ संस्थान दौलती गादीवर बसून, उपभोग करून मोहीम वगैरे करून वतन इनाम संपादन केल्याचा वगैरे तपशील. . कलम.

१ बापूसाहेब गोखले यांनीं सावनूर प्रांत सरसुभांत असतां बाबासाहेब पटवर्धन यांनीं दहा बारा हजार फौजेनिशीं येऊन सावनुरास वेढोन, गोखले यांसी लढाईंत शिकस्त करून, किल्लेंत कोंडून जेर केलें असतां, आह्मांस गोखले यांनीं पत्र लिहून दिल्हें जेः—या मसलतीस तुह्मीं फौजबंदी वगैरे सर्वविशीं कुमक केले पाहिजे ह्मणोन कित्येक प्रकारें निरोपून राजश्री गोविंदपंत तात्या यांसी डंबलास पाठविलें. त्या समयीं आमचे कारभारी भिमराव यांणीं फौज भरती करून, दोन हजार स्वार व पायदळ तीन हजारनिशीं सावनुरास जाऊन बाबासाहेबाचे फौजेस लढाई करून ठाणेंत जें साहित्य कंपेस पडले तें काफले पुरवणी करून तीन महिने सदरहू गोखले याजबरोबर मसलतीस मदत पुरविली. त्या वेळीं लाख रुपये पदरचे खर्च करून कामकाज बजावून, गोखले यांची दौलत काइम राहतेसे पुरवणी करून दिल्यावर, गोखले यांनीं बहुतच खुष होऊन, आपली दौलत तुमचे योगानें काइम राहिली असें तारीफ करून, हत्ती बक्षीस बहुमान वस्त्रें वगैरे देऊन, डंबल संस्थान प्रकरणें बहाल सनदा आपले तर्फे करून देऊन पत्र दिल्हें. हे बजिन्नस हजर आहे. सदरहू मोहीम केली ती सन १२१२ फसली सुरुसन सलास मयातैन व अलफ दुंदुभीनाम संवत्सरें. कलम.

१ मोंगलाईंत मीर अलम बहादर याजपाशीं कितेक कामकाज करून, त्याची मेहेर संपादून, कोपल तालुके कलकेरा समत आम्हांकडे सुपर्द करून घेऊन, इस्तकबिल लागायत सुभा मजकुरचे वहिवाट करीत असतां, याजबद्दल कोपल तालुके मामलेदार नागनाथराव म्हणणार यांनीं हरएक प्रकारें गैर करून लढाई सुरु करूं लागले. त्या समयीं आमच्या मुलकाची व त्याचे मुलकाची बहुत खराबी जाहली. त्यानंतर हैदराबाद सरकारांतून पेशजीपासून चालल्याप्रमाणें आम्हांकडे कलकेरा तालुका कायम असावा हा ठराव जाहला. तधीपासून आम्हांकडे वहिवाटलेला तालुका सरकारांत हल्लीं दाखल जाहला आहे. सदरहु तालुका आपणाकडे जाहला तो सन १२१४ फसली. कलम.

१ कलकेरी इलाखा मोंगलाई येथें जमीदारयांसीं व सरकारासीं बिघाड पडले समयीं, उभयपक्षीं जे कुमक करणें ते करून, मसलतीस पुराविल्यासमयीं मोंगलाई तालुक्यापैकीं हालकेरा वगैरे इनाम गांव नवीन संपादिले. ते हल्लीं सरकारांत दाखल आहे. सदरीं गांव संपादिले, सन १२१७ फसली सुरुसन मयातैन व अलफ. कलम.

१ श्रीमंत राजश्री बाजीराव साहेबांची स्वारी कर्नाटकप्रांतीं जाहले समयीं, आमचे कारभारी भिमराव स्वारीसह मुक्कामीं जाऊन श्रीमंतांची भेट घेऊन सन्मान, बहुमान वस्त्रें घेतलीं. कर्नाटकाची मोहीम श्रीकुमार स्वामींचें दर्शन घेऊन, श्रीमंतांची स्वारी परतोन पुण्यास जाई तोंपर्यंत, स्वारी बरोबर आह्मीं आपले फौजेनिशीं रुजू राहून, श्रीमंतांची मर्जी बहुत

सुप्रसन्न करून घेऊन सदाशिव माणकेश्वर यांनीं निरोप देवविला. यानंतर स्वस्थळास येऊन संस्थान अनुभव करून घेऊन, सालाबादी पेषकश साडेबत्तीस हजार रुपये देऊन सन १२२० फसली सालपर्यंत दौलती गादीवर डंबलास होतों. कलम.

१ त्यानंतर सन १२२० फसली सुरुसन इहिद्दे अशर सालीं बापू गोखले यांनीं नवलगुंदास लेकाचें लग्न करावयानिमित्त फौज वगैरे सरंजामींसह पुण्याहून निघोन आले. ते नवलगुंदास येऊन चिरंजिवाचें लग्न केलें. मग आमचे कारभारी भिमराव यांस कृत्रमपणानें मसलत सांगून, भुलथापेस घालून एकाएकीं गफलतीनें गदग मुक्कामीं कैद केल्याचें कारण जें:—आपल्या पट्यांतील जमीदार यांनीं श्रीमंतांपाशीं भेटून, वस्त्रें व खडी ताजीम घेतली. त्याची इतःपर बदनी श्रीमंतांपाशीं जाहल्यास आपल्यासी बदलतील. ऐसी कितेक प्रकारें तजवीज करून आकसकासीनें गोखले यांनीं भिमराव यास कैद करून, बंदीस सवंदत्ती किल्लेवर घालून, डंबलास फौजेसुद्धां बापूसाहेब गोखले याची स्वारी येऊन डंबल किल्लेस वेटा घालून, जबरदस्तीनें संस्थान निसबतचे दरोबस्त वतनी उमली गांव वगैरे ठाणीं घेऊन, खर्चापुरता सरंजाम पंधरा हजार रुपये खुद्द खर्चास व भिमराव यांचे बंधु व लेकास चार हजार रुपये व कारकुनास दीडशें मार जमीन येणेंप्रमाणें नेमणूक बेहडा करून देऊन, सोरटुरास आणून ठेविलें. तो सन १२२० फसली सुरुसन इहिद्दे अशर मयातैन व अलफ. कलम.

१ सन १२२० फसलीपासून सिनपैयांनीं सोरटूर येथें राहून सदरहू खर्चाचे नेमणुकीप्रमाणें अनुभव करीत राहिले. तेव्हां बापसाहेब पुण्यास जाऊन डंबल संस्थानचें ठाणें आपण घेतलें आहे, त्या महाल सरंजामास फौजेच्या खर्चाबद्दल सरंजाम देववावे असें श्रीमंतांसी समजाविलें. त्यावेळीं राजश्री चिंतोपंत देशमुख यांनीं उत्तर सांगितलें कीं, जमीदारी वतन हरण करायाचें नव्हे. देसाई मजकूर यांनीं नजर कबूल करून, ज्या वेळेस सरकारास रुजू होतील, तेव्हां सरंजाम दूर केले जाईल. असें उत्तर करून सरंजामी मखलासी ठराव होऊन याप्रमाणें कलमें मखलासींत उगविले आहे. यानंतर भिमराव यांनीं अंतरंगीं संस्थान प्रकर्णीं परभारें श्रीमंताकडे संधान भेट केली. ते बातमी गोखले यांसी लागली. आणि सदाशिव माणकेश्वरही डंबल निसबत भिमराव यांस हुजूर आणविणेचें आहे, ऐसें गोखले यास सांगतांना दचक खाऊन, ते हुजूर आले असतां, आपले अपायासी कारण होईल ऐसें ध्यानीं आणून भिमराव यासी जिवानिशीं मारावें असा बेत करून सवंदत्ती मुक्कामीं विष घालून ठार मारविलें. तत्क्षणीं भिमराव ब्रह्महत्या होऊन गोखलेचे लेकास लागले. तर्धीपासून गोखले यांचे लेकास ब्रह्महत्या समंध लागला. निर्वंश करतों ह्मणोन रोजरोजीं आपले आपण गोखले बाबासाहेब उच्चार करीत होते. अलीकडे आह्मीं श्रीमंतांपाशीं आपले संस्थान प्रकरणीं रदबदल करावें, तरी गोखले यांनीं सदरहू भिमरायास मारविल्याप्रमाणें आम्हांसही मारवितील ह्मणोन जिवाचे आशेनें “ जीझं

भद्राणि पश्यति " अशी शास्त्रमर्यादा आहे, हें ध्यानीं आणून गोखल्याचे खात्रीस दरद बाळगून पुणियास संस्थानचे प्रयत्नासी प्रविष्ट जाहलों नाहीं. सात वर्षे त्यांचा अंमल सन १२२७ फसली मिनहू असीजेपरीयंत जे सदरहू नेमणूक करून दिल्ही, तेच अनुभव करून घेऊन सिनपैया हें होते. कलम.

१ सांप्रत कुंपणी अंमल १२२७ फसली लागाईत संस्थान सुपुर्द व्हावें या प्रकर्णी अर्ज हजरत जरनेल मनरोल साहेब व एलफिस्टनसाहेब व चापलीनसाहेब बहादूर यांजपाशीं करून घेतला. त्यासी दर्यामी होणें ते होऊन चालते खर्चाबद्दल पेनशन मोकरर कुंपणीसरकारांतून करून दिल्हे रुपये ३००० कुंपणी तीन हजार सन १२२९ फसली सुरुसन अशरीन मयातेन व अलफ. कलम.

येणेंप्रमाणें सदरहू वंशावळी मोहीम दौलत मिळविल्याची कैफियत लिहिली आहे. हल्लीं जयंतीबाई वेंकटाद्री श्रीनिवास बहादर देसाई दौलतीस सन १२२९ फसली विक्रमनाम संवत्सर चैत्रमासपासून सदरह सरंजाम नेमणूकप्रमाणे अनुभवीत आहे म्हणून लिहून दिल्ही कैफियत. सही तारीख छ १० माहे आकटोबर सन १२३१ फसली विषु संवत्सरें सुरुसन इसन्ने आशरीन मयातैन व अलफ माहे मोहरम.

रुजू जयंतीबाई वेंकटाद्री श्रीनिवास बहादर देसाई.

---

## ४ बागलकोटकर देसाई.

विक्रमनाम संवत्सरें, चैत्र वद्य १४ तालुके बागलकोट, देसाई व नाडगौडा व देशपांडे यांणीं लिहून दिल्ही कैफियत ऐसाजे.—सुरुसन १२२९ फसली, साहेबी हुकूम फर्माविला कीं, बागलकोट किल्ला कोणी बांधिला, बांधिल्यास किती साले झालीं, बांधिला त्याचें नांव काय, कोण कोणत्या, पादशाहाकडे किती किती साल चालिला, ते समयीं वतनदार कोण कोण झाले, जमी कोण कोणाचे कारकीर्दीत कस कशी झाली, म्हणून त्याजवरून नानाराव मामलेदार यांनीं आह्मांस विचारलें. त्यावरून लिहून दिल्हें तितपशील:—

३६ रामराजा नरपती विजयनगर इस्तकबील शके १३६२ रौद्रीनाम संवत्सर लागायत शके १३९७ मन्मथनाम संवत्सर एकूण साल याजपाशीं तिमाप्पा प्रधान होता. त्याजवळ रायबाग ह्मणणार होता. त्यास नरपती याची स्वारी तोरगलास आली ते समयीं कदरूर ऊर्फ हवेली येथील कामकाज सांगितलें व गढी बांधणें म्हणून हुकूम केला. त्याजवरून रायबाग यांनीं कदरूर ऊर्फ हवेली ही पाडून, ती जागा सोडून दुसरी जागा नाहीं, हें पाहून तेथें शके १३९० विलंबीनाम संवत्सरीं प्रारंभ करून गढी तयार करून पेठेची वसाहत करविली; आणि गढीचें नांव बागलकोट म्हणून त्या लागायत परगणे बागलकोट म्हणून नांव चालविलें आहे. ते समयीं जमीदार यांनीं नरपतींस विजयनगर येथें जाऊन

अर्ज केला कीं, कदरूर ऊर्फ हवेली परगणा सरकार तोरगल येथें झाडी वाढून जंगल गर्द होऊन गेलें आहे. त्यास खावंदांनीं आह्मांस कांहीं नूतन इनाम करून दिल्हीया जमिनीचे कीर्दी महामुरी करून परगणे आकारास आणितों. त्याजवरून जमीदार, सरकार-उपयोगी जाणून, शके १३७५ श्रीमुखनाम संवत्सरांत वतन करार करून दिल्हें.

एकूण छत्तीस वर्षे नरपती यांनीं राज्य केलें. नंतर दिल्ली पादशाहा याची फौज येऊन त्याची याची लढाई जाहली. शेवटीं नरपती याचें शिर कापून नेलें. ते दवलत गर्क होऊन गेली.

९. सुलतान महमद अल्ली बादशाहा बेदर याची पैवस्ती सन ८८६ फसली शके १३९८ दुर्मुखीनाम संवत्सर लागायत सन ८९४ फसली शके १४०६ क्रोधीनाम संवत्सरपर्यंत राज्य केलें. एकूण साल वतनदार कदीम नरपती याचे कारकीर्दींत चालत आल्याप्रमाणें अनुभव केला.

सदर बादशाहा यांनीं विजापूर किल्ला बांधोन तेथें जाऊन गैफ जाहले.

२००. इसुफखां गोगी बादशाहा विजापूर यांनीं राज्य केलें. इस्तकबील सन ८९५ फसली विश्वावसुनाम संवत्सर लागायत सुलतान शिकंदर बादशाहा दौलत अखेर सन १०९५ फसली शके १६०७ क्रोधनाम संवत्सर एकूण साल २००.

२३. बादशाहा सदर इसुफखां गोगी इस्तकबील ८९५ फसली लागायत सन ९१७ फसली एकूण साल २३.

१९. बादशाहा इस्माल गोगी इस्तकबील सन ९१८ फसली लागायत सन ९३७ फसली मिनहू एकूण साल सदरीं वतनदार कदीम इनाम प्रमाणें सररास चालले.

२६. बज्याम गोगी बादशाहा व मल्लुखां पादशाहा इस्तकबील सन ९३७ फसली लागायत सन ९६३ फसली एकूण साल. सदर वतनदार कदीम इनाम बमोजीब.

२३. अल्ली आदिलशा पादशाहा बुदरुक लगर इस्तकबील सन ९६४ फसली लागायत सन ९८७ फसली एकूण साल. त्या वेळीं बारगी देवी नाईक व मली नाईक यांजकडे बागलकोट होता. त्यास सन ९७५ फसली सालीं हुकूम जाल्हा कीं, बागलकोट ही लहान गढी आहे, ती पाडून किल्ला मजबूद चांगला संगीन बांधणें म्हणून. त्याजवरून उभयतां नाईक यांणीं किल्ला बांधावयास प्रारंभ करून, विजापूर बादशाहा यांजकडे जासूदजोडी पाठविली. तों दोनप्रहर दिवसास विजापुरास बादशाहा यांस पत्र देऊन खबर सांगितली. त्याजवरून बादशाहा यांणीं विचारलें कीं, येथून बागलकोट किती कोस आहे?, तेव्हां जासूद यांणीं सांगितलें कीं, येथून वीस कोस येईल. त्यास पत्र द्यावयास हुकूम जाहल्यास सायंकाळीं बागलकोटास जाऊन पोंहचतील. त्याजवरून बादशाहा यांणीं हुकूम नाईक यास पाठविला कीं, विजापूर आहे तेलगत संगीन किल्ला बांधावयास कारण नाहीं. कच्ची इमारत बांधून किल्ला तयार करा.

त्याजवरून नाईक यांणीं कच्ची इमारत बांधोन किल्ला तयार केला. त्या वेळीं जमीदार कदीम इनाम वतन सररास अनुभव केलें.

४७. इब्राम आदिलशा जगद्गुरु पादशाहा इस्तकबील सन ९८७ फसली लागायत सन १०३४ फसली मिनहू एकूण साल इनाम चाललें.

३०. सुलतान महमद पादशाहा इस्तकबील सन १०३४ फसली लागायत सन १०६४ फसली मिनहू एकूण साल इनामदाराकडे इनाम चाललें.

१९. अली आदिलशाहा बादशाहा इस्तकबील सन १०६४ फसली लागायत सन १०८२ फसली एकूण साल इनाम चाललें.

१३. सुलतान शिकंदर पादशाहा इस्तकबील सन १०८२ फसली एकूण साल.

एकूण दोनशें वर्षे विजापूर पादशाहा यांणीं राज्य केलें. नंतर आलमगिरी पादशाहा तख्त दिल्ली फौजसुद्धां येऊन सदर सुलतान शिकंदर पादशाहा विजापूर यास बुडविलें सन १०८६ फसली.

२१. आलमगिरी पादशाहा तख्त दिल्ली सन १०८६ फसली लागायत सन १११६ फसली मिनहू एकूण साल.

४९. नबाब सावनूरकर हे, साहेबी मोख्तीयारीनें करूं लागले. इस्तकबील सन १११७ फसली लागायत सन ११६५ फसली मिनहू एकूण साल ४९.

एकूण एकोणपन्नास वर्षे दौलत मोख्तीयारीनें केल्यानंतर सन ११६५ फसली सालांत श्रीमंत बाळाजी बाजीराव प्रधान व त्यांचा बंधु सदाशिवराव चिमणाजी यांनीं फौजसुद्धां येऊन बागलकोटास मोर्चेबंदी करून महिना पंधरा दिवस बसले. तदनंतर किल्लेदार वगैरे लोक सल्हेनें उतरोन सावनुरास गेले. तेच वेळीं श्रीमंत पेशवे यांचें ठाणें बागलकोटास कायम झालें.

६३. पेशवे बाळाजी बाजीराव प्रधान इस्तकबील सन ११६५ फसली लागायत सन १२२७ फसली मिनहू बाजीराव रघुनाथ प्रधानपर्यंत एकूण साल ६३.

एकूण त्रेसष्ट वर्षे अनुभव केला. नंतर पुणेंवर श्रीमंत राजश्री पेशवे यांसी व सरकार कुंपणी यास लढाई झाली. ते समयीं पुणें सोडून निघोन गेले. नंतर जनरल मंड्रोल साहेब फौजसुद्धां येऊन बदामीस वेढा देऊन मोर्चेबंदी करून हल्ला करून किल्ला घेतला. हें बागलकोटकर किल्लेदार वगैरे यांनीं ऐकून, माघ शु॥ १४ दिवशीं किल्लेदार व लोक व × × × किल्ला मोकळा टाकून निघोन गेले.

२. सरकार कुंपणी इसवी सन १२२७ फसली माघ वद्य दिवशीं ठाण्यास जर्नल मंड्रोल साहेब येऊन किल्ल्याचा बंदोबस्त करून नानाजीराव यांजकडे मामलत सांगितली. त्या लागायत सन १२२९ फसली मिनहू एकूण साल २.

---